प्रसाद-प्रकाशन-क्रमांक : : २ : :

( महाराष्ट्र-स्तोत्र )

# स ह्या द्रि

लेखक :

श्री. सदाशिव आत्माराम जोगळेकर,

एम्. ए., एल्एल्. बी.

मूल्य दहा रुपये

प्रकाशक :

श्री. यशवंत गोपाळ जोशी, प्रसाद-प्रकाशन-कार्यालय,

६२३/१५ सदाशिव पेठ, पुणें नं. २.

मुद्रक :

श्री. र. राजगुरु,
राजगुरु प्रेस,
४०५ नारायण पेठ,
पुणें नं. २.

मुखपृष्ठावरील चित्र श्री. जि. भि. दीक्षित

प्रकाशन दिनांक : ३।८।१९५२

याच लेखकाचीं इतर पुस्तकें

१. **मानवी कर्तव्यें** : ( Duties of Man )
प्रथमावृत्ति : १९२१. किमत १ रुपया. अप्राप्य.
द्वितीयावृत्ति : १९२४. किमत १ रुपया. अप्राप्य.

२. **जोसेफ मॅझिनी** : चरित्र, काल व विचार
१९२३. किमत २ रुपये. अप्राप्य.

३. **स्वातंत्र्याचीं मूलतत्त्वें** : (Principles of Freedom)
१९२७ किमत १॥ रुपया. अप्राप्य.



आगामी

**गा था स प्त श ती**

प्राकृत गाथा, संस्कृत छाया, मराठी भाषांतर व टीका,
पाठभेद, संदर्भ, परिशिष्टें, शब्दकोश आणि
विस्तृत विवेचक प्रस्तावना.

# प्रस्तावना

या ग्रंथांत समाविष्ट केलेल्यापैकीं ' महाराष्ट्र-स्तोत्र ' हा लेख प्रथम ' प्रसाद ' मासिकाच्या पहिल्या अंकांत प्रसिद्ध झालेला आहे; आणि ' सह्याद्रि ' ही लेखमाला ' प्रसाद 'च्या चवथ्या व पांचव्या वर्षांच्या अंकांतून क्रमशः प्रसिद्ध झालेली आहे. पैकीं ' महाराष्ट्र-स्तोत्र ' हा लेख स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीं लिहिलेला. पुनर्मुद्रणापर्यंत झालेल्या विविध घटना विचारांत घेऊन मूळ लेखाचा जागोजाग संक्षेप केलेला आहे. उलटपक्षीं ' सह्याद्री 'तील मूळ मजकुराचा पुनर्मुद्रणाचे वेळीं विस्तार केलेला आहे; कधीं सन्मित्रांच्या सूचनांवरून आणि केव्हां संकल्पित विवेचनापैकीं कालाभावीं अगर अनवधानामुळें राहून गेलेला मजकूर लेखांत समाविष्ट करण्याची पुन्हां संधि उपलब्ध झाल्यामुळें. तसें पाहिलें तर महाराष्ट्र-स्तोत्र हीच सह्याद्रीची प्रस्तावना आहे.

भूगर्भशास्त्रज्ञ सांगतात कीं सह्याद्रि पर्वत उद्रेकजन्य आहे. ' सह्याद्रि ' ह्या लेखाची जन्मकथा अशीच आहे. महात्माजींच्या वधानंतर महाराष्ट्रांत जातीयतेचा डोंब जाळपोळीच्या रूपांत उसळला. त्यानंतर सुमारें आठवडाभर पुण्यांत संचारबंदीचा अंमल होता. या फुरसतीच्या दिवसांत प्रक्षुब्ध मनःस्थितींत मीं सह्याद्रि हा लेख लिहिला. तेव्हां त्याचा विस्तार मर्यादित होता; पण त्यांतील विचार व भावना अत्यंत प्रक्षोभक होत्या. त्या स्वरूपांत लेख प्रसिद्ध झाला असता तर कांहीं तरी विपरीत प्रकार खास ओढवला असता. हे जाणून तो लेख वाचून पाहिल्यावर माझे स्नेही व सहकारी श्री. यशवंतराव जोशी यांनीं मला संयमाचा सल्ला दिला. विचारांतीं तो मला पटला. म्हणून सह्याद्रि फिरून लिहून काढावयाचें ठरविलें. पुनर्लेखनाचें काम सुरू झालेंही; पण अनेक विषयांच्या भट्ट्या लावलेल्या असल्यामुळें हें काम रेंगाळलें. पुढें श्री. जोशी यांनीं लेखाबाबत एवढा तगादा लावला कीं तो देण्याघेण्याच्या व्यवहाराबाबत असता तर ऋणकोनें पोलिसांत वर्दी देणें न्याय्य ठरलें असतें! नियतकालिकासाठीं ठराविक वेळांत लेख

लिहून द्यावयाचा सराव मोडलेला असल्यामुळें आणि चरितार्थाचा व्यवसाय सांभाळून हा उद्योग करावयाचा असल्यामुळें गेल्या दोन वर्षांत फार कष्ट करावे लागले. सावकार तगादा करतो, तेव्हांच ऋण फिटतें. त्याचप्रमाणें नियतकालिक-नेट लागतो, म्हणूनच आमच्यासारखे आळशी व चुकार अन्यव्यवसायी लोक थोडेंबहुत लेखन करूं शकतात! पहिल्या लेखांकाचा मजकूर लिहून होतो न होतो तोंच दुसऱ्या लेखांकाचा तगादा सुरू होऊं लागला. याप्रमाणे लेखमाला अपुरी राहण्याचा धोका पत्करून, खणपटीस बसून श्री. जोशी यांनीं हा ग्रंथ मजकडून पुरा करून घेतला. मोबदल्यावर नजर ठेवून मी लेखन करीत नाहीं; शिवाय मी लिहितों त्या धर्तीच्या व दर्जाच्या लेखनाला कोण व कितीसा मोबदला देणार? श्री. जोशी हे प्रसादचें प्रकाशन किफायतीसाठीं करीत नाहींत, तोंडमिळवणीही होत नाहीं, हें उघड आहे. म्हणूनच कीं काय कोण जाणें, आम्हां तिघां संपादकांच्या सहकार्याच्या अल्पजीवित्वाबद्दल आमच्या हितचिंतकांकडून आगाऊ वर्तविण्यांत आलेलीं भाविष्यें पडताळयास उतरूं शकलीं नाहींत! 'सह्याद्री'त प्रसाद आहे किंवा कसें हे वाचकांनी ठरवावयाचें आहे; 'प्रसाद' मध्यें सह्याद्रि प्रथम प्रकाशित झाला, एवढेंच नव्हे, 'प्रसाद'मुळेंच सह्याद्रीचा संकल्प व संभव झाला, हे मात्र अगदीं खरे!

सह्याद्रि ही लेखमाला सुरू झाल्यानंतर प्रसादच्या सुसंस्कृत वाचकांपैकीं अनेकांनीं मला प्रोत्साहन दिलें आणि कांहीं स्नेह्यांनीं वेळोवेळीं अनाहूत प्रशंसा केली. यामुळें हा विषय वाचकांना प्रिय आहे असें प्रत्ययास आलें आणि लेखमाला पुरी करण्याचा उत्साह अखेरपर्यंत टिकला; यामुळेंच, मला वाटते, हा लेख कांहीं ठिकाणीं विशेष रंगला आहे; निदान असें माझ्या कांहीं स्नेह्यांचें म्हणणें आहे. व्यासपीठावरील साथीदारांच्याच नव्हे, भोवतालच्या रसग्रहणोत्सुक श्रोत्यांच्या व प्रेक्षकांच्या समरसतेमुळें व प्रोत्साहनामुळें गायनाची मैफल किंवा कुस्त्यांची दंगल रंगते, हा अनुभव होता; वाचकांच्या आनुकूल्यामुळें लेखनही रंगतें, हा अनुभव नवा व अनपेक्षित. लेखकाला जीवनाचा साक्षात्कार एकांतांतच होतो; स्वानुभवांच्या निवेदनामुळें प्राप्त होणाऱ्या

स्वानंदाच्या लहरींत लेखन होत असतें; वाचकांच्या भावनेची प्रतिक्रिया अपेक्षित असली तरी ती प्रकाशनानंतर लेखकाच्या प्रत्ययास यावयाची असते. सह्याद्रीच्या बाबतींत अशी प्रतिक्रिया मला अल्पांशानें आगाऊ समजूं शकली; कारण सह्याद्रि लेखमालेच्या स्वरूपांत प्रसिद्ध झाला; अर्थात् या लेखांतील कांहीं भाग कोणास आवडला तर त्याचें श्रेय प्रसादच्या वाचकांच्या सहानुभूतीला व आश्वासक उत्तेजनालाच दिलें पाहिजे.

प्रसादच्या वाचकांनीं अनुग्रहाची कृपा केली. त्याचप्रमाणें थोडेंबहुत दोषदिग्दर्शनही केलें आहे. त्यांपैकीं कांहींचा येथें उल्लेख करणें जरूर आहे.

ज्योतिर्लिंगसंकेताबाबत शिवपुराणाच्या मूलस्तंभांतील उतारा पृ. ३८ वर उद्धृत केलेला आहे. त्यांत 'ओंकारममलेश्वरम्' असा पाठ आहे. प्रथम भौगोलिक स्थान द्यावयाचें आणि नंतर ज्योतिर्लिंगाचें अभिधान, अशी मुळांतील मांडणी आहे. ओंकारमांधाता येथील अमलेश्वर, असा या पाठाचा सरळ अर्थ आहे. अर्थात् महाराष्ट्रांतील ज्योतिर्लिंगांची संख्या मी तेथें नमूद केल्याप्रमाणें आठ नसून सात आहे; त्याचप्रमाणें पृ. ३९ वर ममलेश्वर म्हणजे महाबळेश्वर असें सांगितलें आहे तेंही या संदर्भापुरतें चूक आहे. चूक व्याकरणाची व गणिताचीही. माझे हे दोन्ही विषय मुळापासून कच्चेच. मसूरचे श्री. कृष्णाजी धोंडो तळवलकर यांनीं ही चूक माझ्या निदर्शनास आणली. समर्थन म्हणून नव्हे, चुकीचें कारण सांगतों : महाबळेश्वराचें मूळचें नांव ममलेश्वर आणि येथे ज्योतिर्लिंग आहे अशी स्थानिक आख्यायिका आहे. एवढेंच ध्यानांत राहिल्यामुळे ही चूक झाली. साधी बेरीज करून पाहण्याचेही व्यवधान राहिलें नाहीं. अधिकृत ज्योतिर्लिंगांत महाबळेश्वर व गोकर्ण यांचा समावेश होत नाहीं ( ज्योतिर्लिंग : श्री. मुळे, पृ. ५७ ). ज्ञानकोशांत मात्र गोकर्ण हे ज्योतिर्लिंग आहे असें सांगितलेलें आहे.

लाटप्रकरणांत दाला देसायाच्या कन्येची दंतकथा दिलेली आहे ( पृ. २७६–७ ). या कथेंतील कांहीं चुका माझे मित्र श्री. लालजी पेंडसे यांनीं माझ्या निदर्शनास आणल्या. वाघजी पटेल हा

बोरसदचा रहिवासी आणि दाजी पटेल वसईचा, असें मीं सांगितलें आहे, तें चूक आहे. हीं गांवें बोरसद व डभई हींच असलीं पाहिजेत. श्री. पेंडसे कळवितात, “ पादरा, बोरसद व बडोदे हीं गांवें त्रिकोणांत वीस - पंचवीस मैलांच्या परिघांत आहेत. डभोई बोरसदच्या ओळीला जरा तिरपेसें आहे. सुजातखानानें मुलीला पळवावयाची तर ती उत्तर गुजरातेतीलच असली पाहिजे. पटेलांची मुख्य वस्ती खेडा जिल्ह्यांत. त्यांतलें बोरसद हे तालुक्याचे ठिकाण आहे. उन्हई ही आदिवासींची देवी आहे. हे बिलिमोरा–वघई या आगगाडीच्या फाट्यावरील एक स्टेशन आहे. येथें वज्रेश्वरीप्रमाणें गरम पाण्याचीं कुंडें आहेत. येथून सोनगड सुमारें चाळीस मैलांवर आहे. आपण ही जी गोष्ट सांगितली ती मीं डभईस लहानपणीं ऐकलेलीहि आहे. अर्थात् तिला ऐतिहासिक आधार किती आहे कोण जाणे! पण विस-नगरसारखीं सबंध गांवेंच्या गांवें मुसलमानांनीं भ्रष्टावलेलीं आहेत.”

रत्नागिरीचे श्री. शामनाथ काशीनाथ जोशी यांनीं सह्याद्रि-खण्ड आणि महाराष्ट्रीय ब्राह्मणांतील सारस्वत, कऱ्हाडे व चित्पावन या गटांबद्दल बरीच माहिती कळविलेली आहे. ही माहिती फार उशीरां हातीं आली. शिवाय या विषयाचा परामर्श मी स्वतंत्र लेखांत घेणार आहें, म्हणून आतांच त्याची चर्चा करीत नाहीं. ठाणें येथील श्री. रामचंद्र गोविंद शेळकंदे कळवितात कीं मीं सांगितल्याप्रमाणें ( पृ. ४६३ ) जव्हारचे राजे मल्हार कोळी नसून महादेव कोळी आहेत. ह्यांचें म्हणणें बरोबर आहे. ज्ञानकोशांत संदर्भ पाहिला, तोही तसाच आहे.

पुनर्मुद्रणाच्या वाचकांनीं या चुका दुरुस्त करून वाचाव्यात अशी विनंति आहे. या चुका निदर्शनास आणणाऱ्या सज्जनांचे आभार मानतों.

जशी दृष्टि तशी सृष्टि; व्यक्ति तितक्या प्रकृति, या म्हणींचा प्रत्यय व्यक्तिमात्राला हरघडीं येत असतो. सह्याद्रीकडे जो ज्या वृत्तीनें व दृष्टीनें पाहील त्याला त्यांना पोषक अशीं सत्त्वें येथें हमखास आढळतील, इष्ट, तशींच अनिष्ट. येथें कोणाला संवर्धक बीजशक्ति आढळेल, तर

कोणाला विघटनेचीं बांडगुळें दिसतील. इतकेच नव्हे, व्यक्तिशः जसे आपण असतों तसा तो भासतो; सह्याद्रि व त्याचा परिसर एवढेंच नव्हे, त्यावरून दिसणारीं दृश्येही. सह्याद्रीच्या कांहीं उत्तुंग शिखरांवरून उन्हाळयांत सकाळच्या वेळांत प्रेक्षकाला आपली पडछाया मेघमंडलांत सप्तरंगी वर्तुलाकृति इंद्रवज्रांत आतिवर्धित स्वरूपांत दिसते. इंद्रधनुष्य अर्धवर्तुलाकृति असतें, हें धनुष्य वर्तुलाकृति असतें, म्हणून त्याला इंद्रवज्र हा शब्द योजला आहे. १८३५ सालीं कर्नल साइक्स घोडेस्वार होऊन हरिश्चंद्रगडाच्या कोकणकड्यावर गेला होता. वेळ सकाळची होती. पूर्वेकडे निरभ्र आकाशांत कोंवळा सूर्यप्रकाश होता; पश्चिमेकडे अपरान्तांतून दाट व शुभ्र धुकें वर चढत होतें. त्याच्या पृष्ठभागावर, सुमारें साठ फूट व्यासाच्या सप्तरंगी इंद्रवज्रांत साइक्सला एकाएकीं आपली पडछाया दिसूं लागली ( Bombay Gazetteer : Ahmadnagar : p. 718 ). माझे स्नेही वै. श्री. पुरोहितस्वामी हे तपश्चर्येसाठीं लोणावळयानजीक तुंगारलीवर वास्तव्य करून राहिले होते; त्यांनाही स्वतःची आसनस्थ पडछाया वैशाखांत वारंवार दिसत असे, असें त्यांनीं सांगितल्याचें स्मरतें. अशीं दृश्यें दिसलीं म्हणजे आपणांस कांहीं साक्षात्कार होत आहे असें आमच्यासारख्या अनभिज्ञांस भासतें. अशाच कांहीं स्वसंतुष्ट गैरसमजुतीमुळें माझ्या हातून या ग्रंथांत कांहीं अनधिकारी विचार व भावना प्रकट झाल्या असल्यास सुज्ञ वाचकांनीं त्यांबद्दल क्षमा करावी अशी विनंति आहे.

सह्याद्रीचा प्रदेश व त्यावर स्थायिक झालेले मानव या आणि तद्भव व तत्सम विषयांचा अभ्यास अनेक शास्त्रीपंडितांनीं आजवर केलेला आहे. त्यांनीं संशोधित व संकलित केलेल्या सामुग्रीमुळेंच मला हा लेख लिहितां आला हें उघड आहे. त्यांच्या लेखनापैकीं जें माझ्या तुटपुंज्या वाचनांत आलें त्याचा मी भरपूर उपयोग केलेला आहे आणि शक्य व अवश्य तेथें जागोजाग मूळाचा निर्देशही केलेला आहे. सह्याद्रि या विषयाची मांडणी मीं स्थूल मानानें भौगोलिक-समाज-नियोजन-शास्त्राच्या अनुरोधानें केलेली आहे. हे शास्त्र नवीन आहे. त्याचे

सिद्धांत अद्याप सर्वमान्य झालेले नाहींत. कारण ते अद्याप अपरिपक्व अवस्थेंत आहेत आणि प्रत्यक्ष प्रयोगांच्या अशक्यतेमुळें त्यांची मान्यता अनुभवजन्य नसून अनुमानजन्य आहे. ही लेखमाला मी शास्त्री-पंडितांसाठीं लिहिलेली नाहीं; कारण तेवढा या शास्त्राचा माझा अभ्यास नाहीं; सर्वसाधारण मराठी वाचकांसाठीं लिहिलेली आहे. या दृष्टीनें विषयाची मांडणी केलेली आहे. प्रसादच्या पाहिल्या वर्षांत 'गोदावरी' हा लेख मीं याच धोरणाने लिहिला होता. संकल्पित मांडणीचा तोल कांहीं ठिकाणीं ढळलेला आहे; जागोजाग विषयाच्या ओघांत मीही वहावलों आहें; ठिकठिकाणीं पुनरुक्ति झालेली आहे; हें आतां कळतें. मुद्रणप्रत संपूर्ण तयार झाल्यानंतर प्रकाशनाला दिली असती तर किती तरी भाग वगळतां आला असता; पण आतां झाल्या-गेल्याला इलाज राहिलेला नाहीं. ह्या दोषांबद्दल वाचकांनीं मला क्षमा करावी अशी विनंति करतों आणि या ग्रंथांतील दोष कोणीं माझ्या निदर्शनास आणले व पुनरावृत्तीचा सुप्रसंग आला तर ते सुधारण्याचा प्रयत्न मी प्रामाणिकपणें करीन असे आश्वासन देतो.

सह्याद्रि ह्या लेखमालेचा विस्तार माझ्या व प्रसादच्या संपादकीय संकल्पाबाहेर वाढला. मी स्वतः प्रसादच्या संपादकांपैकीं एक असल्यामुळेंच तो पुरा झाला व प्रसादमध्यें प्रसिद्ध होऊं शकला. एका लेखांकाच्या विस्तारावर कोणत्याही अन्य संपादकानें लेखमालेच्या प्रसिद्धीला सुरुवात केली नसती, त्याचप्रमाणे एवढी लांबण लावूं दिली नसती.

ह्या ग्रंथाच्या कामीं अनेक स्नेह्यांचें साह्य झालेलें आहे. त्या सर्वांचे नामनिर्देश न करतां आभार मानतों. मे. राजगुरु प्रेसचे श्री. गानू तर सांगतात कीं मुद्रितांत फिरवाफिरव करण्याचे बाबतींत त्यांना माहीत असलेल्या लेखकांत माझा क्रमांक दुसरा लागतो! त्यांचें सौजन्य तर आम्ही विसंबण्यासाठीं गृहीत धरले होते!

आरंभिलेला ग्रंथ पुरा झाला याबद्दल आतां समाधान वाटत आहे. तीन-चार वर्षें ज्या विषयाच्या अध्ययनांत घालविलीं त्याचा सहवास संपल्यामुळें आतां चुकल्यासारखे वाटत आहे. तारुण्यांत विद्यालयीन अध्ययनकालांत स्नेह्यांसोबत्यांसह अनेक दिवस-रात्री सह्याद्रीच्या

सान्निध्यांत व पर्यटनांत घालविल्या; त्या वेळीं पाहिलेलीं दृश्यें व अनुभवलेले प्रसंग, उचंबळलेल्या भावना व उसळणारे विचार अंधुक, पण आतां उजळूं पाहणाऱ्या स्मृतींच्या स्वरूपांत चित्तासमोर वावरत आहेत. सह्याद्रीचीं अनेक स्वरूपें व वैशिष्टयें, ज्यांचा निर्देशही ह्या लेखमालेंत झालेला नाहीं, तीं आतां निदर्शनास येऊं लागलीं आहेत. ही लेखमाला वाचणाऱ्या माझ्या स्नेह्यांनीं आणखी किती तरी नवी माहिती अलीकडे पुरविली आहे, नवे सिद्धांत निवेदित केले आहेत, नव्या समस्या सुचविल्या आहेत. उदार ग्राहकांच्या अनुग्रहामुळें सह्याद्रीच्या पुनर्मुद्रणाची दुर्मिळ सुसंधि प्राप्त झाली तरच या सामग्रीचा परामर्श घेतां येईल. त्या उमेदींत तोवर टिपणें-टांचणें करीत रहावयाचें हाच या विषयापुरता या पुढचा उद्योग!

माझी ही चतुर्थ कृति महाराष्ट्राला प्रिय होईल अशी आशा आहे.

ता. १ ऑगस्ट १९५२.
३७४ शुक्रवार पेठ, पुणें.

स. आ. जोगळेकर

---

# सह्याद्रि

हे पुस्तक लेखमालेच्या रूपानें पहिल्यांदां आमच्या प्रसाद-मासिकांतून प्रसिद्ध झालें, आणि ते आज पुस्तकरूपानें प्रसिद्ध होत आहे. ही लेखमाला प्रसाद-मासिकांतून प्रसिद्ध होत असतांना अनेक वाचकांचीं गौरवपर पत्रे आलीं, आणि ही माला पुस्तकरूपानें प्रसिद्ध करावी अशा अनेकांच्या सूचनाही आल्या. रियासतकार सरदेसाई, महामहोपाध्याय दत्तोपंत पोतदार, प्रा. न. र. फाटक इत्यादींचें लक्ष या लेखमालेने वेधून घेतले होतें. आज ती लेखमाला पुस्तकरूपानें प्रसिद्ध होत आहे. सह्याद्रि मराठी वाङ्मयाचें भूषण ठरेल असें अनेक विद्वानांनी सांगितलें आहे. विषयाचें वैशिष्ट लक्षांत न घेतलें तर लोकमान्यांच्या **गीतारहस्या**नंतर हेंच महत्त्वपूर्ण पुस्तक प्रसिद्ध होत आहे असें एका सर्वमान्य विद्वानानें माझ्यापाशीं उद्गार काढले

आहेत. यांत अतिशयोक्ति आहे असें मलासुद्धां वाटतें; पण त्यांत अर्थही खास आहे!

हें पुस्तक प्रकाशित होत असतांना माझी एक जुनी वैयक्तिक आठवण येथें ग्रथित करून ठेवावी असा मोह होतो आहे.

सुमारें बावीस वर्षांपूर्वी या ग्रंथाचे लेखक श्री. स. आ. जोगळेकर हे त्या वेळीं नवीनच निघालेल्या ' यशवंत ' मासिकाचे संपादक होते आणि ज्याच्या कथा बहुतेक सर्व मासिकें नियमानें परत करीत असा मी एक अप्रसिद्ध लेखक होतों. त्या वेळीं मी सदुभाऊ जोगळेकरांना प्रथम भेटलों व माझी " एक रुपया दोन आणे " ही अनेक मासिकांकडून परत आलेली कथा त्यांना वाचनाकरितां दिली व त्या गोष्टीचा परतीचा इतिहासही त्यांना सांगितला व " माझी ती कथा आपणांस न आवडल्यास परत करण्याऐवजीं फाडून टाका व मला तसें कळवा म्हणजे माझ्याजवळ घरीं लिहून पडलेलें इतर लेखन फाडून टाकून मीं लेखनव्यवसायाच्या नांवानें आंघोळ करण्याचें ठरविलें आहे " असें त्राग्यानें सांगितलें! पण श्री. सदुभाऊ जोगळेकर यांनीं ती माझी कथा अगत्यानें छापली आणि ' यशवंत ' मध्येच माझ्या ' शेवग्याच्या शेंगा ' स्पर्धेंत पहिल्या आल्या आणि मराठी वाङ्मयांत मला जागा मिळाली! श्री. सदुभाऊ जोगळेकरांना भेटतांना ही गोष्ट मला नेहमीं आठवते आणि आज श्री. सदुभाऊ जोगळेकर आणि मी प्रसादचे सहकारी संपादक आहोंत. त्यांचें ' सह्याद्रि ' हें पुस्तक मी प्रकाशित करीत आहें आणि आशा वाटते आमचें सहकार्य लक्षांत घेतां मराठी वाङ्मयाची आमच्या हातून आणखी सेवा होईल अशी अपेक्षा करायला हरकत नाहीं!

तसेंच माझें पहिलें पुस्तक कोणी छापायला तयार होईना म्हणून कांहीं स्नेह्यासोबत्यांच्या मदतीनें मीं माझें पहिलें पुस्तक छापलें आणि त्यांत यश आल्यामुळें मी प्रकाशनव्यवसायांत पडलों. त्यामुळे एकंदर ' अडचणींविषयीं मला फार लोभ वाटतो. त्यांतूनच कांहीं तरी चांगलें निर्माण होतें असा माझ्या आयुष्याचा अनुभव आहे. या

अडचणींतून 'लोभ' निर्माण होतात–माणसें एकत्र येतात–कांहीं तरी कार्य होत राहतें! आणि मला वाटतें माणसाचें फार चांगलें चालूंच नये–त्या वेळीं माणसामाणसांत चलबिचल होते–कार्यावरचें लक्ष उडून वैयक्तिक स्वार्थाकडे जातें–किंवा कार्याची मनोराज्यें निर्माण होतात–आणि कांहीं बरें होत नाहीं!

मी प्रकाशनव्यवसायांत पडल्यापासून 'राजगुरु प्रेसमध्यें' माझें काम चालू आहे आणि अडचणींतून कार्य कसें होतें पहा–त्यांचें मला कांहीं देणें आहे-तें येण्याकरितां त्यांना माझें पुढचें काम नाकारतां येत नाहीं आणि पुढें काम चालू राहिलें कीं मला पहिले पैसे द्यावे लागतात आणि तात्पर्य काम चालू राहते! आणि या लोकांचे आतांपर्यंत मीं इतके आभार मानले आहेत कीं, या वेळेला औपचारिकसुद्धां राजगुरु–गानू या मंडळींचे आभार मानीत नाहीं.

पण राजगुरु प्रेसमधील कंपॉझिटर श्री. काठे यांचे मात्र मुद्दाम आभार मानतों. श्री. जोगळेकर हे विद्वान् असल्यामुळें आणि रोज रोज त्यांची कल्पनाशक्ति आणि विचार पालवत असल्यामुळे ते मजकुरांत इतका बदल करीत–श्री. काठे यांना मुद्रितांत इतकी फिरवाफिरव करावी लागे कीं, मला वाटतें सह्याद्रि पूर्ण झाला याचा सर्वांपेक्षां त्यांनाच जास्त आनंद झाला असेल! संपली ती फिरवाफिरव आणि कोष्टकें! सह्याद्रीचीं तपासून आणलेलीं प्रुफें न्यायला ते सह्याद्रीचा एखादा घाट चढून आल्यासारख्याच दमलेल्या चेहऱ्यानें येत–आणि "मागच्यापेक्षां या फॉर्ममध्यें फिरवाफिरव कमी आहे" असें सांगून मी त्यांचें सांत्वन करीत असें. तात्पर्य, काय–अडचणींतून आणि कष्टांतूनच चांगलीं कामें निर्माण होतात!

तात्पर्य, माझ्या अडचणी हरहमेश वाढाव्या आणि 'सह्याद्रि' सारखीं अनेक प्रकाशनें माझ्या हातून व्हावींत हीच परमेश्वरापाशीं प्रार्थना!

सर्वांचा कृपाभिलाषी,

**यशवंत गोपाळ जोशी**

# अनुक्रमणिका



( येथें फक्त महत्त्वाच्या शीर्षकांचा निर्देश केलेला आहे. )

## सह्याद्रींतील किल्ले : ५५–१३३

## सह्याद्रींतील लेणीं : १३४–२६४

## अपरान्त : २६५–३९९

## सागर-संस्कृतींशीं संघर्ष : ३००—३९९

## परशुराम : ३९९–४५५



## सह्याद्रीचा पिंड : ४५५–४७६

## सह्याद्रीशीं सहकार्य : ४७६–४९०



## सह्याद्रि-महात्म्य : ४९०–५०४



## सह्यादि-स्तोत्र : ५०४–५०९

# नकाशे, कोष्टकें व आकृति



---



**श्रीपरशुराम**

**त्रावणकोरमधील मूर्ति**

( मिसेस हॅच यांच्या 'त्रावणकोर' वरून )

१ :

# महाराष्ट्र स्तोत्र

महाराष्ट्राच्या माहात्म्यावर व महान् भवितव्यावर माझी पूर्ण निष्ठा आहे.

महाराष्ट्र, महाराष्ट्रीय व महाराष्ट्र-संस्कृति यांना हीन लेखण्याची प्रवृत्ति भारतांत फिरून रूढ होऊं पाहत आहे. त्याग व कार्य यांमुळें वंद्य, सदाचार व विद्वत्ता यांनीं संपन्न, संपत्ति व साधनें यांनीं समृद्ध असलेल्या अनेक व्यक्ति आपल्या वैयक्तिक माहात्म्याच्या आधारावर वेळीं-अवेळीं विधानें करीत असतात कीं महाराष्ट्र हें बालराष्ट्र आहे, कीं महाराष्ट्रीय लोक केवळ बुणगे आहेत, कीं महाराष्ट्र-संस्कृति रांगडी आहे. या विधानांचा प्रचार अखंडितपणें चालू असल्यामुळें त्यांना सिद्धांतांचें स्वरूप येऊं पाहत आहे. हे निष्कर्ष खरे असलेच पाहिजेत असा भ्रम आमचेपैकीं कांहीं विद्वानांनाही झाला आहे; यामुळें महाराष्ट्रांत न्यूनगंड निर्माण झालेला आहे. भूतकाळाबद्दल शरमण्याचें, वर्तमानकाळाबद्दल मिंधेपणा वाटण्याचें अगर भविष्य काळाबद्दल निराश होण्याचें महाराष्ट्रीयांना कांहींही व केव्हांही कारण नव्हतें व नाहीं.

विस्ताराच्या दृष्टीनें हिंदुस्थानांतील कोणत्याही एकजिनसी प्रदेशापेक्षां महाराष्ट्र देश मोठा आहे. महाराष्ट्राची पश्चिम सीमा सिंधुसागराच्या किनाऱ्यालगत कारवारपासून दमणपर्यंत आहे. तेथून सोनगडावरून नर्मदेपर्यंत व पुढें ओंकार मांधात्यापासून बऱ्हाणपुरावरून जबलपूरपर्यंत उत्तर सीमा आहे. पूर्व सीमा येथून दक्षिणेकडे राजनांदगांवावरून गोदावरी व इंद्रावती यांच्या संगमापर्यंत असून दक्षिण सीमा येथून निर्मळ, बेदर, गुलबर्गा, विजापूर, बेळगांव या शहरांवरून कारवारपर्यंत आहे. गुजरात, तेलंगण व कर्नाटक या आमच्या सीमांवरील देशांपेक्षां महाराष्ट्राचा प्रदेश अधिक विस्तृत आहे. मग याची जाणीव

मुद्दाम कां करून द्यावी लागते ? कोंकण हा एक वेगळाच भूप्रदेश आहे, तेथील वस्तुमात्राचा दर्जा आपल्याहून हीन आहे, असे देशावरील लोकांना अधून मधून वाटतें: गोमंतकांतील रहिवाशांच्या मनांत तुटकपणाची अंधुक कल्पना असते; परप्रांतीयांनीं मोठ्या प्रमाणावर वसाहती केल्यामुळें व भांडवल गुंतविल्यामुळें मुंबई महाराष्ट्रापासून स्वतंत्र आहे, निदान असावी, असें कित्येकांना वाटतें. इंग्रजांच्या राज्य कमावण्याच्या क्रमानुसार इलाख्यांची मांडणी केलेली असल्यामुळे विदर्भ व नागपूर हे प्रदेश तुटक झालेले आहेत; मोंगलाईतला मराठवाडा तर पुष्कळांना पाकिस्तानाइतका परका वाटतो. पण हे भेदभाव क्षुल्लक, क्षणिक व कृत्रिम आहेत. महाराष्ट्राचें ऐक्य नैसर्गिक आहे, ऐतिहासिक सत्य आहे; आणि हा विस्तृत देश हा एक एकजिनसी, सजीव घटक आहे; आज नाहीं. उद्यां, तो एकछत्राखालीं येणार आहे; हें स्वप्न नाहीं, ध्येय आहे, आणि तें क्षणाक्षणाला मूर्त स्वरूप धारण करीत आहे.

आणि हा महाराष्ट्र देश सौंदर्यानें नटलेला आहे. येथें हिमाच्छादित गिरिशिखरें नाहींत अगर काश्मीरसारखी वनश्री नाहीं; गंगायमुनेसारख्या नद्या नाहींत किंवा गिरसप्पासारखे धबधबे नाहींत. म्हणून काय महाराष्ट्रांत सृष्टिसौंदर्य नाहीं ? कारवारपासून दमणपर्यंत पडावांतून जावें, कोंकणपट्टींतून तेलगाडीनें जावें, सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांतून पायीं हिंडावें आणि देशावरील मार्गक्रमण आगगाडीनें करावें. मात्र हा प्रवास उघड्या डोळ्यांनीं, संवेदना ग्रहण करण्याच्या भावनेनें करावा; म्हणजे महाराष्ट्राचें सौंदर्य प्रत्ययास येईल. यात्रेकरू लोक नेहमीं प्रवास करतात, पण त्यांचें अंतःकरण आराध्य दैवतावरच एकाग्र झालेलें असतें; खेडवळ लोक अधून मधून आपल्या गांवच्या आजूबाजूच्या मुलखांत प्रवास करतात, पण त्यांचें अंतःकरण संवेदनाक्षम नसतें; सुशिक्षित म्हणवून घेणारे नागरिक या ना त्या कारणानें प्रवास करतात, पण त्यांची बुद्धि ऐहिक व्यवसायांत गुरफटलेली असते. महाराष्ट्राच्या सौंदर्याची खरी प्रतीति येण्यासाठीं उत्तर, पूर्व व दक्षिण हिंदुस्थानांतूनही प्रवास केला पाहिजे. तेथील जमिनी सुपीक आहेत, नद्या विस्तृत व बारमहा

वाहणाऱ्या आहेत; पण तेथील सुबत्तेत आकर्षकता नाहीं, निसर्गांत विविधता नाहीं. महाराष्ट्राचें सौंदर्य क्षणाक्षणाला नवोनव वाटतें, पावलागणिक त्याच्या भिन्न भिन्न कला प्रत्ययाला येतात. असा कोणता प्रदेश आहे कीं जो गोमंतकाइतका आकर्षक आहे, गोदातीराहून सुंदर आहे, कृष्णाखोऱ्याहून रम्य आहे, महाबळेश्वराहून भव्य आहे?

सांगितलें तर थोडा वेळ खरेंही वाटणार नाहीं – पण विधान सत्य आहे – कीं महाराष्ट्र देश संपन्न आहे. महाराष्ट्र दरिद्री आहे हें आपण अनेक वर्षांपासून ऐकत आलों आहोंत. निराश झालेल्या दरिद्र्यांना सारें जग आपल्यासारखें दिसतें. कोण म्हणतो महाराष्ट्र दरिद्री आहे? महाराष्ट्रांतील बोलके लोक दरिद्री आहेत आणि त्यांनींच आमच्या दारिद्र्याचा खोटा बोभाटा केला आहे. महाराष्ट्रांत खनिज संपत्ति नाहीं, पंजाबसारखा गहूं नाहीं, बंगालसारखा तांदूळ नाहीं, सिंध-सारख्या गाई व दिल्लीसारख्या म्हशी नाहींत. खरें आहे, पण जें आहे तें काय कमी आहे? मावळासारखा तांदूळ कोठेंही पिकत नाहीं. कोंकणासारखा आंबा कोठेंही निघत नाहीं. हिंदुस्थानांत साखरेचे कारखाने ठिकठिकाणीं आहेत, पण महाराष्ट्राइतकें साखरेचें प्रमाण मात्र कोठल्याही उंसांत आढळत नाहीं. एकदां कपाशीला भाव आला होता, तेव्हां आमच्या शेतकऱ्यांनीं बैलगाड्यांना चांदीच्या धांवा घातल्या होत्या. माळ्यांनीं, मराठ्यांनी आणि ब्राह्मणांनींही गेल्या पंचवीस वर्षांत महाराष्ट्राच्या शेतींत क्रांति करून दाखविलेली आहे. कारखानदारीच्या बाबतींतही महाराष्ट्र देश मागासलेला नाहीं. कापड व वीज यांच्या उत्पादनांत आपण अग्रेसर आहोंत. अनेक धंद्यांत आपण आघाडीवर आहोंत. ह्या धंद्यांत या जातींतलीं माणसें जास्त आहेत, त्या धंद्यांत त्या प्रांतांतल्या व्यापाऱ्यांचें प्राबल्य आहे; सावकारी मारवाड्यांकडे आहे, कारखानदारी गुजरात्यांचे हातांत आहे; हे विचार गैरलागू आहेत. राष्ट्राच्या जमाखर्चांत ह्या कलमाही जमेच्या बाजूलाच मांडल्या पाहिजेत.

महाराष्ट्रांतील उद्योगधंदे, मग ते कोणाच्याही मालकीचे असोत, ते आमच्या जमिनीवर आहेत, आमच्या श्रमानें उभारलेले आहेत व आमच्या मिढळाच्या घामावर चालले आहेत. आज नाहीं उद्यां, ते

आमचेच आहेत. निसर्गाच्या व समाजाच्या सुप्त शक्ति संघटनेची वाट पहात आहेत. भांडवलवाल्यांच्या सामर्थ्यावर नियंत्रण घालणारी शक्ति राष्ट्राच्या हातांत आहे; उद्योगधंद्यांची संस्थापना व संवर्धन करण्याचें सामर्थ्य राष्ट्राच्या मनगटांत आहे. तें सामर्थ्य जागृत होत आहे हें खास; आणि ते संघटित झालें कीं आमच्या संपन्नतेत जे कांहीं न्यून असेल तें नियोजनपूर्वक भरून काढतां येईल.

महाराष्ट्र या सांस्कृतिक व्यक्तीचे मागें अनेक महावंशांचा इतिहास उभा आहे. स्थलमात्राभोंवतीं अनेक महाकृत्यांचीं स्मारकें उभीं आहेत. महाराष्ट्रानें भारतांत ठिकठिकाणीं मिळविलेल्या विजयांचीं चिन्हें अटक-पासून मद्रासपर्यंत आणि काठेवाडपासून कलकत्त्यापर्यंत अजून अस्तित्वांत आहेत. भारतावर राजकीय व सांस्कृतिक परचक्रें आलीं तेव्हां तेव्हां त्याचें निवारण व निर्मूलन महाराष्ट्रानें केलें आहे. शकपूर्व-कालापासून ही महाराष्ट्राची परंपरा आहे. स्वातंत्र्यलक्ष्मीची पूजा महाराष्ट्राइतक्या एकनिष्ठेनें हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याही प्रदेशानें केलेली नाहीं. ग्रीक, शक व क्षत्रप यांच्यासारख्या परक्यांच्याच नव्हे तर खारवेल व हर्षवर्धन यांसारख्या स्वकीयांच्याही आक्रमणाला महाराष्ट्रानें धीरानें तोंड देऊन हटवलें आहे. अर्वाचीन काळांत स्वदेश, स्वधर्म व स्वातंत्र्य यांच्या नांवानें मुसलमानांविरुद्ध पहिली उठावणी हिंदुस्थानांत झाली ती महाराष्ट्रांतच. औरंगजेबाने रामेश्वराला मशीद उभारल्याची थाप मुसलमानी इतिहासांत नमूद होते न होते तोंच मराठ्यांचा झेंडा एकीकडे अटकेवर व दुसरीकडे बंगालवर फडकूं लागला. हें माहात्म्य काय आम्ही डोळे मिटून ध्यानस्थ बसलेले असतांना एखाद्या वरदानाप्रमाणें आमच्यासमोर येऊन व्यक्त स्वरूप धारण करतें झाले? नाही. भारतीयांच्या पापक्षालनासाठीं महाराष्ट्रीयांनीं जागोजाग रक्ताचे अर्घ्य दिले आहेत; आणि ही परंपरा आम्हीं कायम ठेवली तरच आमचें माहात्म्य चिरस्थायी व कार्यक्षम होईल आणि उज्ज्वल राहील.

हें माहात्म्य महाराष्ट्राला प्राप्त झाले, कारण महाराष्ट्राची जनता या माहात्म्याचा झेंडा उभारण्यास व पेलण्यास समर्थ आहे.

महाराष्ट्रांतले लोक देहयष्टीने अफगाणांसारखे अगडबंब नाहींत; त्यांच्या चेहऱ्याचा काट सप्तसिंधूतल्या लोकांसारखा रेखीव नाहीं; त्यांच्या वागणुकींत उत्तर हिंदुस्थानी आर्जव नाहीं. खरे आहे. पण माणसें कशीं आहेत ? डोंगरी किल्ल्यांसारखीं – मित्राला आश्रय देतील व शत्रूला दाद देणार नाहींत; बाभळीच्या बांडासारखीं– जळतील, पण फुटणार नाहींत! उपाशी मरतील, पण वांकणार नाहींत, राजीखुषीनें गुलामी पत्करणार नाहींत! मरतील, पण हटणार नाहींत – आणि हटलींच तर फक्त उसळीच्या उशीसाठी! महाराष्ट्रांत होऊन गेले तसे व आहेत तसे, शापादपि शरादपि या वृत्तीचे, बुद्धिमान् व लढाऊ प्रवृत्तीचे ब्राह्मण अखिल भारतांत इतरत्र आढळणार नाहींत. तेलंगणांतील ब्राह्मण वेदाध्ययनांत अधिक पारंगत व जास्त कर्मठ आहेत, पण त्यांना राजकीय कर्तृत्वाची परंपरा नाही. गुजरातेंतल्या ब्राह्मणांना महाराज म्हणतात – पण ते केवळ आचारी व पाणके झाले आहेत. सातवाहन कुलांतल्या ब्राह्मण राजांनीं वैदिक यज्ञकर्मे केलीं आणि खड्ग धारण करून आक्रमकांचा उच्छेद केला. ही परंपरा अजूनही चालू आहे. महाराष्ट्रांतील क्षत्रियांसारखे बुद्धिमान् लढवय्ये हिंदुस्थानांत दुसरीकडे क्वचितच सांपडतील. रजपूत अधिक कडवा, शीख जास्त जोरदार; पण त्यांच्या कर्तृत्वाला बुद्धिमत्तेची जोड नसल्यामुळे भारतांत एकमेव सत्ताधारी हें स्थान त्यांना मराठ्यांप्रमाणें मिळवितां आलें नाहीं. महाराष्ट्रांतील महार ही जमात तर अशी अद्वितीय आहे कीं त्याच्यावरूनच महाराष्ट्र हें अभिधान निर्माण झाले असाही एक सिद्धांत आहे. महाराष्ट्रांतील लोकांचें आणखी एक वैशिष्ट्य आहे. जो तो आपआपल्या परीनें राजा आहे. अशोककालीन शिलाशासनांच्या लेखकांनींही नमूद करून ठेवलें आहे कीं महाराष्ट्र हा राजांचा देश आहे. आमचा शेतकरी हा आपल्या रयतावा जमिनीचा मालक. त्यांचा राजा त्यांच्यावर केव्हांपर्यंत राज्य करूं शकतो ? त्यांच्या वैयक्तिक स्वातंत्र्यावर व हक्कांवर घाला घालीत नाहीं तोंपर्यंतच. स्वतंत्र वृत्तीचीं ताठ माणसें हेंच राष्ट्राचें वैभव आहे व तें महाराष्ट्रापाशीं भरपूर आहे.

हिंदुस्थानांत आजवर जी जी उठावणी झालेली आहे तिची पहिली ललकारी प्रथम महाराष्ट्रांत उठलेली आहे; प्रत्येक चळवळ व संघटना महाराष्ट्रांत निर्माण झालेली आहे आणि महाराष्ट्राच्याच प्रेरणेनें इतरत्र प्रसृत झालेली आहे. जरा आठवा, राष्ट्रीय जीवनाच्या प्रत्येक क्षेत्राकडे पहा आणि विचार करा — म्हणजे या विधानाची सत्यता प्रत्ययास येईल; आणि ही कर्तबगारी महाराष्ट्रांतील महापुरुषांची आहे. रानडे, टिळक, गोखले, भांडारकर, राजवाडे, केतकर, कर्वे, आंबेडकर अशीं नररत्नें दुसऱ्या कोणत्या देशांत पन्नास-पाऊणशे वर्षांत निर्माण झालीं आहेत? शिवाय कोठेही सुरू झालेली चळवळ वा संघटना — जोवर तिचा स्वीकार महाराष्ट्रानें केलेला नाहीं तोंवर ती विफल आहे; आणि हें कर्तृत्व महाराष्ट्रांतील चिकित्सक बहुजनसमाजाचें आहे. हा आमचा, म्हणून तो जें सांगतो त्याचा स्वीकार हा समाज करणार नाहीं — आणि तो परका असला तरी तो सांगतो तें ग्राह्य आहे असें वाटल्यास केवळ वैयक्तिक अगर प्रांतिक अभिमानाच्या आहारीं जाऊन त्याचा पुरस्कार केल्यावांचून राहणार नाहीं. महत्कार्यांचा आरंभ व जोपासना करणारे असे महापुरुष आणि त्यांना चिकित्सापूर्वक पाठिंबा देणारे अनुयायी इतरत्र आढळणार नाहींत.

धर्मांचे बाबतींतही महाराष्ट्राच्या परंपरेंत असेच वैशिष्ट्य आहे. पंढरीचा विठोबा हें महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाचें अधिदैवत; ज्ञानेश्वर व तुकाराम हे वारकरी पंथाचे आद्य प्रणेते; त्यांच्या समकालीन नव्हे तर सांस्कृतिक सहकार्यावर या सांप्रदायाची उभारणी व संघटना झालेली आहे. यामुळें महाराष्ट्राची धार्मिक दृष्टि सहिष्णु व व्यापक झालेली आहे. जितकें भावनेवर तितकेंच बुद्धिप्रामाण्यावर आमच्या धर्मवृत्तीचें अधिष्ठान आहे. कारण आम्ही कर्मठ नाहीं; कारण आम्ही सहिष्णु, अधिक कणखर आहोंत. बुद्धिप्रामाण्य धार्मिक भावनांशीं सुसंगत असेल तरच आम्ही त्याचा स्वीकार करतों. आमची भवानी आम्हांला युद्धप्रवण करते, यज्ञप्रवण करीत नाहीं. आमचा पिंडच युद्धप्रधान आहे. महाराष्ट्रांतील विचारक्रांतीच्या नेत्यांनीं जेव्हां जेव्हां धर्मग्रंथांचे

स्पष्टीकरण केलें आहे तेव्हां तेव्हां तें समाजाला संग्रामाकडे प्रवृत्त करण्यासाठींच केलें आहे.

महाराष्ट्रीयांची मनोवृत्ति कलाप्रधान नाहीं हें खरें आहे; पण म्हणून ते सुसंस्कृत नाहींत असें थोडेंच ठरतें? हिंदुस्थानांतील अस्तित्वांत असलेल्या शिल्पकृत्यांत अशोकाच्या वास्तु सर्वांत प्राचीन मानण्यांत येतात; महाराष्ट्रांतील कोरीव लेण्यांचा अनुक्रम नंतर लागतो. जवळजवळ अशोककालापासून तों राष्ट्रकूटांचे कालापर्यंत फक्त महाराष्ट्रांतच लेणीं खोदण्याची व तीं हरतऱ्हेच्या कलाकौशल्यानें सजविण्याची परंपरा अखंडितपणें अस्तित्वांत होती. कार्लें, वेरूळ व अजंठा येथील लेणीं आणि महाराष्ट्रभर विखुरलेलीं चालुक्य व यादवकालीन मंदिरें, आणि आधुनिक महाराष्ट्रीय चित्रकारांच्या व शिल्पकारांच्या कलाकृति पाहिल्यानंतर महाराष्ट्रांत कलाकौशल्याचा व संस्कृतीचा अभाव आहे असें म्हणावयाची कोणास हिंमत होणार नाहीं.

महाराष्ट्राचें वाङ्मय, नाट्य व संगीत पहिल्या दर्जाचें आहे. हिंदुस्थानांतील प्राचीन प्राकृत भाषांमध्यें महाराष्ट्रीला अग्रस्थान देण्यांत येतें. उपलब्ध प्राकृत वाङ्मयांत महाराष्ट्रींतील वाङ्मय कालानुक्रमेंच नव्हे तर गुणानुक्रमेंही आद्य श्रेणींत ठेवावें लागते. महाराष्ट्राचा पिंड भावनाप्रधान नाहीं हें खरें आहे. कथा वाचताना, काव्य ऐकतांना अगर चित्र पाहताना, विशेषतः इतरेजन आजूबाजूला असतांना घळघळ अश्रु ढाळणारे श्रोते, वाचक व प्रेक्षक आमच्यांत कमी आहेत; पण म्हणून आमच्या अंगीं रसिकताच नाहीं असा निष्कर्ष काढतां येणार नाहीं. जी गोष्ट साहित्याची, तीच नाट्याची. आमच्यापेक्षां बंगाली वाङ्मय अधिक भावनामय व समृद्ध आहे; गुजराती साहित्य अधिक मृदु व पृथुल आहे; उर्दू लिखाण अधिक ठसकेबाज व उत्तेजक आहे. पण आमच्यासारखें बांधेसूद व समर्थ वाङ्मय इतर भाषांत फार थोडें आहे. कथावस्तूचा अगर प्रतिपाद्य विषयाचा परिपोष कौशल्यानें, निश्चयानें व संयमानें करणारे लेखक महाराष्ट्राव्यतिरिक्त इतरत्र क्वचितच आढळतील.

आणि हें सर्व जर खरें तर महाराष्ट्र मागासला आहे असें कां

मानण्यांत येतें ? महाराष्ट्राची उपेक्षा कां करण्यांत येते ? महाराष्ट्राविरुद्ध बुद्धिपुरःसर प्रचार कां करण्यांत येतो ?

कारण आमचा देश विस्तृत असला तरी तो विभागला गेला आहे; या विभागांचें एकीकरण होऊन संघटित अशा संयुक्त महाराष्ट्राची उभारणी झाली पाहिजे.

कारण महाराष्ट्र देश संपन्न असला तरी संपत्तीच्या उत्पादनाचीं साधनें तिऱ्हाइतांच्या व पुंजीवाल्यांचे हातीं गेलीं आहेत, तीं राष्ट्राच्या मालकीचीं झालीं पाहिजेत व त्यांच्या शक्तींचा पूर्ण फायदा जनतेला मिळाला पाहिजे.

कारण महाराष्ट्र हा महापुरुषांचा देश असला तरीहि जो तो आपापल्या परीनें स्वतःलाच महापुरुष मानीत असल्यामुळें बजबजपुरी माजली आहे. पुढारी होण्यास लायक लोक आमच्यांत नाहींत असें नाहीं; जे आहेत त्यांची लायकी ओळखून आपण आपखुषीनें आपलें पुढारीपण त्यांना दिलें पाहिजे. त्यांनीं निःस्वार्थीपणें महाराष्ट्राचें माहात्म्य वाढवावें या अटीवर ते इच्छितील तेवढें वैयक्तिक महत्त्व आपण त्यांना दिलें पाहिजे.

कारण महाराष्ट्राचा सांस्कृतिक दर्जा उच्च असला तरी परदेशांत व परप्रांतांत महाराष्ट्र संस्कृतीचा प्रसार व प्रचार करण्याचे बाबतींत आपण आजवर कुचराई केलेली आहे आणि म्हणूनच सर्वत्र महाराष्ट्राची उपेक्षा चाललेली आहे.

आणि आपण आपला न्यूनगंड नष्ट केला पाहिजे. सहनशीलतेची सीमा झाली, कडेलोटाची वेळ आली, आतां निर्धार केला पाहिजे, प्रतिपक्ष केला पाहिजे आणि जरूर तर प्रतिकारही.

हिंदुस्थानच्या शासनसंस्थांमध्यें आणि राष्ट्राच्या सांस्कृतिक व आर्थिक जीवनांत महाराष्ट्राला त्याच्या माहात्म्याच्या प्रमाणांत महत्त्व मिळालेंच पाहिजे – आणि आम्ही तें मिळवूंच, असा आपण निर्धार केला तर तें आपणांस खचित प्राप्त होईल आणि एकाहून एक महाकार्यें करण्यास स्फूर्ति व शक्ति प्राप्त होईल.

२ :

# सह्याद्रि

## प्रास्ताविक :

या शतकांत सर्वच शास्त्रांची प्रगति होत आहे व ज्या क्षेत्रांत संशोधनाला वाव राहिलेला नाहीं असा शास्त्रज्ञांना भरंवसा वाटत होता त्या भूगोलशास्त्राचीही. भूपृष्ठाची तपशीलवार माहिती उपलब्ध होऊं लागली तेव्हां नव्या दृष्टीच्या संशोधकांना वाटूं लागलें कीं भौगोलिक परिस्थितीचा समाजाच्या प्रगति-परागतीशीं संबंध असावा. पदार्थ-विज्ञान, रसायन, वगैरे शास्त्रांत प्रयोग करतां येतात; भूगोलशास्त्रांत हें अशक्य आहे; म्हणून इतिहास, अर्थशास्त्र, वगैरे शास्त्रांतील सिद्धान्तांच्या अनुरोधानें भूगोल-शास्त्राची पुनर्घटना करण्यांत आली. सामाजिक दृष्टीनें विचार करणाऱ्या भूगोलशास्त्रज्ञांमध्यें दोन पंथ आहेत : निसर्गवादी (एन्व्हिरोन्मेन्टॅलिस्टस्) व संवर्धनवादी (पॉसिबिलिस्टस्). या पंथांना माझ्या एका स्नेह्यानें नेचरिस्टस् व नर्चरिस्टस् हे अधिक समर्पक प्रतिशब्द सुचविले आहेत. या पंथांचीं अतिरंजित स्वरूपें म्हणजे निसर्गशाक्त व समाजशाक्त. मानवसमाजाची उत्क्रांति, प्रवृत्ति व कर्तृत्व हीं सर्वस्वीं भौगोलिक परिस्थितीवर व निसर्गाच्या प्रेरणेवर अवलंबून असतात, नैसर्गिक परिस्थिति पालटली म्हणजे समाजाच्या वृत्तींत, कृतींत व संस्कृतींत फरक होतो आणि त्यांची प्रगति किंवा परागति होते, हा निसर्गवाद्यांचा सिद्धान्त. निसर्गशाक्त हे निसर्ग-वाद्यांच्या सिद्धांताला आक्रमक स्वरूप देतात, स्वदेशाला आक्रमणाकडे प्रवृत्त करतात आणि आक्रमणांचें समर्थन करतात. संवर्धनवादी मानतात कीं मनुष्य हा निसर्गाचा दास नाहीं, समाज सर्वसमर्थ आहे, व्यक्तीप्रमाणेंच समाजाच्याही प्रवृत्तींचें नियंत्रण करून त्याला कर्तृत्व-वान् करतां येतें. या सिद्धांताच्या अनुरोधानें समाजशाक्त हे स्व-

देशाला आक्रमणाकडेच प्रवृत्त करतात; यांचें आक्रमण थोडें सौम्य स्वरूपाचें असतें एवढेंच. निसर्गशाक्त तर म्हणतात कीं जेथें निसर्गाच्या प्रेरणेचा अभाव असतो तेथेंच समाजशाक्तांच्या तत्त्वांचा प्रसार होतो आणि म्हणूनच ते यशस्वी होत नाहींत. आग्रहाचा आत्यंतिक भाग सोडला तर असें दिसून येतें कीं दोन्ही पंथांच्या सिद्धांतांत तथ्य आहे. या सिद्धांतांच्या ग्राह्यांशांचा समन्वय समाजशास्त्र करतें. मानवी समाजाची उत्क्रांति आणि विशेषतः संवर्धन हीं अनेक शक्तींचे संघर्ष, संकर व संघटना यांची निष्पत्ति असल्यामुळे त्यांची सांगता एकाच एका कारणाच्या अनुरोधानें लावतां येत नाहीं; म्हणून समाजशास्त्राला अनेक शास्त्रांचा आधार घ्यावा लागतो; म्हणूनच हें शास्त्र संकरजन्य आहे, किंबहुना हें शास्त्रच नाहीं, असें शुद्ध शास्त्रज्ञ हेटाळणीनें म्हणतात. अभ्यासाच्या सोयीसाठीं समाजशास्त्राचे अनेक पोटविभाग पाडण्यांत आलेले आहेत, तेही संकरजन्य आहेत. उदाहरणार्थ: ऐतिहासिक भूशास्त्र, भौगोलिक अर्थशास्त्र, वगैरे. समाजशास्त्राच्या ज्या विभागांत भौगोलिक परिस्थिति व मानवी संस्कृति यांचा समन्वय होतो आणि ज्याच्या आधारानें प्रगतीच्या योजना निश्चित करण्यांत येतात त्याचें नांव जिओपॉलिटिक्स: भौगोलिक-समाज-नियोजनशास्त्र. मॅकाइंडर व हौशॉफर या भूगोलशास्त्रज्ञांनीं हें नवेंच शास्त्र चालू शतकात निर्माण केलें आहे. जिओपॉलिटिक हा शब्द मूळचा जर्मन; यांतील पॉलिटिक या शब्दाचा अर्थ धोरण, राजनीतिशास्त्र नव्हे. बोडेन पॉलिटिक व लेबेनस्त्रौम हीं जर्मन आक्रमणाचीं धोरणें हौशॉफरच्या सिद्धांतांतून निर्माण झालीं. स्पर्धा व संघर्ष यांच्या युगांत विशिष्ट राष्ट्राला स्वतःच्या व भोंवतालच्या भौगोलिक, राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक परिस्थितीचा फायदा कसा घेतां येईल, राष्ट्राच्या प्रगतीसाठीं व वृद्धीसाठीं शासनसंस्थांनीं संरक्षण, नियंत्रण व आक्रमण यांच्या योजना कशा ठरविल्या असता त्या यशस्वी होतील, राष्ट्राची शक्ति वृद्धिंगत व्हावी म्हणून निष्क्रिय सुप्तावस्थेंत असलेल्या स्थानिक सामर्थ्यांची संघटना कशी करावी, वगैरे तात्त्विक व व्यावहारिक प्रश्नांचा विचार ‘ जिओपॉलिटिक्स ’ या शास्त्रांत करण्यांत येतो.

भौगोलिक दृष्ट्या सह्याद्रि हा महाराष्ट्राचा निर्माता व हिंदुस्थानचा मूलाधार आहे; महाराष्ट्राचें व्यक्तिमत्त्व ज्या भौगोलिक परिस्थितीच्या व ऐतिहासिक घटनांच्या अनुरोधानें उत्क्रांत झालेलें आहे त्यांचें सह्याद्रि हें बीज आहे. हिंदी संघराज्यांत अग्रस्थान मिळावें एवढें कर्तृत्व महाराष्ट्राचे अंगीं आहे, तें स्थान मिळावें म्हणून जें नवें संघटन व राजकारण महाराष्ट्रीयांनीं आंखावयाचें त्याची उभारणी सह्याद्रीच्याच अनुरोधानें केली पाहिजे; आर्थिक उन्नतीसाठीं ज्या ठळक योजना तांतडीनें हातीं घ्यावयाच्या त्यांची मांडणी सह्याद्रींतच केली पाहिजे; संघटित झाल्याशिवाय आधुनिक संघर्षक्षेत्रांत महाराष्ट्राचा निभाव लागणार नाहीं. सह्याद्रि हाच महाराष्ट्राला प्रेरणा देतो, महाराष्ट्राची धारणा करतो; सह्याद्रि हेंच महाराष्ट्राचें आशास्थान आहे, पूजास्थान आहे, असें माझें म्हणणें आहे.

या लेखांत ठिकठिकाणीं विषयांतर झालेलें आहे, याबद्दल आरंभींच वाचकांची क्षमा मागून ठेवतों. कोठें विषयांतर हेतुपुरःसर केलेलें आहे; कांहीं ठिकाणीं प्रकृतिदोषामुळें झालेलें आहे. हा विषय सर्व-साधारण वाचकांना अपरिचित असल्यामुळें कोठें विषय रंगविण्यासाठीं, तर कोठें दृष्टिकोनाच्या स्पष्टीकरणासाठीं विषयांतर केलेलें आहे; कोठें आनुषंगिक विषयांच्या प्रवाहाबरोबर मीही वाहवलों आहें. या लेखांत कोणाला कांहीं ठिकाणीं अभिनिवेशाचा भाग आढळेल; तो कोणाला रुचला नाहीं तर त्यांचीही आगाऊ क्षमा मागून ठेवतों. या बाबतींत नाइलाज झाला; कारण, सामर्थ्य-संवर्धन हा लेखाचा विषयच आहे; आणि हें युग संघर्षाचें आहे. टाळूं पाहिलें तरी तो टळणार नाहीं; आणि संघर्षाशिवाय समुत्थान संभवतच नाहीं, असा समाजशास्त्राचा सिद्धांत आहे; शिवाय यांत वैयक्तिक असें कांहींच नाहीं.

## प्रयोजन :

हिंदुस्थानांत आहे तितकी विविधता, त्याचप्रमाणें एवढें ऐक्य दुसऱ्या कोणत्याही देशांत आढळत नाहीं, एवढ्या खंडप्राय देशांत तर नाहींच नाहीं; केवळ भौगोलिक दृष्टीनेंच नव्हे तर सांस्कृतिक दृष्टीनेंही.

एकीकडे रम्य व भव्य हिमालय तर दुसरीकडे रुक्ष व भयाण हिंदुकुश; इकडे निर्जल, नापीक, निर्मनुष्य मरुभूमि तर तिकडे आर्द्र, सुपीक व मनुष्यवस्तीनें गजबजलेलीं मळईचीं मैदानें; या पहाडांत यक्षकिन्नरांसारख्या सौंदर्यसंपन्न जातींचा निवास तर त्या जंगलांतले रहिवासी असे विद्रूप कीं केवळ द्विपाद म्हणूनच त्यांना मनुष्य म्हणावयाचें; मानवतेच्या कल्याणासाठीं तपश्चर्या करणारे ऋषि व अहर्निश झटणारे महात्मे या अरण्यांत किंवा आहारांत, तर त्या जंगलांत किंवा वस्तींत मानवांचा संहार करण्यास सदैव सज्ज व उत्सुक असलेले सैतान; एकीकडे प्रजा साक्षर तर दुसरीकडे अक्षरशत्रु; इकडे मूर्तिपूजक तर तिकडे मूर्तिभंजक; एकीकडे मुंगीचीही हिंसा करावयाची नाहीं असा कटाक्ष तर दुसरीकडे रुधिराच्या अभिषेकाशिवाय देवदेवतांची दैनिक पूजाही पूर्ण होत नाहीं, असा आग्रह.

भौगोलिक दृष्ट्या हिंदुस्थान विस्तीर्ण आहे व सास्कृतिक दृष्ट्या संकीर्ण आहे. ही विविधता व तज्जन्य परस्पर–विरोधाची शक्यता विचारांत घेऊन तिचा समन्वय करण्यासाठीं, समाज एकजीव करण्यासाठीं आणि बहुसंख्य पण सांस्कृतिक दृष्टया कनिष्ठ असलेल्यांचा विशिष्ट परिस्थितींत शक्य तेवढा उद्धार करण्यासाठीं आर्य संस्कृतीच्या प्रवर्तकांनीं अनेक प्रयत्न नियोजनपूर्वक केले. या खण्डप्राय देशांतील अफाट वस्तींत संस्कृतीचा विस्तार व ज्ञानाचा प्रसार करणें उपलब्ध साधनांच्या मानानें अशक्यप्राय आहे असें दिसून आल्यामुळें त्यांनीं श्रद्धेचें अधिष्ठान निर्माण केलें, सांस्कृतिक संकेत निर्माण केले आणि त्यांचें आकलन व्हावें म्हणून त्यांवर धार्मिक आचारांचें अवगुंठन चढविलें. संस्कृतीचा विस्तार होऊं लागला तसतशा या संकेतांच्या मर्यादाही विस्तृत झाल्या. ऋग्वेदकाळांतील प्रार्थना ऐकण्यासाठीं फक्त मध्यदेशांतील नद्यांना आवाहन करण्यांत येत असे; आर्य संस्कृतीचा प्रसार हिंदुस्थानभर झाल्यानंतर, पुराणकाळात, अर्घ्यदानांत समाविष्ट होण्यासाठीं हिंदुस्थानांतील सर्व प्रमुख नद्यांना आवाहन करण्यांत येऊं लागलें. संस्कृतीच्या प्रवर्तकांनीं मध्ययुगाच्या उत्तरकालांत व संस्कृतीच्या उतरत्या काळांत या संकेतांना विकृत स्वरूप दिलें, हा भाग वेगळा. मात्र

याचा परिणाम असा झालेला आहे कीं मक्केकडे तोंड करून नमाज पडणाऱ्या मुसलमानांचें कौतुक होतें आणि संध्यावंदन करून सूर्याला अर्घ्य देणारांची हेटाळणी होते.

जीवनकलहाची तीव्रता संस्कृतीच्या स्थैर्याला किंवा विकासाला पोषक नसते; आणि ज्ञानाचा प्रसार श्रद्धेला; विशेषतः राजकीय पारतंत्र्याच्या काळांत, जेव्हां आचार अधोगतीला गेल्यामुळें धर्मच विकृत असावा असा भास निर्माण होतो. आर्य संस्कृतीच्या प्राचीन व मध्ययुगीन प्रवर्तकांनीं निर्माण केलेल्या संकेतांना व सिद्धान्तांना आधुनिक सुशिक्षितांनीं झुगारून दिलें. राष्ट्रीय पुनरुद्धाराच्या व राजकीय चळवळीच्या प्रवर्तकांनीं परिस्थितीच्या अनुरोधानें कांहीं नवे सिद्धांत व संकेत निर्माण केले, तेहि नष्ट होऊं लागले आहेत. सध्यांचें युग हें अश्रद्धा-युग आहे, जोंवर ही अश्रद्धा पुरातन किंवा भूतकालावर आधारलेल्या श्रद्धांपुरती आहे. सध्यांचें युग हें श्रद्धायुग आहे, जोंवर या श्रद्धा अर्वाचीन व भविष्यकालावर आधारलेल्या आहेत! राजकीय व धार्मिक आणि श्रद्धांच्याही विफलतेमुळें आम्ही आतां संशयात्मे झालों आहोंत. संशयात्म्यांचा नाश होतो हा सिद्धांत पुरातन असला तरी अबाधित आहे. या परिस्थितींत आपण कोणत्या सिद्धान्तांवर निष्ठा ठेवावयाची ?

हिंदुस्थान हें एक राष्ट्र आहे, त्याचें अखण्डत्व स्वयंसिद्ध आहे, हा सिद्धान्त हें स्वातंत्र्याच्या उठावणीचें आरंभापासूनचें अधिष्ठान. स्वातंत्र्यविरोधक म्हणत, हिंदुस्थान हें राष्ट्र नाहीं, खण्ड आहे, एकराष्ट्रीयत्व हें उच्च वर्णीयांचें व सुशिक्षितांचें आधुनिक सुखस्वप्न आहे. एकाएकीं आणि ध्यानींमनींही नसतांना हिंदुस्थानची फाळणी झाली, एकराष्ट्रीयत्वाच्या सिद्धान्तावर आपणांस निमूटपणें, अगतिकपणें तिलांजलि द्यावी लागली. भाषावार प्रांतरचना हें राष्ट्रीय चळवळीचें दुसरें अधिष्ठान. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर हा सिद्धान्त कोणाकोणाला गैरसोयीचा वाटूं लागला; कुजबूज सुरू झाली; आतां जाहीर झालें आहे कीं भारताच्या आत्म्याला प्रांतीयतेची कीड लागलेली असून तिचा उच्छेद केल्यावांचून लोकशाही सुरक्षित होणार नाहीं. या विचारप्रणालीमुळें प्रादेशिक संघटनेंत विघटनेचीं बीजें आहेत असा नवा प्रवाद रूढ होऊं पहात आहे आणि

प्रादेशिक व्यक्तिमत्त्वाला मूर्त स्वरूप देण्याच्या तांतडीबद्दल व इष्टतेबद्दल संशय व अनास्था निर्माण झालीं आहेत. ही परिस्थिति अत्यंत घातुक आहे, प्रांतीयतेच्याच नव्हे तर एकराष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनेंहि.

हिंदुस्थानांत प्रादेशिक भावना अनेक शतकांपासून अस्तित्वांत आहेत; कारण त्यांना नैसर्गिक व सांस्कृतिक अधिष्ठान आहे. संकल्पित प्रांतांच्या व्यक्तिमत्त्वावर झालेले संस्कार भिन्न आहेत. भिन्नतेची जाणीव सर्वांना आहे. मतभेद आहे तो फक्त तिला मान्यता देण्याचे बाबतींत. याविषयीं उघड बोलण्यास कोणाला संकोच वाटतो, कोणाला धास्ती. राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेणारांना अशासाठीं संकोच वाटतो कीं न जाणों, या बाबतींत आग्रह धरला तर आपले ऊर्ध्वपति ( High Command ) आपल्यावर अराष्ट्रीयतेचा, निदान पक्षद्रोहाचा आरोप करतील. सर्वसाधारण लोकांना वाटतें, न जाणों, आपलेंच चुकत असेल. कोणाची धास्ती प्रामाणिक तर कोणाची अप्रामाणिक. प्रामाणिक धास्ती अशासाठीं कीं त्यामुळें भिन्नतेला संघटित स्वरूप येऊन त्याचें पर्यवसान राष्ट्राच्या विच्छेदनांत होईल. अप्रामाणिक धास्ती अशासाठीं कीं त्यामुळें आपल्या वा आपल्या जमातीच्या हितसंबंधांना धोका पोंचेल.

या संशयी वृत्तीचें मूळ कारण हें कीं या भिन्नतेच्या अंतरंगांतून संथपणें, अविरतपणें वाहत असलेल्या संस्कृतीच्या प्रवाहाकडे किंवा अखण्डितपणें तेवत असणाऱ्या नंदादीपाकडे आपले दुर्लक्ष झालेलें आहे.

हिंदुस्थानांतील भाषा व प्रदेश याची सांगड निसर्गानेंच घातलेली आहे. विशिष्ट प्रदेशांत विशिष्ट जमाती बहुसंख्य आहेत. भाषावर प्रांतरचना केली तर राजकारण त्यांच्या हातांत जाईल आणि अनवस्था उद्भवेल, असें सांगण्यांत येतें. हें सत्य आहे, हें संभवनीय आहे, पण म्हणून काय संघटनाच होऊं द्यावयाची नाहीं ? सांगण्यांत येतें, असें झालें तर कांहीं बळी जातील. चालेल, ते शहीद होतील. सर्वांच्या हितासाठीं बळी जातील तेच योगी. बहुसंख्य पण अल्पशिक्षित आणि म्हणून अदूरदृष्टि, यामुळें आपपरभावानें मलिनचित्त झालेल्या जमातींना दूरदृष्टीचें राजकारण व सनातन धर्मकारण शिकविणें, स्वतः सत्तासंपादना-

पासून अलिप्त राहून, हें आजच्या सुशिक्षितांना परिस्थितीचें आव्हान आहे. तें स्वीकारलेंच पाहिजे.

परक्यांची सत्ता होती तोंवर सारेंच पराधीन होतें. आतां आपण स्वतंत्र झालों आहोंत. स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं जनतेच्या शक्ति संघटित करतांना आपण एकमेकांना जीं अभिवचनें दिलीं तीं पाळलींच पाहिजेत. पुनर्घटनेच्या योजना डावलणें अगर लांबणीवर टाकणें हें केवळ कार्यक्षमतेच्या अभावाचें अगर अदूरदर्शित्वाचें लक्षण आहे असें नव्हे– हें विश्वासघाताचें लक्षण मानण्यांत येईल; आणि संभवनीय आहे, त्यांतून ठिणग्या उडूं लागतील, वणवे भडकतील.

स्वतंत्र हिंदी राष्ट्रानें संघराज्य हें अभिधान हेतुपुरस्सर व अभिमानपूर्वक धारण केलेलें आहे. तें सर्व दृष्टींनीं यथार्थ ठरलें पाहिजे. हिंदी संघराज्य म्हणजे इलाख्यांच्या व विलीन संस्थानांच्या क्षेत्रफळांची व त्यावर वावरणाऱ्या द्विपादांची बेरीज नव्हे. संघराज्याचें अधिष्ठान सुसंघटित घटकांवरच असलें पाहिजे; हे घटक स्वयंनिर्णीत असेच असले पाहिजेत. ते सर्वस्वीं स्वयंपूर्ण व स्वयंशासित असावे, असा कोणाचाही आग्रह नाहीं. प्रश्न अहंकाराचा नाहीं, अभिमानाचा आहे; विघटनेचा नाहीं, संघटनेचा आहे; प्रांतीयतेचा नाहीं, राष्ट्रीयतेचा आहे. भावनेचा आहे आणि व्यवहाराचाही आहे.

इस्लाम धर्मीयांच्या संख्येच्या प्रमाणाच्या परिमाणानुसार परकीय सर्वसत्ताधारी लवादानें नकाशावर आंखलेल्या रेघोट्यांच्या अनुरोधानें मातृभूमीची फाळणी ज्यांनीं स्वीकारली व ती स्वीकारण्यात आपण मुत्सद्देगिरीची पराकाष्ठा केली असा ज्यांचा दावा, ते आमचे पुढारी प्रादेशिक पुनर्घटनेच्या बाबतींत शेष हिंदुस्थानच्या–म्हणजे भारताच्या–अखंडत्वाचा अडाणी, अदूरदर्शी व आत्मघातकी आग्रह धरून अडून बसणार नाहींत आणि पुनर्घटनेच्या रेषा समंजस लोकमतानुसार नकाशावर ओढल्या जाण्याऐवजीं त्या रक्तानें किंवा जळीतांच्या अवशेषांनीं प्रत्यक्ष भूमीवरच डागल्या गेल्या पाहिजेत, असा आग्रह धरणार नाहींत, अशीच स्वतंत्र हिंदुस्थानच्या प्रत्येक प्रामाणिक नागरिकाची अपेक्षा आहे.

## हिंदुस्थानची नैसर्गिक उत्क्रांति:

भूपृष्ठ व भूस्तरशास्त्रज्ञांनीं भौगोलिक उत्क्रांतीबद्दल कांहीं सिद्धांत अलीकडेच निश्चित केलेले आहेत. यांपैकीं ढालींचा सिद्धांत प्रस्तुत विषयाला आनुषंगिक आहे. ढाल (Shield) म्हणजे भूपृष्ठाचा पुरातन, प्रबळ व प्रतिकारक्षम प्रदेश; अंतर्गत उद्रेकांमुळें पृथ्वीच्या पापुद्र्याबरोबर चिरडला न जाणारा स्थिर व अचल असा भूप्रदेश. भूपृष्ठावरील जमिनीचा बहुतेक भाग उत्तर ध्रुवाभोंवतीं व भूमध्यरेषेच्या उत्तरेस आहे. भूपृष्ठाचा पापुद्रा किती जाडीचा आहे याची अद्याप निश्चित कल्पना आलेली नाहीं. कॅनडा, ब्राझील, सहारा, (युरोपियन) रशिया, (एशियाटिक) सैबीरिया, सह्याद्रि व पश्चिम ऑस्ट्रेलिया या सहा ढालींच्या आधारावर भूप्रदेश स्थिर झालेला आहे. शास्त्राला अजून अज्ञात असलेल्या कारणांमुळें पृथ्वीच्या अंतर्भागांतील उष्णतामान कमीअधिक होतें; यामुळें पृथ्वीचा पृष्ठभाग आकसतो व तडकतो आणि सुकलेल्या जमिनीचा पापुद्रा कमजोर असेल तेथें ढालीच्या दाबामुळें चिरडला जातो; कोठें पाया ढांसळल्यामुळें तो समुद्रांत गडप होतो तर कोठें उफाळून आलेला भूभाग ढालींच्या दरम्यान चिमटला गेल्यामुळें पर्वतांच्या रूपानें वर उचलला जातो; यामुळें भूपृष्ठभागाच्या मांडणींत फेरबदल होतो. ज्वालामुखींच्या उद्रेकांच्या व धरणीकंपांच्या धूमधडाक्यांत पृथ्वीचा हल्लींचा पृष्ठभाग निर्माण झाला त्या 'अल्पाइन स्टॉर्म' च्या काळांत आफ्रिका व हिंदुस्थान यांना जोडणारा गोण्डवनाचा भाग समुद्रांत गडप झाला; सैबीरिया, रशिया, सहारा व सह्याद्रि या ढालींच्या प्रचण्ड चिमट्यांत मधला पापुद्रा जरा चिमटला गेला. मध्ययुरोपांतील आल्पस् पर्वत, कृष्णसागर (Black Sea) व कश्यपसागर (Caspian Sea) यांचे दरम्यान कॉकेशस् पर्वत, इराण व अफगाणिस्तानचें पठार, पामीर पर्वत, हिंदुकुश व सुलेमान पर्वत, सिंकियांगच्या उत्तरेकडील तिआनशान व दक्षिणेकडील अल्तीनतघ पर्वत, तिबेटचें पठार, हिमालय पर्वत, ब्रह्मदेशापासून सुमात्रा व जावा यांमधून सेलिबसपर्यंत पसरलेले पर्वत—ही एकच पर्वतश्रेणी

असून ती या उद्रेककालांत निर्माण झाली. पामिर हें या श्रेणीचें केंद्रस्थान, असें आधुनिक भूपृष्ठशास्त्रज्ञ मानतात आणि हेंच मानव-जातीचें मूलस्थान, असें वंशशास्त्रज्ञ सांगतात. ढालींच्या या सिद्धान्ता-वरून स्पष्ट दिसून येतें कीं सह्याद्रीचें पठार हा हिंदुस्थानांतील सर्वांत प्राचीन, प्रबळ व प्रतिकारक्षम असा प्रदेश आहे.

गेल्या शतकांत ढालींचा सिद्धांत उत्क्रांत झालेला नव्हता आणि भूपृष्ठ व भूगर्भशास्त्रांची विशेष प्रगति झालेली नव्हती. हिंदुस्थानां-तील पर्वतांच्या बाबतींत तेव्हांच्या भूगर्भशास्त्रज्ञांनीं लावलेला अनुक्रम वेगळा होता. त्यांची उपपत्ति थोडक्यांत सांगतों : अरवली हा हिंदु-स्थानांतील जुन्यांत जुना पर्वत. त्यानंतर गोंडवन प्रदेश निर्माण झाला. भूगर्भशास्त्रांत गोंडवन ही संज्ञा विशिष्ट अर्थानें वापरण्यांत येते. हल्लीं गोंड लोकांची वस्ती असलेल्या प्रदेशाशीं या संज्ञेचा विशेष संबंध नाहीं. पुढें ज्वालामुखींच्या उद्रेकांचा काळ सुरू झाला. या काळांत गोंडवनाचा बहुतेक भाग बुडाला आणि हिमालय व सह्याद्रि या पर्वत-श्रेणी मोठ्या धूमधडाक्यांत भूगर्भांतून वर आल्या. विंध्याद्रीचें पठार त्यानंतर निर्माण झालें. भडकलेल्या ज्वालामुखींतून उफाळणारा तप्त रस दक्षिणापथांत सुमारें दोन लक्ष चौरस मैलांच्या प्रदेशावर अनेक शतकेंपर्यंत खदखदत होता. या रसानें गोंडवनाच्या अवशिष्ट भागापैकीं पुष्कळसा प्रदेश व्यापून टाकला. या पुराण प्रदेशाचे मूळ स्वरूपांतील अवशेष आतां सिरोंचा, राजमहाल, वगैरे तुटक भागांत आणि दगडी कोळशाचें उत्पादन होतें त्या भागांत आढळतात. ज्वालामुखींचा रस थंड झाल्यानंतर त्याच्या सुकलेल्या थरांवर ऊन व पाऊस यांची प्रति-क्रिया होऊन दक्षिणापथाचे पठार सिद्ध झालें. सिंध, पंजाब, संयुक्त प्रांत, बिहार, बंगाल या प्रांतांच्या प्रदेशांत पूर्वी समुद्र होता. धरणी-कंपांमुळें त्याचा तळ वर आला. सिंधु, गंगा, वगैरे नद्यांनीं ठिसूळ हिमालयांतून वाहून आणलेल्या मातीमुळें गोंडवनाच्या उत्तरेकडील ही प्रचंड दलदल भरून निघाली. हिंदुस्थानच्या भूपृष्ठाच्या उत्क्रांतींतील या तपशिला बाबतींत गेल्या व चालू शतकातील शास्त्रज्ञांची एक-

वाक्यता आहे. फरक आहे तो फक्त अरवली व सह्याद्रि यांच्या अग्रत्वाबद्दल आणि हिमालय व सह्याद्रि यांच्या समकालीनत्वाबद्दल. अरवली हा क्षुद्र पर्वत आहे हें आपण जाणतों; म्हणून त्याची उपेक्षा करावयास हरकत नाहीं. गेल्या शतकांतील या सिद्धांतावरून दिसतें कीं कालमानाच्या दृष्टीनें सह्याद्रीची तुलना जर कोणा पर्वताशीं करण्याजोगी असेल तर ती फक्त नगाधिराज हिमालयाशीं!

आपण ज्यांची वारंवार हेटाळणी करतों—आणि अलीकडे तर हा शिष्टाचारच होऊन बसलेला आहे—त्या आपल्या प्राचीन ग्रंथकारांना या सिद्धांताची अंधुक कल्पना होती, असें दिसतें. पृथ्वीचा आंस चल आहे, तो फिरल्यामुळें ध्रुवतारा उत्तरेकडे व अगस्ती दक्षिणेकडे दिसूं लागला, त्यापूर्वी ध्रुवप्रदेश विंध्याद्रीवर होता, असें योगवासिष्ठांत भुशुंडानें वसिष्ठाला सांगितलेलें आहे. अगदीं अलीकडे डॉ. इमॅन्युएल वेलिकोव्स्की यांनीं हे व असे वृत्तांत एकत्रित केलेले असून ते सत्य व यथार्थ असल्याचें अनेक प्रमाणांवरून सिद्ध केलेलें आहे (पहा : Worlds in Collision. संक्षेप: Reader's Digest, मार्च १९५०). प्राचीन मेरु हाच आधुनिक पामीर. मेरु हा भूपद्मामध्यें कर्णिकेसारखा असून त्याच्याभोंवतालचे पर्वत हे कमळाच्या पाकळयांसारखे आहेत, असें विष्णुपुराणांत सांगितलेलें आहे. आधुनिक शास्त्रांचा निष्कर्ष आहे कीं भूपृष्ठावरील पर्वतांत हिमालयाचीं शिखरें अत्युच्च व त्याचा विस्तार सर्वांहून अधिक असला तरी त्याला स्वतंत्र स्थान नाहीं. हिमालय ही पामीर श्रेणीची शाखा मात्र आहे. हिंदूंचीं अनेक पवित्र तीर्थें हिमालयांत आहेत, अनेक पवित्र नद्यांचा उगम हिमालयांत आहे; यामुळें हें विधान करण्यांत पाश्चिमात्य शास्त्रज्ञांचा कांहीं कावा असावा असें सकृद्दर्शनीं वाटतें. पण शास्त्रज्ञ हे क्वचितच प्रचारक असतात. हिमालयाच्या दुय्यम दर्जाची प्राचीन भारतीयांना ही कल्पना होती, असें दिसतें. विष्णुपुराणांतील कुलपर्वतांची यादी पहा—

महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमानृक्षपर्वतः।
विन्ध्यश्च पारियात्रश्च सप्तात्र कुलपर्वताः॥ २. ३ ३.॥

इतर पुराणांत ऋक्ष पर्वताचे जागीं गंधमादन पर्वत दिलेला आहे आणि अग्निपुराणांत त्याचे जागीं हिमपर्वत समाविष्ट केलेला आहे. एकूण

कुलाचलांचे यादींतील सह्याद्रीचें स्थान अचल असून हिमालयाचें वैकल्पिक आहे, हा निष्कर्ष आपल्याला नवा नाहीं.

## हिंदुस्थानचे नैसर्गिक विभाग :

हिमालय, अरवली, विन्ध्य व सह्याद्रि हे हिंदुस्थानचे मुख्य पर्वत. त्यांनीं हिंदुस्थानची प्रादेशिक विभागणी व मांडणी केलेली आहे.

सिंधूचें मैदान, गंगेचे मैदान व सह्याद्रीचें पठार असे हिंदुस्थानचे तीन मुख्य नैसर्गिक विभाग आहेत. काश्मीर व आसाम हे प्रदेश निसर्गतः स्वतंत्र आहेत.

हिमालयानें हिंदुस्थानला आशियापासून अलग केलेलें आहे. विन्ध्याद्रीनें हिंदुस्थानचे उत्तर व दक्षिण असे दोन भाग पाडलेले आहेत. सह्याद्रि हा दक्षिणापथाचा निर्माता आहे. नैसर्गिक ठेवणीच्या अनुरोधानें या पठाराची आणखी विभागणी झालेली आहे. अरवली हा आतां हिंदुस्थान व पश्चिम पाकिस्तान यांचे सरहद्दीवर आहे.

हिमालय व हिंदुकुश पर्वतांनीं सिंधूचें मैदान निर्मिलें ; हिमालयानें पंजाबचें, हिमालय व विन्ध्य यांनीं गंगेचें, आणि अरवली व विन्ध्य यांनीं मध्यभारताचें पठार निर्मिलें. या नैसर्गिक विभागांच्या प्रकृति व प्रवृत्ति भिन्न आहेत व भौगोलिक रचना हें या भिन्नतेचें मूलकारण आहे.

हिमालयाएवढा विस्तीर्ण व उत्तुंग पर्वत जगांत दुसरा नाहीं. शिवाय हिमालयाच्या एवढे पठारही दुसऱ्या कोणत्याही पर्वताला नाहीं. हिमालयाच्या पठारानें संपूर्ण तिबेट व्यापलेला आहे. यामुळें त्याचा विस्तार आहे त्याहून अधिक भासतो. हिमालयाला हिंदुस्थानच्या बाजूला पठाराचा प्रदेश नाहींच म्हटलें तरी चालेल. सिंधु, गंगा व ब्रह्मपुत्रा या महानद्या हिमालयांत एकमेकींच्या आसपास उगम पावतात. सिंधु व ब्रह्मपुत्रा या हिमालयाला वळसा घालून हिंदुस्थानांत प्रविष्ट होतात ; सिंधु मध्य आशियाच्या सरहद्दीवरून आणि ब्रह्मपुत्रा तिबेटच्या पठारावरील घळींतून. हिंदुकुशाच्या ढाळांवरील पाणी वाहून आणणारी काबूल नदी सिंधूला अटकजवळ मिळते. यामुळें सिंधूची घाटणी मध्य–एशियाटिक आहे. तिबेटच्या सान्निध्या-

मुळें ब्रह्मपुत्रेला मंगोलियन धाटणी आलेली आहे. हिमालयाच्या पश्चिम भागांतील दक्षिण ढाळांवरील पाणी वाहून आणणाऱ्या पहिल्या दर्जाच्या नद्या पंजाबांत सिंधूंत विलीन होतात. हिमालयाच्या हिंदी उतारांवर गंगा व तिच्या उपनद्या उगम पावतात; अर्थात् गंगेच्या पाण्यांत परदेशी भेसळ नाहीं. पंजाबवर पंच नद्यांचें प्रभुत्व आहे आणि सिंधेवर सिंधूचें; युक्त प्रांत व बहार यांवर गंगेचें, आणि बंगालवर गंगा व ब्रह्मपुत्रा यांचें. या नद्यांच्या धाटणींची छटा त्यांच्या प्रभुत्वाखालीं असलेल्या प्रदेशांवर उमटलेली आहे.

पामीरचे प्रचण्ड पहाड फोडून व सरहद्द ओलांडून सिंधु हिंदुस्थानच्या मैदानांत येते; ती पंजाबांत येते न येते तोंच तिला अटकजवळ काबूल नदी मिळते. ही वेदकालीन कुभा. हिंदुकुशाच्या ढाळांवरील पाणी ती वाहून आणते. हिंदुकुश हा वेदकालीन निषध पर्वत. हिंदुकुश म्हणजे हिंदूंची कत्तल. सिंधूच्या कांठांवर, गांधार प्रांतांत व खुद्द काबूल येथें हिंदूंचीं राज्ये होतीं. त्यांचा निःपात झाला त्या सुमारास या पर्वताला हें नांव देण्यांत आलेले असावें; कारण हिंदु लोकांना हिंदु हे नांव सिंधूवरून यापूर्वींच मिळालेलें होते. बारमहा दुथडी भरून वाहणारा सिंधूचा अथांग प्रवाह हीच मध्य–एशियाटिक आक्रमकांना थोपवून धरणारी, खैबर खिंडीच्या अलीकडची अखेरची आडकाठी; अटकेच्या अलीकडे त्यांना अडविण्यास नैसर्गिक सोयींनीं युक्त असें स्थान लांबवरपर्यंत नसल्यामुळें अटक हे नांव यथार्थ आहे.

अटकेनजीक सिंधूचें हृदय ज्यानें एकदां पाहिलें त्याला त्याचा विसर पडणें शक्य नाहीं. उत्तरेस सिंधु व कुभा यांच्या संगमाचें विस्तीर्ण मैदान, जेथें मध्य आशियांतून व सरहद्दीवरील दऱ्याखोऱ्यांतून अव्यवस्थितपणें घुसलेल्या आक्रमकांनीं विश्रांति घेऊन पुढील कार्यक्रमाची आंखणी करावी. स्वच्छ रेतीनें भरलेल्या रुंद पात्रांतून वाहणारा गडद निळया व थंडगार पाण्याचा अथांग पण अरुंद प्रवाह. रेतीच्या पांढुरक्या पार्श्वभूमीवर रंगीत रत्नांसारख्या चमकणाऱ्या, भडक वस्त्रें परिधान केलेल्या, धिप्पाड लालबुंद स्त्रिया. जरा अलीकडे, उंचच उंच कड्यांमधून लांबवरपर्यंत वाहणाऱ्या

प्रवाहावरून वाऱ्याचा झोत आला कीं कडेकपाऱ्यांमधून घुमणारी सिंहनादासारखी गर्जना. सणावारासाठीं मुसलमान लोक रोट बनवतात त्या आकाराचे व मापाचे पण रंगीबेरंगी वर्तुळाकार चपटे दगड या पात्रांत सर्वत्र विखुरलेले आहेत. वाऱ्याच्या सोंसाट्यासरशीं प्रवाहावर लाटा उसळतात तेव्हां हे किनाऱ्यावरले दगड एकामेकांवर आपटून विजा कडाडल्यासारखे ध्वनि होतात, लागोपाठ होत राहतात आणि त्यांचे प्रतिध्वनि कडेकपारींतून सारखे घुमत राहतात. वाटतें कीं त्या तीरावरून 'अल्ला हो अकबर' आणि या तीरावरून 'हर हर महादेव'च्या रणगर्जना चाललेल्या आहेत! वाऱ्याच्या लोटाबरोबर कांठावरली पाढरी स्वच्छ सिकता गिरक्या घेत घेत धूम्रचक्रासारखी वर वर उडते, नंतर शरद् ऋतूंतल्या मेघांसारखी विरळ होते आणि संथपणें चाळल्यासारखी खालीं पडते; कांहीं प्रवाहा-बरोबर वाहून जाते आणि कांहीं कांठावर स्थिर होते; स्थिर होते न होते तोंच वाऱ्याची दुसरी लहर सळाळूं लागते. सिंधूच्या व काबूलच्या प्रत्येक पुराबरोबर, आणि सिंधूला असे पूर वर्षांतून दोनदां येतात, हिमालयांतून, पामीरांतून, गांधारांतून, सरहद्दीवरून, टोळीवाल्यांच्या प्रदेशांतून, प्रचण्ड प्रवाहानें पहाडांच्या मर्दनानें सिद्ध केलेली सिकता दऱ्याखोऱ्यांतून वहात येते, अटकच्या कांठावर कांहीं काळपर्यंत ती विश्रांति घेते, उडते, बागडते आणि पुढल्या पुराबरोबर पंजाबच्या व सिंधच्या मैदानांकडे धांव घेते. अचेतन सृष्टींत अहोरात्र व हरहंगामीं चालू असलेल्या या प्रकाराच्या आवृत्ति सचेतन सृष्टींतही सारख्या घडत आहेत, अलेक्झँडरच्या स्वारीपासून कालपरवांपर्यंत.

अटकेनजीक सिंधूचें दृश्य ज्यानें एकदां पाहिलें त्याला त्याचा विसर कधींही पडणें शक्य नाहीं. हें दृश्य पाहतांना त्याचें अंतःकरण ऐति-हासिक आठवणींनीं भरून येईल. ग्रीकांनीं व कुशाणांनीं, हूणांनीं व यवनांनीं अटकेच्या आसपास सिंधु ओलांडून हिंदुस्थानांत प्रवेश केला. आपण कधीं त्यांना प्रतिकार केला, तर कधीं त्यांना फितूर झालों. आक्रमक यवनांचा लोंढा थोपवून धरण्यासाठीं अकबरानें अटकेचा किल्ला उभारला आणि याचसाठीं इंग्रजांनीं तो शाबूत

राखला. येथून सिंधूच्या पात्राकडे पाहतांना मनाचा थरकांप होतो. वाटतें कीं पलीकडल्या तीरावर मध्य-आशियांतील अबुंज टोळीवाल्यांचा तळ पडलेला आहे आणि त्यांचे बिनीवाले उतार हुडकीत आहेत; क्षणभरांत ते अलीकडे येतील आणि बिजन सुरू करतील. मन जरा कचरतें, तोंच आठवतें कीं याच किल्ल्यावर मराठ्यांनीं भगवे झेंडे रोंवले होते. विजयी मराठ्यांचा नेता राघो भरारी अटकेच्या किल्ल्याच्या बुरुजावर रोंवलेल्या भगव्या झेंड्याशेजारीं उभा आहे; तो व त्याचे कणखर अनुयायी काबूल-कंदाहारकडे डोळे वटारून पहात आहेत आणि इस्लामी जगाला आव्हान देत आहेत! सत्यसृष्टींत घडलेल्या पण आतां कल्पनेलाही अकल्पित वाटणाऱ्या या घटनेचा आम्हांला तरी विसर पडणें शक्य नाहीं. या घटनेची ज्याला आठवण होईल त्याची छाती अभिमानानें भरून येईल आणि तशाच आवेशांत तो इकडे तिकडे पाहूं लागेल तर त्याला काय दिसेल? जमीनदोस्त झालेलीं हिंदूंचीं घरें, उध्वस्त केलेलीं हिंदूंचीं मंदिरें! फाळणीपूर्वींच झालेले हे अत्याचार पाहून तो शरमेनें मान खालीं घालील व स्वतःला विचारील, याचें कारण? कारण हिंदुस्थानच्या अखंडत्वावरील अविश्वास, कणखर मनगटाच्या नेत्यांचा व द्रष्ट्यांचा अभाव आणि यादवी व आर्जवी वृत्तीचा प्रादुर्भाव.

सिंधूनें अनेक खडक फोडले आहेत, तिला अनेक खडक अजून फोडावयाचे आहेत. तिनें एक संस्कृति निर्माण केली तर अनेक संस्कृतींचा उच्छेद केला; अनेक राज्यांचा विध्वंस केला, अनेक धर्मपीठांची धूळधाण केली. सिंधूचा प्रवाह घातकी आहे, सिंधूची परंपरा विध्वंसक आहे. सिंधूनें अलेक्झँडरला उतार दिला आणि सिंधनें शकांना आश्रय दिला. इस्लामी आक्रमकांचें हिंदुस्थानांत पहिलें पाऊल पडलें तें सिंधेंत आणि हिंदुस्थानच्या विच्छेदनाला पहिला विधियुक्त पाठिंबा मिळाला तोही येथेंच. पूर्वांवार प्रथाच आहे कीं हिंदुस्थानला जें जें विघातक त्याचा प्रारंभ येथें व्हावा. समाज सुसंपन्न झाला कीं त्याचा कणखरपणा कमी होतो, त्याच्या अंतरात्म्याला सुखासक्तीची कीड लागते; त्याला धर्मरक्षणापेक्षां चर्मरक्षणाची मातबरी विशेष वाटूं

लागते; आचारानें व विचारानें भ्रष्ट झालेला समाज स्वतः देशोधडीला लागतो. समाजशास्त्राचा हा सिद्धांत अचल आहे. सिंध व पंजाबमधील हिंदु व शीख यांची प्रचलित परिस्थिति हें या सिद्धांताचें प्रात्यक्षिक आहे. सिंधमधील हिंदु आपलीं संस्कारकर्मे ब्राह्मणांकडून करवीत, पूजा ज्योतीची करीत आणि शीखांचा गुरुग्रंथ पूज्य मानीत. त्यांनीं धर्म राखला नाहीं, आचारविचार पाळले नाहींत; फार काय, त्यांनीं आपली भाषाही सांभाळली नाहीं. शेवटीं ते मातृभूमीला पारखे झाले. आणि आपण हें सहन केलें, कारण आपणां सर्वांची वृत्ति जवळजवळ अशीच झालेली आहे. धार्मिक ढिलाईचें व सांस्कृतिक संकराचे समर्थन करणारांनीं आणि नव्या युगधर्माच्या व संस्कृतिनिर्मितीच्या वल्गना करणारांनीं हें प्रात्यक्षिक अभ्यासण्यासारखें आहे, एवढें तरी कोणीही मान्य करील.

सिमल्यापासून दार्जीलिंगपर्यंत अनेक दक्षिणवाहिनी नद्या गंगेला मिळतात. गंगेच्या मैदानांत पहाड नाहींत, खडक नाहींत व पत्थरही नाहींत. हरिद्वारापासून तों सहस्रमुखांनीं गंगा सागराला मिळते तेथपर्यंत पुराचें पाणी थोंपवून धरण्याची व्यवस्था करतां येईल असें नैसर्गिक सोयींचें स्थान नाहीं; त्याचप्रमाणें परचक्राचा प्राणपणानें प्रतिकार करण्याकडे नैसर्गिक प्रवृत्ति नाहीं आणि अशा वृत्तीची जोपासना करीत असलेल्या लढवय्या जमातीही नाहींत. बौद्धांनीं व जैनांनीं अहिंसा धर्माचा आत्यंतिक प्रचार करून हिंदुस्थानच्या प्रतिकारशक्तीचा कणा प्रथम या भागांत मोडला. एकदांच नव्हे तर अनेकदां सिद्ध झालेलें आहे कीं या प्रचारामुळें आक्रमकांना नेटाचा प्रतिरोध करण्यास हा प्रदेश असमर्थ झालेला आहे. गंगा मैदानांतील रहिवाशांचे देह सौष्ठवपूर्ण आहेत, आविर्भाव मिजासी आहेत, भाषा मिठास आहे, रीतरिवाज दरबारी आहेत; हे लोक धर्मनिष्ठ आहेत, सुसंस्कृतही आहेत; सकृद्दर्शनीं वाटतें कीं त्यांचें कौतुक करावें, अनुकरण करावें. पण या लोकांचे अंगीं कणखरपणा नाहीं. अहिंसेच्या अतिरिक्त प्रचारामुळें व पुरस्कारामुळें आणि अनेक शतकांच्या गुलामगिरीमुळें त्यांच्या अंगीं लाजिरवाणी लाचारी भिनलेली




नकाशा क्रमांक ...लींचा सिद्धांत

या नकाशात कॅनडा व ब्राझील या ढाली दाखविलेल्या नाहींत. ...ांतील आफ्रिका खण्डाची परिस्थिति अति प्राचीन आहे. या काळांत सिंधु व गंगा यांचीं मैदानें भरून आलेलीं नव्हतीं.

आहे, इतकी कीं तिलाच जरा शिष्टाचाराची मुरड घालून त्यांनीं वागणुकीची अशी एक विशिष्ट लकब व प्रथा निर्माण केलेली आहे कीं ती पाहून आपण क्षणभर चकित होतों, नंतर क्षणभर स्वतःच्या रांगड्या रिवाजांबद्दल शरम वाटते आणि थोड्या वेळानें अशी शिसारी येते ! वाटतें, कीं देव पावला, या शिष्टाचारांच्या संसर्गापासून आम्ही अलिप्त राहिलों ! आठवतें कीं इख्तियारुद्दीन मुहम्मद खल्जीनें फक्त अठरा घोडेस्वारांच्या आधारावर नडियाच्या लक्ष्मणसेनाचें राज्य एका सपाट्यास जिंकलें. गंगा गये गंगादास, जमना गये जमनादास, ही म्हण हें या गंगाजमनी वृत्तीचेंच प्रतीक आहे. ज्या प्रदेशाला पर्वताचा कणा नसतो व जेथील मैदानें सुपीक मळईचीं असतात त्याची वृत्ति अशीच असते. मैदानी मनोवृत्ति तडजोडीला नेहमीं तयार असते आणि डोंगरी वृत्ति प्रतिकाराला नेहमीं सज्ज असते, हा सिद्धांत येथेंही प्रत्ययाला येतो.

अरवलीचें मूळचें नांव आडावला. आबू हें याचें अत्युच्च शिखर. विस्तारानें लहान असला तरी याचें माहात्म्य मोठें आहे. अरवली हा राजस्तानचा आधार आहे. उत्तरेस सप्तसिंधूंचा प्रदेश आणि पश्चिमेस थर पारकरचें रण व त्यापलीकडे सिंधूचें मैदान. हे रण एवढें विस्तीर्ण व तहानलेलें आहे कीं त्यावर सिंधूसारख्या प्रचंड शक्तीलाही आक्रमण करतां आलेलें नाहीं. या रणांतील रेतीच्या लोटांपासून राजस्तानांतील जमिनींचें रक्षण करणें हें अरवलीचें भौगोलिक कार्य. तें त्यानें अनेक शतकें शक्य तेवढ्या कसोशीनें चालविलें आहे. पण मानवी सहकार्याच्या अभावीं व एकाकी तो काय करूं शकणार ? या रणानें भारतावर आक्रमण करून अरवलीला हतप्रभ केलें आहे—इतकें कीं आतां अरवलीचीं शिखरें तेवढीं या सिकतासागरांतून वर आलेलीं दिसतात; दऱ्याखोरीं रेतीनें भरून गेलीं आहेत आणि आसमंतांतला प्रदेश शेतीला किंवा वसाहतीला कायमचा निरुपयोगी होऊन गेलेला आहे. या मरुभूमीचें रूपांतर कृषिभूमींत करण्यासाठीं भगीरथाचा अवतार केव्हां होईल तो होवो. सिंध-पंजाबच्या मैदानांतून भारतावर झालेलीं आक्रमणेंही कांहीं काळपर्यंत अरवलीनें थोपवून धरलेलीं आहेत. या संघ-

षींचीं प्रतीकें त्याच्या अंगाखांद्यावर गडांच्या रूपांत अद्याप अस्तित्वांत आहेत. या कार्यांत भारतांतून मिळावयास पाहिजे होतें तेवढें सहकार्य अरवलीला मिळालें नाहीं, म्हणूनच तो हतप्रभ झाला. अरवलीच्या दक्षिणेकडील ढाळांचें पाणी गुजरातेंतून खंबायतच्या आखातांत जातें व पूर्वेकडील उतारांवरील पाणी राजपुतान्यांतून चंबळमार्फत गंगेला मिळतें. सौराष्ट्र, राजपुताना व मारवाड हे तिन्ही प्रदेश अरवलीनें निर्माण केलेले आहेत. पण त्यांच्या मनोवृत्तींत व परिस्थितींत केवढा फरक आहे! एवढासा पाऊस आला तर गुजरातेंत महापूर लोटतात; आणि सरस्वतीसारखी महानदी गडप करूनही मरुभूमि मात्र तृषार्त व कोरडी. सौराष्ट्राची वृत्ति राजस व वैश्य तर राजस्तानची तामस व क्षात्र. सौराष्ट्र ही भोगभूमि आणि राजस्तान ही त्यागभूमि. शकक्षत्रपांपासून इंग्रजांपर्यंत, अनेक परकीय आक्रमकांना सौराष्ट्रानें आमंत्रणपूर्वक आश्रय दिलेला आहे. व्यापाराला सोईस्कर असा समुद्रकिनारा, समृद्धीला पोषक अशी सुपीक जमीन आणि वाहतुकीला सुलभ अशी सपाट भूमि, या वैशिष्ट्यांमुळें सौराष्ट्रांत प्राचीन काळींच वैश्य वृत्ति निर्माण झाली; म्हणूनच चालू वैश्ययुगाची पहिली चाहूल सौराष्ट्राला लागली. तागडी–चोपडी यशस्वी झाली आणि ढाल–तलवार गंजत पडली. कारस्थानांच्या व कवाइती सैन्यांच्या जोरावर इंग्रजांनीं हिंदुस्थानांत शांतता प्रस्थापित केल्यामुळें व्यक्तिशः शूर पण असंघटित रजपुतांना हिंदुस्थानांत मानाचे स्थान राहिलें नाहीं; यापुढेंही असें स्थान त्यांना मिळेल असें दिसत नाहीं; कारण राजस्तान अद्याप मध्ययुगीन क्षात्रधर्माच्या कुसुंबी सुखस्वप्नांत दंग आहे; आणि हिंदुस्थान? – संमार्जनीच्या पावित्र्याच्या!

विन्ध्याद्रि हा भारताच्या कुलपर्वतांपैकीं एक प्रमुख पर्वत आहे. विन्ध्याद्रि हा हिंदुस्थानांतील सर्वांत प्राचीन पर्वत आहे, असें प्राचीन लेखक सांगतात. कुलपर्वतांच्या यादींत समाविष्ट केलेले ऋक्षवान् व पारियात्र हे स्वतंत्र पर्वत नसून ते विन्ध्य पर्वतश्रेणीचे भाग आहेत असें आधुनिक संशोधकांचें म्हणणें आहे; या तिन्ही पर्वतांबद्दलचे आधारग्रंथांतील उल्लेख गोंधळलेले आहेत. अमरकंटकपासून अलीराजपूरपर्यंत

नर्मदेच्या उत्तर किनाऱ्यालगत पसरलेल्या पर्वतश्रेणीला विन्ध्याद्रि ही संज्ञा अर्वाचीन आधारग्रंथांतून देण्यांत येते. विध्याद्रीनें हिंदुस्थानचे उत्तर व दक्षिण असे दोन भाग पाडलेले आहेत. विन्ध्याद्रि ही उत्तर हिदुस्थानची सीमारेषा आहे. विध्याद्रि हा मध्य–हिदुस्थानचा आधार आहे. नर्मदेच्या दक्षिण किनाऱ्यावरून उत्तरेकडे पाहिलें असतां विन्ध्याद्रि हा उत्तुग तटबंदीसारखा दिसतो आणि वाटते कीं जणुं या तटबंदीच्या संरक्षणासाठींच नर्मदेचा खंदक पहाड फोडून खोदून काढलेला आहे; आणि नर्मदेच्या उत्तर किनाऱ्यावरून उत्तरेकडे पाहिले असतां दिसून येतें कीं विन्ध्याद्रि हा पर्वत नसून पठाराचा कडा आहे; नर्मदेच्या कांठावर तो तुटलेला असल्यामुळें तो पर्वतप्राय भासतो, एवढेंच. या कड्यांपासून गंगाकिनाऱ्यापर्यंत उत्तर हिदुस्थानच्या बड्या मैदानाला उत्तराभिमुख ठाय ढाळ आहे.

पुराण वाङ्मयांत सांगितलें आहे कीं एके काळीं विन्ध्य अतिशय उंच होता आणि त्याच्या उंचीपेक्षां त्याची महत्त्वाकांक्षा मोठी होती. विन्ध्य मेरूशीं स्पर्धा करण्याच्या ईर्ष्येला पेटला आणि विन्ध्यदेवता सूर्यचंद्रांना म्हणूं लागली कीं तुम्ही आजवर मेरूभोंवतीं प्रदक्षिणा घालीत आलांत, आतां माझ्याभोंवतीं फिरूं लागा. विन्ध्याच्या विरोधामुळें सूर्यचंद्रांची गति कुंठित झाली, जगावर अंधकार पसरला, धरणी कंपायमान झाली, प्रळयकाळ येऊन ठेपला. या संकटांतून देवांच्या विनंतीवरून अगस्तीने जगाला सोडविलें. अगस्ती हा विन्ध्याद्रीचा गुरु. अगस्त्य या शब्दाचा अर्थ पर्वतांचें स्तंभन. आपण दक्षिणेंत जात आहोंत, तेथून परत येईपर्यंत अष्टांगांवर पडून रहा अशी त्यानें विन्ध्याद्रीला आज्ञा दिली. बिचारा फसला. त्यानें दण्डवत घातल्यानंतर अगस्ती दक्षिणेकडे निघाला व इकडेच स्थायिक झाला. नगर जिल्ह्यांत अकोल्याजवळ अगस्तीचा आश्रम आहे. ही त्याची पहिली वसाहत असावी. कन्याकुमारीनजीक अगस्त्येश्वरावर त्याचा आश्रम आहे. या स्थानावरून त्याच्या प्रवासाची व कार्याची कल्पना करता येते. उत्तरेंतून आर्यांच्या टोळ्या अगस्तीच्या नेतृत्वाखालीं विन्ध्य ओलांडून दक्षिणेंत आल्या, हे ऐतिहासिक सत्य अगस्तीच्या कथेंत निवेदन केलेलें

आहे. हा प्रसंग खि. पू. आठव्या शतकांत घडलेला असावा, असें डॉ. अयंगार यांचें म्हणणें आहे. 'दक्षिण दिशेला अगस्त्या नव्हत्या असें मीं पाहिलेलें आहे' असें भुशुंडानें वसिष्ठाला सांगितल्याचें योगवासिष्ठांत नमूद केलेले आहे ( निवारण प्रकरण ; पूर्वार्ध, सर्ग २१ ), त्याचें रहस्य हेंच आहे. सृष्टीच्या रचनेंत झालेल्या बदलामुळें ओढवलेल्या आणि बायबलांत नमूद केलेल्या अशाच प्रसंगांचा काळ खि. पू. ७४७ च्या सुमारास असावा आणि यामुळेंच यापूर्वी वर्ष ३६० दिवसांचे होतें, तें त्यानंतर ३६५ दिवसांचें करावें लागले. असे डॉ. वेलीकोव्स्की यांचें प्रतिपादन आहे.

उत्तरेकडून दक्षिणेंत येणारांना किंवा दक्षिणेंतून उत्तरेकडे जाणारांना, मग ते प्रवासी असोत किंवा आक्रमक असोत, आपल्या विस्ताराच्या, निबिड अरण्यांच्या व जंगली जमातीच्या जोरावर विरोध करणें, हे विन्ध्याद्रीचें प्राचीन काळांतील प्रधान कार्य. अगस्तीनें विन्ध्याद्रीला नमविलें पण त्यानें आपलें अडवणुकीचें धोरण सोडलें नाहीं. उत्तरेला दक्षिणेंत किंवा दक्षिणेला उत्तरेंत आक्रमण करूं द्यावयाचें नाहीं हा त्याचा बाणा. इतिहास सांगतो, सातवाहनांनीं उत्तर दिग्विजय करून मगधांत आपलें साम्राज्य प्रस्थापित केले, पण त्यांची सत्ता तेथें फार काळपर्यंत टिकली नाहीं. दंतकथा सांगते, दक्षिण दिग्विजयाला निघालेल्या विक्रमादित्याचा पराभव करून उत्तर दिग्विजयाच्या इच्छेने त्याचा पाठलाग करणाऱ्या शालिवाहनाचे सैन्य विन्ध्यकन्या नर्मदा हिने बुडविलें. दक्षिण दिग्विजयासाठी निघालेल्या हर्षवर्धनाचा पराजय पुलकेशि चालुक्यानें विन्ध्याद्रींत नर्मदातीरींच केला. अर्वाचीन इतिहासही हेंच सांगतो. वाहतुकीचे मार्ग सुलभ झाले व साधने विपुल झालीं, तरी आतांही विन्ध्याद्रीचा विरोध शांततामय वसाहतवाल्यांनाही बाधल्यावांचून राहत नाहीं.

अगस्तीच्या नेतृत्वाखालीं आर्यांच्या वसाहती दण्डकारण्यांत होऊं लागण्यापूर्वीच भृगूच्या नेतृत्वाखालीं आर्यांच्या टोळ्या सौराष्ट्रमार्गें दक्षिणेंत दाखल झाल्या होत्या. भृगूचें सौराष्ट्राशीं आणि परशुरामाचें अपरान्ताशीं असलेलें साहचर्य दर्शवितें कीं या टोळ्या विन्ध्याद्रीला

बगल देऊन गुजरातेंतून दक्षिणेंत घुसल्या. शकक्षत्रपांनीं याच मार्गानें दक्षिणापथावर आक्रमण केलें. अर्थात् सौराष्ट्र हें सह्याद्रीच्या पठाराचें दौर्बल्य आहे. खंबायतच्या आखातापासून अष्टागरापर्यंत अपरान्ताचा भाग मैदानी आहे. म्हणून उत्तरेकडून या भागांत सहज प्रविष्ट होतां येतें. या भागांतून पठारावर येण्यासाठीं असलेले अनेक घाट पुरातन काळापासून सह्याद्रीच्या मोक्याच्या शिखरांवरील प्रबळ किल्लेकोटांनीं रोखून धरलेले आहेत. ते दर्शवितात कीं महाराष्ट्राचें दौर्बल्य कोठें आहे याची जाणीव येथील मध्ययुगीन पुढाऱ्यांनाहि झालेली होती.

## सह्याद्रि :

जशी विविधता हिंदुस्थानांत तशीच महाराष्ट्रांत, आणि तसेंच ऐक्यही. एकीकडे घाटमाथ्यावरील उत्तुंग व प्रचण्ड प्रस्तर आणि दुसरीकडे सपाट व सुपीक मळई; एकीकडे निरक्षर व संस्कारशून्य जंगली जमाती तर दुसरीकडे संस्कारांनाच सर्वस्व मानणाऱ्या पण्डितांच्या वसाहती. एकीकडे मनुष्यवस्तीनें गजबजलेलीं सुसंपन्न शहरे व दुसरीकडे खोपटांचीं खेडी व निर्मनुष्य अरण्यें. एकीकडे झुडपेंही उगवणार नाहींत असे कोरडे माळ तर दुसरीकडे झुडूप रुजण्यालाही अवसर नाहीं अशी घनदाट अरण्ये. इकडे घाटांच्या उतारांवर बीजमात्रासाठीं खडकांत छेद घेऊन धान्याची लागवड करण्याची दरिद्री शेती तर तिकडे आजतागाईत शास्त्रीय साधनांनीं युक्त व समृद्ध अशा व्यापारी पिकांची पैदास. एकीकडे पावसाची समृद्धि तर दुसरीकडे सदैव अवर्षणाची धास्ती. या विविधतेचें कारण सह्याद्रि आणि या विविधतेच्या अंतरंगांतून एक ऐक्याचा प्रवाह अविरतपणें वहात आहे, त्याचेही आदिकारण सह्याद्रि.

गुजरात, महाराष्ट्र व कर्नाटक हे पश्चिम किनाऱ्याचे तीन मुख्य विभाग. त्यांची विभागणी सह्याद्रीनेंच केलेली आहे.

कोंकण व घाटमाथा आणि पठार व मैदानें, हे महाराष्ट्राचे मुख्य भौगोलिक विभाग. हे भिन्न असले तरी त्या सर्वांचें अंतर्याम एकच आहे. हें अंतर्याम म्हणजे सह्याद्रि.

हिंदुस्थानांतील पर्वतांमध्यें हिमालयाच्या खालोखाल विस्तार सह्याद्रीचाच आहे. सह्याद्रीची मुख्य रांग तापीतीरापासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेली आहे. सह्याद्रीची लांबी सुमारे अकराशें मैल आहे. सह्याद्रीची मुख्य रांग पश्चिम किनाऱ्यालगत असली तरी ती समुद्राला प्रत्यक्ष अशी कोठेंच भिडलेली नाहीं. त्याच्या पश्चिमेकडील तोकड्या शाखा कोठें अगदीं समुद्रापर्यंत आलेल्या आहेत, तर कोठें त्या समुद्रांत घुसून छोट्या बेटांच्या किंवा खडकांच्या रूपांत वर डोकावत आहेत.

तापी नदीपासून पालघाटपर्यंत सह्याद्रीची रांग सलग असून तिची लांबी आठशें मैलांवर आहे. पालघाटनजीक सुमारें दहा कोस रुंदीची खिड आहे. तिच्या दक्षिणेस कन्याकुमारीपर्यंत सुमारे दोनशें मैल लांबीची सह्याद्रीची दक्षिण श्रेणी पसरलेली आहे. महेंद्र पर्वत हें सह्याद्रीचें दक्षिणेकडील अखेरचें शिखर. तें त्रिवेंद्रमच्या आग्नेयेस असून अगस्त्येश्वर हें शिखर ईशान्येस आहे. महाराष्ट्रांत सह्याद्रीची उंची सरासरी तीन हजार फुटांची आहे. कळसूबाई हें या सह्याद्रीचें अत्युच्च (५४२७ फूट) शिखर. मलबारनजीक सह्याद्रि व नीलगिरि यांची भेट होते तेथे सह्याद्रीच्या शिखरांची उंची सात ते आठ हजार फूट आहे. महेंद्र पर्वताची उंची सुमारे चौपनशें फूट आहे. म्हणजे सह्याद्रीच्या उत्तरान्त व दक्षिणान्त शिखरांची उंची जवळजवळ सारखीच आहे.

भूगर्भशास्त्राच्या दृष्टीनेही सह्याद्रीचे दोन भाग पडतात. मालवणपर्यंतचा प्रदेश कृष्णप्रस्तरांचा व दक्षिणेकडील स्फटिकप्रस्तरांचा. हा फरक ठळकपणें सहज दृष्टीस येतो. खानापूरच्या दक्षिणेकडील टेकड्या आकारानें गुंडगोळ्या आहेत. त्यांच्या अंतर्भागांतील प्रस्तर ठिसूळ आहेत; त्यांवरील माती लाल आहे व आंतील खडक तांबूस व ठिसूळ आहेत. हे खडक क्वचितच उघडे दिसतात. कृष्णा पूर्वेकडे वळते तेथपासून तुंगभद्रेपर्यंतच्या प्रदेशांत ही भिन्नता वारंवार दृष्टोत्पत्तीस येते.

सह्याद्रीचे पूर्वेकडील फांटे दक्षिणापथाच्या पठारावर महाराष्ट्राच्या पूर्वसीमेपर्यंत पसरलेले आहेत. सातपुडा, सातमाळ, बालाघाट व महादेव ह्या सह्याद्रीच्या महाराष्ट्रांतील मुख्य शाखा. पालघाटनजीक उत्तरेस असलेल्या सह्याद्रीच्या फांट्याला नीलगिरि व दक्षिणेकडील फांट्याला

अनैमलै अशीं नांवें आहेत. कोचीन व त्रावणकोर भागांतल्या सह्याद्रीच्या फांट्यांना पाश्चिमात्य व्यापाऱ्यांनीं उत्पादनावरून वेलदोड्याचे पर्वत हें नांव दिलेलें आहे.

सह्याद्री व सातपुडा हे पर्वत एकामेकांशीं काटकोनांत आहेत. ते भिन्न व स्वतंत्र आहेत असा ग्रह आहे तो बरोबर नाहीं. त्यांचें अंतर्याम एकत्र आहे.

सातपुडा हा पर्वत अमरकण्टकपासून तापीच्या मुखापर्यंत पसरलेला आहे. त्याची लांबी सुमारें सहाशे मैल असून रुंदी वीस ते शंभर मैल आहे. महादेव व भैरवल पर्वत हे सातपुड्याचेच भाग आहेत. सातपुड्याची सर्वसाधारण उंची सुमारें दोन हजार फूट आहे. विन्ध्य व नर्मदा, सातपुडा व तापी आणि महाराष्ट्राचे पठार यांची उंची सोबतच्या आकृतीवरून स्पष्टपणे लक्षांत येईल. विन्ध्य हा स्वतंत्र पर्वत नसून



नर्मदा व तापी यांची खारी (श्री देशपांडे, 'वेस्टर्न इंडिया' वरून)

माळव्याच्या पठाराचा कडा आहे हें यावरून निदर्शनास येईल. आखराणी (४३४६), पचमढी (४३५८) आणि अमरकंटक (३४३३) हीं सातपुड्याचीं अत्युच्च शिखरें. तोरणमाळ व पचमढी हीं अत्युच्च व विस्तीर्ण पठारें. पचमढीचे भव्य पठार प्रवाशांना सोईस्कर आहे. ते तसें असलें तरी तोरणमाळ त्याहून भव्य आहे. या पठाराची सरासरी उंची ३३३६ फूट आहे. त्याचा विस्तार सुमारें सोळा चौरस मैल आहे. भोवती तोरणाचीं झाडें पुष्कळ असल्यामुळे त्याला हे नांव देण्यांत आलेले आहे. तोरणमाळाच्या नैर्ऋत्य कोपऱ्यांत एक विस्तीर्ण सरोवर आहे. हें कृत्रिम आहे. त्याचें पाणी अडवून धरणारा बंधारा कोणीं उभारला हें निश्चित झालेलें नाहीं. या सरोवराचा परिघ सुमारें पावणे-दोन मैलांचा आहे. डोंगराच्या एका दरींत सुमारे दोन फर्लांग

लांब, चारशें फूट उंच आणि पायथ्याशीं सुमारें दोनशें फूट रुंदीचा मातीचा बंधारा उभारून याचें पाणी अडविलेलें आहे. तलावाभोंवतीं अनेक पडकीं मंदिरें आहेत. स्थानिक दंतकथा सांगते कीं हीं मंदिरें गोरखनाथांनीं उभारलेलीं आहेत. असे विस्तीर्ण माळ सातपुड्यावर पुष्कळ आहेत, किंबहुना हें सातपुड्याचें वैशिष्ट्य आहे असें म्हटलें तरी चालेल. सातपुड्याच्या पश्चिम भागांत गर्द अरण्यें आहेत, पूर्व भागांत गवती रानें आहेत.

नर्मदा ही मेखलकन्या; कारण मेखल पर्वताच्या भ्रुकुटीवर तिचा उगम झालेला आहे. तिच्या शक्तीपुढें सृष्टीचा निभाव लागेना. तेव्हां तिला आवरण्याचें कार्य महादेवानें विन्ध्य व त्याचे सप्त पुत्र यांचेकडे सोंपविलें. त्यांनीं तिचा प्रवाह नियंत्रित केला. तेव्हांपासून तिचा प्रवाह मर्यादेनें वाहूं लागला. सप्तपुत्र ही सातपुडा या नांवाची एक व्युत्पत्ति. एकामागें एक अशा सात रांगा असल्यामुळे या श्रेणीला सातपुडा हें नांव प्राप्त झालें अशी सर्वसाधारण समजूत आहे. संभवनीय आहे कीं महाराष्ट्राचे आद्य ऐतिहासिक राज्यकर्ते जे सातवाहन त्यांच्या कुल-नामाच्या संक्षेपावरून व त्यांच्या येथील निवासावरून या श्रेणीला हें अभिधान प्राप्त झालेले असावे. विन्ध्यपुराणांत सातपुड्याला विन्ध्यपाद-पर्वत असे नांव दिलेले आहे. खुद्द सह्याद्रीच्या एका श्रेणीला सातमाळा हे नांव आहे.

सह्याद्रि व सातपुडा यांचा गाभा एकच आहे असें वर सांगितलें; त्याचे आतां स्पष्टीकरण करतो.

ज्वालामुखींतून उफाळलेल्या तप्त रसापासून सिद्ध झालेल्या खडकांना कृष्णप्रस्तर ( Trap-rock ) अशी संज्ञा आहे. एकेका उद्रेकाबरोबर तप्त रसाचा एकेक लोट उसळून वर येतो व जमिनीच्या पृष्ठभागावर पसरतो. तो थंड झाला कीं त्याचा एक थर तयार होतो. पुढल्या उद्रेकाबरोबर आलेला थर नंतर त्यावर पसरतो. अशा प्रकारें सिद्ध झालेल्या प्रदेशाला कृष्णप्रस्तर प्रदेश ( Trap-region ) अशी संज्ञा आहे. कृष्णप्रस्तर प्रदेशाची निर्मिति क्रांतिजन्य आहे. दक्षिणापथाच्या

निर्मितींतील ही अखेरची क्रांति. पठारनिर्मिति ही या घटनेची उत्क्रांति. या क्रान्तीनंतर महत्त्वाची अशी भौगोलिक घडामोड झालेली नाहीं. उत्क्रांतिकार्य सृष्टिक्रमानुसार अविरतपणे चालू आहे.

कृष्णप्रस्तर प्रदेश म्हणजेच महाराष्ट्र. थोडा भाग सोडला, जरा देवाण-घेवाण केली, कीं हें समीकरण बसतें.

भूगर्भशास्त्राच्या सर्वमान्य नकाशावरून या प्रदेशाच्या मर्यादा सांगतो : मालवणपासून खानापुरावरून बेळगांव, तालीकोट, कलादगी-वरून वाडी ; मालखेड, कल्याणी आणि बेदर यांना समाविष्ट करून घेऊन



नकाशा क्रमांक नं २
कृष्ण प्रस्तर प्रदेश

मुधोळ, हिंगणघाटवरून नागपूर ; तेथून अमरकंटकवरून जबलपूर ; पुढें सागर, चंदेरी व गुणावरून नीमच ; येथून प्रतापगड, झाबुवा व राजपिपळा यांवरून दमणपर्यंत ; अखेर दमणपासून समुद्रकांठानें मालवणपर्यंत. नर्मदेच्या खोऱ्यांत नरसिंगपुरापासून मोरटक्यापर्यंतची

सुमारें दहा ते वीस मैल रुंदीची पट्टी विंध्यप्रस्तरांची आहे आणि या भागांत जागोजाग गोंडवन-प्रस्तरांचे अवशेष आहेत. तापीकांठीं तळोद्यापासून अमरावतीपर्यंतची पट्टी मळईची आहे. ही पट्टी संयुक्त महाराष्ट्रांत सामील करून घ्यावयाची आणि गुजरातेतील राजपूत संस्थानें त्यांतून वगळावयाचीं. या कणखर प्रदेशांत सातपुड्याचा समावेश होतो. म्हणूनच मी म्हणतों कीं सह्याद्रि व सातपुडा यांचें अन्तर्याम एकच आहे.

सातपुडा हा सह्याद्रीचाच एक भाग आहे. जणुं सह्याद्रीनें स्वतःच्या शरीराशीं काटकोनांत उचलून धरलेला हा त्याचा दण्डच आहे. जे कार्य सह्याद्रीच्या किल्लेकोटांचे तेंच सातपुड्यांतील गडांचें.

नाशिक जिल्ह्याच्या वायव्य कोंपऱ्यांत सह्याद्रीच्या सातमाळ या शाखेचा प्रारंभ होतो. सातमाळ्याची चांदूर शाखा हातगडापासून मनमाडपर्यंत सलग पसरलेली आहे. घोडप ( ४७६१ फूट ) हे या शाखेचे अत्युच्च शिखर. या श्रेणीत सप्तशृंगीचे स्थान आहे व अनेक डोंगरी किल्ले आहेत. चांदूरचा प्राचीन ऐतिहासिक किल्ला ह्याच रांगेत आहे. मनमाडपलीकडे अंकाई-टंकाईपासून सातमाळ्याची अजंठा शाखा सुरू होते. या शाखेची एक फांदी कन्नडवरून बुलढाण्यापर्यंत गेलेली आहे आणि दुसरी देवगिरी, सिंदखेडवरून परभणीपर्यंत. पहिल्या रांगेत अजंठ्याचीं लेणीं आहेत आणि दुसऱ्या रांगेत वेरूळचीं. चांदूरच्या आसपास असलेली डोंगरी किल्ल्यांची रांग, अजंठा येथील अद्वितीय लेणीं आणि सातवाहनांचा निवास, यांमुळे या श्रेणीला हीं तीन वैकल्पिक अभिधानें देण्यांत आलेलीं आहेत.

हरिश्चंद्रगडापासून पश्चिमेकडे फुटलेली सह्याद्रीची शाखा अकोळनेर-नजीक पठारांत विलीन होऊन जेऊरनजीक पुन्हा डोकें वर काढते ; येथून एका बाजूने बेदरपर्यंत व दुसऱ्या बाजूने गुलबर्ग्यापर्यंत ही शाखा पसरलेली आहे. या रांगांना बालाघाट ही संज्ञा आहे. तुळजापूर व आंबे जोगाई हीं स्थाने बालाघाटावर आहेत. रायरेश्वरापासून किंवा मांढरदेवा-पासून शिंगणापुरापर्यंत विस्तार असलेल्या शाखेला महादेवाचे डोंगर असें नांव आहे.

महाराष्ट्राच्या पठारावर आणि कोकणांत सह्याद्रीच्या अनेक लहान-

मोठ्या शाखा सर्वत्र पसरलेल्या आहेत. हे जणुं महाराष्ट्राचे समर्थ स्नायु आहेत; त्यांमधून वाहणाऱ्या नद्या ह्या धमन्या. मेहनत करून समर्थ झालेले स्नायु कणखर व प्रतिकारक्षम करण्याकरतां पहिलवान त्यांवर दगडी कड्यांचे प्रहार करतात. सह्याद्रीचे घाटमाथ्यावरील दुर्ग व समुद्रकांठचे जंजिरे हीं अशाच पद्धतीनें सिद्ध केलेलीं सामर्थ्याचीं केंद्रें आहेत. सह्याद्रीला पारतंत्र्य असह्य आहे, पारतंत्र्याच्या प्रतिकाराला तो सदैव सज्ज असतो याचींच जणूं हीं प्रतीकें आहेत.

उद्रेक कालापूर्वी दक्षिण हिंदुस्थान आफ्रिका खंडाशीं जुळलेलें होतें. या जोडप्रदेशाचे नांव गोंडवन. शास्त्रीय सिद्धान्तानुसार त्या काळांत या भागांत लोकवस्ती नव्हती, प्रचण्ड श्वापदें मात्र होतीं. भूकंपांमुळें दरम्यानचा प्रदेश बुडाला. कांहीं संशोधक सांगतात कीं आफ्रिका हें नांव संस्कृतोद्भव असून तें अपरक — पश्चिम प्रदेश या शब्दावरून सिद्ध झालेले आहे. दरम्यानचा भाग एकाएकीं समुद्रार्पण झाल्यामुळें सह्याद्रीच्या पश्चिमेकडे फार थोडा चिंचोळा प्रदेश राहिला. या पट्टीचे प्राचीन नांव अपरान्त आणि प्रचलित नांव कोंकण.

पालघाटच्या खिंडीमुळें सह्याद्रीचे दोन भाग झाले आहेत, त्याचप्रमाणें कोंकणांचेही. पालघाटाच्या उत्तरेकडील कोंकण डोंगराळ आहे व जमिनी नापीक आहेत. दक्षिणेकडील कोकणांत विस्तीर्ण व सुपीक मैदानें आहेत. तेथील शेती वरिष्ठ दर्जाची आहे आणि लोकवस्ती दाट आहे. मलबार व त्रावणकोर हें दाक्षिणापथाचे नन्दनवन आहे. मुंबई राज्यांत जसे गोंवे, तसें. जे या प्रदेशाचे सुदैव तेंच त्याचे दुर्दैव. गोव्याप्रमाणेच या भागांतही पोर्तुगीजांनीं पंधराव्या शतकांत पाऊल रोंवलें. डच व पोर्तुगीज धर्मप्रचारकांनीं या भागांत इतक्या लोकांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिलेली आहे आणि येथील ख्रिस्ती लोकांच्या जीवनाला असें वैशिष्टय आणलेले आहे कीं त्यांचा प्रश्न आज नाहीं उद्यां, हिंदुस्थानला सहयावांचून राहणार नाहीं.

महाराष्ट्राचें हवामान, पाऊस व पाणीपुरवठा हीं सह्याद्रीवरच अवलंबून आहेत. पर्जन्यमानाचा नकाशा सह्याद्रीच्याच अनुरोधानें काढावा लागतो. खुद्द सह्य पर्वतांत दरसाल सरासरीने दीडशे इंच पाऊस

पडतो. पर्जन्याचें मान ज्या त्या स्थळाची उंची व तेथील झाडी यांवर अवलंबून असतें. महाबळेश्वरास सुमारें अडीचशें इंच पाऊस पडतो. पांचगणी याच पठारावर, नजीकच आहे, महाबळेश्वराचें उपनगरच आहे. पण येथें दरसाल सुमारें साठच इंच पाऊस पडतो. महाराष्ट्रांत पावसाचें मान वर्षानुवर्ष कमी होत आहे हें निश्चित. खुद्द महाबळेश्वरास पाऊस कमी कमी पडत चालला आहे. याचें कारण जंगलांची नियोजनशून्य अशी तोड. सह्याद्रीच्या बागलाण श्रेणीवर आणि भोंवतालच्या प्रदेशांत पावसाचें मान चाळीस इंचांहून कमी आहे. अपरान्त हा अपरिमित पर्जन्याचा प्रदेश ; उत्तर कोंकणांत चाळीस ते सत्तर इंच आणि दक्षिण कोंकणांत पंचाहत्तर ते शंभर इंच. देशभागांत सह्याद्रीपासून जसजसे दूर जावें तसतसें पावसाचें मान कमी होत जातें. मात्र इकडील प्रदेश उताराचा असल्यामुळे सह्याद्रीवरील दऱ्यांत बंधारे घालून अडविलेले पाणी या भागांत पाटांनीं आणून शेतीसाठीं उपयोगांत आणतां येते.

सह्याद्रि व सातपुडा या दोन्ही श्रेणींवर जंगले आहेत , पण तीं नांव घेण्यासारखीं मात्र नाहींत. जिकडे पहावे तिकडे बोडके डोंगर दिसतात आणि दऱ्याखोऱ्यांमध्ये खुरटलेलीं झाडे तेवढीं आढळतात. जुने लोक सांगतात कीं जे डोंगर आतां उघडे बोडके झालेले आहेत ते हिरव्यागार व प्रचंड वृक्षांनी आच्छदलेले त्यांनीं पाहिलेले आहेत. सरकारनें जंगलांच्या रक्षणाची व वाढीची तजवीज केली नाहीं आणि जनतेने लांकूडफांट्या-साठीं त्यांची लूटमार करण्याचे बाबतींत कसूर केली नाहीं. जंगलांची वाढ खुंटल्यामुळेंच पावसाचें मान कमी झालेलें आहे आणि जमिनी धुपून जात आहेत.

महाराष्ट्रांतील अपरान्ताच्या बाजूला सह्याद्रीचे कडे तुटलेले आहेत. त्यालगतच्या भागाला ढाळ फार आहे आणि समुद्रकिनाऱ्यानजीक मात्र तो ठाय आहे. यामुळें येथे लांब, रुंद, नांव घेण्यासारख्या नद्या नाहींत. त्यांची लांबी वाढते वळणांमुळें आणि मुखांजवळ रुंदी वाढते खाड्यांमुळें. या नद्या पावसाळ्यांत तेवढ्या भरून वाहतात. त्याचा ओघ द्रुत असल्यामुळें, प्रवाह हंगामी असल्यामुळें व त्यांचें पाणी अडविण्यास सोयीच्या अशा जागा नसल्यामुळें त्यांच्या पाण्याचा आपणांस अजून

फारसा उपयोग करून घेतां आलेला नाहीं. भूगर्भशास्त्रज्ञ सांगतात कीं या भागांत कृष्णा-गोदावरीसारख्या महानद्या होत्या. पृष्ठभागा-बरोबर त्याही सागरांत लुप्त झाल्या. पश्चिम किनाऱ्यालगतचा समुद्र उथळ आहे. यावरून अनुमान करतां येते कीं या बाजूचा त्याखालचा भूप्रदेश खचलेला नसून कललेला असला पाहिजे. सह्याद्रीच्या पूर्वेकडील प्रदेश पठारांचा, विस्तीर्ण मैदानांचा व कलत्या ढाळाचा असल्यामुळें दक्षिणापथाच्या मुख्य नद्या पूर्ववाहिनी झालेल्या आहेत. नर्मदा व तापी यांच्या खोऱ्यांचा ढाळ मात्र पश्चिमाभिमुखी आहे.

सह्याद्रि पर्वत व त्याचे पठार हा प्रदेश ज्वालामुखींच्या उद्रेकांपासून सिद्ध झालेला आहे याची जाणीव गेल्या शतकांत भूगर्भशास्त्रज्ञांना झाली. आपल्याला हा सिद्धांत फार प्राचीन काळापासून माहीत होता असे निश्चितपणे म्हणतां येते. हा सिद्धान्त ज्योतिर्लिंगांच्या संकेतांत नमूद केलेला आहे. ज्योतिर्लिंगांबाबतचा पुढील उल्लेख पहा—

सौराष्ट्रे सोमनाथं च श्रीशैले मल्लिकार्जुनम् ।
उज्जयिन्यां महाकालमोङ्कारममलेश्वरम् ॥
परल्यां वैजनाथं च डाकिन्यां भीमशंकरम् ।
सेतुबंधे तु रामेशं नागेशं दारुकावने ॥
वाराणस्यां तु विश्वेशं त्र्यंबकं गौतमीतटे ।
हिमालये तु केदारं घृसुणेशं शिवालये ॥

हिमालय पर्वत एवढा प्रचण्ड व पवित्र; आणि त्यावरील शिखरे हीं शंकराचीं आवडतीं वसतिस्थाने; पण हिमालयाच्या वांट्याला एकच ज्योतिर्लिंग आलेले आहे. गंगा तर प्रत्यक्ष शंकराच्या जटांतून अवतीर्ण झालेली; पण तिच्या वांट्याला विश्वेश्वर हें एकच ज्योतिर्लिंग आले. हिंदुस्थानच्या उत्तरेस जसें केदार तसे दक्षिणेस रामेश्वर. सौराष्ट्रांत सोमनाथ आणि अवन्तींत महाकाल, प्रत्येकीं एकएकच. बाकीचीं आठही ज्योतिर्लिंगें महाराष्ट्रांत, सह्याद्रीच्या शिखरांवर, पठारांवर अगर मैदानांवर आहेत. नर्मदातीरावरील ओंकार मांधाता ह्या स्थानाचा समावेश या

भागांत करण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. मामलेश्वर ( महाबळेश्वर ), भीमाशंकर व त्र्यंबकेश्वर हीं तिन्ही ज्योतिर्लिंगे व सह्याद्रीचीं शिखरें विख्यात आहेत. घृष्णेश्वर ( वेरूळ ), वैजनाथ ( परळी वैजनाथ ) व नागेश हीं स्थान भागानगर राज्यांत असून श्रीशैल हें मद्रास राज्याच्या सीमेवर, कृष्णाकांठीं आहे. अधिकृत अशीं द्वादश ज्योतिर्लिंगें हीं व एवढींच असलीं तरी ज्वालामुखींचा प्रत्यक्ष प्रत्यय येत असलेलीं व लोककथांशीं संबद्ध असलेलीं आणखी किती तरी स्थानें या भागांत आहेत.

शंकर हा सह्याद्रीचा स्वामी, विशेषतः घाटमाथ्याचा. त्याचा पुत्र स्कंद - खंडोबा हा स्वामी कडेपठारांचा ; विठोबा हा देशभागाचा ; आणि परशुराम हा अपरान्ताचा.

सातमाळा व बालाघाट या श्रेणींच्या दरम्यानचे खोरें गोदावरीचें ; त्र्यंबकेश्वर हा ह्या खोऱ्याचा स्वामी. बालाघाट व महादेव या श्रेणींचे दरम्यानचें खोरें भीमेचें ; भीमाशंकर हा या खोऱ्याचा स्वामी. महादेवाच्या डोंगरांच्या दक्षिणेकडील खोरे कृष्णेचे ; महाबळेश्वर हा या खोऱ्याचा स्वामी. गोदावरीची वृत्ति सात्त्विक आणि कृष्णेची वृत्ति तामस. भीमा ही या वृत्तींचा समन्वय करते. भीमा ही मोक्षाची सीमा असे भीमाशंकर-माहात्म्यांत सांगितलेलेच आहे. गंगथडी ही भूमि प्रभु रामचंद्राची, भीमथडी ही पंढरीरायाची. गंगथडी हा प्रदेश सप्तशृंगीच्या महिषासुरमर्दिनीचा ; भीमथडी हा तुळजापूरच्या भवानीचा आणि कृष्णथडी हा कोल्हापूरच्या अंबाबाईचा. कृष्णथडीचा नामदेव आणि गंगथडीचा ज्ञानेश्वर यांचा समन्वय तुकारामाने भीमथडींत केला. गंगथडींतले नाशीक हे धर्मक्षेत्र ; कृष्णथडींतला सातारा हें वीरक्षेत्र; भीमथडींतले पुणें हें कर्मक्षेत्र. या कर्मक्षेत्रीं धर्मक्षेत्र व वीरक्षेत्र यांचा समन्वय होतो ; आणि जेव्हां असा समन्वय होतो तेव्हांच महाराष्ट्राच्या संस्कृतीचा आविष्कार होतो.

सह्याद्रीमुळें महाराष्ट्राची नैसर्गिक विभागणी झालेली आहे. कोकण व देश ही एक जोडी ; घाटमाथा आणि मावळें व नेरे ही दुसरी. महाराष्ट्राचा दक्षिण भाग खुद्द सह्याद्रीच्या प्रभुत्वाखालीं आहे आणि उत्तर भाग सातपुड्याच्या. घाटमाथा कोकणापासून तुटक असला तरी त्यावर कोकणची छटा दिसते आणि मावळांवर देशाची व सातपुड्यावर

विदर्भांची. महाराष्ट्रांत सर्वत्र मराठे बहुसंख्य आहेत, तसेच ते कर्नाटकाच्या उत्तर भागांतही आहेत. ब्राह्मणी दृष्टीनें व स्थूलमानाने पाहिलें तर दिसतें कीं सह्याद्रि हा ऋग्वेदी आहे व सातपुडा यजुर्वेदी. सह्याद्रि महाराष्ट्राला कर्नाटकाशीं जोडतो व त्यापासून तोडतोही. ऋग्वेदी समाज हा त्यांना जोडणारा दुवा. सातपुडा हा महाराष्ट्राला गुजरात व मध्यप्रदेश यांशीं जोडतो व त्यांपासून तोडतोही. यजुर्वेदी समाज हा त्यांना जोडणारा दुवा. सह्याद्रि ही भूमि मूळची कातवडी व रामोशी या जमातींची आणि सातपुडा ही भिल्लांची व गोंडांची. कोळी व वारली जमाती हा त्यांना जोडणारा दुवा. सह्याद्रि हा पठाराला अपरांतापासून तोडतो व जोडतोही. कोंकण ही भूमि कोळी व भंडारी यांची; मावळ हा त्यांना देशाशीं जोडणारा दुवा. हे दुवे जितके प्रबळ होतील तितकेंच महाराष्ट्राचें ऐक्यही प्रबळ होईल. प्रचलित भिन्नता व ऐक्य हीं दोन्ही राज्यव्यवस्थेमुळें किंवा राजकीय कारणांसाठीं झालेलीं आहेत.

एवंगुणविशिष्ट सह्याद्रीचें दृश्य कसें दिसतें? दर्शन घेणारा ज्या विशिष्ट प्रदेशांत उभा असेल किंवा तो ज्या मोसमांत दर्शन घेत असेल त्यावर हें अवलंबून आहे. कोंकणांतून सह्याद्रीकडे पाहणारास प्रचण्ड, उत्तुंग, काळेभोर, तुटलेले कडे समोर खडे असलेले दिसतात. कोठें उतारांवर किर्र झाडी दिसते किंवा कड्यांच्या पायथ्यांशीं गर्द अरण्ये दिसतात. हीं अरण्यें व कडे जणुं त्याची हेटाळणी करून बजावीत असतात कीं पहा, आम्ही किती उच्च व तूं किती क्षुद्र. प्रचंड नागराजाने फडा उभारावी तसा खडा असलेला नागफणीचा कडा त्याला विचारतो कीं मी जसा तुझ्या क्षुद्र देहाकडे उंचावरून वांकून पहात आहे तशाच आविर्भावांत पठारावरले लोक तूं देशावर येशील तेव्हां तुझ्याकडे पाहतील, ते तुला सहन होईल ना? घाट चढावे आणि कडे तोडावे कोंकणच्या किंवा मावळच्या काटकुळया पण कणखर लोकांनींच; त्यांनीच सह्याद्रीचें आव्हान स्वीकारले. सह्याद्रीला क्वचित् कोठें कोठें उंचच उंच सुळके आहेत. जणुं आभाळ कोसळूं नये म्हणून जागोजाग धिरे दिलेले आहेत! तर कोठें अशा सुळक्यांचे पुंज दिसतात; जणुं आकाशाला लाथ मारणाऱ्या सूर्यवंशी उत्तानपाद राजाच्या पायाचीं बोटेंच आहेत! प्राचीन काळीं कडेपठारावर मुक्कामा-

साठीं उतरलेल्या श्रीमंत वऱ्हाडांचें व त्यांच्या सामानसुमानाचें हें आश्मिक रूप आहे असें दंतकथा डोळे मिचकावून सांगते. पठारावरून लांबवरून सह्याद्रीकडे पाहणारास वाटतें कीं देशाच्या सरहद्दीवर सृष्टीने ही तटबदीच उभारलेली आहे. घाटमाथ्यावरून आजूबाजूला पाहणारास नजर पोंचेल तेथवर अनेक आकारांचे लहानमोठे डोंगर टेकड्या दिसतात, त्यांमधील प्रारंभीं चिंचोळया असणाऱ्या दऱ्या व त्यांचीं पुढें रुंदावलेलीं खोरीं दिसतात. कांहीं डोंगर झाडाझुडपांनीं आच्छादलेले तर बरेच उघडे बोडके; सृष्टीने, वनश्रीने अलंकृत केलेले, पण मनुष्यानें अदूरदृष्टि स्वार्थासाठीं मुण्डन केलेले; कालमानाप्रमाणे कांहीं निळे तर कांहीं तांबूस, कांहीं हिरवट तर कांहीं पिवळसर, कांहीं करडे तर कांहीं काळेभोर; जणुं खुल्या मैदानांतील बाजारांत रंगी बेरंगी कडधान्यांच्या राशी घातलेल्या आहेत! आणि कांहीं असे संमिश्र रंगाचे कीं जणुं सरकारी वखारींतील धान्याची रास! घाटमाथ्यावर कोठेंही उभे रहा. आजूबाजूच्या ओबडधोबड प्रदेशाच्या उफाळणाऱ्या अंतर्यामासारखा एक तरी किल्ला दृष्टिपथांत येईल. त्याच्या दंतकथा व संग्रामकथा चित्तासमोर येतील. डोंगरांचे उतार खणून सपाट केलेल्या जागांवर, गर्द राईत किंवा टेंकाडांच्या माथ्यांवर वसलेली खेडीं व वाड्या लांबवरून किती मनोहर दिसतात. गवताच्या पेंढ्यांनीं किंवा नारळीच्या झांवळयांनीं शाकारलेल्या झांपांच्या व झोंपड्यांच्या पुंजक्यांमधून मंगलोरी कवलांचीं बंगलेवजा घरे मोठ्या डौलांत वर डोकें काढून उभीं असतात; वाटतें, जणुं कुस्ती मारणारा पहिलवान डोक्याला लाल पागोटे गुंडाळून आपल्या सहकाऱ्यांच्या खांद्यांवर बसलेला आहे! सह्याद्रींत पळसाचीं झाडें पुष्कळ. वसंतांत त्यांना कोंवळी पालवी फुटते आणि उन्हाळयांत लाल भडक फुलें. गाथासप्तशतींतील एका कवीला हीं पाने मुंगसाच्या कानांसारखीं दिसलीं. आणि फुले? एकाला तीं मांसभक्षक राक्षसांसारखीं दिसलीं तर दुसऱ्याला वाटलें कीं रानांत बुद्ध भिक्षूंचा थवाच जमलेला आहे! पावसाळयांत कड्यांवरून कोसळणारे पांढरे शुभ्र प्रपात पाहिले कीं वाटतें, काळयाभोर पार्श्वभूमीवर ही रजतरेखा ओढ-

आहे; पाण्याचा झोत वाऱ्याच्या झुळकीबरोबर हेलकावे घेऊं लागला कीं वाटतें, ही कड्याला चिकटलेली सर्पाची कात आहे, आणि कात टाकून सटकलेला सर्पाचा देह दऱ्याखोऱ्यांमधील नागमोडी मार्गानें सळसळत आहे. प्रपातांचा संतत घोष धुंद वातावरणांत दऱ्याखोऱ्यांमधून सारखा घुमत असतो; वाटते कीं त्यांनीं सह्याद्रीच्या वर्षासंगीताचा सूर धरलेला आहे! काळीभोर मेघमाला काळ्याकभिन्न खडकांना बिलगते तेव्हां सोसाट्याचे वारे वाहूं लागतात, विजा कडाडूं लागतात, पावसाच्या सरीवर सरी कोसळूं लागतात; तेव्हां चिंब झालेला बिचारा मानव एखाद्या कपारीचा, वृक्षाचा किंवा जाळीचा आश्रय घेतो आणि चकित चित्तानें हा कल्लोळ पाहूं लागतो, तेव्हा त्याला वाटतें कीं जणुं रानावनांत, दऱ्याखोऱ्यांत किरात-भिल्लिणीचा प्रेमप्रसंग चाललेला असून तो कोणीं पाहूं नये किंवा तो आपणांस दिसूं नये म्हणूनच सृष्टीनें रौद्र रूप धारण केलें आहे! पावसाळ्यांत केव्हांही आणि पावसाळा होऊन गेल्यानंतर सूर्याच्या अस्तोदयाच्या सुमारास दऱ्याखोऱ्यांमध्यें धुक्याचे ढग जमतात आणि सूर्योदयाबरोबर ते वर वर येऊन विरळ होत होत नाहींसे होतात; तेव्हां वाटतें कीं जणुं स्वप्नसृष्टीत सत्यसृष्टि विलीन होत आहे, किंवा सत्यसृष्टींत स्वप्नसृष्टि विलीन होत आहे; किंवा पावसाळ्याच्या आठवणीनें सह्याद्रि रुद्ध चित्तानें निश्वास सोडीत आहे!

## घाटमाथा :

ठाणें, नाशिक व नगर या जिल्ह्यांच्या सीमा कळसूबाईच्या डोंगरांत एकीमेकींना भिडतात. कळसूबाईच्या दक्षिणेस हरिश्चंद्रगडाचे पहाड आहेत. येथपासून फोंडा घाटापर्यंत पसरलेल्या सह्याद्रीच्या अत्युच्च शिखरांच्या व पठारांच्या प्रदेशाला घाटमाथा अशी संज्ञा आहे. या भागाची लांबी सुमारे दोनशे मैल व रुंदी सुमारे पन्नास मैल आहे. हरिश्चंद्रगड (४६९१′), भीमाशंकर (३४४८′) आणि महाबळेश्वर (४७१९′) हीं घाटमाथ्यावरील अत्युच्च शिखरें. घाटमाथ्याची पश्चिम सीमा नाणेघाट, भीमाशंकर, रायगड, प्रतापगड व विशाळगड यांवरून भूधरगडापर्यंत गेलेली आहे; पूर्वसीमा जुन्नर, पुणें, सातारा व कोल्हापूर या महाराष्ट्राच्या राजधान्यांच्या जवळून, पण त्यांना टाळून, गेलेली

नाशिक
सिन्नर
गोदावरी नदी
कळसूबाई
अकोले
संगमनेर
प्रवरा नदी
हरिश्चंद्रगड
मुळा नदी
शिवनेरी
भीमाशंकर
पुणे
पुरंदर
रायगड
राजगड
जंजिरा
मोर
भीमा नदी
महाबळेश्वर
नीरा नदी
सुवर्णदुर्ग
सातारा
परशुराम
कोकण
घाटमाथा
पाटण
जयगड
कऱ्हाड
संगमेश्वर
कृष्णा नदी
विशाळगड
पन्हाळा
कोल्हापूर
विजयदुर्ग
सिंधुदुर्ग
सावंतवाडी

नकाशा
क्रमांक ३
# घाटमाथा

आहे. शिवनेरी, सिंहगड, प्रतापगड, रायगड वगैरे महाराष्ट्राचीं राष्ट्रीय तीर्थस्थानें या भागांतच आहेत.

नाशिक जिल्ह्याच्या वायव्य कोंपऱ्यांत साल्हेर (५२६३′), मुल्हेर (४२७५′) व हातगड हे किल्ले आहेत. त्यांच्याभोंवतीं डोंगरांची जणुं निरगांठ मारलेली आहे. स्थानिक दंतकथा सांगते कीं मुल्हेरचा किल्ला पाण्डवांच्या काळांत मयूरध्वज व ताम्रध्वज या भावांच्या ताब्यांत होता. तारीख–इ–फिरोझशाही या ग्रंथांत सांगितलें आहे कीं १३४० सालीं साल्हेर–मुल्हेरचे किल्ले मानदेव राजाच्या ताब्यांत होते. आईन–इ–अकबरींत नमूद केलेलें आहे कीं या किल्ल्यांनीं मोंगलांच्या वेढ्याला बारा वर्षेंपर्यंत दाद दिली नाहीं. मुल्हेरचा किल्ला पडला तेव्हांच तिसरें व अखेरचें मराठा युद्ध समाप्त झालें. या बाजूला सह्याद्रीचीं शिखरें उत्तुंग आहेत, त्यांवर प्राचीन व मध्ययुगीन, प्रबळ व प्रचंड आणि ऐतिहासिक महत्त्वाचे किल्ले आहेत, तरीही या भागाचा समावेश घाट-माथ्यांत करण्यांत येत नाहीं.

कळसूबाई हे महाराष्ट्राच्या सह्याद्रींतील अत्युच्च (५४२७′) शिखर. आर्चडीकन गेल यानें १८६० सालीं रात्रीं प्रवास करून या शिखरावर आरोहण केलें. सुप्रभातीं त्यानें आजूबाजूला पाहिलें, तेव्हां त्याच्या तोंडून उद्गार निघाले : “खरोखर, हा दक्षिणेंतील पर्वतांचा राजा आहे!” कळसूबाईच्या उत्तरेस बितनगड व दक्षिणेस अलंग कुलंग हे किल्ले आहेत. दक्षिणेस पायथ्याशीं रत्नगडाजवळ प्रवरेचा उगम होतो आणि हरिश्चंद्रगडाच्या दक्षिणेस मुळेचा. इतिहासप्रसिद्ध असला तरी या भागाचा समावेश घाटमाथ्यांत करण्यांत येत नाहीं.

या उपेक्षेचें भौगोलिक कारण असें, की सह्याद्रीचा सलग असा घाटमाथा हरिश्चंद्रगडापासूनच सुरू होतो. शिवाय घाटमाथा ही संज्ञा नेहमीं कोंकणच्या साहचर्यानें वापरण्यांत येते. कोंकण व देश यांचे दरम्यान असलेल्या अनेक घाटांवरूनच या प्रदेशाला घाटमाथा हें नांव मिळालेलें आहे. हरिश्चंद्रगडाच्या उत्तरेकडचीं शिखरें तुटकीं आहेत, स्वतंत्र आहेत; हा भाग महाराष्ट्राच्या सांस्कृतिक केंद्रांपासून दूर व अलग आहे. सामाजिक कारण असें, कीं या बाजूला कोळी व ठाकूर

लोक बहुसंख्य आहेत व ते मागासलेले आहेत. ऐतिहासिक कारण असें कीं या भागांतले लोक मराठेशाहीशीं कधींच एकजीव झाले नाहींत; किंबहुना मराठेशाहींत या भागांतील प्रजा व तिचे पुढारी यांना शत्रुवत् लेखण्यांत येत असे. खुद्द घाटमाथ्यावर अशाच जंगली जमातींच्या वसाहती आहेत; पण येथें ब्राह्मणांनीं व मराठ्यांनीं आपलें राजकीय वर्चस्व व सांस्कृतिक महत्त्व प्रस्थापित केलेलें आहे.

कळसूबाईचें शिखर हा सह्याद्रीचा कळस आहे; पण या शिखराला यावरून ही संज्ञा प्राप्त झालेली नाहीं; संभवनीय आहे कीं हें शिखर अत्युच्च आहे अशी येथील जंगली जमातींना जाणीव होती. कळसूबाईची स्थानिक दंतकथा ऐकण्यासारखी आहे. कळसू ही एका गरीब कोळ्याची मुलगी. तिला रानावनांत भटकण्याची फार हौस. एकदां फिरत फिरत ती इंदूर या खेडेगांवीं आली. हें गांव कळसूबाईच्या पायथ्याशीं आहे. येथें एका कोळ्याच्या कुटुंबांत ती कामाला राहिली. भांडीं घासणार नाहीं आणि झाडलोट करणार नाहीं, या अटीवर ती वरकामाला राहिली होती. सुरळीत चाललें होतें, तों एके दिवशीं कोणी तरी तिला भांडीं घासायला व केर काढायला सांगितलें. सांगितलेलीं कामें आज्ञेप्रमाणें तिनें पुरीं केलीं; पण काम होतांच तिनें तें घर सोडलें आणि ती कळसूबाईच्या पठारावर येऊन राहिली. मरेपर्यंत ती येथेंच राहिली. तिनें भांडीं घासलीं त्या जागेला थाळेमेळ व केर काढला त्या जागेला काळदरा अशीं नांवें आहेत. कळसूबाईच्या येथील जीवनक्रमामुळें येथील लोक तिला देवीचा अवतार मानूं लागले. त्यांनीं कळसूबाईच्या शिखरावर छोटेंसें मंदिर उभारलें. कोळी लोक तिला आपली कुलदेवता मानतात, तिला नवस करतात. कळसूबाई ही जशी कोळ्यांची देवता, त्याचप्रमाणें महाबळेश्वर हेंही त्यांचेच दैवत. महाबळेश्वराच्या व कृष्णाबाईच्या मंदिरांत कोळ्यांना विशिष्ट हक्क आहेत. सिंघण यादवाच्या कारकीर्दींत (१२१० ते १२४७) या देवळांची व्यवस्था बाचाजी नांवाच्या कोळ्याकडे असल्याचा उल्लेख आढळतो. शिरके व मोरे या घराण्यांचें या भागावर प्रभुत्व होतें तेव्हांही हीच व्यवस्था चालू होती. सतराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास येथील वतनदार कोळ्यांनीं

पूजेचे काम गुरवांवर तात्पुरतें सोंपविलें, तेव्हांपासून हा हक्क गुरवांनीं बळकावला. या हक्काचे बाबतींत तंटे व निवाडे झालेले आहेत आणि या भागाचे प्रथेप्रमाणें खूनही पडलेले आहेत.

घाटमाथा हा प्रदेश महाराष्ट्राच्या इतिहासांत प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे; सांस्कृतिक व ऐतिहासिक दृष्टींनींही. प्राचीन व प्रसिद्ध अशीं लेणीं याच भागांत – भाजें व कार्लें, बेडसें व कोंडाणें येथे – आहेत. महाराष्ट्राच्या संस्कृतीचा आविष्कार याच भागांत प्रथम झाला असें यावरून दिसतें. सातवाहन हे स्थानिक राज्यकर्ते आणि क्षहरात क्षत्रप हे आक्रमक. त्यांचे संग्राम कोठें कोठें झाले हें निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. जुन्नरच्या परिसरांत यांपैकीं एक संग्रामक्षेत्र होते हें मात्र निश्चित. म्हणजे घाटमाथ्याच्या प्रारंभींच महाराष्ट्राचें पहिलें स्वातंत्र्य-संग्राम-क्षेत्र आहे, हिंदुस्थानांतील प्राचीन शिलालेखांचा एक संच जुन्नरनजीक नाणेघाटांत आहे. या लेखांना पहिल्या दर्जाचें ऐतिहासिक महत्त्व आहे; हिंदुस्थानच्या व महाराष्ट्राच्या दृष्टीनेंही. हे महाराष्ट्रांतले आद्य शिलालेख आहेत. वैदिक यज्ञांचा शिलालेखांतील पहिला उल्लेखही त्यांतच आलेला आहे. प्रजेच्या सुखसोयीसाठीं अशोकानें अनेक सार्वजनिक कृत्ये केल्याचे त्याच्या शिलालेखांत नमूद केलेलें आहे; त्यांचे अवशेषही आतां अस्तित्वांत नाहींत. हिंदुस्थानांतील अत्यंत प्राचीन, निश्चितपणें सार्वजनिक आणि अद्याप अस्तित्वांत व वापरांत असलेलें सार्वजनिक कृत्य म्हणजे जुन्नर व चौलसोपारा यांना जोडणारा नाणेघाट हें होय. हा घाट सुमोरें दोन हजार वर्षांपूर्वी सातवाहनांच्या अमदानींत खोदण्यांत आला. नाना व गुणा या दोन लोक-कार्य ( Public Works ) अधिकाऱ्यांनीं किंवा ठेकेदारांनीं परस्परांशीं स्पर्धा करून येथे दोन घाट खोदले व बांधून काढले; पैकीं जो प्रथम पुरा झाला त्याला अगोदर जाहीर झालेल्या अटींनुसार अधिकृत मान्यता देण्यांत आली, असें दंतकथा सांगेत. ती खरी असो वा नसो, येथें अगदीं जवळ जवळ असे दोन घाट आहेत आणि त्यांपैकीं नाणेघाट हा अधिक सोइस्कर आहे, एवढें मात्र खरें. व्यापारी व रहदारी वाहतुकीसाठीं सह्याद्रींत अनेक घाट खोदलेले आहेत.

सह्याद्रीवर आणि महाराष्ट्राच्या पठारावर अनेक दुर्ग आहेत. त्यांपैकीं बहुसंख्य घाटमाथ्यावर आहेत. यांपैकीं कांहीं सातवाहनकालीन असणें संभवनीय आहे. शिवनेरी किल्ल्याचा कडा तर मधाच्या पोळ्यासारखा या काळांत खोदलेल्या विहारांनीं भरलेला आहे. चालुक्य, राष्ट्रकूट, शिलाहार व यादव यांनीं घाटमाथ्यावर उभारलेल्या किल्ल्यांचे उल्लेख ऐतिहासिक साधनांत जागोजाग आढळतात. घाटमाथ्याच्या पूर्वेकडील ढाळांवर उगम पावणाऱ्या सर्व लहानमोठ्या नद्या एकमेकींना मिळत मिळत प्रथम भीमेंत व अखेरीस कृष्णेंत विलीन होतात. या नद्यांमध्ये एवढा तरी एकोपा आहे. पश्चिमेकडील ढाळांवरील नद्यांमध्यें एवढेंही सहकार्य नाहीं. जी ती स्वतंत्रपणें वाहते व खुद्द सागरालाच जाऊन मिळते. घाटमाथ्यावर पडणाऱ्या अपरिमित पर्जन्याचें पाणी वाहून नेतांना या नद्या सह्याद्रीचे कडे व दऱ्या फोडून काढतात आणि त्यांतील अक्षत रजःकण पाण्याच्या लोटांबरोबर देशावर वाहून नेतात. अविरतपणें चालू असलेल्या या कार्यामुळें महाराष्ट्राच्या सुपीकतेंत भर पडत आहे. मात्र या क्रियेचा खरा फायदा मिळतो कर्नाटकाला व आंध्राला! कधीं काळीं पूर आला तर गांवेच्या गांवे सर्वस्वासह वाहून न्यावयास या नद्या कमी करीत नाहींत. सह्याद्रीच्या साह्याशीं आपण सहकार्य करीत नाहीं किंवा शक्तीचे नियंत्रण करीत नाहीं; झाडें तोडतो, मळई वाहून जाऊं देतों व जमिनी धुपून जाऊं देतों; हा दोष आपला, सह्याद्रीचा नव्हे. हिंदुस्थानच्या इतिहासांत ज्यांनीं नांव गाजविलें त्या मावळ्यांचें निवासस्थान घाटमाथ्यालगतच आहे. एकूण महाराष्ट्राचें माहात्म्य, जीवनसामर्थ्य व समृद्धि हीं पर्यायाने घाटमाथ्यावरच अवलंबून आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं.

## मावळें व नेरें :

महाराष्ट्राच्या इतिहासाची थोडीबहुतही माहिती आहे त्याला मावळे व नेरे या संज्ञा परिचित असतात; पण त्यांची निश्चित माहिती नसते. पुणें जिल्ह्यांत मावळ आणि (माजी) भोर संस्थानांत पवन मावळ या नांवांचे तालुके आहेत. महाराष्ट्राच्या इतिहासांत विख्यात असलेला

मावळ भाग तो हाच व एवढाच आणि त्यांतील शेतकरी तेच मावळे, अशी पुष्कळांची समजूत असते, पण ती सर्वस्वी बरोबर नाहीं.

मावळ या शब्दाची व्युत्पत्ति अनेक प्रकारें लावण्यांत आलेली आहे. महाराष्ट्राच्या प्राचीन शिलालेखांत मामलाहार असा प्रादेशिक उल्लेख आढळतो. महाबळेश्वराचें जुनें नांव मामलेश्वर असें आहे. मनुस्मृतींत मल्ल नांवाच्या संकरजन्य जमातीचें नांव आहे; मल्ल किंवा तत्सम शब्द अंतर्भूत असलेलीं ग्रामनामें विशेषतः नगर, पुणें व सातारा या जिल्ह्यांत आढळतात. या साधनांवरून श्री. आबा चांदोरकर यांनीं सिद्धांत मांडला आहे कीं मावळ म्हणजे 'मल्लराष्ट्र'; किंवा महामल्ले – मामल्ल – मावळ = 'अत्युच्चपर्वतवेष्टित' प्रदेश; ज्या प्रदेशांतील अरण्यांत महाभल्ल, मोठीं अस्वलें पुष्कळ असतात तो प्रदेश; देशाच्या मावळतीला, म्हणजे पश्चिमेला असलेला प्रदेश – अशाही व्युत्पत्ति संशोधकांनीं दिलेल्या आहेत. मल्ल वा तत्सदृश नांवे असलेलीं ग्रामनामें इतरत्रही अशा प्रदेशांत आढळतात कीं ज्यांचा ज्ञात मावळांशीं यत्किंचितही संबंध नाहीं; किंवा तेथील मल्लांच्या निवासाबद्दल थोडासाही पुरावा आढळत नाहीं. महामल्ले हा समास घेडगुजरी आहे; कारण त्यांतील मल्ले हा शब्द कबूलीनें तेलगू, तामीळ किंवा कानडी आहे; म्हणून ही व्युत्पत्ति समाधानकारक वाटत नाहीं; शिवाय महामल्ल या समासानें खुद्द उच्च पर्वत सूचित होतो, अशा पर्वतांनीं वेष्टित असलेला प्रदेश, असा अर्थ सूचित होत नाहीं. सबब अधिक स्वीकारार्ह अशी व्युत्पत्ति आढळेपर्यंत महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांची व्युत्पत्तिच मान्य केली पाहिजे. महाराष्ट्राच्या–म्हणजे देशविभागाच्या मावळतीस, म्हणजे पश्चिमेस, घाटमाथ्यालगत, सह्याद्रीच्या कुशींत, पूर्वेकडील उतारांवरील कांहीं नद्यांच्या खोऱ्यांना मावळे व नेरें अशा संज्ञा देण्यांत आलेल्या आहेत. मावळ म्हणजे मावळतीकडील प्रदेश; विशेषतः मावळतीकडील खोरीं. घाटमाथा ही संज्ञा जशी कोंकणच्या लोकांनीं निर्माण केली तशीच मावळे ही संज्ञा देशावरील लोकांनीं निर्माण केलेली आहे. नेर म्हणजे नहर, पाण्याचा प्रवाह. सह्याद्रीच्या घाटमाथ्याच्या पूर्वेकडील प्रदेश, ज्यामधून नद्या वाहतात, जेथें विपुल पर्जन्य पडतो व तांदूळ पिकतो, त्या भागाला मावळ किंवा

नेर म्हणतात. पण मावळतीकडील सर्वच खोऱ्यांना हीं अभिधानें देण्यांत येत नाहींत.

बारा मावळें पुण्याखालीं व बारा मावळें जुन्नरखालीं, असा उल्लेख तुळशीदास शाहीराच्या पोवाड्यांत आहे; दुसऱ्या एका पोवाड्यांत अठरा मावळें असा संख्यादर्शक उल्लेख आहे; मात्र कोणत्याही पोवाड्यांत या मावळांचीं नांवे दिलेलीं नाहींत. श्री. राजवाड्यांनीं एका ठिकाणीं बारा नेरांची यादी दिलेली आहे. ही यादी आपण एका जुन्या दप्तरांत पाहिल्याचें ते सांगतात. ती यादी अशी : जुन्नेर, शिवनेर, मोन्नेर (किंवा मीन्नेर), घोडनेर, भीमनेर, भामनेर, पारनेर, संगमनेर, जामनेर, पिंपळनेर, अकोळनेर व सिन्नेर. या यादीपैकीं सिन्नर हें नाशिक जिल्ह्यांत आहे; जामनेर खानदेशांत; पारनेर, अकोळनेर व संगमनेर हीं नगर जिल्ह्यांत; आणि बाकीचीं पुणें जिल्ह्यांत आहेत. जुन्नर व पुणें या शीर्षकाखालीं त्यांची मांडणी होऊं शकत नाहीं. श्री. राजवाड्यांनीं इतरत्र पुणें ते शिरवळ या भागांतल्या बारा मावळांची यादी दिलेली आहे. यांपैकीं कांहींना त्यांनीं ‘खोरीं’ असेंही म्हटलेलें आहे. ही याद अशी : अंदर, पवन, घोटण, नाणें, गुंजण व हिरडस—हीं मावळें; मुसे, मुठे, पौड, भोर, वेलवंड व शिवतर—हीं खोरीं. हीं सर्व पुणें व भोर भागांतच आहेत. श्री. सरदेसाई यांनीं मावळांचे वर्गीकरण परंपरेप्रमाणें पुणे व जुन्नर या केंद्रांभोंवतीं केलेलें आहे, मात्र या रहाळांबाहेरचीं नेरें त्यांनीं दूरदृष्टीनें वगळलीं आहेत. रोहिड खोरे, वेलवंड, मुसे, मुठे, जोर, कानद, शिवतर, मुरूम, पौड, गुंजण, भोर व पवन हीं मावळें पुण्याखालीं; आणि शिवनेर, भीमनेर, घोडनेर, पारनेर, वगैरे जुन्नरखालीं.

मावळांच्या व नेरांच्या यादींतील बरींचशीं पुष्कळांना परिचित आहेत; आणि कांहींबद्दल बहुतेकांच्या कल्पना अस्पष्ट आहेत. बहुजनांच्याच नव्हेत तर संशोधकांच्याही. जुन्नर व शिवनेरी हीं तर महाराष्ट्राचीं राष्ट्रीय तीर्थस्थानें आहेत. मीना, घोड, भामा व भीमा या नद्या जुन्नर व खेड तालुक्यांतील असून त्यांच्या नांवांवरून त्यांच्या

खोऱ्यांना नेरांचीं नांवें दिलेलीं आहेत. पुणें-मुंबई रस्त्यालगत काल्र्यांचीं लेणीं आहेत. तीं ज्या डोंगरांत आहेत त्याच्या उत्तरेस आंध्रा नदीचें खोरें आहे. ही नदी भिवपुरीच्या डोंगरांत उगम पावते आणि राजापुराजवळ इंद्रायणीला मिळते. या नदीच्या खोऱ्याला आंध्र–अंदर–मावळ म्हणतात. शककर्ता शालिवाहन ज्या कुलांत निर्माण झाला त्या सातवाहन या महाराष्ट्र–महावंशाचें मूलस्थान आंध्र मावळांत असलें पाहिजे, म्हणूनच पुराणकारांनीं त्यांना आंध्र हें नांव दिलें असलें पाहिजे, असें माझें म्हणणें आहे. नाणे मावळ म्हणजे इंद्रायणीचें खोरें. नाणें हें गांव इंद्रायणीच्या उत्तर तीरावर खडकाळ्यासमोर आहे. पवना नदी मावळ तालुक्यांत तुंग किल्ल्याचे उत्तरेकडील डोंगरांत उगम पावते आणि दापोडी व बोपोडी यांचे दरम्यानचे मैदानांत पुण्यानजीक मुळा नदीस मिळते. बेडसा येथील अद्वितीय लेणीं या मावळांत आहेत. चिंचवडच्या पलीकडे पवनेच्या दक्षिण तीरावर पवनाळें या नांवाचें खेडे आहे. या नांवावरून पुणें या नांवाचाही संबंध पवनेशीं जोडण्याचा मला वारंवार मोह होतो. पौड खोरें हें मुळा नदीचें खोरें. महाराष्ट्रांत मुळा या नांवाच्या दोन नद्या आहेत. एक नगर जिल्ह्यांत व दुसरी पुणे जिल्ह्यांत. प्राचीन लेखांत 'मूलक' हें प्रादेशिक नांव वारंवार येतें. या दोन मुळा नद्यांच्या दरम्यानच्या प्रदेशाचें तर हें नांव नसेल? मूलक या नांवाची आंध्र ब्राह्मणांची एक शाखा आहे आणि मुळे या आडनांवाचीं अनेक जातींतील कुटुंबें महाराष्ट्रांत आहेत. मुठा व मुसा (मोसे) या नद्या खडकवासल्याच्या धरणानजीक एकत्र होतात. त्यांच्या कांठावर त्या त्या नांवांचीं खेडींही आहेत. या नद्यांचीं खोरीं त्यांच्या नांवांवरून ओळखलीं जातात. मोसे या नांवाच्या दोन नद्या सूक्ष्म प्रमाणाच्या सरकारी नकाशांत दाखविलेल्या आहेत. त्यांच्या कांठांवरच्या व दरम्यानच्या प्रदेशाला मोसें खोरेंच म्हणतात. गुंजण मावळ म्हणजे गुंजवणी नदीचें खोरें. गुंजवणी या नांवाच्याही दोन नद्या सूक्ष्म नकाशांत दिलेल्या आढळतात. पैकीं ज्या नदीवरून गुंजण मावळ हें नांव पडलेलें आहे ती राजगडाच्या उत्तरेकडील डोंगरांत गुंजवणें खेड्यानजीक उगम पावते आणि आळंदें या खेड्यानजीक नीरेस मिळते.

कानद नदी गुंजवणीस मिळते; वेळवंड नदी भाटघरच्या जलाशयांत विलीन झालेली आहे. त्यांच्यावरून त्यांच्या खोऱ्यांना तीं तीं नांवें मिळालेलीं आहेत. हिरडस मावळ म्हणजे नीरा नदीचें खोरें. नीरेच्या कांठावर हिरडोशी नांवाचें गांवही आहे. या भागांत हिरड्याचीं झाडें विपुल आहेत; त्यावरून या भागाला हें नांव प्राप्त झालेलें असणें संभवनीय आहे. रोहिड खोरें रायरेश्वराच्या पठाराच्या पायथ्याशीं आहे. शिवाजीनें व त्याच्या सहकाऱ्यांनीं रायरेश्वरासमोर स्वराज्याच्या शपथा घेतल्या, असा समज आहे; म्हणून शिवनेरीप्रमाणेंच हेंही महाराष्ट्राचें एक तीर्थस्थान आहे. नीरेच्या दक्षिण तीरावर, आणखी पुढें भोर व शिरवळ हीं खोरीं आहेत. वस्तुतः शिरवळ हें मैदान आहे, खोरें नाहीं. जोर खोरें म्हणजे जावळीचा प्रांत. श्री. राजवाड्यांनीं कर्यात व खेडेबारें या मावळांचाही उल्लेख केलेला आहे. कर्यात म्हणजे दहा-बारा खेड्यांचा लहान महाल. कर्यात मावळ म्हणजे पुण्याच्या आजूबाजूचा पठारी प्रदेश. या भागांत छत्तीस गांवें होतीं. ही शिवाजीची मूळची जहागीर. खेडेबारें म्हणजे खेड-शिवापुराभोंवतालचा भाग, शिवगंगा नदीचें खोरें. श्री. शंकरराव वत्स जोशी यांनीं मुळशी सत्याग्रहाचे वेळीं 'स्वावलंबन' या नियतकालिकांत मुळशी पेट्याचा इतिहास दिला होता. त्यांत त्यांनीं सावड खोरें आणि जुनें, मुरूम व चिमण या मावळांचा उल्लेख केला होता; पण त्यांचीं स्थळे निश्चित केली नव्हतीं. मुरूम खोरें हा गुंजण मावळाचाच एक भाग आहे; राजगडावर मुरूमदेव नांवाचे स्थान आहे, त्यावरून या भागाला हें नांव मिळालेलें आहे, असे श्री. खरे सांगतात. सावड, जुनें व चिमण या मावळांचा मला अद्याप उलगडा झालेला नाहीं. श्री. जोशी यांनीं कोर बारसें या आणखी एका मावळाचा उल्लेख केलेला आहे. हें स्वतंत्र मावळ नसून पौड मावळाची ही एक तर्फ मात्र आहे. कोळवण व कोरी गड यांचे दरम्यानचे भागाला कोर बारसें हें नांव होते. या भागांत कोळी लोकांची वस्ती प्राचीन काळापासून आहे. लगतचा कोंडाणें (सिंहगड) हा किल्ला मुसलमानी अमदानीपूर्वी कोळी नाइकांचे ताब्यांत होता. कोरी हें कोळयांच्या एका पोटजमातीचें नांव आहे. या जमातीची वस्ती

या भागांत असल्यामुळें या मावळाला हें नांव देण्यांत आलेलें असणें संभवनीय आहे.

आतांपर्यंत सांगितलेलीं सर्व मावळें घाटमाथ्याच्या पूर्वेस आहेत. शिवतर मावळ मात्र पश्चिमेस आहे. वरंध घाटांतलें मोठे वळण व उरमोड चढ आहे, तेथून उत्तरेकडे पाहिलें असतां पारमाचीची वस्ती दिसते; पलीकडे कुंभें, अंबें व कसबें अशीं तीन शिवतरें आहेत. हीं तिन्ही खेडीं खडक ओढ्याचे कांठीं आहेत. वेळवंड खोऱ्यांतून अथवा बोचेघोळी घाटाच्या मार्गानेंही या मावळांत उतरतां येते.

आतांपर्यंत दिलेल्या माहितीवरून दिसून येईल कीं संशोधकांनीं आजवर प्रसिद्ध केलेल्या मावळांच्या व नेरांच्या याद्या अविश्वसनीय आहेत. त्यांची बैठक अस्सल साधनांवर नाहीं आणि त्या पारखून घेतलेल्या नाहींत. पहा : जुन्नर ते चाकणपर्यंतच्या नेरांच्या यादींत या कक्षेबाहेरचीं नेरें समाविष्ट केलेलीं आहेत; उदाहरणार्थ, संगमनेर, सिन्नेर, वगैरे. विपुल पर्जन्य व तांदळाचें पीक हीं नेरांचीं लक्षणे कांहीं ठिकाणीं आढळत नाहींत; उदाहरणार्थ, संगमनेर, पिपळनेर वगैरे. घाटमाथ्याशीं सान्निध्य हें लक्षण कांहीं नेरांना लागू पडत नाहीं; उदारणार्थ, संगमनेर, पारनेर वगैरे. मावळतीकडे स्थान हें लक्षण कांहीं नेरांना लागू पडत नाही; उदाहरणार्थ, जामनेर, अकोळनेर वगैरे. यादींतील कांहीं नेरांचा कोणत्याही नदीशीं यत्किंचितही: संबंध लावतां येत नाहीं; उदाहरणार्थ, शिवनेर, अकोळनेर वगैरे. जुन्नरच्या उत्तरेस कुकडी नदी आहे व दाक्षिणेस थोड्या अंतरावर मीना. मीनेला स्वतंत्र नेर आहे. सबब जुन्नर हे कुकडीचें नेर मानलें तर शिवनेर हें स्वतंत्र नेर होऊं शकत नाहीं. शिवाय या याद्यांमध्यें एकाच नदीच्या नेराला अनेक नांवें दिलेलीं आढळतात. नीरेच्या खोऱ्याला हिरडस मावळ हें नांव आहे; तरी नीरेच्याच कांठच्या भोर व शिरवळ या भागांना स्वतंत्र खोरीं मानण्यांत आलेलें आहे. ही या खोऱ्याची वतनदारी विभागणी असणें संभवनीय आहे. हिरडस मावळ, भोर खोरें व शिरवळ खोरें, हीं नीरेच्याच कांठीं असलीं तरी त्या त्या भागांचे वतनदार देशमुख वेगवेगळे आहेत : हिरडसचे बांदल, भोरचे ढोर व शिरवळचे निगडे. वतनदारी विभागणीबाबतचें हें विधानही अनिश्चित

स्वरूपाचे आहे, कारण एकट्या रोहिड खोऱ्यांत जेधे व खोपडे अशीं दोन देशमुख घराणीं आहेत. नेरांत संगमनेरचा समावेश करावयाचा मग थाळनेर, अमळनेर यांनीं काय पाप केले आहे? जी स्थिति नेरांची तीच मावळांची. पुणें व शिरवळ हीं खुल्या मैदानांत आहेत; येथें विपुल पर्जन्य पडत नाहीं आणि तांदूळही पिकत नाहीं. सबब हीं मावळें होऊंच शकत नाहींत. त्याचप्रमाणें शिवतर हें घाटमाथ्याच्याही पश्चिमेस असल्यामुळें त्याचाही समावेश मावळांत करतां येणार नाहीं.

पारनेर, संगमनेर, जामनेर, पिंपळनेर, अकोळनेर व सिन्नेर या नेरांचा संबंध त्या त्या नांवांनी प्रसिद्ध असलेल्या तालुक्यांच्या ठाण्यांशीं लावण्यांत येतो. नेर व मावळ यांच्या सर्वमान्य व्याख्या पाहतां ही ओळख बरोबर नाहीं असें मला वाटतें. हीं सारीं ठिकाणें घाटमाथ्यापासून दूर आहेत, मोकळ्या मैदानांत आहेत, येथे अपरिमित पर्जन्य पडत नाहीं, तांदूळ पिकत नाहीं, तीं देशविभागाच्या मावळतीस नाहींत; शिवाय साधारणतः मावळे या नांवाने ओळखल्या जाणाऱ्या विशिष्ट रीतरिवाजाच्या जमातींची वस्ती या भागांत नाहीं. ऐतिहासिक दृष्ट्याही त्यांचा समावेश नेरांत किंवा मावळांत करतां येणार नाहीं. त्याच खोऱ्यांना मावळें किंवा नेरें म्हणावें कीं जेथे त्यांची नैसर्गिक लक्षणें अस्तित्वांत असतील आणि जेथील शेतकरी लढवय्यांनीं शिवाजीशीं स्वराज्यस्थापनेच्या उद्योगांत प्रारंभीं सहकार्य केलें असेल. अशी उठावणी झाल्याचे ज्या नेरांच्या व मावळांच्या बाबतींत नमूद नाहीं त्यांची मान्यता काढून घेतली पाहिजे.

मावळें व नेरें निश्चित करतांना आणखी एका दृष्टीनें विचार केला पाहिजे. महाराष्ट्राच्या देश या नांवाने ओळखल्या जाणाऱ्या प्रदेशाचे स्थूलमानानें चार भाग पडतात. पैकीं कृष्णेच्या दक्षिणेकडील कुंतल भागाचा प्रस्तुत विषयाशीं संबंध नाहीं. कुंतलाच्या उत्तरेकडील बालाघाट रांगेपर्यंतच्या प्रदेशावर भीमेचें प्रभुत्व आहे; येथून सातमाळा रांगेपर्यंतच्या भागावर गोदावरीचे आणि खानदेश, वऱ्हाड भागावर तापीचें. रायरेश्वर पठाराच्या पूर्वेस सुरू झालेली महादेव श्रेणी शिंगणापुरापर्यंत पसरलेली आहे. बालाघाट श्रेणी नगरनजीकच्या जेऊरपासून नांदेड जिल्ह्यांतील मांजरा-गोदावरी संगमापर्यंत पसरलेली आहे. महादेव व बालाघाट यांच्या

दरम्यानचा प्रदेश ही भीमथडी; कारण या भागांतील सर्व लहानमोठ्या नद्यांचा ओघ भीमेकडे आहे. भीमथडीच्या घाटमाथ्यानजीकच्या भागांत, जुन्नरपासून रायरेश्वरापर्यंतच्या प्रदेशांत, बहुतेक सर्व नेरें व मावळें आहेत. कृष्णा व गोदावरी हीं महाराष्ट्राच्या अनुक्रमें तामस व सात्त्विक वृत्तींचीं प्रतीकें आहेत आणि भीमा ही या दोन्ही वृत्तींचा समन्वय करणारी शक्ति आहे. भूगोल हें सांगतो व इतिहासही. शिवाजीमहाराजांचें नेतृत्व व कर्तृत्व भीमथडींतच सिद्ध झालें आणि मराठेशाहींत भीमथडींतील तट्टें हिंदुस्थान-भर थयथयलीं. शिवाजीमहाराजांना पहिला प्रबळ प्रतिरोध भीमथडीच्या दक्षिणेस जावळी प्रांतांत झाला आणि मराठेशाहीची पहिली फाळणी कृष्णा खोऱ्यांतच झाली. प्रस्तुत विषयापुरतें सांगावयाचें म्हणजे जीं मावळें व नेरें रायरेश्वराच्या दक्षिणेस मांडलेलीं असतील तींही आपण मान्य यादीं-तून वगळलीं पाहिजेत. नेर हें नगर या शब्दाचें रूप असणेंही संभवनीय आहे. खुद्द नेर या नांवाचीं अनेक गांवे महाराष्ट्रांत आहेतही. म्हणून या बाबतींत कांटेकोरपणें खबरदारी घेतली पाहिजे. नाहीं तर या रूपांत आढळणाऱ्या गांवांचा समावेश झाल्यामुळें नेरांची संख्या फुगत जाईल आणि या संज्ञेचें वैशिष्ट्य नष्ट होईल.

नेरांच्या ओळखींत कांहीं फरक सुचवावेसे वाटतात. नगर जिल्ह्यांत प्रवरेचे कांठीं अकोले हें तालुक्याचें गांव आहे. येथें नेराचीं सर्व लक्षणें अस्तित्वांत आहेत. यावरून वाटते कीं नेरांच्या यादींतलें अकोळनेर तें हेंच असावें. त्याचप्रमाणें सिन्नेर हें सीना नदीचें खोरें असावें. शिवतर हें शिवगंगा नदीच्या खोऱ्याचें नेर असणें संभवनीय आहे; येथें शिवतरे या आडनांवाचीं मराठा कुटुंबें आहेतही.

स्वातंत्र्यसाधन हा विषय महाराष्ट्रीयांना मोठा जिव्हाळ्याचा आहे. कारण हिंदुस्थानांतील अनेक स्वातंत्र्य-संग्रामांत त्यांनीं आघाडीची उडी घेतलेली आहे. खुद्द महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या इतिहासाशीं मावळांचा व नेरांचा निकटचा संबंध आहे. म्हणूनच महाराष्ट्रीयांना त्यांच्याबद्दल विशेष आस्था वाटते.

## सह्याद्रींतील किल्ले :

हिंदुस्थानांतील किल्ले उभारण्याची प्रथा फार प्राचीन आहे. ऋग्वेदांत कडेकोट बंदोबस्त असलेल्या किल्ल्यांचे अनेक उल्लेख आढळतात. (उदा० : ५.३४.७ ; ७.२५.२.) ; एके ठिकाणीं तर चिरेबंदी कोट असलेल्या नगरांचा उल्लेख (४.३०.२०) केलेला आहे. सुसंस्कृत आर्यांनींच नव्हे, अनार्यांनींही अभेद्य दुर्ग उभारले होते आणि इंद्राच्या नेतृत्वाखालीं आर्यांनीं ते नष्ट केले, असें कांहीं ऋचांवरून दिसतें. पुराणवस्तुसंशोधकांनीं सिंधु नदीच्या खोऱ्यांत तटबंदीचीं अनेक शहरें उकरून काढलेलीं आहेत. ऋग्वेदांतील अनार्यांचे दुर्ग हेच वा असेच असले पाहिजेत, असा अर्वाचीन संशोधकांचा निष्कर्ष आहे. महाभारत व रामायण या सर्वसंग्राहक ग्रंथांत किल्ल्यांचीं अनेक वर्णनें आढळतात. तट, वेस, बुरूज, मोर्चे, माऱ्याचीं ठिकाणें, गुप्त मार्ग, जलाशय, खंदक वगैरे योजना तत्कालीन किल्ल्यामध्ये असत, असें या (उदा० : महाभारत : शांतिपर्व : राजधर्म) वर्णनांवरून दिसतें. या प्राचीन किल्ल्यांचा अद्याप मागमूसही लागलेला नाहीं. शिशुनाग हा हिंदुस्थानांतील पहिला ज्ञात ऐतिहासिक राजवंश. त्यांची पहिली राजधानी गिरिव्रज येथे होती. नांवच सांगतें कीं ही राजधानी डोंगरी होती. राज्यविस्तारानंतर तेथून ती त्यांनीं राजगृहास आणली. येथील दुर्गाच्या चिरेबंदी तटांचे अवशेष अद्याप अस्तित्वांत आहेत. साम्राज्याचा विस्तार वाढूं लागल्यामुळें मराठेशाहीची राजधानी रायगडाहून साताऱ्यास व तेथून पुण्यास न्यावी लागली. त्याच कारणासाठीं शिशुनागांनीं आपली राजधानी गिरिव्रज येथून राजगृहास आणली आणि त्यांचे उत्तराधिकारी जे मौर्य त्यांनीं आपली राजधानी मैदानी मुलखांत, पाटलीपुत्र येथें प्रस्थापित केली. येथें शोण व गंगा यांच्या संगमावर अजातशत्रूनें किल्ला बांधला होता. मेगॅस्थेनिसनें केलेलें पाटलीपुत्राचें वर्णन उपलब्ध आहे. त्यावरून दिसतें कीं या शहराची लांबी नऊ मैल व रुंदी अर्धा मैल होती. शहराभोंवतीं भक्कम लांकडी तटबंदी होती ; तटांत चौसष्ट वेशी होत्या ; तटावर पांचशें सत्तर बुरूज होते ; तटाभोंवतीं सहाशें फूट रुंदीचा व

चाळीस फूट खोलीचा पाण्यानें भरलेला खंदक होता. पाटलीपुत्रांत अलीकडे झालेल्या उत्खननांत या लांकडी तटबंदीचे अवशेष उपलब्ध झालेले आहेत. या तटांचे आंत मातीची तटबंदी असलीच पाहिजे. उज्जयिनी येथेंही तटबंदीच्या फळ्या आढळलेल्या आहेत. यावरून हे किल्ले समकालीन असावे असा निष्कर्ष निघतो. भुवनेश्वरानजीकच्या शिशुपालगडाच्या उत्खननाचा अहवाल नुकताच प्रसिद्ध झालेला आहे. खि. पू. ३०० ते इ. स. ३५० पर्यंत हा गड वापरांत होता. याचीही सर्वांत प्राचीन तटबंदी मातीचीच होती. कौटिल्यानें अर्थशास्त्रांत ( २ : ३ व ४. ) दुर्ग या विषयाला दोन प्रकरणें दिलेलीं आहेत. औदक ( जलदुर्ग, जंजिरा ), पार्वत ( गड, डोंगरी किल्ला ), धानवन ( भुईकोट ) व वनदुर्ग ( जंगली छावणी ) असे किल्ल्यांचे चार प्रकार त्यानें नमूद केलेले आहेत. कौटिल्याचे जंजिरे समुद्रांतील खडकांवर उभारलेले नसून मुख्यत्वेकरून नदीकांठीं किंवा नद्यांच्या प्रवाहांमधील बेटांवर उभारलेले आहेत. कौटिल्याच्या किल्ल्यांची तटबंदी मातीची असे आणि भोंवतीं खंदक असत. वरून रथ चालण्याइतके हे तट रुंद असत. तट मातीचे असले तरी बुरूज विटांचे असत. शुक्रनीतींत दुर्गांची वर्गवारी लावलेली असून गिरिदुर्गांना सर्वोच्च स्थान ( ४ : ६, ११, १२ ) दिलेलें आहे. मनुस्मृतींतही किल्ल्यांचें वर्गीकरण ( ७ : ७०, ७१ ) सांगितलेलें आहे.

धनुर्दुर्गं महीदुर्गमब्दुर्गं वार्क्षमेव वा ।
नृदुर्गं गिरिदुर्गं वा समाश्रित्य वसेत्पुरम् ॥
सर्वेण तु प्रयत्नेन गिरिदुर्गं समाश्रयेत् ।
एषां हि बाहुगुण्येन गिरिदुर्गं विशिष्यते ॥

"धनुर्दुर्ग ( सभोंवार वीस कोसपर्यंत उदकरहित प्रदेशानें युक्त असलेला दुर्ग ), महीदुर्ग ( बारा हातांहून उंच, युद्धार्थ वरून फिरतां येईल एवढा रुंद आणि आवरणयुक्त गवाक्षांदिकांनीं संपन्न अशा तटाने वेष्टित असलेला दुर्ग ), अब्दुर्ग ( जलानें परिवेष्टित असा दुर्ग ), वार्क्षदुर्ग ( तटाबाहेर चार कोसपर्यंत मोठमोठे वृक्ष, कांटेरी झाडें व जाळ्या यांनीं व्याप्त असलेला

दुर्ग), नृदुर्ग ( हत्ती, घोडे, रथ व पायदळ यांनीं रक्षित असा दुर्ग ) आणि गिरिदुर्ग ( ज्यावर चढण्यास एकच मार्ग आहे, ज्यावर जलसंचय, वृक्ष व धान्य निर्माण करणारीं क्षेत्रे आहेत असा दुर्ग ) यांपैकीं कोणत्या तरी दुर्गाचा आश्रय करून नगर रचावें. या सर्व दुर्गांत अनेक गुणयुक्त असलेला गिरिदुर्ग प्रशस्त आहे. यास्तव प्रयत्नेंकरून त्याचा आश्रय करावा. " दुर्गाचा आश्रय करून राहणाऱ्या राजाला त्याचे शत्रु मारूं शकत नाहींत आणि दुर्गाच्या आश्रयानें लढणारा एक एक धनुर्धर शंभर शंभर शत्रूंशीं लढूं शकतो, असेंही मनुस्मृतींत सांगितलेलें आहे. या वर्णनावरून तत्कालीन दुर्गांची व युद्ध-पद्धतीची ठोकळ मानानें कल्पना करतां येते. मनूने निर्वाळा दिला आहे कीं गिरिदुर्गांचे ठायीं देवादिकांचा निवास असतो. गिरिशिखरांवर देवा-दिकांचीं स्थाने असतात अशी सर्वसाधारण समजूत असल्यामुळें मनूनें हे उद्गार काढले आहेत कीं गिरिदुर्गांवर होणाऱ्या निर्वाणीच्या संघर्षांत आत्मयज्ञ करून देवलोकीं अढळपद मिळविणाऱ्या वीरांना अनुलक्षून त्यानें हें वैशिष्टय नमूद केलें आहे, कोण जाणे.

गड व दुर्ग हीं संघर्षांचीं प्रतीकें. दुर्ग हे शस्त्रसज्ज दुर्गेच्या आराधनेचें आसन. भवानी ही स्वातंत्र्याची अधिष्ठात्री देवता. दुर्ग हें स्वातंत्र्य-लक्ष्मीचें यज्ञकुंड. तरवारींचे खणखणाट आणि तोफांचे धडधडाट, रणवाद्यांच्या मैफलींत दुर्गाची वास्तुशांति व्हावी लागते. आत्मार्पणाची अहमहमिका व मर्दुमकीची शर्थ यांवर त्यांचे अस्तित्व अवलंबून असतें. महाराष्ट्रांतील किल्ल्यांनीं स्वातंत्र्यलक्ष्मीची पूजा अनेक वेळां हरप्रकारच्या साहित्याने केलेली आहे.

महाराष्ट्रांत आहेत तसे किल्ले हिंदुस्थानांत इतरत्र कोठेंही नाहींत. असलेच तर फक्त राजपुतान्यांत आहेत. येथें आहेत तितके किल्ले तर कोठेंच नाहींत. कोणत्याही पर्वतश्रेणींत किंवा कोणत्याही देशांत येथें आहेत तशा किल्ल्यांच्या रांगा व पुंज आढळत नाहींत. डोंगरी किल्ले हें महाराष्ट्राचें वैशिष्टय आहे. असे किल्ले महाराष्ट्राच्या प्रत्येक पोट-विभागांत आहेत. इतिहासाची आठवण आहे तेव्हांपासूनचे गड व दुर्ग महाराष्ट्रांत आहेत.

या वैपुल्याचें, वैशिष्ट्याचें व परंपरेचें आदिकारण सह्याद्रि. सह्याद्रीच्या सान्निध्यामुळें नैसर्गिक अनुकूलता; राजकीय उलाढालींमुळें संरक्षणाची आवश्यकता आणि यांहून महत्त्वाचें कारण, येथील जनतेची दुर्दम्य व स्वाभाविक स्वातंत्र्यप्रीति व लढाऊ वृत्ति.

हिमालयांत किल्ले नाहींत; कारण तेथें किल्ले उभारण्याची जरूरीच नाहीं. हिमालयापलीकडून शत्रूंचें आक्रमण होणें शक्य नाहीं आणि सिंधु-गंगा मैदानांवर शत्रूंचें आक्रमण झालें तर हिमालयाचा आश्रय घेणें शक्य नाहीं. स्वातंत्र्यरक्षणासाठीं किंवा उठावणीसाठीं हिमालयाचा आश्रयस्थान किंवा संघटनास्थान म्हणून उपयोग होणें अशक्य. हिमालय निवृत्तिप्रधान आहे आणि सह्याद्रि प्रवृत्तिप्रधान. हिमालय ही देवभूमि आहे आणि सह्याद्रि ही वीरभूमि आहे. आक्रमकांपासून बचावणी करण्यासाठीं किंवा शत्रूंचा निःपात करण्याकरितां उठावणी करण्यासाठीं सह्याद्रीसारखी सोयीची पर्वतश्रेणी नाहीं. गैरमाहितगाराला दुर्गम व धोक्याची आणि माहितगाराला सुगम व बिनधोक. स्वतः सह्याद्रि हा मैदानी लोकवस्तीपासून दूर आहे आणि हीं मैदानें त्याच्या टप्प्यांतही आहेत. पादचारी व अश्वारूढ सैन्यांच्या काळांत या किल्ल्यांत मुक्काम ठेवून बंदोबस्ताने राहतां येत असे, राज्यकारभारावर देखरेख ठेवतां येत असे आणि भोवतालच्या मुलखांत शत्रूंच्या छावण्या पडल्या तर त्यांवर अग्निवर्षाव करून किंवा छापे घालून त्यांचा परामर्ष घेतां येत असे. या दृष्टीनें विशेष सोयीचे असे फक्त दोन पर्वत हिंदुस्थानांत आहेत : अरवली व सह्याद्रि. म्हणूनच दुर्गनिर्मितीचें तंत्र येथे अनेक वैशिष्ट्यांसह पराकोटीला पोंचलेलें आहे.

सिंधु व गंगा यांच्या मैदानांत अनेक लहान-मोठे, प्राचीन व मध्ययुगीन भुईकोट आहेत. त्यांच्या तोडीचे कोट आपल्याकडेही आहेत. या मैदानांतील रेती व मातीच्या लोटांखालीं गाडले गेलेले असे अनेक कोट व नगरें संशोधकांनीं उत्खनन करून उजेडांत आणलीं आहेत. आमच्या भागांतले प्राचीन कोट रणधुमाळींत नष्ट झाले, त्यांचे अवशेषही आढळत नाहींत. नांव घेण्यासारखे महाराष्ट्रांतील भुईकोट मैदानी मुलखांत आहेत. हे कोट मुख्यत्वेंकरून येथें कांहीं काळपर्यंत राज्यें

करणाऱ्या परकीय सत्ताधाऱ्यांनीं किंवा त्यांच्या हस्तकांनीं उभारलेले आहेत; ते त्यांनीं स्वतःच्या वा निकटवर्तीयांच्या संरक्षणासाठीं उभारलेले आहेत किंवा पूर्वींपासून अस्तित्वांत असलेल्या कोटांचा गणवेश बदलून सिद्ध केलेले आहेत. त्यांचें वैभव आतां केवळ उध्वस्त अवशेषांच्या स्वरूपांत निदर्शनास येतें. उलटपक्षीं अशाच परकीयांनीं हिंदुस्थानाच्या उत्तर भागांत उभारलेले किल्ले उत्कृष्ट स्थितींत अस्तित्वांत आहेत; कारण त्यांवर तेथील जनतेने निकराचे हल्ले चढविलेच नाहींत. उदाहरणार्थ, दिल्ली व आग्रा येथील मोंगली किल्ले पहा. दिल्लीच्या व भोंवतालच्या हिंदु राजांचीं राज्यें व त्यांचे किल्ले मुसलमानांनीं—मोंगलांनीं आवेशानें व हेतुपुरःसर उध्वस्त केले; तेथील प्रजेनें तसा आवेश त्यांना विरोध करतांना कधीं दाखविला नाहीं. त्यांच्या हिंदु अधिकाऱ्यांनीं हिंदूं-वरच चढाई करतांना मात्र तो दाखवला. अखिल हिंदुस्थानच्या वतीने दुराणीशीं लढावयासाठीं मराठे पानिपतावर गेले तेव्हांचा प्रसंग. भाऊ-साहेबांच्या बखरींतील पुढील उतारा पहा: "खर्चाचो टंचाई जाणोन पातशहा याचे तक्तावरतें कचेरीस छत रुप्याचें होतें, त्याजवर सोनेरी वर्खी मुलाम्याचें काम होतें. त्याजवर नजर भाऊसाहेबांची गेली. विचार केला कीं हें छत आहे. हें काढून फौजेस रोजमुरा द्यावा, म्हणोन मसलत ठीक केली, आणि उगेंच फुलें द्यावीं म्हणोन शिंदे, होळकर व सुरजमल्ल जाट यांस विचारणा केली. ते समयीं सुरजमल्ल जाट यांनीं अर्ज केला कीं 'भाऊसाहेब, पातशाही तक्ताची जागा मर्यादेची आहे. पूर्वी नाजरशाही जाली होती ते वेळेस तक्तावर सोन्याचें कवच होतें ते नेलें, परंतु या छतास हात लावला नाहीं. प्रस्तुत मी पातशाही उमराव तुम्हांपाशीं आहे. आम्हां देखत या गोष्टी होऊं नयेत, आम्हांस या गोष्टीने यश येणार नाहीं आणि स्वामीद्रोह पदरीं पडेल.'" आणि हे सुरजमल्लजी हिंदुपदपात-शाहीच्या प्रस्थापनेसाठीं मराठ्यांच्या लष्करांत सामील झालेले! भाऊ-साहेबांनीं छत फोडल्यानंतर वर ते सांगतात: "'आमचे चित्तांत हिंदु धर्म आहे,' आणि विचारतात, 'यमुनेचें पाणी हातांत घेतलें त्याचें सार्थक हेंच कीं काय?'... भाऊसाहेब यांनीं जाबसाल केला कीं 'आम्ही कांहीं दक्षण सोडून तुमचे बळावर आलों नाहीं. तुम्ही रहावेल तर रहावें नाहीं

तर आपले ठिकाणास जावें. गिलच्यांचें पारिपत्य केल्यावर तुम्ही आम्ही समजून घेऊं '...उपरांतिक सुरजमल्ल जाट अजुरदा होऊन आपले डेरियास गेला. चित्तांत विवंचना करता जाहला कीं आतां येथून जाण्याची तजवीज कोणत्या रीतीनें होईल." पुढें सुरजमल जाट गुप्त रूपें कोणास न कळवितां पळून गेला हें वेगळें सांगणें नकोच. खरोखर, धन्य त्या मोंगल सम्राटांची, कीं त्यांना असे स्वामिनिष्ठ उमराव लाधले. शोधूं जातां त्रिखण्डांत अशी धर्मनिष्ठ व स्वामिनिष्ठ प्रजा लाभणार नाहीं. आश्चर्याची गोष्ट ही कीं पुढें मोंगलांची सत्ता खिळखिळी झाल्यानंतर येथील इमारतींवरील नक्षींत जडविलेलीं रत्नें याच महाभागांनीं उखडून नेली! असो. वस्तुतः दिल्ली व आग्रा येथील किल्ले हे राजवाडे आहेत. छावणींतल्या जनानखान्याभोंवतीं रेशमी कनाती लावतात. या राजवाड्यांभोंवतीं अशीच देखणी तटबंदी आहे. तटबंदी आहे म्हणूनच त्यांना किल्ले म्हणावयाचें. त्यांची तटबंदी सुंदर लालसर दगडांची आहे. त्यांच्या कंगोऱ्यांना किंवा महाद्वारांवरील नक्षीलाही धक्का लागलेला नाहीं. कसा लागणार? कारण राज्यकर्त्यांची धर्मातीत व स्वामिनिष्ठ प्रजा त्याभोंवतीं छातीचा कोट करून उभी होती! या किल्ल्यांच्या अंतर्भागांत संगमरवरी महालांच्या रांगा आहेत. त्यांचें सौंदर्य अद्वितीय आहे. पृथ्वीवरील स्वर्ग तो हाच, हाच, असे त्यांचे वर्णन करण्यांत आलेलें आहे. असें कांहीं ऐकलें म्हणजे उत्तर हिंदुस्थानांतील लोक निःश्वास सोडतात, तल्लीनतेनें डोळे किलकिले करतात! बिचाऱ्यांच्या लक्षांतही येत नाहीं हा स्वर्ग त्यांच्या पूर्वजांच्या मुडद्यांवर उभारलेला आहे, कीं या किल्ल्यांतील अद्वितीय वैभवाचें अभंग अस्तित्व हें आपल्या नामुष्कीचें प्रतीक आहे. या महालांत पाऊल टाकलें कीं भासते, येथें अद्याप अत्तरांच्या फवाऱ्यांचे सुगंध व मद्यांच्या प्रवाहांचे दर्प दरवळत आहेत, रमणींच्या नूपुरांच्या झणत्कारांचे प्रतिध्वनि अद्याप घुमत आहेत. अधून-मधून कारस्थानांची कुबट घाणही प्रत्ययास येते. या किल्ल्यांनीं प्रत्यक्षपणे मर्दुमकी कधीं पाहिलेली नाहीं. येथें शस्त्रांची जी चमक दिसली ती फक्त खुनी खंजिरांची; मसलती झाल्या असतील तर त्या हिंदूंच्या व त्यांच्या राज्यांच्या निःपातांच्या; शाही वैभवाच्या या अवशेषांना मोंगलांच्या मर्दुमकीचीं प्रतीकें मानतां येणार नाहीं. शोभिवंत पण निरुपयोगी अशा

सोन्यारुप्याच्या तोफांप्रमाणेंच यांचेंही फक्त कौतुक करावयाचें. आग्र्याच्या किल्ल्यांत कोणाची मर्दुमकी प्रकट झाली असेल तर ती शिवाजीची. धन्य त्याची कीं मोंगल साम्राज्य वैभवाच्या कळसावर व सामर्थ्याच्या शिखरावर असतांना आणि स्वतः एकाकी असतांना भरदरबारांत, शहानशहाच्या समोर, त्याने विश्वासघाताबद्दल औरंगजेबाचा जाहीर निषेध केला—आणि तरवार उपसली! आणि धन्य त्याची कीं हें वैभव पाहून स्वदेशीं परत आल्यावर त्याने मोंगलांचें अनुकरण करून रंगमहाल उठवले नाहींत, तर त्यांच्या प्रतिकारासाठीं त्यांच्याच मुलखांतून गोळा केलेल्या लुटींतून स्वदेशाच्या स्वातंत्र्यसाधनेसाठीं त्याने जागोजाग दुर्दम्य दुर्ग व दुर्गम गड उभारले.

आमच्या मध्ययुगीन राज्यकर्त्यांच्या राजधान्याही डोंगरी किल्ल्यांवरच असत, सम्राटांच्या आणि त्यांच्या सामन्तांच्याही. चंद्रादित्यपुर (चांदूर) ही राजधानी राष्ट्रकूटांची, वातापिपुर (बदामी) ही चालुक्यांची आणि देवगिरी-दौलताबाद ही यादवांची. त्याचप्रमाणे पन्हाळा ही राजधानी सामन्त शिलाहारांची. राजधानी हें संघर्षाचें अंतिम केंद्र असल्यामुळें हे किल्ले उध्वस्त झालेले आहेत; तरी येथील अवशेषांवरूनही त्यांचें महत्त्व अनुमानतां येते. हे किल्ले मैदानांलगत तरी आहेत. सर्वस्वीं डोंगरी अशी राजधानी फक्त शिवाजीची — रायगड.

हिंदुस्थानांतील किल्ल्यांच्या नांवांच्या अखेरीस कोट, गड, गिरि व दुर्ग हे शब्द बरेच वेळां आढळतात; आणि महाराष्ट्रांतही. कधीं असे शब्द न वापरतां नजीकच्या गांवाच्या नांवावरून किल्ले ओळखण्यांत येतात: जसे, अर्नाळा, घोडप. नांवाचा पहिला भाग कधीं विशिष्ट अर्थाचा द्योतक असतो: जसे, प्रचण्डगड; तर कधीं नजीकच्या गांवाचा: जसें, पिसोळगड. कोट म्हणजे तटबंदी, मुख्यत्वेकरून भुईकोट, मैदानी किल्ला: जसें, बागलकोट. असे किल्ले सह्याद्रीच्या रहाळांत नाहींतच. मात्र येथे समुद्रकांठच्या किल्ल्यांना अनुलक्षून ही संज्ञा वापरण्यांत येते: जसें, सर्जेकोट. गिरि ही संज्ञा साधारणतः तुटक टेकड्यांवरील किल्ल्यांना दिलेली आढळते: जसें, देवगिरी. दुर्ग म्हणजे जंजिरा (जझीरा = बेट), समुद्रकिनाऱ्यावरील किंवा बेटावरील किल्ला: जसें, सुवर्णदुर्ग. श्री. काळे

सांगतात, गड शब्दामध्यें चढावाचा अवघडपणा, दुर्ग शब्दामध्यें प्रवेशाची कठिणाई व कोट शब्दामध्यें सभोंवारची तटबंदी यांचा तत्काळ बोध होतो. अर्थाच्या दृष्टीने पाहिलें असतां दिसून येतें कीं महाराष्ट्रांतील किल्ल्यांच्या नांवांच्या बाबतींत या संज्ञांचा उपयोग इतक्या ढिलाईनें केलेला आहे कीं नुस्त्या नांवावरून त्यांची जात ओळखतां येत नाहीं.

किल्ले कां बांधण्यांत येतात ? शांततेच्या काळांत स्थानिक बंदोबस्तासाठीं व रहदारीच्या नियंत्रणासाठीं; आणि आक्रमणाच्या काळांत संरक्षणासाठीं किंवा चढाईच्या सोयीसाठीं. किल्ले कसे बांधण्यांत येतात ? त्यांचा आकार व बांधणी ही त्यांसाठीं निवडलेल्या भूमीच्या ठेवणीवर अवलंबून असतात; आणि त्यांची मजबुती त्यांच्या उद्दिष्ट कार्यावर. किल्ले कोठें बांधण्यांत येतात ? भैदानी किल्ले बहुधा नदीकांठीं, एखाद्या नैसर्गिक किंवा कृत्रिम उंचवट्यावर आणि मुख्य शहरानजीक; डोंगरी किल्ले रहदारीच्या मार्गांवर हुकमत ठेवतां येईल, पण तिचा उपसर्ग होणार नाहीं, एवढ्या अंतरावर; निसर्गतः दुर्गम अशा ठिकाणीं; मात्र तेथें मुबलक पाणी असलें पाहिजे आणि भोंवतालच्या मुलखांतून भरपूर रसद मिळण्याची तरतूद असली पाहिजे.

स्वराज्यांत, शांततेच्या काळांतही, मुलखाच्या बंदोबस्तासाठीं व रहदारीच्या सुरक्षिततेसाठीं जागोजाग किल्ले ठेवावे लागतात. व्यापाऱ्यांना लुटारूंपासून संरक्षण हवे असते; सरकारी दप्तर व खजिना कमीअधिक बंदोबस्ताचे जागीं ठेवावा लागतो; विशेष प्रसंगीं सरकारी अधिकाऱ्यांनाही सुरक्षित आसऱ्याची तरतूद करून ठेवावी लागते. कारण एकदिलाची, एकजीव आणि फक्त सनदशीर मार्गांचा अवलंब करणारी प्रजा स्वराज्यांत व शांततेच्या काळांतही क्वचितच संभवते. संरक्षक वर्गांतील किल्ले मुख्यत्वेंकरून दोन जातींचे असतात : मुलकी प्रजेचें संरक्षण करणारे आणि लढाऊ शिबंदीचें रक्षण करणारे. मुलकी प्रजेच्या रक्षणासाठीं वस्ती-भोंवतींच तटबंदी उभारण्यांत येत असे. या धर्तीचे किल्ले मुख्यत्वेंकरून भैदानी मुलखाच्या संपन्न भागांत आढळतात. यांची तटबंदी पगारी शिबंदीच्या किंवा लढाऊ स्वयंसैनिकांच्या ताब्यांत असे. मोठ्या आक्र-

मणाला दीर्घ काळपर्यंत तोंड देण्यासाठीं हे किल्ले निरुपयोगी असतात ; कारण मुलकी वस्ती जेवढी अधिक तेवढा फितुरीचा व अकालीं शरणागतीचा संभव अधिक. किल्ल्यामध्यें मुलकी प्रजा राहूं देण्याविरुद्ध कटाक्ष असे तो यामुळेंच. शत्रूच्या हल्ल्यापासून प्रत्यक्षपणें सैनिकांचें आणि अप्रत्यक्षपणें भोंवतालच्या प्रदेशाचें संरक्षण करणें आणि संधि सांपडतांच किंवा निर्वाणीच्या क्षणीं शत्रूवर तुटून पडणें हें लढाऊ किल्ल्याचें मुख्य कार्य. लढाऊ किल्ले डोंगरी व मैदानी मुलखांतही असतात. परचक्राचे प्रसंगीं तुटवडा पडूं नये म्हणून प्रत्येक लढाऊ किल्ल्यावर शिबंदीच्या उपयोगासाठीं अन्नसामुग्री व युद्धसामुग्री यांचा भरपूर पुरवठा आगाऊ करून ठेवावा लागतो. दारूगोळा पेटणार नाहीं व पाणी आटणार नाहीं यासाठीं अनेक तजविजा लढाऊ किल्ल्यांवरून करून ठेवलेल्या असतात. स्वराज्याच्या अंतर्भागांतील किल्ले आकारानें विस्तृत व सुखसोयींनीं युक्त असे असतात. सरहद्दीवरील किल्ले आकारानें सुटसुटीत आणि विशेष दुर्गम असे असतात.

सोबतच्या नकाशांत कोंकण, घाटमाथा व पठाराची पहिली पट्टी एवढ्याच भागांतलि साडेतीनशें किल्ले दाखविले आहेत. पूर्वभागांतले किल्ले दाखविलेले नाहींत ; या भागांत महत्त्वाचे किल्ले नाहींत म्हणून नव्हे, या लेखांत व त्यासोबतच्या नकाशांत त्यांचा समावेश करणें अप्रस्तुत होईल, म्हणूनच ते वगळलेले आहेत. सरकारी गॅझेटीयर्समध्यें, श्री. गोगटे यांनीं "महाराष्ट्रांतील किल्ले" या ग्रंथांत आणि श्री. सरदेसाई यांनीं "शिवाजी सूव्हनीर" या ग्रंथांतील महाराष्ट्रांतील किल्ल्यांच्या यादींत नमूद केलेले या भागांतील सर्व किल्ले या नकाशांत समाविष्ट केलेले आहेत. त्याचप्रमाणें या विषयावरील माझ्या थोड्याबहुत वाचनांत आणि ऐकण्यांत व अवलोकनांत आले तेही. असा नकाशा तयार करण्यांत अनेक अडचणी आलेल्या आहेत ; त्यांपैकीं कांहीं मला ओलांडतां आल्या नाहींत. इतिहासांत कांहीं किल्ल्यांचे उल्लेख आढळतात, पण ते कोणते याचा थांग लागत नाहीं. शिवाजी व औरंगजेब यांचे दरम्यान १६६५ सालीं झालेल्या पुरंदरच्या तहांत शिवाजीकडे रहावयाच्या बारा किल्ल्यांची यादी दिलेली आहे. यांपैकीं अलवारी व उदयदुर्ग या किल्ल्यांचा मला तलास लागूं शकला नाहीं.

महाराष्ट्रांतल्या अनेक लहानमोठ्या गांवांभोंवतीं गांवकुसूं किंवा तटबंदी उभारलेली असे. जेथें गढी असेल अशाच गांवांना कसबा ही संज्ञा देण्यांत येत असे, असें दिसतें. स्वतःच्या व लवाजम्याच्या सुरक्षिततेसाठीं देशमुख व पाटील यांसारखे स्थानिक अधिकारी जागोजाग गढ्या बांधून बंदोबस्तानें रहात असत. राजकीय पुढारी व श्रीमंत लोक गांवांत किंवा गांवानजीक किल्ल्यासारखी तटबंदी असलेले वाडे उभारून त्यांत आपल्या आश्रितांसह मोठ्या इतमामानें राहत असत. पुंड लोकांचे किल्लेवजा वाडे कधीं जंगलांत तर कधीं मैदानांत, आडरस्त्यालगत असत. उदाहरणार्थ, हिंगणगांव येथील दमाजी थोराताची गढी. मध्ययुगीन व अर्वाचीन काळांतही राज्यकर्ते व त्यांचे अधिकारी जागोजाग तात्पुरत्या बंदिस्त छावण्या उभारीत असत. ऐतिहासिक उल्लेखांमध्यें व किल्ल्यांच्या सरकारी याद्यांमध्यें अशा गांवांचा, गढ्यांचा, वाड्यांचा व छावण्यांचा उल्लेख किल्ले म्हणून केलेला आढळतो. प्रत्यक्ष जागेवर जाऊन स्थान पाहिलें म्हणजे भ्रमनिरास होतो. कांहीं मंदिरांभोंवतींही तटबंदी उभारलेली आढळते आणि म्हणून त्यांना गड म्हणण्यांत येतें : उदाहरणार्थ, जेजुरी. कांहीं ठिकाणीं कृत्रिम तटबंदी नसते, केवळ भोंवतालचे कडे तुटलेले असतात, म्हणूनच अशा स्थानांना किल्ला ही संज्ञा देण्यांत येते : उदाहरणार्थ, अंजनेरी. कांहीं ठिकाणीं एकाच किल्ल्याला किंवा किल्ल्याच्या वेगवेगळ्या भागांना, त्याच किंवा भिन्न कालखंडांत निरनिराळीं नांवें दिलेलीं आढळतात : उदाहरणार्थ, कोंडाणा व सिंहगड आणि अशीरगड व मालइगड. कांहीं ठिकाणीं वस्तुतः किल्ले अस्तित्वांत आहेत; पण त्यांचा उल्लेख असा कोठेंही आढळत नाहीं. या व अशाच अनेक अडचणींमुळे केवळ ग्रंथांच्या आधारानें नकाशा तयार करण्याच्या किंवा ऐतिहासिक घटनांचा अन्वयार्थ लावण्याच्या बाबतींत गोंधळ होतो. सोबतच्या नकाशांत या परिस्थितीमुळें कांहीं चुका झालेल्या असणे संभवनीय आहे. या नकाशांत फिक्या व गडद रेघांनीं किंवा रंगांनीं भूप्रदेशाची उंची दाखविण्याचा विचार होता. पण अशी योजना केल्यास किल्ल्यांचीं नांवें अस्पष्ट होतात असें दिसून आल्यावरून तो विचार सोडून द्यावा लागला.

सोबतच्या नकाशांत अपरान्त, घाटमाथा व पठाराची पाहिली पट्टी यांमधील किल्ले नमूद केलेले आहेत. त्यांचें अक्षांश-रेखांशात्मक वर्गीकरण पुढील कोष्टकांत दिलेलें आहे.

| अक्षांश ↓ / रेखांश → | ७२° – ७३° | ७३° – ७४° | ७४° – ७५° | एकूण |
|---|---|---|---|---|
| | किल्ल्यांची संख्या | | | |
| २२° – २१° | १ | ३ | १३ | = १७ |
| २१° – २०° | ९ | १८ | २७ | = ५४ |
| २०° – १९° | ३० | ५३ | ३ | = ८६ |
| १९° – १८° | १३ | ५२ | ३ | = ६८ |
| १८° – १७° | | ४० | १६ | = ५६ |
| १७° – १६° | | २६ | १६ | = ४२ |
| १६° – १५° | | ९ | १३ | = २२ |
| १५° – १४° | | | ६ | = ६ |
| एकूण | ५३ | २०१ | ९७ | = ३५१ |

या कोष्टकावरून दिसून येते कीं महाराष्ट्रांतले जास्तींत जास्त म्हणजे सुमारें बेचाळीस टक्के किल्ले रेखांश ७३° व ७४° आणि अक्षांश २०°

ते १७° यांचे दरम्यानच्या चौकटींत आहेत ; आणि हें जसें असावें तसेंच आहे. कारण हा भाग हाच महाराष्ट्राच्या स्वराज्याचा गाभा आहे. अक्षांश २०° ते १९° या भागाचें स्वामित्व जुन्नरकडे आहे, १९° ते १८° चें पुण्याकडे आणि १८° ते १७° चे साताऱ्याकडे. खानदेशांतले किल्ले तापी तीरावर व खोऱ्यांत आहेत. रेखांश ७५° चे पलीकडे पूर्वेस आणि अक्षांश २२° ते २०° यांचे दरम्यान सातपुड्यांतले अनेक किल्ले आहेत. सातपुड्यांतील किल्ल्यांपैकीं लढाऊ व लढलेले असे किल्ले दोन : थाळनेर व अशीरगड. हे किल्ले लढाऊ खरे, पण त्यांच्या इतिहासांत महाराष्ट्राचे व्यक्तिमत्त्व कधीं व्यक्त झालेले नाहीं. ह्या दोन्ही किल्ल्यांच्या उभारणीचें श्रेय अहीरांना देण्यांत येतें. चौदाव्या शतकांत थाळनेर ही फरुकी घराण्याची राजधानी होती. अशीरगड येथें मध्ययुगांत चौहान व हाडा या राजपूत घराण्यांचीं राज्यें होतीं. नाशिक जिल्ह्याच्या वायव्य कोंपऱ्यांतील किल्ल्यांचे नेतृत्व साल्हेर व मुल्हेर या इतिहासप्रसिद्ध जोडीकडे आहे. नाशिक जिल्ह्याच्या रेखांश ७४° व ७५° आणि अक्षांश २१° व २०° या चौकटींतील किल्ल्यांचे नेतृत्व चांदूरच्या किल्ल्यांकडे आहे. रेखांश ७३° व ७४° आणि अक्षांश २०° व १९° या चौकटींतील किल्ले नाशिक व पुणे या जिल्ह्यांत विभागले गेले आहेत. त्र्यंबकेश्वर, कळसूबाई, हरिश्चंद्रगड व भीमाशंकर हीं सह्याद्रीचीं शिखरे या भागांत आहेत. ह्या चौकटींतील किल्ल्यांचें नेतृत्व नैसर्गिक व ऐतिहासिक दृष्टींनीं शिवनेरीकडे आहे. रेखांश ७३° ते ७४° आणि आणि अक्षांश १९° ते १८° या भागांतील किल्ल्यांचें आधिपत्य रायगडाकडे आहे. या खालच्या चौकटींतील किल्ल्यांचें नेतृत्व प्रतापगडाकडे आणि त्याही खालच्या चौकटींतले विशाळगडाकडे आहे. रेखांश ७४° ते ७५° आणि अक्षांश १७° ते १६ या चौकटींतील किल्यांवर पन्हाळ्याचें प्रभुत्व आहे. किनाऱ्यावरील दुर्गांचे नेतृत्व मराठ्यांच्या दृष्टीनें अलीबाग व मालवण येथील घाटमाथ्याच्या उत्तरान्त व दाक्षिणान्त जंजिऱ्यांकडे आहे. अपरान्ताचा किनारा कलता असल्यामुळें या कोष्टकांतील डावीकडल्या चौकटी मोकळ्या पडल्या आहेत.

सोबतच्या नकाशांत सह्याद्रींतील घाटांचीं नांवें कंसांत नमूद करून त्यांचा गडकोटाशीं असलेला संबंध दाखविण्याचा विचार होता ; नांवांचा



(दाभोळ)
गोपाळगड
उर्फ अजनवेल
अजिंक्यतारा
वर्धनगड
महिमानगड
बासोटा
नवरसतारा
भूषणगड
गोवळकोट
जंगली जयगड
भैरवगड
चेरा
धनगड
हातगड (सुंदरगड)
वसंतगड
शास्त्री नदी
विजयगड
गुणवंतगड (मोरगिरी)
कऱ्हाड
सदाशिवगड
जयगड
उर्फ जयदुर्ग
बहिरवगड
भवनगड
प्रचीतगड
बोरगाव
भूपालगड
मच्छींद्रगड
महिमतगड
सुमारगड
बाहे
रत्नागिरी
पेठ
सांगली
मिरज
माचोळ
प्रभानवल्ली
पूर्णगड
मुचकुंदी नदी
साठवली
पन्हाळा
(पन्हाळ)
पावनगड
कोल्हापूर
आंबोलगड
यशवंतगड
राजापूर
सालवा
बांधोटण नदी
खारेपाटण
(घेरिया) विजयदुर्ग
शिवगड
देवगड
फोंडा
रामगड
भैरवगड
भूधरगड
भुजबळ
गडहिंग्लज
मगवतगड
सिध्दगड (सोनगड)
भरतगड
सामानगड
सर्जेकोट
राजकोट
सिंधुदुर्ग
पद्मगड
कालावली
खाडी
प्रसिध्दगड
उर्फ रमणा
मनोहर
मनसंतोष
नारायणगड
गंधर्वगड
आजरे
पवित्रगड
नादोस
कुडाळ
कठारीगड
कार्लीखाडी
तिवारी
वेंगुर्ले
सावंतवाडी
महादेवगड
चंदगड
महिपालगड
बेळगाव (अजिमनगर)
हनुमनगड
खिल्लेगड
(यशवंतगड) रेडी
तेरेखोल
आरवार
भीमगड
नन्दगड
समशेरगड
हणमंतगड (विजरणीगड)
सदाशिवगड
कूर्मगड
काली नदी
(कारवार)
अंजदिव
अंकोला
राजमनदुर्ग
बसवराजदुर्ग
७२
७३
७४
१७
१६
१५

गोंधळ होऊं लागल्यामुळें तोही सोडून द्यावा लागला. मुख्य विषयाकडे वळण्यापूर्वी ह्या उपांगाचें विवेचन करतों.

दुर्गमता हे गडांचें मुख्य लक्षण होय असें मानण्यांत येतें. दुर्गमता या शब्दाचे दोन अर्थ होऊं शकतात: किल्ल्याच्या भोंवतालच्या प्रदेशाची दुर्गमता आणि खुद्द किल्ल्याची दुर्गमता. वैयक्तिक मजबुतीचे बाबतींत हें लक्षण मानण्यास प्रत्यवाय नाहीं. निबिड अरण्यें व प्रचण्ड पर्वत यांच्या गडांशीं असलेल्या साहचर्यामुळें अनेकांची अशी समजूत होऊन बसलेली आहे कीं अगदीं दुर्गम अशा प्रदेशांत व अशाच स्थानीं सह्याद्रींतील गड उभारण्यांत आलेले आहेत. प्रादेशिक दुर्गमता हें लक्षण रायगडासारख्या कांहीं विशिष्ट किल्ल्यांचे बाबतींत निदर्शनास येतें हें खरें; मात्र सर्वसाधारणतः किल्ले अशाच जागीं उभारण्यांत येतात कीं तेथून भोंवतालच्या मुलखावर हुकमत चालवितां यावी, भोंवतालच्या प्रदेशांतील हालचालींवर नियंत्रण ठेवतां यावे. आपण अनेक किल्ले पाहतों, कांहींचें निरीक्षण करतों, कांहींचा इतिहास वाचतों; पण इतिहासाचा प्रादेशिक वस्तुस्थितीशीं समन्वय घालीत नाहीं, म्हणूनच असे गैरसमज रूढ होतात. विशिष्ट किल्ले पाहिले म्हणजे ते कसे बांधण्यांत आलेले आहेत हें दिसतें, पण ते विशिष्ट ठिकाणीं कां बांधले याचा उलगडा होत नाहीं. साधनग्रंथांत याचा खुलासा क्वचित् आढळतो. पैकीं एक उल्लेख येथे देतो. जावळीनजीक कृष्णेच्या उगमाजवळ पारघाटाचे नाके आहे, ते ताब्यांत ठेवण्यासाठीं व भोंवतालच्या मुलखाच्या बंदोबस्तासाठीं एका उंच डोंगरावर शिवाजीनें प्रतापगडाची उभारणी केली, असें इतिहासांत नमूद करण्यांत आलेलें आहे. हें गमक मानलें असतां निदर्शनास येतें कीं सह्याद्रींतील घाटांचें नियंत्रण हेंच घाटमाथ्याच्या पूर्वेस व पश्चिमेस असलेल्या अनेक किल्ल्यांचें प्रधान कार्य आहे. हें विधान पुढील कोष्टकावरून स्पष्ट होईल. सह्याद्रींत घाट असंख्य आहेत. गॅझेटीयर्समध्यें त्यांपैकीं कांहीं नमूद केलेले आहेत; कोठें तर पायवाटाही नमूद केलेल्या आहेत. क्षुद्र घाट या कोष्टकांत दिलेले नाहींत; त्यांचें नियंत्रण करणें अनावश्यक असल्यामुळें त्यांच्या रक्षणासाठीं किल्ले किंवा गढ्याही कोणीं उभारलेल्या नाहींत.

| | कोंकण वस्ती<br>१ | घाटमाथ्याच्या पश्चिमेकडील किल्ला<br>२ | घाट<br>३ | घाटमाथ्याच्या पूर्वेकडील किल्ला<br>४ | पठार वस्ती<br>५ |
|---|---|---|---|---|---|
| १ | सुरत (तापींतून जलमार्गें विसरवाडीपर्यंत) | | कोंडाई बारी | भामेर | सटाणा (पुढें पाटणवरून पैठण) |
| २ | दमण | पिंडवल | पिंडवल बारी | म्हसगड | सटाणा |
| ३ | डांग | | बाभुळणा घाट | मुल्हेर, हरगड व साल्हेर | ,, |
| ४ | सुरगणा | | कांचन-मंचन | चौलेर | कळवण |
| ५ | ,, | | मोरकंडा घाट | चौलेर व हातगड | ,, |
| ६ | पेठ | | सावळ घाट | भोरगड | दिंडोरी |
| ७ | बलसाड, दमण | | राजबारी | | पेठ (मुलूख अति दुर्गम असल्यामुळें संरक्षणाची आवश्यकता नाहीं.) |
| ८ | दमण, पेठ | | सत्ती घाट | वाघेरा | नाशिक |
| ९ | डहाणू, जव्हार | | गोडा घाट | त्रिंबक, घारगड | ,, |
| १० | ,, | | अंबोली घाट | हरीष | ,, |
| ११ | डहाणू | भोपटगड | अव्हाट घाट | | ,, |
| १२ | वाडे | | शिर घाट | कवनाई | ,, |
| १३ | सुपारा, कल्याण, चौल | | थळ घाट | त्रिंगलवाडी | ,, |
| १४ | ,, | | पिंप्री, बोर घाट | बळवंतगड | ,, |
| १५ | कल्याण | | तोरण घाट | अलंगकुलंग | अकोला |
| १६ | शहापूर | | मेंढ्या घाट | बितनगड | ,, |
| १७ | ,, | | चेढ्या घाट | कुलंग | ,, |

| | १ | २ | ३ | ४ | ५ |
|---|---|---|---|---|---|
| १८ | मुरबाड | | मालसेज घाट | हरिश्चंद्रगड, बहिरवगड | ओतूर |
| १९ | मुरबाड, वैशा खऱ्यावरून | | नाणे घाट | जीवधन, हडसर | जुन्नर |
| २० | मुरबाड, पुलु सोनाळयावरून | मच्छींद्रगड, गोरखगड | कोपोली घाट | चावड | घोडें, आंबेगांव |
| २१ | नेरळ, पनवेल | तुंगी, चंदेरी | भीमाशंकर | | ,, |
| २२ | कर्जत | कोतळी | कोलिंबा घाट | | खेड कडूस |
| २३ | ,, | ,, | सावळ घाट | | ,, |
| २४ | ,, | भिवगड, ढाक | कुसूर घाट | | आंध्र खोरें, नवलाख उंबरें |
| २५ | खालापूर | गोरखगड | कोकण दरवाजा | राजमाची | नाणें |
| २६ | खोपोली | | भोर घाट | लोहगड, विसापूर | कार्लें, लोणावळें |
| २७ | पेण | | उबर खिंड | लोहगड | ,, |
| २८ | चौल | | वाघजाई घाट | कोरीगड | पौड |
| २९ | जंजिरा | तळे, घोसाळे | ताम्हण घाट | छानगड | ,, |
| ३० | कोलाड | कुई | लिंग्या घाट | | भोर |
| ३१ | ,, | ,, | देव घाट | | ,, |
| ३२ | ,, | ,, | कुंभा घाट | | ,, |
| ३३ | माणगांव | मानगड | कावळ्या घाट | तोरणा | ,, |
| ३४ | माणगांव | लिंगाणा | शेवत्या घाट | राजगड | भोर |
| ३५ | महाड | | मढ्या घाट | रोहिडा | ,, |
| ३६ | ,, | कौला | भोपे घाट | मंगलगड | ,, |
| ३७ | ,, | ,, | वरंध घाट | कंगोरी | ,, |
| ३८ | ,, | | कामथा घाट | मनमोहन | ,, |
| ३९ | पोलादपूर | चंद्रगड | ढवळ्या घाट | केजळगड | ,, |

| | १ | २ | ३ | ४ | ५ |
|---|---|---|---|---|---|
| ४० | ,, | प्रतापगड | आंबेनळी, उर्फ रडतोंडी | कमालगड | वांई |
| ४१ | ,, | ,, | पार घाट | | ,, |
| ४२ | दापोली | महिपतगड | हातलोट घाट | | मेढें, सातारा |
| ४३ | खेड | रसाळगड | आंबोली घाट | | ,, |
| ४४ | दाभोळ | प्रचीतगड | उत्तर तिवरा घाट | वासोटा | सातारा |
| ४५ | चिपळूण | जंगली जयगड | कुंभारली घाट | घेरा दातेगड | पाटण |
| ४६ | संगमेश्वर | भवानगड | मळा घाट | | ,, |
| ४७ | ,, | प्रचीतगड | दक्षिण तिवरा घाट | | ,, |
| ४८ | देवरूख | महिपतगड | कुंडी घाट | | कोल्हापूर |
| ४९ | साखरपे | | अंबा घाट | पन्हाळा | मलकापूर |
| ५० | रत्नागिरी | | विशाळगड घाट | विशाळगड | ,, |
| ५१ | राजापूर | | अणस्कुरा घाट | पन्हाळा | कोल्हापूर |
| ५२ | विजयदुर्ग, देवगड | | बावडा घाट | बावडा | बावडा |
| ५३ | ,, ,, | रामगड | फोंडा घाट | शिवगड | कोल्हापूर |
| ५४ | मालवण | बहिरवगड | नरदावा घाट | | ,, |
| ५५ | ,, | सिद्धगड | घोटगीचा घाट | | आजरें |
| ५६ | कुडाळ | रांगणा | रांगणा घाट | अवाचितगड, मनहरगड, मनसंतोषगड | ,, |
| ५७ | सावंतवाडी, वेंगुर्लें | महादेवगड | आंबवली घाट | चंद्रगड, गंधर्वगड | बेळगांव |
| ५८ | गोवें | पारगड | राम घाट | कलानिधिगड | ,, |
| ५९ | ,, | | केळ घाट | भीमगड | खानापूर |
| ६० | ,, | | तिन्नई घाट | हणमंतगड | धारवाड |

युरोपांतील सर्व रस्ते रोमकडे जातात असा वाक्प्रचार आहे. प्राचीन महाराष्ट्रांतील सर्व रस्ते पैठण या राजधानीकडे व तगर या व्यापारी पेठेकडे जात असत. महाराष्ट्रांतून उत्तरेकडे जाणारे रस्ते महेश्वर व मांधाता या नर्मदेच्या उतारांवरून, विन्ध्याद्रि ओलांडून, उज्जयिनीकडे जात असत. हिंदुस्थानच्या राजसत्तेचें केंद्र उत्तरेंत होतें तोंवर पश्चिम किनाऱ्यावरील भडोच हें बंदर भरभराटींत होते. सातवाहनांच्या अमदानींत राजसत्तेचीं केंद्रें पैठण व नाशिक येथे प्रस्थापित झालीं. यामुळें व्यापारी केंद्रें दक्षिणेकडे झुकलीं. त्यांच्या काळांत मुख्यत्वेंकरून सोपारा, कल्याण व चौल हीं बंदरे भरभराटीस आलीं. कदम्ब हे सातवाहनांचे दक्षिण महाराष्ट्रांतील उत्तराधिकारी. त्यांच्या अमदानींत पश्चिम किनाऱ्या-वरील व्यापाराचीं केंद्रे आणखी दक्षिणेस गेलीं. राजमार्गांची धांव राजधानीकडेच असते. राजसत्तेचीं केंद्रें बदलली तसतसे नवे राजमार्ग तयार झाले ; त्यांच्या नियंत्रणासाठीं नव्या योजना आंख्याव्या लागल्या, नवे दुर्ग व गड उभारावे लागले. शिवाजीच्या कारकीर्दीच्या अखेरी-पर्यंत हीं कामें मोठ्या प्रमाणावर चालू होतीं. मराठेशाहीच्या दुसऱ्या शतकांत सर्व रस्ते पुण्याकडे वाहूं लागले. घाटमाथ्याचेभोंवतीं कांहीं गड सामंतांनीं स्थानिक वर्चस्वासाठीं उभारलेले आहेत, तर कांहीं प्रादेशिक नियंत्रणासाठीं साम्राज्यसत्तेने आपल्या अधिकाऱ्यांचे मार्फतीने. घाटमाथ्याच्या दोहों बाजूंस घाटांलगत असलेल्या या किल्ल्यांचा इतिहास उपलब्ध झाला तर दिसून येईल कीं हिंदुस्थानांतील जनता राजकीय स्वातंत्र्याच्या आणि परकीयांच्या आक्रमणांच्या बाबतींत कांटेकोरपणें साशंक व निष्ठुरपणें जागरूक नसल्यामुळे सत्ताधाऱ्यांनीं राष्ट्रीय जागरूक-तेचीं साधने म्हणूनच हे गड निर्माण केले.

प्रादेशिक संरक्षण व नियंत्रण हें किल्ल्यांचें प्रधान कार्य. हें कार्य इतकें स्पष्ट आहे कीं त्याबद्दल विवेचन करण्याची जरूर नाहीं. क्रमांक ४ या नकाशांत दर्शविलेल्या मावळे व नेरें या भागांपुरता तपशील सांगतों :

( १ ) शिवनेर हा किल्ला जुन्नेर, शिवनेर व मीन्नेर या नेरांचें नियंत्रण आणि जुन्नर या प्राचीन शहराचें संरक्षण करी. नाणेंघाटाच्या तोंडाशीं व घाटमाथ्यावर जीवधन, चांवड, हडसर व भैरवगड हे

किल्ले पहारा करीत उभे असल्यामुळें खुद्द नेरांत जास्त बंदोबस्ताची जरूर नव्हती. जीवधन व शिवनेरी हे दोन्ही किल्ले एकाच धर्तीचे आहेत. चोहों बाजूंस त्यांचे कडे तुटलेले आहेत आणि या कड्यांत बौद्ध लेणीं आहेत. यावरून हे प्राचीन व समकालीन असावेत असे दिसतें. (२) चाकणच्या किल्ल्यावरून फिरंगोजी नरसाळा मावळांवर नजर ठेवीत असे, असा उल्लेख आढळतो; हा उल्लेख घोटण, पौड व मावळ या भागांबद्दलचा आहे. घोडनेर, भीमनेर व भामनेर या नेरांवर नजर ठेवण्यास हा भुईकोट विशेष सोईचा आहे. या नेरांलगतच्या घाटमाथ्या-वरचे कोंकणांत उतरण्याचे घाट क्षुद्र असल्यामुळे आणि संपन्न शहरें आसपास नसल्यामुळे येथे अधिक बंदोबस्त करण्याची जरूर नव्हती. (३) लोहगड किल्ल्यावरून नाणें मावळ व आंध्र मावळ या प्रदेशांवर नजर ठेवण्यांत येत असे, असाही ऐतिहासिक उल्लेख आढळतो. हा किल्लाही शिवपूर्वकालीन आहे. खुद्द कोकण दरवाजाच्या नियंत्रणासाठीं राजमाचीचा प्रचंड व मजबूत जोडकिल्ला नजीकच, कोंकणच्या आघाडीवर आहे. लोहगड व राजमाची या दोन्ही किल्ल्यांच्या कुशींत बौद्ध लेणीं आहेत. (४) तुंग व (५) तिकोना या किल्ल्यांची हुकमत पवनमावळावर असून (६) कोरी या गडाचा अधिकार कोर बारसें या मावळावर चालत असे. मुसे, मुठे व खेडे बारे या खोऱ्यांवर (७) सिंहगडावरून नजर ठेवण्यांत येत असे. सिंहगडाला मध्ययुगांत कोंडाणे हें नांव होतें. या किल्ल्याच्या सर्वांत प्राचीन उल्लेखांत आढळतें कीं तो एका कोळी नाइकाच्या ताब्यांत होता आणि त्यानें दीर्घकालपर्यंत मुसलमानांच्या वेढ्याला दाद दिली नाहीं. (८) तोरणा उर्फ प्रचण्डगड या किल्ल्यावरून गुंजण, कानद व वेळवंड या खोऱ्यांवर अधिकार चालविण्यांत येत असे. तोरण्याच्या जोडीला या भागांत शिवाजीनें राजगड हा किल्ला स्वराज्यस्थापनेच्या प्रारंभींच उभारला. हिरडस मावळ व रोहिड खोरें या प्रदेशांवर (९) रोहिडा उर्फ विचित्रगड या किल्ल्याचा अधिकार होता.

सह्याद्रीवरील व लगतच्या प्रदेशामधील किल्ल्यांपैकीं कांहीं प्राचीन आहेत, कांहीं मध्ययुगीन व कांहीं अर्वाचीन; कांहीं पठारावर आहेत,

बरेचसे घाटमाथ्यावर; कांहीं कोंकणांत, कांहीं समुद्रकांठीं व कांहीं बेटांवर.

किल्ल्यांच्या स्थानांवरून आणि त्यांच्या बांधकामाच्या पद्धतोवरून त्यांच्या कालमानाबद्दल कांहीं निष्कर्ष निघूं शकतील. पण महाराष्ट्रांतील राजकीय धामधुमींत बऱ्याच किल्ल्यांची डागडुजी वेगवेगळ्या घराण्यांचे अमदानींत इतक्या वेळां झालेली आहे कीं त्यामुळें या बाबतींत निश्चित विधानें मात्र करतां येत नाहींत.

पैठण, नाशिक व कऱ्हाड येथें सातवाहनकालीन टेक आहेत. आजूबाजूच्या सपाट प्रदेशांत ते इतके उठून दिसतात कीं ते कृत्रिम असावेत, केवळ नद्यांच्या पुरांबरोबर वाहून आलेल्या मळईमुळे झालेले नसावेत, असें वाटते. त्यांच्याभोंवतीं मातीची तरी तटबंदी असलीच पाहिजे व ती मात्र कृष्णा-गोदावरींच्या पुरांबरोबर वाहून गेलेली असली पाहिजे. आंध्र सातवाहनांच्या प्रदेशांत तटबंदीचीं तीस शहरें होतीं असें त्यांच्या सामर्थ्याचें वर्णन करतांना प्लिनीने नमूद केले आहे. तीं कोणतीं याचा अद्याप तलास लागलेला नाहीं. कारण त्यानें त्यांचीं नावें दिलेलीं नाहींत. प्लिनीचा काळ पहिल्या शतकांत निश्चित झालेला आहे. या शतकाच्या प्रथमार्धांत सातवाहनांचें साम्राज्य [illegible] मर्यादित झालेलें होतें. म्हणून वाटते कीं त्याने उल्लेखिलेलीं हीं ठाणीं महाराष्ट्रांतीलच असलीं पाहिजेत. याच शतकांतील परकी प्रवाशांनीं उल्लेखिलेल्या कांहीं बंदरांची ओळख पटलेली आहे. त्यांपैकीं कांहींचा संबंध अनुमानानें जलदुर्गांशीं लागू शकतो : उदाहरणार्थ, मन्दगोर = बाणकोट (मन्दारगिरि), मलिझगर = जयगड अगर राजापूर (मलयगिरि), बायझँटिओन=विजयदुर्ग. या स्थानांचा उल्लेख त्यानें व्यापारी बंदरें म्हणून केलेला आहे, जलदुर्ग म्हणून केलेला नाहीं. या काळांतील प्रवाशांनीं उल्लेखिलेल्या स्थानांची ओळख प्रस्तरलेखांतील उल्लेखांचे अभावीं पटणें सध्यां तरी शक्य नाहीं. सातवाहनांनंतर महाराष्ट्रांत अभीर, त्रैकूटक, वाकाटक, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव वगैरे सम्राट् घराण्यांच्या सत्ता होऊन गेल्या आणि कदम्ब, शिलाहार वगैरे सामन्त घराण्यांच्या. त्यांनीं व त्यांच्या राज्यांतील धनिकांनीं जागोजाग धर्मकृत्यें केलेलीं

आहेत आणि त्यांच्या कर्तृत्वाबद्दल शिलालेख खोदून ठेवलेले आहेत आणि दानपत्रें दिलेलीं आहेत. या काळांत देशाच्या संरक्षणाच्या योजना राज्यकर्त्यांनीं केल्या असल्याच पाहिजेत; जागोजाग छावण्या, गढ्या, किल्ले व जंजिरे उभारले असले पाहिजेत. पण कोणीं कोणते किल्ले उभारले याचा तपशील मिळूं शकत नाहीं. धर्मकृत्यांचाच तेवढा निर्देश करावयाचा आणि ऐहिक कृत्यांचा उल्लेख करावयाचाच नाहीं, अशी प्रथा होती कीं काय नकळे. शक्य आहे कीं एकाद्या घराण्याचा उच्छेद झाला कीं त्याचीं पाळेंमुळें त्यांच्या शिलालेखांसह उखडून काढण्याची पद्धत प्रचारांत असेल. अजंठ्याच्या लेण्यांतील कित्येक शिलालेखांतील राजांचीं नांवें हेतुपुरःसर तोडून काढण्यांत आलेलीं आहेत. यावरून या तर्कास बळकटी येते.

महाराष्ट्रांतील लेण्यांच्या मांडणीवरून आपणांस तत्कालीन वाहतुकीचे मार्ग निश्चित करतां येतात. लेणीं व मंदिरें हीं धर्मकृत्यें असलीं तरी त्यांच्या निर्मात्यांनीं त्याची मांडणी आडमार्गाला केलेली असणे संभवत नाहीं. प्राचीन आर्य ऋषींचीं निवासस्थानें गहन अरण्यांत असत; ते एकांतांत तपश्चर्या करीत, कंदमूळांवर निर्वाह करीत. प्राचीन आर्य आचार्यांचीं निवासस्थानें व विद्याश्रम ऐहिक व्यवहारांत गुरफटलेल्या वस्तीपासून दूरवर, सुपीक खोऱ्यांत असत. बौद्धांचीं लेणी मात्र रहदारीच्या मार्गावर, बहुधा राजधानींच्या आसपास असत; कारण बौद्ध भिक्षूंना परावर्तन करावयाचें असे; कारण त्यांचें सामर्थ्य राजाश्रयावर, व्यापाऱ्यांच्या देणग्यांवर आणि बहुजनसमाजांतील खालच्या वर्गांच्या पुरस्कारावर अवलंबून असे; कारण हिंदुस्थानला परकीय असणाऱ्या राजांच्या व व्यापाऱ्यांच्या धर्मांतरस्वीकारावर व संभावनेवर त्यांच्या धर्मचक्राचे परिवर्तन अवलंबून असे. नकाशावर लेण्यांचीं स्थानें मांडावीं आणि रेघा ओढून तीं जोडावीं, म्हणजे या रेघांवरून तत्कालीन रहदारीचे मार्ग दिसून येतात. अजंठ्याचा घाट, थळघाट, नाणेंघाट आणि बोरघाटानजीकचा कोंकण दरवाजा या मार्गांनीं महाराष्ट्रांतील व्यापारी वाहतूक होत असे, असें या सिद्धान्तावरून दिसून येतें. सातवाहनकालापासून इतिहासाच्या प्राचीन युगाच्या अखेरीपर्यंत महाराष्ट्रावर आलीं तीं परचक्रे कोणत्या

मार्गांनीं आलीं याबद्दल पुरावा उपलब्ध नाहीं; मात्र हीं आक्रमणें याच मार्गांनीं आलीं असलीं पाहिजेत असें निश्चित विधान करतां येण्याइतका अनुमानिक पुरावा उपलब्ध आहे. उदाहरणार्थ : महाराष्ट्रावर आक्रमण करणाऱ्या क्षहरात क्षत्रपांचे लेख नाशिक, जुन्नर व कार्ले येथील लेण्यांत आढळतात. या भागांतल्या बौद्ध धर्मक्षेत्रांभोंवतीं घोंटाळण्याच्या व व्यापाराच्या निमित्तानें टोळयाटोळयांनीं अपरान्तांतून पठारावर प्रवेश करून घेऊन स्थिरस्थावर झाल्यानंतर त्यांनीं हातपाय पसरून कालांतरानें येथील राजसत्ता काबीज केलेली असावी. व्यापारी व रहदारी वाहतुकी-साठीं त्या काळीं घाट अस्तित्वांत होते हें निश्चित. घाटांतून होणाऱ्या वाहतुकीच्या नियंत्रणासाठीं व सशस्त्र आक्रमकांना अटकाव करण्यासाठीं त्या काळीं डोंगरी छावण्यांची योजना अमलांत असलीच पाहिजे; आणि अशा छावण्या या लेण्यांच्या आसपासच असल्या पाहिजेत. नाशिकनजीक गोवर्धन येथे सातवाहनांचीं छावणी होती असा शिलालेखांत उल्लेख आढळतो. यावरून सर्वसाधारण विधान करतां येण्यासारखे आहे कीं ज्या किल्ल्यांच्या कड्यांत किंवा परिसरांत लेणीं खोदलेली आहेत ते किल्ले त्या लेण्यांना समकालीन असले पाहिजेत; आणि जेथे बौद्ध लेणी आहेत ते किल्ले त्यांतल्या त्यांत प्राचीन असले पाहिजेत. इद्राई, चांदूर, त्रिंगलवाडी, भामेर, जीवधन, शिवनेर, राजमाची, लोहगड, अशेरी, ठाक, कोतळी वगैरे किल्ल्यांच्या कड्यांत लेणीं खोदलेली आहेत. यावरून हे व असे किल्ले प्राचीन असावेत, असा निष्कर्ष काढतां येण्यासारखा आहे. बदामी ही प्राचीन चालुक्यांची राजधानी. येथे ज्या कड्यांत लेणीं खोदलेली आहेत त्यावरच बदामीचा उध्वस्त दुर्ग आहे. चालुक्य-पल्लव संघर्ष येथेंच झाला. यावरून हा डोंगरी किल्ला कमींत कमी सहाव्या शतकांतील असावा असें दिसते. सातव्या शतकाच्या प्रारंभीं पुलकेशि चालुक्यानें कोंकणच्या मौर्यांची पुरी ही राजधानी काबीज केल्याचा उल्लेख ऐहोळ येथील शिलालेखांत केलेला आहे. पुरी ही पश्चिम समुद्राची लक्ष्मी; मत्त गजांच्या गंडस्थलांप्रमाणें आकार असलेल्या शेंकडो नावांच्या साह्यानें पुलकेशीनें पुरीला वेढा घातला, असा तपशील या शिलालेखांत दिलेला आहे. पुरी म्हणजे घारापुरी,

घेरा पुरी. येथील लेणीं सुप्रसिद्ध आहेत. बेटावरील प्राचीन तटबंदीचे अवशेषही आतां आढळत नाहींत. तरीही येथें जंजिरा असला पाहिजे असा निष्कर्ष वरील आधारावरून काढतां येतो. अर्थात् ह्या जलदुर्गांची मांडणी महाराष्ट्रांतील जंजिऱ्यांच्या अग्रस्थानीं केली पाहिजे. तिसरा गोविंद राष्ट्रकूट याने चांदूर पर्वतश्रेणींतील मार्कंड गडावरून काढलेला सन ८०८ चा ताम्रपट प्रसिद्ध झालेला आहे. त्यांत त्यानें या किल्ल्याचा उल्लेख मयूरखंडी या नांवानें केलेला आहे. खुद्द चांदूरचा किल्ला दृढप्रहार यादवानें निर्मिलेला असणें संभवनीय आहे. येथेच त्याची राजधानी होती. मात्र चंद्रादित्यपुर हें स्थान त्याच्याही पूर्वीपासून अस्तित्वांत होतें, असे वसई ताम्रपटांतील उल्लेखावरून दिसतें.

लेणीं खोदण्याची प्रथा सातवाहनांपासून राष्ट्रकूटापर्यंत प्रचलित होती. मंदिरें उभारण्याच्या विशिष्ट प्रथा चालुक्य व यादव यांच्या अमदानींत सुरू झाल्या. लेणीं खोदतांना आलेल्या अनुभवावरून व त्याच आदर्शाच्या अनुरोधानें मंदिरांची उभारणी सुरू झाली, हें ऐहोळ येथील प्राचीन चालुक्यकालीन मंदिराच्या बांधणीवरून सिद्ध झालेले आहे. शिल्पशास्त्रांत ही क्रान्ति होत होती त्याच सुमारास दगडी दुर्ग उभारण्याची प्रथा सार्वत्रिक झालेली असावी. डोंगरी किल्ल्यांचीं प्रवेशद्वारे विवरांतून ठेवण्याची कल्पना आपल्या शिल्पकारांना लेण्यांच्या खोदकामावरूनच सुचली असली पाहिजे. ज्या गडांना अशीं प्रवेशद्वारें आहेत त्यांचा काल उशीरांत उशीरां राष्ट्रकूटांच्या राजवटीपर्यंत मांडला पाहिजे.

सातमाळा, बालाघाट व महादेव या सह्याद्रीच्या मुख्य शाखा. सातमाळ्याची गळणा रांग खानदेश व नाशिक या जिल्ह्यांच्या सीमेवर आहे ; आणि चांदूर ऊर्फ अजंठा ही आग्नेयेकडे कललेली रांग नाशिक जिल्ह्यामधून जाते. अजंठा श्रेणींतील किल्ल्यांची बांधणी वैशिष्ट्यपूर्ण आहे. तोडलेले कडे आणि विवरांतून प्रवेश या साधनांची योजना असलेले अनेक किल्ले महाराष्ट्रांत आहेत ; विशेषतः या श्रेणींत. अंकाई-टंकाई, देवगिरि, राजधेर वगैरे किल्ल्यांवर या योजना पहावयास मिळतात. देवगिरि हा या श्रेणींतला अखेरचा किल्ला. यादवांची राजधानीच येथें असल्यामुळें या किल्ल्याची उभारणी विशेष काळजी-

पूर्वक करण्यांत आलेली आहे. मध्यवर्ती डोंगरी किल्ल्याचेभोंवतीं विस्तृत व मजबूत भुईकोट उभारलेला आहे. भुईकोटांत शिबंदी व रसद असे, डोंगरी किल्ल्यावर राजवाडा व खजिना असे. डोंगरी किल्ल्याचा दीडशें ते दोनशे फूट उंचीचा कडा छिन्न्या लावून तोडून काढलेला आहे. त्यावरून सापही चढूं शकणार नाहीं, मग शत्रूचे सैनिक कसे चढणार? या किल्ल्यांतील योजना हें पहिल्या दर्जाचें लष्करी व राजकीय रहस्य. त्या अगदीं गुप्त ठेवलेल्या होत्या. अव्वल मुसलमानी अमदानींतही ह्या रहस्याचा स्फोट झालेला नव्हता. कड्याला लागून सुमारें पन्नास फूट रुंदीचा खोल खंदक खडकांत खोदलेला आहे. भुईकोटांतून गडांत प्रविष्ट होण्यासाठीं प्रथम हा खंदक ओलांडावा लागतो. यासाठीं पूर्वी ओढता पूल ठेवलेला असे. पूल ओलांडून पलीकडे गेल्यावर अंधारी या नांवाचें सुमारें दीडशें फूट लांबीचें विवर लागतें. या भुयारांत जागो-जाग वळणें आहेत व आंधळे फांटे आहेत, गैरमाहितगाराचा घात व्हावा म्हणून कांहीं ठिकाणी कडेलोटाच्या जागा मुद्दाम ठेवलेल्या आहेत. भुयारांतून बाहेर येण्याच्या जागीं तापत्या तव्याची योजना केलेली आहे. हा तवा सुमारें वीस फूट लांबीचा आहे. आणीबाणीच्या प्रसंगीं तो प्रवेशद्वारावर बसवावयाचा आणि त्यावर सरपण ठेवून तें पेटवावयाचे; ते लवकर पेटावें व पेटतें रहावें म्हणून वारा वाहता राहण्यासाठी सभोवार व्यवस्थित खिंडारें खोदलेलीं आहेत. तवा तापला कीं त्याला स्पर्श करणेही अशक्य; मग तो बाजूला करून वर जाण्याची शक्यताच नाहीं. शिवाय या सर्व योजना इतक्या गुप्त ठेवलेल्या होत्या कीं प्रत्यक्ष पहाऱ्यावर असलेल्या शिबंदीशिवाय कोणालाही त्यांचा तपशील माहीत नव्हता. मनुष्यानें एवढी व्यवस्था केली, तोडही मनुष्यानेंच काढली. दुर्गाचें सामर्थ्य दगडांवर अवलंबून असतें, असें सकृद्दर्शनीं भासते; वस्तुतः हें सामर्थ्य शिबंदीच्या निष्ठेवर, धैर्यावर व सावधानतेवर अवलंबून असतें. अल्लाउद्दीन खिलजीच्या स्वारीच्या वेळीं देवगिरीचा पाडाव झाला तो रसद संपल्यामुळे, बेसावधपणामुळें, फितुरीमुळें आणि खुद्द राजानें धास्ती घेतल्यामुळें. दगडांचें काम दगडांनीं केलें, पण माणसांचें काम माणसांनीं केलें नाहीं. लखूजी जाधवरावानें मात्र हा

किल्ला हल्ला चढवून, लढून काबीज केला. त्याला किल्ल्यावरील योजनांची माहिती होती. तापता तवा थंड करण्यासाठीं त्यानें पाण्याच्या डोलच्या बरोबर नेल्या होत्या. शिवाय त्यानें शिबंदीच्या बेसावधपणाचाही फायदा घेतला होता. या श्रेणीच्या बाहेरच्याही कांहीं किल्ल्यांवर या व अशा योजना केलेल्या आढळून येतात. नाणें घाटाच्या तोंडाशीं असलेल्या बहिरवगड या किल्ल्याचे कडे तोडलेले आहेत. या किल्ल्यांत प्रविष्ट होण्यासाठीं ओढत्या शिडीचा उपयोग करावा लागे. ही शिडी सत्तावीस फूट लांबीची असून ती वर साखळदंडांनीं पक्की केलेली होती. शिडी ओढून घेतली कीं गडावर जाण्याला दुसरा मार्गच नसे. कमालगडावरही अशीच व्यवस्था होती. अशेरीच्या किल्ल्यावर जाण्याचा मार्ग खडक तोडून तयार केलेला आहे. तो इतका अरुंद कीं त्यावरून एकेकासच चालतां यावें. तटबंदीनें बंदिस्त अशा तेरा खिडी ओलांडाव्या तेव्हां प्रवेशद्वाराचे दर्शन व्हावयाचें.

अजंठा श्रेणींतील किल्ल्यांची उभारणी या विशिष्ट धर्तीची कां करण्यांत आली ? कारण येथील किल्ल्यांची रांग ही महाराष्ट्राच्या गाभ्याचे संरक्षण करणारी फळी आहे. ही फळी फुटली की मग महाराष्ट्रांतील राजकर्त्यांनीं सह्याद्रीच्या घाटमाथ्याचाच आश्रय घेतला पाहिजे आणि तेथें आपलें सामर्थ्य संघटित करून मैदानांत शत्रूशीं लढाया दिल्या पाहिजेत. अजंठा श्रेणी हें महाराष्ट्राचें उत्तरेकडील संघर्षक्षेत्र आहे. प्राचीन काळीं नर्मदा ही महाराष्ट्राची उत्तर सरहद्द होती ; पण ती केवळ संकेतापुरती. नर्मदेच्या उत्तरेस विन्ध्य व दक्षिणेस सातपुडा. गेल्या शतकाच्या सुरवातीपर्यंत या भागांत दाट जंगल होतें, लोकवस्ती विरळ होती, राज्यव्यवस्था सुसंघटित नव्हती. महाराष्ट्रांतील मध्ययुगीन सत्तांचें या भागावरील आधिपत्य नाममात्र होतें. स्थानिक जंगली जमातींचा या सत्तांना फारसा पाठिंबा नव्हता. अशा परिस्थितींत या सत्तांना या भागाच्या बंदोबस्ताची योजना विशिष्ट पद्धतीनें करणें भाग होतें. शक्य तेवढ्या थोड्या शिबंदीचे आधारानें भोंवतालच्या मुलखावर हुकमत चालवितां यावी आणि शत्रूला या भागांत शक्य तेवढ्या आधिक काळापर्यंत थोपवून धरतां यावें, या दृष्टीनेंच ह्या योजना केलेल्या असल्या पाहिजेत. महाराष्ट्रावर आलीं तीं आक्रमणें उत्तरेकडूनच आलीं. त्यांना पहिला

पायबंद नाशिक-खानदेशच्या मैदानांतच घालणें जरूर. म्हणूनच या-करितां ह्या रांगेची निवड करण्यांत आली असावी. शिवाय या भागांतील नैसर्गिक परिस्थितिही या योजनेला अनुकूल अशीच आहे.

गेल्या शतकाच्या आरंभीं इंग्रजी लष्करानें हे किल्ले थोड्याबहुत प्रतिकारानंतर काबीज केले. लष्करी अधिकाऱ्यांनीं त्यांचीं पाहणी केली तेव्हां त्यांनीं उद्गार काढले कीं या किल्ल्यांना वेढा घालणारें सैन्य कितीही अफाट व सुसज्ज असलें तरी अशा किल्ल्यांतील पांच-पन्नास निर्धाराच्या लढवय्यांना रसद आहे तोवर ते सहज लढवितां आले असते. वरून नुसते दगड लोटीत राहिलें तरी वेढणाऱ्यांचा चेंदामेंदा व्हावयाचा. जें यांचे सामर्थ्य तेच त्यांचें दौर्बल्य. अशा छोट्या किल्ल्यांवर फारशी शिबंदी ठेवतां येत नाहीं, म्हणून येथील शिबंदीला किल्ल्यावरून मैदानांत उतरून वेढा घालणारांवर छापे मारतां येणें अशक्य होते. शिड्यांची व्यवस्था किंवा अरुंद रस्त्यांची योजना असलेल्या किल्ल्यांवरील शिबंदीला झपाट्याने हालचाली करतां येत नाहींत. समकालीन परिस्थिति आणि युद्धाचीं साधने व पद्धति यांच्या अनुरोधानें किल्ल्यांची उभारणी करण्यांत येते. या किल्ल्यांची उभारणी हातघाईच्या लढाईच्या दृष्टीनें केलेली आहे. या किल्ल्यांवरील योजना दारूगोळ्यांची युद्धपद्धति प्रचारांत येण्यापूर्वींच्या आहेत, हें लक्षांत बाळगलें पाहिजे. हे किल्ले पडले तेव्हां अपुरी रसद, फितुरी व धास्ती यांमुळेच पडले. कधी प्रत्यक्ष फितुरी झाली तर कधीं कुचराई. एखादाही नाईक किंवा पाईक फितुर झाला कीं किल्ल्याची शक्ति कोलमडून पडते. शिवाय किल्ल्यांचे सामर्थ्य परिसरांतील प्रजेच्या राजनिष्ठेवरही अवलंबून असते. किल्ल्यावर हल्ला झाला तरच तटबंदी शिबंदीचें रक्षण करणार. वेळ्याला थोडेसें सैन्य मोक्याचे जागीं ठेवून किंवा किल्ला तसाच मागे ठेवून परचक्र वादळासारखें पुढें गेलें तर? अशा परिस्थितींत किल्ल्यांतील शिबंदीने झपाट्यानें मैदानावर उतरून आक्रमकांवर निकराने तुटून पडलें पाहिजे. हर्ष परमारानें नित्यवर्ष खोट्टिग राष्ट्रकूटाचा पराभव नर्मदातीरीं खलिघट्ट येथे केला आणि नंतर येथून साडेतीनशें मैल अंतरावर असलेली राष्ट्रकूटांची

राजधानी त्याने सावकाशपणें लुटली. या परचक्राचे वेळीं सरहद्दीवरील किल्ल्यांचा उपयोग झालेला दिसत नाहीं किंवा येथील सामन्त लढलेले दिसत नाहींत. किल्लेदार फितुर झाले असतील किंवा त्यांनीं धास्ती घेतली असेल; किंवा सम्राटांची वेळ भरली, हें ओळखून ते युद्धाला बाहेर पडलेच नसतील; किंवा प्रजेचा पाठिंबा नसल्यामुळें ते जागच्या जागीं दबा धरून बसले असतील; त्यांनीं विचार केला असेल, कीं परचक्र परत गेलें म्हणजे पुन्हा स्थिरस्थावर झाल्यानंतर आपण कोणाचें सामन्त व्हावयाचे तें ठरवूं. संभवनीय आहे कीं हर्ष या किल्ल्यांच्या वाटेसच गेला नसेल; त्यांची दिखाऊ मजबुती व वास्तविक क्षुद्रता त्यानें जाणली असेल; किल्ले व त्यांतील कामचलाऊ शिबंदी मागेंच राहिली आणि परचक्र तेवढें पुढें गेलें, असेही झालें असेल. मुंज परमारानें महाराष्ट्रावर स्वारी केली तेव्हां मात्र यादवांच्या निर्धाराच्या प्रतिकारामुळें परमारांचा पराभव झाला आणि मुंज कैद झाला. पुढें खुद्द यादवांवर प्रसंग आला त्या वेळीं शत्रूने सरहद्दीवरील सामन्तांच्या व किल्लेदारांच्या गैरसावधपणाचा फायदा घेतला आणि खुद्द देवगिरीसारख्या अद्वितीय किल्ल्याचा आधार असूनही यादवांना शरणागति पत्करावी लागली. देवगिरीच्या तटबंदीनें टिकाव धरला पण फितुरीमुळें रसद तुटली आणि खुद्द राजानेंच कच खाल्ली.

मग किल्ल्याचा काय इलाज, काय उपयोग?

चालुक्यांचे सामन्त या नात्यानें महाराष्ट्राच्या उत्तर सरहद्दीचें संरक्षण करण्याची जबाबदारी यादवांवर होती. यासाठीं त्यांनीं अजंठा श्रेणीत अनेक गड उभारले. सम्राटांनीं सामन्तांचें सामर्थ्य मर्यादेंत ठेवलें नाहीं. यादव प्रबळ झाले आणि त्यांनीं सम्राट्पद पटकावले. शिलाहार हेही चालुक्यांचेच सामन्त. या घराण्याच्या शाखा घाटमाथ्यावर आणि कोकणांत राज्यें करीत होत्या. महाराष्ट्राची पश्चिम सरहद्द आणि समुद्रकिनारा सांभाळण्याची जबाबदारी शिलाहारांवर होती. या घराण्यांपैकीं कोल्हापूरचे शिलाहार विशेष नांवारूपास चढले. त्यांची राजधानी पन्हाळ्यावर होती. या घराण्यांतील जतिग शिलाहाराचा उल्लेख 'पन्नाल–दुर्गाद्रि–सिंह' असा करण्यांत आलेला आहे. या शाखेंतील अखेरीचा राजा दुसरा भोज.

कारकीर्दीच्या आरंभीं तो चालुक्यांचा सामन्त होता; तो स्वतःला महामंडलेश्वर म्हणवीत असे. त्याच्या राजवटीचा काळ महाराष्ट्रांत मोठ्या धामधुमीचा होता. चालुक्यांची सत्ता संपुष्टांत येत होती, त्यांची जागा घेण्यासाठीं यादवांची धडपड चालू होती. भोजानें या परिस्थितीचा फायदा घेऊन जागोजाग प्रचंड किल्ले उभारले, स्वतःचें सामर्थ्य वृद्धिंगत व संघटित केलें आणि नंतर मांडलिकत्व झुगारून देऊन राजाधिराज व पश्चिमचक्रवर्ती हीं बिरुदे धारण केलीं. भोजाला पुढील पंधरा गड उभारण्याचे श्रेय देण्यांत येते: केळंज, चंदन, नंदगिरी ऊर्फ कल्याणगड, पन्हाळा, पाण्डवगड, पावनगड, बावडा, भूधरगड, रांगणा, वसंतगड, विराटगड, खेळणा ऊर्फ विशाळगड, वंदन, सातारा व सामानगड. या यादीवरून दिसते कीं भोजाचें राज्य मुख्यत्वेंकरून कोल्हापूर व सातारा या भागांत होतें. भोजाचे तथाकथित चक्रवर्तित्व यादवांना सहन झाले नाहीं; कारण केंद्रसत्ता सर्वसमर्थ करण्याचे यादवांचे धोरण होतें. सिंघण यादवानें १२०९ सालीं भोजाचा पराभव केला आणि कोल्हापूरचे शिलाहार घराणें बुडविलें. या घटनेवरून महाराष्ट्राच्या इतिहासांत एक सिद्धांत प्रस्थापित झाला, कीं अपरान्तांतील, सह्याद्रीतील किंवा घाटमाथ्यावरील सत्ता कितीही समर्थ झाली तरी ती पठारावरील मैदानी सत्तेशीं स्पर्धेत टिकाव धरूं शकत नाहीं.

महाराष्ट्रांतील मध्ययुगीन साम्राज्यें मैदानी होतीं आणि त्यांचे सामन्त डोंगरी होते. या काळांत साम्राज्यांचे सामन्तांशीं व सामन्तांचे प्रजेशीं असलेले संबंध कधी दुर्बल तर कधीं प्रबल, कधीं गोड तर कधीं कटु, असे असल्यामुळें जो तो आपआपल्या जागीं मजबुतीनें रहात असे. तो काळच असा होता कीं तेव्हां स्वतःच्या निवासस्थानाभोंवतीं तटबंदी उभारून राहण्यांतच सुरक्षितता होती. शत्रूंपासूनच नव्हे तर वेळप्रसंगीं स्वतःच्या प्रजेपासून, समानाधिकारी प्रतिस्पर्ध्यांपासून आणि केंद्रवर्ती साम्राज्यसत्तेपासूनही स्वतःचें संरक्षण करण्यासाठीं सामन्तांनीं जागोजाग किल्ले उभारले होते. देशमूख,

पाटील वगैरे स्थानिक पुढारी व अधिकारी हेही त्यांच्याच होडीं-तले सहप्रवासी. तेही आपआपल्या जागीं आपल्यापरीनें बंदोबस्तानें रहात असत. प्रजा आपल्याला रामराम करते तो जुलमाचा आहे हें सामन्त जाणून होते; सामन्तांची तकलुपी निष्ठा शक्य तोंवर कसोटीला लावावयाची नाहीं अशा धोरणानें सम्राट् वागत होते. आपल्या तथाकथित सम्राट्पदाला आसमंतांतील राजांची शाब्दिक किंवा तात्त्विक मान्यता मिळविणें आणि अश्वमेधाचा घोडा देशभर फिरवून आणणें, एवढीच तत्कालीन राजकीय कर्तृत्वाची परिसीमा असल्यामुळें आक्रमणांचे बाबतींत खडा बंदोबस्त ठेवण्याची फारशी जरूर नसे; कारण परचक्रें आलीं तरी तीं वावटळीसारखीं किंवा वातचक्रासारखीं घुमून लवकरच विरून जात; कारण तत्कालीन प्रजा, तिजवर हुकमत गाजवणारे स्थानिक अधिकारी, प्रादेशिक सामन्त आणि मध्यवर्ती सम्राट् हे सर्व बहुशः एकाच किंवा संलग्न वंशांतील वा जमातींतील असत. म्हणूनच आज एक प्रमुख घराणें बुडालें तरी तें जीव धरून राही आणि कालांतरानें फिरून ऊर्जितावस्थेला येई. चालुक्यांची सत्ता राष्ट्रकूटांनीं मोडली आणि कालांतरानें त्याच घराण्यांतील चालुक्यांनींच राष्ट्रकूटांचा उच्छेद केला. या परिस्थितीमुळें मध्ययुगीन मध्यवर्ती सम्राटांचे हातीं सत्तेचें केंद्रीकरण होऊं शकलें नाहीं. या दौर्बल्यांतच या व्यवस्थेचें सामर्थ्य होतें आणि या व्यवस्थेंत देशाचें व्यक्तिमत्व व्यक्त होत होतें. अखेरीस स्थानिक राज्यसंस्थांच्या सामर्थ्यावरच देशाचें सामर्थ्य अवलंबून असतें. यादवांनीं सर्व सत्ता आपल्या हातीं केंद्रित केली. हें सर्वसामर्थ्य दिसावयाला ठीक होतें. पण मुसलमानांबरोबरच्या युद्धांतल्या पहिल्या फेरींत यादवांचा पराभव झाल्यानंतर त्यांना आपल्या सामर्थ्याची पुनर्घटना करतां आली नाहीं, एवढेच नव्हे, तर या पराजयानंतर लवकरच त्यांना परचक्रांचें मार्गदर्शन करणें भाग झालें. आतांपर्यंत आलेल्या परचक्रांहून हें परचक्र वेगळें होतें. हें आलें तसें गेलें नाहीं. तें येथेंच भ्रमत राहिलें. या परचक्रामुळें महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचा स्वाहाकार झाला. स्वराज्य व स्वातंत्र्य आणि परराज्य व पारतंत्र्य यांची यथार्थ कल्पना महाराष्ट्रीयांना

प्रथमच आली. पौराणिक कालगणनेप्रमाणें शकांच्या अमदानींत पश्चिम हिंदुस्थानला फक्त बहात्तर वर्षें पारतंत्र्य भोगावें लागलें. पण मुसलमानी रिसायतीचें पारतंत्र्य महाराष्ट्राला कमींत कमी सुमारें चारशे वर्षें व मराठवाड्याला सुमारें सातशें वर्षें भोगावें लागलें. शेवटचें ग्रहण आतांच कोठें सुटलें आहे. पारतंत्र्य हें विष मानलें तर परधर्मीयांची सत्ता हें कालकूट, हलाहल मानलें पाहिजे. काय झालें आहे तें नीटपणें समजण्यापूर्वी, काय होणार आहे याची अंधुकशीही कल्पना येण्यापूर्वीच आमच्या स्वातंत्र्याची होळी झाली, आमच्या सामर्थ्याची राखरांगोळी झाली; आमच्या वैभवाची धूळधाण झाली, आमच्या धर्माचे धिंडवडे निघाले, आमची इज्जत मातीमोल झाली, आमची संस्कृति लुप्तप्राय झाली. अविंधांच्या आज्ञेवरून आम्ही एकामेकांच्या घरांदारांवरून गाढवांचे नांगर फिरवूं लागलों, एकामेकांच्या पाठींत विषारी खंजीर खुपसूं लागलों आणि यांतच भूषण मानूं लागलों !

## सह्याद्रींतील किल्ल्यांचें माहात्म्य :

महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या व माहात्म्याच्या दृष्टीनें सह्याद्रीचें व त्यावरील किल्ल्यांचें महत्त्व नीटपणें ध्यानांत येण्यासाठीं आपणांस महाराष्ट्राच्या इतिहासाची, विशेषतः मध्ययुगाच्या अंतिम विभागाची व मराठशाहीच्या प्रथम विभागाची, थोडीबहुत उजळणी केली पाहिजे. हल्लीं इतिहास शिकविण्याची जी विकृत पद्धत उत्क्रान्त झालेली आहे आणि ज्या विकृति उत्तरोत्तर वृद्धिंगत होत जातील अशीं चिन्हें दिसत आहेत, तीमुळें विशेषतः महाराष्ट्राच्या इतिहासाची आबाळ होत आहे. आमच्या इतिहासग्रंथांची बैठक परदेशी, मुसलमानी व उत्तर हिंदुस्थानी, आणि म्हणून कलुषित अशा साधनांवर व आधारग्रंथांवर उभारलेली असल्यामुळें सर्वसाधारण महाराष्ट्रीय वाचकांना शिवपूर्वकालीन घटनांची फारशी माहिती नसते. म्हणून या कालखंडांतील कांहीं घटनांचा वृत्तान्त, थोडेसें विषयांतर करून, पण अप्रस्तुत होणार नाहीं एवढी खबरदारी घेऊन, जरा विस्तारपूर्वक सांगतों.

सामन्तावस्थेंत असतांना सम्राटांच्या संरक्षणासाठीं आणि

संक्रमणावस्थेंत असतांना स्वतःच्या सत्तासंवर्धनासाठीं यादवांनीं सह्याद्रीचा व त्यावरील गडांचा भरपूर उपयोग करून घेतला. त्यांनीं अनेक गड उभारले व थोडेबहुत लढाविलेही. परंतु सम्राट्पदावर अधिष्ठित झाल्यानंतर त्यांचें या महाशक्तीकडे दुर्लक्ष झालें. महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचें सह्याद्रि हेंच अधिष्ठान आहे, या अनुभवजन्य सिद्धान्ताचा त्यांना विसर पडला, निदान संकटसमयीं या शक्तीचा उपयोग करून घ्यावयाचें व्यवधान त्यांना राहिलें नाहीं, असें दिसतें. हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून स्वयंपूर्ण ग्रामसंस्था अस्तित्वांत आहेत. केंद्रसत्तेशीं त्यांचा फारसा संबंध नसे. प्रादेशिक राज्यें सामन्तांचे हुकमतींत असत आणि सम्राटांचें अधिराज्य तात्त्विक मान्यतेपुरतेंच असे. हिंदुस्थानचा प्रदेश नैसर्गिक विभागांत वांटला गेलेला आहे आणि समाज वसाहतींच्या अनुक्रमानुसार जमातींत व स्थानिक परिस्थितीच्या अनुरोधानें लहानमोठ्या खेड्यांत विभागला गेलेला आहे. राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक उत्क्रांतीच्या प्राथमिक अवस्थांत या स्थानिक संस्थांचें अस्तित्व समाजस्वास्थ्याला व संस्कृतिसंवर्धनाला अनुकूल होतें. ग्रामराज्यांचा पाया सहकार्यावर, तर सामन्तराज्यांचा स्पर्धेवर. या संस्थांचें अस्तित्व व प्राबल्य हीं केंद्रसत्तेच्या सामर्थ्यसंवर्धनाला प्रतिकूल असतात. सामन्त कधीं आपसांत युद्धें करीत आणि प्रसंगविशेषीं शिरजोर होऊन सम्राट्-सत्तेला जुमानीत नसत किंवा कधीं प्रत्यक्ष विरोधही करीत असत. राजकीय एकीकरणासाठीं त्यांचें सामर्थ्य शक्य तेथें नियंत्रित व अशक्य तेथें उच्छिन्न करणें जरूर होतें. यादवांनीं याच हेतूनें शिरजोर शिलाहारांचा उच्छेद केला; कोठें सामन्ताच्या जोडीला तर कोठें सामन्ताच्या जागीं त्यांनीं महाप्रधान या हुद्यावर केंद्रसत्तेच्या प्रतिनिधींच्या नेमणुका केल्या. सह्याद्रीच्या घाटमाथ्याला, दऱ्याखोऱ्यांना व अपरान्ताला परके असलेले हे मैदानी मनोवृत्तीचे राजप्रतिनिधि या भागांत केंद्रसत्तेचा बोज राखूं शकले नाहींत; कारण ते दुर्बल होते व त्यांचा पाठपुरावा करण्याइतकी केंद्रसत्ता कार्यक्षम नव्हती. केंद्रसत्ता प्रबळ होती तोंवर हें राजकीय एकीकरण देखाव्यापुरतें तरी अस्तित्वांत होतें; दुर्बल राज्यकर्ते सम्राट्पदावर

आल्यानंतर या भागांतील राज्यव्यवस्था कोलमडली आणि क्षुद्र स्थानिक राज्यें अस्तित्वांत आलीं. अपरान्ताकडे यादवांचें फारसें लक्ष नव्हते; कारण ज्यांच्या संभाव्य आक्रमणांचे बाबतींत विशेष खबरदारी घ्यावयाची असे त्यांचे कोणी शत्रु या भागांत नव्हते. पश्चिम समुद्रावरून चालणारी व्यापारी वाहतूक देशी व परदेशी नावाड्यांचे हातीं होती. अरब व्यापारी व दर्यावर्दी यांचा या व्यवहारांत मोठा भाग होता; पण अपरान्तांत स्थायिक होऊन तेथें आपली सत्ता प्रस्थापित करण्याचा विचार अद्याप त्यांच्या मनांत आलेला नव्हता. जलमार्गानें होणाऱ्या आक्रमणांची शक्यता अद्याप दृष्टिपथांत आलेली नव्हती. चालुक्य व राष्ट्रकूट यांच्या काळापासून गुजरात व महाराष्ट्र यांच्या परस्परांवर होणाऱ्या आक्रमणाचें लाट प्रदेश हें संघर्षस्थान व स्पर्धाक्षेत्र होतें. तरीही या भागाच्या बंदोबस्ताकडे यादवांनीं विशेष लक्ष पुरविलेलें दिसत नाहीं. या अनास्थेचें कारण एकच – कीं यादवांचें राज्य हें फक्त मैदानी राज्य होतें.

शिलाहारांच्या काळांत महाराष्ट्राच्या पाण्डित्याची ख्याति काश्मीर-पर्यंत गाजत होती. शिलाहारांच्या पाडावामुळें या पाण्डित्याची परंपरा खण्डित झाली. धर्मशास्त्र, ज्योतिष, वैद्यक, गणित, संगीत, वगैरे शास्त्रांना व शास्त्रज्ञांना आणि त्यांच्या मठांत चालणाऱ्या अध्ययनाला व अध्यापनाला भरपूर आश्रय व प्रोत्साहन देऊन यादवांनीं पुढें देवगिरीच्या परिसरांत महाराष्ट्रीय पाण्डित्याची नवी परंपरा निर्माण केली. विख्यात ज्योतिषी भास्कराचार्य हे यादवकाळांतच होऊन गेले. सह्य पर्वतासन्निध असलेलें विज्जलवाड हें आपलें निवासस्थान असें त्यांनींच सांगितलेलें आहे; मात्र त्यांच्या सांप्रदायाचा विकास मैदानी मुलखांतच झाला. बुद्धिमत्तेची निर्मिति सह्याद्रीच्या कुशींत व्हावी व परिणाति पठारावर व्हावी, असा जणुं संकेतच आहे. भास्कराचार्यांचा पुत्र लक्ष्मीधर हा जैतुगी यादवाचे दरबारीं पण्डित होता आणि आचार्यांचा नातू चांगदेव यानें ज्योतिष व गणित या शास्त्रांच्या अध्यापनासाठीं सिंघण यादवाच्या कारकीर्दींत खानदेशांत पाठशाळा चालविली होती. मुख्यत्वेंकरून यादवांच्या अमदानींत महाराष्ट्राच्या मैदानी मुलखांत

महाराष्ट्राच्या वैशिष्ट्यपूर्ण अशा भागवत साम्प्रदायाची जोपासना झाली व त्या अनुषंगानें मराठी भाषा प्रौढत्वाप्रत पोंचली. महाराष्ट्राच्या राजकीय व सांस्कृतिक एकीकरणासाठीं यादवांनीं हमरस्त्यांलगत जागोजाग हेमाडपंती मंदिरें उभारलीं. या काळांत उभारण्यांत आलेल्या किल्ल्यांची तटबंदीही याच धर्तीची आहे. हेमाडपंती शिल्पपद्धति हेमाद्रीनें सिद्ध केली कीं त्याच्या अगोदरच ती उत्क्रांत झालेली होती, हा विषय विवाद्य आहे. एवढें मात्र निश्चित कीं ही शिल्पपद्धति हें महाराष्ट्राचें वैशिष्ट्य आहे आणि या विशिष्ट धर्तीचीं मंदिरें यादवकालांतच मोठ्या प्रमाणावर निर्माण झालीं. वैशिष्ट्य अनेक दृष्टींनीं. यांपैकीं कांहीं मंदिरांत घोंटीव व कोरीव शिलांची योजना केलेली आढळते, पण हें या पद्धतीचें वैशिष्ट्य नव्हे; प्रचण्ड घडीव शिलांची चुन्याच्या अभावीं उभारणी, हें या शिल्पपद्धतीचें वैशिष्ट्य. हीं प्रचण्ड मंदिरें उभारण्यांत आलीं तेव्हां तीं अनन्त काळपर्यंत टिकतील असा त्यांच्या निर्मात्यांचा कयास होता; कारण त्यांनीं त्यांची उभारणी गणितशास्त्रांतील तुलासिद्धान्ताच्या अनुरोधानें केलेली होती; पृथ्वी अचल असल्यामुळे खडकापर्यंत पाया घेतला कीं तो कधींही ढळणार नाहीं, हें त्यांनीं गृहीत धरलें होतें. शास्त्रीय दृष्टीनें अचूक असलेले सिद्धान्त पुष्कळ वेळां व्यवहाराच्या कसोटीला उतरत नाहीत. ऊन, वारा, पाऊस व गारठा यांच्या क्रियेमुळे इमारतीची एकादी शिला कुजली, ढिली झाली किंवा निखळली कीं तोल बिघडून सारें मंदिर कोसळावें, अशी आपत्ति या वैशिष्ट्यांतच अंतर्भूत होती; कारण चुन्याच्या अभावीं या शिला एकमेकींशीं एकजीव होऊं शकत नाहींत. महाराष्ट्राची अवस्था अशीच होती व थोड्याबहुत प्रमाणांत आजही आहे. प्रचण्ड दिसणारा व अभेद्य भासणारा हा डोलारा कां, कसा व केव्हां कोलमडेल, याचा नेम नाहीं; कारण महाराष्ट्राचे घटक अजूनही एकजीव झालेले नाहींत. सह्याद्रीच्या व अपरान्ताच्या अपरिमित पर्जन्याच्या प्रदेशात या शिल्पपद्धतीचा शिरकाव झाला नाहीं; राज्यव्यवस्थेच्या ढिलाईमुळें आणि नैसर्गिक परिस्थितीमुळें. महाराष्ट्राच्या एकीकरणासाठीं यादवानीं योजिलेल्या साधनांच्या प्रभावामुळें महाराष्ट्र सुसंघटित

व समर्थ आणि एकजीव व प्रतिकारक्षम होण्यापूर्वींच महाराष्ट्रावर इस्लामी परचक्र आलें आणि आमचें राजकीय, आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक जीवन उध्वस्त झाले.

चालुक्य, राष्ट्रकूट, यादव हीं साम्राज्यें मुख्यत्वेंकरून मैदानी होतीं. सातवाहनांच्या सत्तेप्रमाणेंच यांचाही प्रारंभ सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांत झाला आणि पठारावर व सुपीक मैदानांवर विस्तार झाल्यानंतर त्यांचें सह्याद्रीकडे दुर्लक्ष झालें. ज्या मानानें त्यांनीं सह्याद्रीवर भिस्त ठेवली त्या प्रमाणांत व तोंवरच तीं टिकलीं; जेव्हा तीं केवळ मैदानी तयारी-वर विसंबून राहिलीं तेव्हां आक्रमकांच्या पहिल्या घडाक्यासरशीं तीं कोलमडून पडलीं. धरण फुटलें म्हणजे भोंवतालचा प्रदेश जलमय होतो, त्यावरील शेतीवाडी वाहून जाते व मुलूख उध्वस्त होतो, आणि रहिवासी परागंदा होतात; त्याचप्रमाणें यांच्या मैदानी राजधान्यांचा पाडाव होतांच त्यांच्या सत्ता लुप्त झाल्या, त्यांच्या साम्राज्याची धूळ-धाण झाली. मैदानांत आघाडीवरची एक फळी फुटली तर घाटमाथ्या-वर पिछाडीला दुसरी खडी, अशी कांहींच तरतूद त्यांनीं करून ठेवलेली नव्हती. सातवाहनांनीं व चालुक्यांनीं अपरान्त, कर्नाटक व आंध्र या प्रदेशांत पाय रोंवून ठेवले होते, म्हणूनच त्यांची सत्ता इतर राजवंशां-हून अधिक काळपर्यंत टिकली आणि प्राथमिक पराभवानंतर पुन्हां उसळी घेऊन प्रस्थापित होऊं शकली. राजारामाचे काळीं जिंजीच्या किल्ल्यानें मराठी राज्याचें रक्षण केल्याचा इतिहास सर्वांना माहीत आहे. यादवांचे वेळीं तर सामन्ताची दुय्यम व भक्कम फळीही अस्ति-त्वांत नव्हती किंवा कार्यक्षम मानण्याइतकी प्रबळ नव्हती. कल्याणी, मालखेड आणि देवगिरी यांच्या इतिहासांत साम्य आहे; तसेंच वैधर्म्यही आहे. चालुक्य व राष्ट्रकूट आले व गेले, तेव्हांची क्रांति आणि मध्ययुगाचे अखेरीस यादवांचें राज्य गेलें तेव्हांची क्रांति, यांत मूलभूत भेद आहे. तेव्हां जे गेले ते व जे आले तेही आपलेच होते आणि तेव्हांची क्रांति केवळ राजकीय होती. बहुजनसमाजाला या क्रांतीबद्दल कोणत्याही पक्षाच्या वतीनें फारशी आस्था नव्हती; त्यांना या क्रांतीची मुळींच झळ लागली नाहीं. आणि आतां मात्र जे

गेले ते आपले व जे आले ते परके होते. जें जें आपलें व चांगलें असें आपण मानीत होतों तें तें जे आले त्यांनीं उध्वस्त केलें; किंबहुना यासाठींच, आणि नंतर महाराष्ट्रावर व दक्षिणापथावर इस्लामचें मोर्तब करण्यासाठीं ते इकडे आले होते; ते एकदां आले कीं पुन्हां पुन्हां येतील, निर्जीव होईपर्यंत ते देशाला शोषून घेतील आणि आमची रग जिरली कीं मग आमच्यावर शतकानुशतकें राज्य करीत राहतील, याची स्पष्ट कल्पना समकालीनांनाही आलेली दिसत नाहीं. आणि असें कां झालें, याचा नीटसा उलगडा आजही होऊं शकत नाहीं.

देवगिरीवर अल्लाउद्दीनाची स्वारी झाली तेव्हां गुजरातेंत अनहिलवाड येथें सारंगदेव वाघेला, कर्नाटकांत द्वारसमुद्र येथें प्रतापचक्रवर्ती बल्लाळदेव आणि तेलंगणांत वरंगळ येथें प्रतापरुद्र काकतीय यांचीं समर्थ व संपन्न राज्यें होतीं. देवगिरीच्या बाबतींत त्यांचा शेजारधर्म वैमनस्यांतच व्यक्त होत होता. जो तो स्वयंमन्य व स्वसंतुष्ट होता. परचक्र आलें तेव्हां प्रसंग ओळखून हे प्रतापी राजे स्वयंस्फूर्तीनें रामदेवाच्या मदतीला आले नाहींत. रामदेवानेंही त्यांच्याकडे मदतीची मागणी केली नाहीं. इस्लामी आक्रमणाच्या वैशिष्ट्यांची जाणीव कोणालाही झालेली असावी असें दिसत नाहीं. उत्तर हिंदुस्थानांत सुमारें तीनशें वर्षांपासून गाजत असलेल्या घडामोडी यांच्या कानीं आल्या नसतील, हें संभवत नाहीं. त्यांपासून घ्यावयाचा तो धडा यानीं घेतला नाहीं, हें मात्र खरें. रामदेवानें आपला पुत्र शंकरदेव याच्यासाठीं सारंगदेवाकडे त्याची नात देवलदेवी हिला मागणी घातली असतां त्यानें ती कुलाभिमानाच्या भरीनें धुडकावून लावली होती; कारण तो शुद्ध व उच्च कुलांतला रजपूत आणि हा रांगडा मराठा. त्या वेळीं रजपुतांशीं मराठ्यांचा वांशिक संबंध जोडण्याचें थोतांड सुरू झालेलें नव्हतें. दक्षिणापथाची उत्तर सरहद्द मजबूत करण्याचे दृष्टीने राजकीय सलोखा निर्माण व्हावा म्हणून रामदेवानें ही मागणी घातलेली असणें संभवनीय आहे; कारण राजघराण्यांतील वैवाहिक संबंध राजकीय दृष्टीनें जोडण्याची प्रथा या काळांतही प्रचलित होती. स्वतःचें राज्य

सुरक्षित रहावें म्हणून राजधानींत स्थायिक झालेल्या मुसलमानांना खुषामतीदाखल सरकारी खर्चानें मशीद बांधून देऊन वाघेले यापूर्वीच कृतार्थ झाले होते! प्रतापचक्रवर्तीची भिस्त द्वारसमुद्राच्या दिल्ली-पासूनच्या अंतरावर होती आणि प्रतापरुद्र वरंगळच्या तिहेरी तटबंदीवर विसंबून होता; खुद्द देवगिरीचा किल्ला दानवांना अजिंक्य आहे असा रामदेवाचा विश्वास होता. अवघ्या शतकचतुर्थांत या सर्वांचा भ्रम-निरास व्हावयाचा होता, व त्यासाठीं सर्वांना केवढी किंमत द्यावी लागणार होती!

अल्लाउद्दीनाचें सैन्य अचानकपणें देवगिरीसमोर येऊन उभें राहिले, तोंवर यादवांना या आक्रमणाची वार्ताही नव्हती, असा समज प्रचलित आहे; तो तितकासा खरा नाहीं. ईसामी सांगतो कीं सेउण देशांतील यादवांचा सेनापति कण्ह यानें या भागांत अल्लाउद्दीनाला चांगला लढा दिला आणि कोंकणच्या दोन राण्या आपल्या काटक सैन्यासह आक्रमकांवर चालून गेल्या व चवताळलेल्या वाघिणींसारख्या लढल्या! करंट्या महाराष्ट्राला यांचीं नांवें माहीत नाहींत आणि त्यांच्या कर्तृत्वाची दखल नाहीं. लोकगीतांनींही त्यांची स्मृति चिरंजीव करून ठेवलेली नाहीं! त्यांचा पराभव करून व त्यांना कैद करून अल्लाउद्दीन पुढें सरकला. या संघर्षाची बातमी देवगिरीला आलेली नसणें संभवनीय नाहीं. यादवांच्या दौलतीची कीर्ति अल्लाउद्दीनानें दिल्लीलाच ऐकली होती. त्यांची प्रतिकाराची शक्ति व तयारी किती आहे याचा आगाऊ अंदाज त्यानें आपल्या हेरांमार्फत घेतलेला होता. यादवांचें मुख्य सैन्य मुलूखगिरीसाठीं परप्रांतीं गेलेलें आहे याची त्याला वर्दी होती. सरहद्दीवर एवढी निकराची लढाई झाली तरी आक्रमकांच्या प्रतिकारासाठीं पहिल्या दर्जाची लढाई देण्याकरितां सैन्याची व सामग्रीची जागरूकतेनें जमवाजमव करण्याचे बाबतींत रामदेव थोडा-बहुत गाफील राहिला, हें मात्र खरें. रामदेव हा कांहीं लढवय्या पुरुष नव्हता. राजवाडे सांगतात ( महिकावतीची बखर ) कीं तो "सातार-च्या शाहूसारखा सुखोपभोगी, सैल व मृदु माणूस होता. हरिदासांच्या कथा, शास्त्र्यांच्या संभावना, हेमाद्रीचीं व्रतें, उद्यापनें, इत्यादि पारमार्थिक

बाबतींत त्याचा सर्व वेळ खर्चिला जाऊन, सैन्य व राज्य ह्यांच्या तयारी-कडे त्याचें चिलकुल लक्ष नव्हतें... दुर्बल राजपुरुषांच्या मनाची रचनाच अशी विघटित असते कीं दुर्दैवानें अंगावर पडलेल्या सम्राट्-सत्तेचा भार त्यांना सहन होत नाहीं. ...राज्यलक्ष्मीचा संसार थाटानें व शिताफीनें चालविण्याच्या करामतीची उणीव त्यांच्यांत निसर्गसिद्ध व परिस्थिति-सिद्ध असते." आणीबाणीच्या प्रसंगीं राज्यसूत्रें अशा दुर्बलाच्या हातीं आलीं, हें महाराष्ट्राचें दुर्दैव ; शाहूला मिळाले तसे मुत्सद्दी व लढवय्ये पेशवे रामदेवाला मिळाले नाहींत, हें आणखी दुर्दैव ! देवगिरीला वेढा पडल्यानंतर रामदेवानें आक्रमकांवर चारदोन छापे घातले आणि चार-आठ दिवस किल्ला लढविला ; पण अन्नसामुग्रीच्या सांठ्याचे बाबतींत झालेल्या विश्वासघातामुळें त्याचा धीर खचला. क्षत्रियांना वैश्यांची कारवाई भोंवल्याचे प्रसंग अर्वाचीन इतिहासांतही अनेक घडलेले आहेत. राजा किंवा पुढारी राजधानींत कोंडला गेला म्हणजे त्याच्या सुटकेसाठीं मोकळया भागातल्या सैन्याने व प्रजेनेंही उठावणी केली नाहीं तर निर्जीव तटबंदी आक्रमकांपुढें फार दिवस टिकाव धरूं शकत नाहीं. मोहिमेवर गेलेलें सैन्य आक्रमणाची वर्दी मिळून राज्यरक्षणासाठीं राजधानीकडे परतण्यापूर्वीच रामदेवाला अल्लाउद्दीनाशीं तह करावा लागला. तूर्त व वार्षिक खंडणीच्या वाटाघाटी पुऱ्या झाल्यानंतर राजधानीचा वेढा उठवून अल्लाउद्दीन उत्तरेकडे परतणार, तोंच त्याच्या छावणींत बातमी आली कीं शंकरदेव मोठें सैन्य घेऊन देवगिरीवर चालून येत आहे. देवगिरींत वेढल्या गेलेल्या रामदेवाला याची वार्ताही नव्हती. लगेच अल्लाउद्दीनानें रामदेवाला आपल्या छावणींत बोलावून घेतलें आणि त्याला शंकरदेवाची बातमी सांगून धमकावले कीं फिरून युद्ध सुरू झालें तर आपलें राखीव घोडदळ मैदानावर आणण्यात येईल, प्रथम राजाला ठार करण्यांत येईल आणि नंतर सर्वांची कत्तल करण्यांत येईल. संभवनीय आहे कीं त्यानें रामदेवाला आपल्या छावणींत ओलीस ठेवून घेतलें असेल. या धास्तीमुळें किंवा दिलेल्या वचनाचा भंग होऊं नये म्हणून रामदेवानें शंकरदेवाला आपलें सैन्य माघारें घेण्याबद्दल आज्ञा दिली ! वैयक्तिक

नीतीचे नियम राजकारणात लावावयाचे नसतात; तरीही पित्याची ही आज्ञा पुत्रानें मानली, हें महाराष्ट्राचें दुर्दैव! एखाद्या जातकांत नमूद करण्यासारखी गोष्ट प्रत्यक्षांत घडली! शंकरदेवाचें अफाट सैन्य चढाईच्या आटोक्यापलीकडे गेल्यानंतर अगणित लूट बरोबर घेऊन अल्लाउद्दीन दिल्लीकडे (१२९४) परतला; वार्षिक खंडणी देण्याच्या अटीवर मांडलिक या नात्यानें देवगिरीचें राज्य त्यानें रामदेवाच्याच ताब्यांत ठेवलें. योजना, धैर्य, यश व निष्पत्ति यांपैकीं कोणत्याही दृष्टीनें पाहिलें असतां या स्वारीला इतिहासांत तोड नाहीं, असें फेरिष्ता सांगतो. अगस्तीनें विंध्याद्रि पालथा घालून दक्षिणापथाचा मार्ग मोकळा केला; अल्लाउद्दीनानें यादवांचा पाडाव करून मुसलमानांना दक्षिणचा रस्ता खुला केला; फरक एवढाच, कीं अगस्तीच्या कर्तृत्वामुळें दक्षिणापथांत आर्यसंस्कृतीचा प्रसार झाला आणि अल्लाउद्दीनाच्या कर्तबगारीमुळें दख्खनची दौलत उध्वस्त झाली, संस्कृति लुप्तप्राय झाली. दक्षिणेंतून कोणीं कधीं नेली नव्हती एवढी लूट अल्लाउद्दीनानें उत्तरेस नेली आणि तिच्याच जोरावर त्यानें दिल्लीचें तख्त जबरदस्तीनें काबीज केलें.

यादवांच्या पाडावानंतर दक्षिणेंत सर्वत्र अंदाधुंदी माजली.

गुजरातेंत अनहिलवाड येथें राणा कर्णदेव नुकताच (१२९६–१३०४) गादीवर आला होता. लगेच उन्मत्त होऊन त्यानें अत्याचारांना सुरवात केली. गुजरात्यांनीं कर्णदेवाला 'घेलो'–वेडा– हें त्याच्या वंशनामाशीं यमक जुळविणारें व अन्वर्थक अभिधान दिलेलें आहे. केशव व माधव हे नागर बंधु त्याचे वडिलार्जित मंत्री होते. माधवाच्या पत्नीचे अंगीं पद्मिनीचे गुण आहेत, अशी ख्याति होती. कर्णानें तिला जबरदस्तीनें आपल्या जनानखान्यांत नेलें आणि तिच्यावर बलात्कार केला. तिच्या रक्षणासाठीं धावलेल्या केशवाची मारेकऱ्यांकडून हत्या करविली. ब्राह्मणांच्या स्त्रियांबद्दल क्षत्रियांना आसक्ति वाटावी, ती त्यांनीं जबरदस्तीनें भागवावी आणि यामुळें त्यांच्या राज्याचा विध्वंस व्हावा, हा जणुं दक्षिणापथाला शापच आहे. याचा सूड उगविण्यासाठीं माधव दिल्लीला गेला

आणि हरप्रकारच्या मदतीचें आश्वासन देऊन त्यानें गुजरातवर स्वारी करण्याविषयीं अल्लाउद्दीनाला उद्युक्त केलें. इतिहासाची पुनरावृत्ति होत असते, आणि अशा पुनरावृत्तीवरून विशिष्ट प्रदेशाच्या वृत्तीबद्दल अंदाज बांधतां येतो असें म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं. प्राचीन काळीं आपल्या बहिणीला जनानखान्यांत ओढणाऱ्या गर्दभिल्लाचा सूड घेण्यासाठीं कालकाचार्यानें शकांना असेंच आमंत्रण दिलें होतें. अर्वाचिन काळांत गायकवाडांचा गुजरातेंत प्रवेश झाला, तोही अशाच कारणासाठीं. माधवाच्या मार्गदर्शनाखालीं उलूघखान व नुस्रतखान या दिल्लीच्या सेनापतींनीं गुजरातवर स्वारी केली व अनहिलवाड काबीज केलें. आक्रमकांना तोंड देण्याऐवजीं हा गुजराती बाजीराव अनहिलवाडच्या वेशी बंद करून पूर्वजांनीं उभारलेल्या निर्जीव तटबंदीवर विसंबून राहिला. राजधानी पडली तेव्हां बायका-मुलांना सोडून तो जंगलांत पळाला. मुसलमानांनीं अनहिलवाडची तटबंदी पाडून टाकली; शहरांतील मंदिरें उध्वस्त करून त्यांच्या खोदीव शिलांनीं कोटाभोंवतालचे खंदक भरून काढले; एका जैन मंदिराचे कोरीव संगमरवरी स्तंभ उखडून काढून त्यांचा उपयोग जुम्मा मशीद उभारण्याचे कामीं केला. मंत्रिपद माधवाला मिळालें. कर्णाची राणी कमलादेवी मुसलमानांचे हातीं लागली. तिची रवानगी दिल्लीला करण्यांत आली. कोणी सांगतात कीं ती अलाउद्दीनाची पट्टराणी झाली; कोणी सांगतात, ती त्याची रखेली म्हणून राहिली. परपुरुषाच्या व परधर्मीयांच्या हातीं लागण्यापेक्षां अग्निकाष्ठें भक्षण करणें श्रेयस्कर, अशी निष्ठा व परंपरा जतन करणाऱ्या उच्च रजपूत कुलांतली ही राणी; दिल्लीला कांहीं दिवस काढल्यानंतर तिची वृत्ति इतकी निधर्मी किंवा धर्मातीत झाली व तेथील जनानखान्यांत ती इतकी रमली कीं दैव-योगामुळें आपल्याला प्राप्त झालीं आहेत तीं विविध सुखें मागें राहिलेल्या आपल्या लाडक्या कन्येलाही मिळावींत म्हणून अजून अविवाहित असलेल्या देवलदेवीला दिल्लीला आणण्यासाठीं दक्षिणेवर फिरून स्वारी करण्याविषयीं तिनें अलाउद्दीनापाशीं हट्ट धरला. आणि हें केव्हां ? तर रणतंभोरच्या (१३०१) जोहारानंतर, पद्मिनीच्या चितोडच्या (१३०३)

जोहारानंतर ! खेलीचा हट्ट पुरविणार नाहीं तो मर्द कसचा ? जणुं दक्षिणेवर फिरून स्वारी करण्यासाठीं अल्लाउद्दीन सबबीची किंवा प्रोत्साहनाची वाट पहात होता ! सुलतानानें दक्षिणेवर फिरून स्वारी रवाना केली आणि केवळ दैवलिखित म्हणूनच पापग्रहांच्या तावडींतून निसटण्याच्या बेतांत असलेली देवलदेवी त्याच्या सैनिकाच्या हातीं लागली. आणि पुढें दिल्लीच्या स्वर्गतुल्य जनानखान्यांत दुर्दैवी देवलदेवीच्या जीवनाचा उकिरडा झाला !

इकडे यादवांनीं विस्कळित झालेली राज्याची घडी जमाविण्याचा खटाटोप सुरू केला होता. यादवांवर आला होता तसाच प्रसंग पुढें भोंसल्यावरहि आला. राजारामाच्या कारकीर्दींत मराठ्यांनीं महाराष्ट्राचें रक्षण तसूतसूनें, प्राणपणानें केलें ; रामराजाच्या अमदानींत हें होऊं शकलें नाहीं, कारण यादवांनीं सह्याद्रीचा आधार घेतला नाहीं. अल्लाउद्दीनाच्या स्वारीपूर्वीच यादवांची सत्ता ढिली झाली होती. आतां ती खिळखिळी झाली. सर्वत्र अंदाधुंदी माजली. दक्षिणेंतील राज्यकर्त्यांनीं व स्थानिक पुंडांनीं त्यांच्या नामधारी हुकमतीखालीं असलेल्या सरहद्दींवरील प्रदेशाचे लचके तोडण्यास सुरवात केली. दक्षिणेचें सम्राट्पद प्राप्त करून घेण्याच्या ईर्ष्येनें प्रतापचक्रवर्तीनें कर्नाटकाच्या सरहद्दीवरील प्रदेशावर हल्ले चढविले. जगताप गंगेयदेवानें अनंतपूर व बल्लारी हे प्रांत काबीज केले. या घालमेलीमुळें राज्याचा वसूल गोळा होईनासा झाला. म्हणून कबूल केल्याप्रमाणें वार्षिक खण्डणी रामदेव दिल्लीला पोंचवूं शकला नाहीं. 'आपला पुत्र संगम यानें आपल्याविरुद्ध बंड उभारलेलें असून त्यानें आपणांस अटकेंत ठेवलेलें असल्यामुळें खंडणी पाठवितां आली नाहीं, सबब बंडवाल्यांचा बीमोड करण्यासाठीं मदत पाठवावी' असा गुप्त निरोप रामदेवानें दिल्लीला पाठविला आणि म्हणून सुलतानानें दक्षिणेवर फिरून स्वारी केली, असें ईसामी सांगतो. संगम म्हणजेच शंकरदेव, ज्याच्यासाठीं रामदेवानें देवलदेवीला मागणी घातली होती आणि निर्वासित होऊन बागलाणात यादवाच्या आश्रयाला आल्यानंतर ज्याच्याशीं कर्णदेवानें तिचा वाङ्निश्चय केला होता. रामदेवाला

शंकरदेव, केशवदेव, भीमदेव ( बिंबदेव ), प्रतापदेव, वगैरे अनेक पुत्र होते. त्यांनीं रामदेवाला पदच्युत केलें असावें, निदान राज्याच्या वेगवेगळया प्रांतांचा कारभार हातीं घेतला असावा आणि परस्परांच्या सहकार्यानें स्वराज्य समर्थ व स्वतंत्र करण्यासाठीं पुनर्घटनेच्या योजना आंखल्या असाव्यात, आणि त्यांच्या या संकल्पाला रामराजाची संमति असावी, असा निष्कर्ष काढण्याला जागा आहे. याच सुमारास बिंबदेवानें कोंकणप्रांतीं यादव राज्याची शाखा स्थापन केल्याचा वृत्तांत प्रसिद्ध आहे. तो बागलाणांतून साल्हेर-मुल्हेरवरून लाट प्रांतांत उतरला ; त्याच्याबरोबर कसलेलें सैन्य व मुरलेलें मंत्रिमंडळ होतें. यावरून दिसतें कीं वंश व राज्य यांच्या रक्षणार्थ तिकडे त्याची रवानगी रामदेवाने हेतुपुरस्सर केलेली असावी. हेतु असा कीं देवगिरीवर फिरून हल्ला झालाच तर सह्याद्रीपलीकडे यादव राज्याची दुसरी फळी खडी असावी. शिवाय आतां अनहिलवाडचें राज्य मुसलमानांचे आधीन झालेलें असल्यामुळें कोंकणपट्टीच्या रक्षणासाठीं लाट प्रांतांत विशेष बंदोबस्त राखणें जरूर झालें होतें. सुलतानाने फिरून स्वारी केली व संकल्पित लढाईत मराठ्याचा मोड झाला तर मुलाच्या बंडाच्या व स्वतःच्या राजनिष्ठेच्या सबबीखालीं तडजोडीला आणि स्वतःच्या व दुर्बल प्रजेच्या चर्मरक्षणाला सवड असावी, अशा दूरदृष्टीनें रामदेवानें हा गुप्त निरोप दिल्लीला पाठविलेला असणें संभवनीय आहे. रामदेवाचें हें कारस्थान फक्त त्याच्या स्वतःपुरतें यशस्वी झालें. मलिक काफूरनें देवगिरीवर स्वारी ( १३०५ ) केली. राजधानीच्या परिसरात शंकरदेवाच्या नेतृत्वाखालीं मराठे निकरानें लढले. आपल्या सैन्यातील अर्ध्याअधिक शिपायांची कत्तल झाल्यानंतर शंकरदेवानें पळ काढला. देवगिरीची लूट झाली. रामदेवाने आपल्या राजनिष्ठेबद्दल सेनापतीची खात्री करून दिली. हुजूर हुकमाप्रमाणें रामदेवाला बरोबर घेऊन मलिक दिल्लीला परतला. दिल्लीला रामदेवाचा सहा महिने मुक्काम होता. अलाउद्दीनानें त्याला मोठ्या इतमामानें वागवलें आणि तो दक्षिणेकडे परतला तेव्हां त्याला गुजरातचें राज्य व दोन लक्ष सुवर्णमुद्रा बक्षीस दिल्या आणि राय-इ-रायान् ही पदवी बहाल केली. दिल्लीचें वैभव व सामर्थ्य पाहून रामदेव इतका

गांगरला व सुलतानाच्या औदार्यामुळें इतका मिंधा झाला कीं पुढें मलिक काफूरनें द्वारसमुद्रावर स्वारी ( १३११ ) केली तेव्हां सैन्याला जरूर ती सामग्री रामदेवानें पुरविली; इतकेंच नव्हे, तर मलिकची कोठें गैरसोय अगर फसगत होऊं नये म्हणून मार्गदर्शनासाठीं त्याच्याबरोबर आपला माहितगार अधिकारी परशराम दळवाई याची नेमणूक केली ! रामदेव व शिवाजी याच्या दिल्ली-निवासाची प्रतिक्रिया तुलना करण्यासारखी आहे. दोघेही मराठे – मग एवढा फरक कां पडला ? उघड आहे. रामदेव हा मैदानचा राजा होता आणि शिवाजी हा सह्याद्रीचा !

यादवांच्या पाडावानंतरचा महाराष्ट्राचा इतिहास म्हणजे बहामनी व दक्षिणी शाह्यांचा इतिहास. या कालखंडाचा इतिहास उन्मत्त राज्यकर्त्यांच्या दुष्कृत्यांमुळें रक्तरंजित आणि स्वार्थाच्या उपासनेमुळें स्वत्त्व विसरून पारतंत्र्याशीं समरस होणाऱ्या स्वजनाच्या दुष्कृत्यांमुळें कलंकित असा आहे. या भयानक अंधकारांतही कधीं कोठें प्रकाशाचे किरण चमकतांना दिसतात. जे दिसतात ते सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांत व कडेकपारीवर उभारलेल्या डोंगरी किल्ल्यांत !

पंधराव्या शतकाच्या आरंभीं महाराष्ट्रांत दुर्गादेवीचा भयंकर दुष्काळ ( १३९६–१४०७ ) पडला. असा भयंकर काळ त्यापूर्वींच्या दोन हजार वर्षांत आला नव्हता. लढाया व लुटी आणि परकी राज्य यांमुळें या दुष्काळाला फारच भयंकर स्वरूप आले. या दुष्काळामुळें महाराष्ट्राचें आर्थिक जीवन उध्वस्त झालें आणि सांस्कृतिक जीवन नष्टप्राय झालें. राजाश्रयाचे अभावीं दुर्गतीला पोंचलेलीं विद्यापीठें पूर्णतया नष्ट झालीं आणि अनेक पण्डित घराण्यांनीं देशत्याग केला. महाराष्ट्राच्या पाण्डित्याची परंपरा खण्डित झाली; जें राहिलें तें इतकें शुष्क व निर्जीव कीं विद्वत्ता हा येथें उपहासाचा विषय झाला ! समाजाची धारणा करणारे तत्त्ववेत्ते व प्रणेते परागंदा झाले आणि प्रजेला कोणी शास्ता किंवा त्राता राहिला नाहीं. प्रजेप्रमाणेंच मध्यवर्ती परकी सत्ताही दुष्काळामुळें दुर्बळ झाली. आरभीं फौजेच्या जोरावर सरकार सारा जेमतेम वसूल झाला, परंतु पुढें दुष्काळ संपल्यावरही सुमारें तीस वर्षेंपर्यंत प्रजेकडून सरकारला कांहींही वसूल मिळाला नाहीं. कारण प्रजेचे अंगीं जमीन कसण्याचें किंवा व्यापार-

उदीम करण्याचें त्राण राहिलें नव्हतें; आणि ठिकाठिकाणच्या मराठे सरदारांनीं व देशमुख-देशपांड्यांनीं मुसलमानी सत्तेविरुद्ध बंडें उभारलीं होतीं. किल्ल्यांची डागडुजी करून व पदरीं शिबंदी ठेवून ते बलिष्ठ झाले. मध्यवर्ती सत्तेची हुकमत व खंडणीच्या मागण्या धुडकावून देऊन भोंवतालच्या मुलखांतून ते स्वतःसाठीं करभार गोळा करूं लागले.

अशा बंडखोरांचा बंदोबस्त करण्यासाठीं बहामनी सुलतानांना जागोजाग फौजा पाठवाव्या लागल्या. माहूरच्या जमेदाराच्या हातीं बरींच बळकट ठाणीं होतीं. त्यानें बंड उभारलें. अहमदशहा बहामनीनें त्याच्यावर स्वारी ( १४२५ ) केली. माफीचें वचन मिळाल्यावर तो शरण आला. पण तो स्वाधीन होताच वचन मोडून शहानें त्याला व त्याच्या पदरच्या पाचसहा हजार लोकांना ठार मारलें आणि कैद केलेल्या सर्व बायकामुलांना जबरदस्तीनें मुसलमान केलें! सरदार मलिक उत्तुजार यानें खटाव (१४२९) प्रांतांतील बंड मोडलें; नंतर त्यानें कोंकणपट्टीवर ( १४२९ ) स्वारी करून मुसलमानी आक्रमणापासून तोंवर अलिप्त असलेल्या या प्रदेशांतून अगणित संपत्ति लुटून नेली. त्यानंतर अल्लाउद्दीनशहा बहामनी याचे कारकीर्दींत दिलावरखानानें कोंकणावर फिरून मोहीम ( १४३६ ) केली. मुसलमान इतिहासकार सांगतात कीं रायरी व सानखेडचे राजे त्याला शरण गेले. महाडच्या उत्तरेस सोनगड किल्ला आहे; याचाच हा उल्लेख असावा असें दिसतें, कारण रायरीचा किल्ला याच्या नजीकच आहे. सोनखेडच्या राजाची अत्यंत रूपवती व गायनवादनादि ललितकलाप्रवीण अशी मुलगी त्यानें शहाकरितां आणली. शहानें तिच्याशीं लग्न केलें व तिचें नांव परीचेहेर ( स्वर्गीची रंभा ) असें ठेवलें. रंभावती त्याला इतकी प्यार झाली कीं शहाची शादीची पट्टराणी मलिकाजहान ही मत्सरग्रस्त झाली आणि तिच्या कागाळीवरून तिचा बाप खानदेशचा शहा नसीरखान याने बहामनींच्या मुलखावर स्वारी केली!

शंकरदेवाच्या पाडावानंतर मलिक काफूरनें कोंकणावर स्वारी करून चौल व दाभोळ हीं बंदरें व त्याच्या आसमंतांतील प्रदेश काबीज केला; कारण किनाऱ्यावरील दर्यावर्दी वाहतुकींत हितसंबंध गुंतलेल्या मुसलमान

व्यापाऱ्यांनीं आपणांवर होणाऱ्या जुलुमांबाबत सुलतानाकडे तक्रारी केल्या होत्या. राजसत्तेचा पाठिंबा मिळण्याचा संभव दिसूं लागतांच कटकटी निर्माण करण्याची हिंदुस्थानांतील मुसलमानांची प्रथा कमींत कमी इतकी पुरातन आहे. शिवाय घाटमाथ्यावर व कोंकणात इस्लामी सत्ता प्रस्थापित होईपर्यंत देशावरील राज्याला निर्वेध स्थैर्य प्राप्त होणें अशक्य आहे, हें सुलतान जाणून होते. शंकरदेवाच्या पाडावा-नंतर त्याचा मेहुणा हरपाळदेव यानें रामदेवाचा मंत्रि राघव याच्या मदतीनें मराठ्यांचें घोडदळ उभारून मुसलमानांविरुद्ध बंड उभारलें आणि सह्याद्रींतील दऱ्याखोऱ्यांच्या आश्रयानें आक्रमकांना हैराण केलें. बंडवाल्यांच्या पाठलागावर निघालेल्या सैन्यानें राघवाला वेढलें. तेव्हा सर्पालाही सरपटत चढतां येणार नाहीं अशा एका कपारींतून तो निसटून गेला, असें मुसलमान इतिहासकार सांगतात. मुहम्मद तुघ्लकानें दौलताबादेस सल्तनतीची राजधानी ( १३२७ ) आणली; तरी कोंडाणा काबीज ( १३२८ ) होईपर्यंत त्याला स्थिरता वाटली नाहीं. हा किल्ला त्या वेळीं नागनायक नांवाच्या कोळी राजाच्या ताब्यांत होता. मुहम्मदानें वेढा घातल्यानंतर सुमारें आठ महिने प्रतिकार केल्यावर अन्नसामग्री संपल्यामुळें नागनायक आपल्या अनुयायांसह गड सोडून निघून गेला व नंतर मुहम्मदाचें निशाण किल्ल्यावर लागलें. जव्हार संस्थानचा प्रस्थापक तो हाच, असें कांहीं संशोधकांचें म्हणणें आहे. ईसामीनें कोंडाण्याला 'महापुरुष-पर्वत' (Hill of Giants) हें यथार्थ नांव दिलेलें आहे. घाटमाथ्याबाबत स्वकीयांनीं जें ओळखलें नाहीं तें परकीयांनीं अचूक हेरलें, कीं घाटमाथा हाच महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचा गाभा आहे, तो काबीज करीपर्यंत आपल्या राज्याला स्थैर्य नाहीं; कीं महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचे नंदादीप येथील गडांवर अखंडितपणें तेवत आहेत; गड काबीज करून हे नंदादीप वेळींच विझवले नाहींत तर ते भडकून आपलें राज्य केव्हां भस्मसात् करतील याचा नेम नाहीं.

म्हणूनच अल्लाउद्दीनशहा बहमनीनें घाटमाथा व कोंकणपट्टी यांवर कबजा करण्याचें मुक्रर केलें. ही कामगिरी मलिक् उत्तुजारावर सोंप-

विण्यांत आली ; कारण त्यानें पूर्वी मिळविलेल्या यशामुळें सह्याद्रींतील घाटांचा माहितगार असा त्याचा लौकिक झाला होता. मलिक् यानें चाकण येथें आपलें मुख्य ठाणें ठेवलें, जुन्नरजवळचा किल्ला (शिवनेरी ?) काबीज केला आणि येथून फौजांच्या निरनिराळया टोळया पाठवून त्यानें कोंकणपट्टींतल्या पुष्कळ राजांना ( १४५३) जिंकलें. दुय्यम लष्करी अधिकाऱ्यांना जड वाटणाऱ्या बंडखोरांचें पारिपत्य करण्यासाठीं अखेरीस तो स्वतः विशेष तयारी करून निवडक फौजेनिशीं दक्षिणेकडे निघाला.

याच मोहिमेंत विशाळगडची सुप्रसिद्ध घटना घडली ; किंवा हल्लीं प्रचलित असलेल्या राजकीय तत्त्वानुसार, कुप्रसिद्ध.

मुसे खोऱ्यांतील जंगलांत शिरकवलीनजीक शिरकाई देवीचें स्थान आहे. शिर्क्यांचा मूळ पुरुष या गांवीं स्थायिक झाला, म्हणून त्यांच्या कुळाला शिर्के हें उपनांव प्राप्त झालें. कालांतरानें शिर्के प्रबल व समर्थ झाले आणि ते स्वतःला राजे म्हणवून घेऊं लागले. घाटमाथ्यावरील बहिरवगड या किल्ल्यावर त्यांची राजधानी होती. हा किल्ला सातारा जिल्ह्यांत पाटणच्या वायव्येस वीस मैलांवर आहे. सह्याद्रीचा वारणेपर्यंतचा घाटमाथा त्या वेळीं शिर्क्यांच्या ताब्यांत होता. श्री. पारसनीस सांगतात कीं शिर्क्यांची राजधानी पन्हाळयावर होती आणि महंमद गवानानें पन्हाळा काबीज केल्यानंतर ते बहिरवगडावर स्थायिक झाले ( Panhala, p. 19 ). फेरिष्ता सांगतो कीं कोकणपट्टींतील लोक मोठे बळकट व काटक अशी त्या वेळींही त्यांची प्रसिद्धि होती. शिर्के एवढे बलाढ्य आणि त्यांची प्रजा एवढी कणखर, तरी मलिकाच्या प्रचंड सैन्यापुढें त्यांचा इलाज चालेना. अनेक लढाया जिंकून मलिकनें शिर्क्यांना कैद केलें. या भागांत मुसलमानी सत्तेचें पाऊल स्थिर व्हावें म्हणून शिर्क्यांना मुसलमानी धर्म स्वीकारण्याविषयीं मलिक् तसदी करूं लागला. त्या काळांत मराठ्यांना स्वातंत्र्याहून स्वधर्माचें महत्त्व अधिक वाटे. स्वधर्माला ते सर्वस्व मानीत ; कारण राज्य आज गेलें तर उद्यां तें फिरून कमावतां येईल, असा त्यांना भरंवसा होता ; पण धर्म एकदां गेला कीं तो पुन्हां प्राप्त होणार नाहीं, अशी त्यांची भावना होती ; आणि तत्कालीन

समाजरचनाही अशीच होती. स्वधर्माला व स्वातंत्र्याला मुकण्याचा प्रसंग आला तेव्हां मुसलमानांचा कांटा काढण्यासाठीं इकडील मातबर मराठ्यांनीं एक मोठें कारस्थान उभारलें व सर्वस्व पणाला लावून तें यशस्वी केलें. फेरिष्तानें त्याची हकीगत सांगितली आहे ( ब्राह्मणी राज्याचा इतिहास–मोडक, पृ. १४३ ) ती अशी :—

"मलिक उत्तुजारानें शिर्क्यांस आग्रहपूर्वक असें सांगितलें कीं तूं मुसलमान हो, नाहीं तर तुझा जीव घेतों. तेव्हां त्या धूर्त हिंदूनें बाह्यात्कारीं मोठा नम्रपणा दाखवून असें कळविलें कीं खेळण्याचा राजा शंकरराय याच्या व माझ्या घराण्यांमध्यें फार दिवसांचें वांकडें आहे. यास्तव जर मी एकटाच मुसलमान झालों आणि तो आपल्या मुलखात अप्रतिबंध रीतीनें राज्य करीत राहिला तर आपली स्वारी परत गेल्यावर धर्मांतर केल्याबद्दल तो माझी फार अप्रतिष्ठा करील व टर उडवील आणि माझ्या घराण्यांतील सर्व माणसांस व प्रजेस बंड करण्यास चिथावून देईल...त्याचा मुलूख जिंकून माझ्या किंवा माझ्या सरदारांच्या स्वाधीन कराल तर मी मुसलमान धर्म स्वीकारून शहाच्या नोकरांत आपली गणना करीन आणि दरसाल हुजूर खंडणी पाठवून शिवाय जे राजे आपल्या कर्तव्यास व राजनिष्ठेस चुकतील त्यांसही ताळ्यावर आणण्यास सहाय्य करीन."

महाराष्ट्रांत पुढें प्राप्त झालेली परिस्थिति व निर्माण झालेली वृत्ति जमेस धरून लेखकानें हा मजकूर लिहिला आहे किंवा कसें, हें जाणण्यास कांहीं साधन नाहीं. कांहीं इतिहासकार सांगतात कीं शंकररायाला जिंकून प्रथम त्याला इस्लामाची दीक्षा देण्यांत यावी, एवढीच अट शिर्क्यानें घातली होती. शिर्क्याचें बोलणें ऐकून घेऊन मलिकनें उत्तर दिलें कीं "त्या राजाच्या मुलखांत जाण्याची वाट गडद जंगलांतून आहे व वाटेंतील घाट बिकट आहेत." त्यास शिर्क्यानें असें उत्तर दिलें कीं "माझ्यासारखा इमानी व माहीतगार सैन्यास वाट दाखविण्यास हजर असतां सैन्यांतील माणसांच्या एका केंसासही इजा होऊं देणार नाहीं." मुसलमान लोक शेंडी किंवा डोईस केंस ठेवीत नाहींत हें विचारांत

घेऊन शिर्क्यानें हें वचन दिलेलें असावें, हें कांहीं मलिकाच्या डोक्यांत आलें नाहीं.

शिर्क्यांचे शेजारीं, संगमेश्वराचे दक्षिण बाजूस खेळणा हा परगणा होता. त्यावर शंकररायाचें राज्य होतें. खेळणा प्रांतांत राजापूर व संगमेश्वर यामधील कोल्हापूरच्या पश्चिमेकडील घाटमाथ्याचा समावेश होतो. खिलिगड उर्फ खेळणा म्हणजे आधुनिक विशाळगड; हा किल्ला भोज शिलाहारानें सन १२०० च्या सुमारास बांधला. हा किल्ला नांवाप्रमाणें विशाल आहे. याची लांबी ३२०० फूट व रुंदी १०४० फूट आहे. या किल्ल्यावर भूपाल नांवाचा सुमारें ६४०० चौरस फुटांचा विस्तार असलेला मध्ययुगीन तलाव आहे. या किल्ल्यावर शंकररायाची राजधानी होती. या शंकररायाचें उपनांव मोरे होतें, असें कोल्हापूर गॅझेटीयरमध्यें नमूद केलेलें आहे. मोरे व धुळप यांचें कुल एकच. ज्ञानकोशांतही हेंच आडनांव दिलेलें आहे. शंकरराय हा शिर्क्यापेक्षां बलाढ्य होता. कोंकणपट्टी त्याच्या ताब्यांत होती. त्याच्याजवळ तीनशें लढाऊ जहाजांचें आरमार होतें. इराण, अरबस्तान वगैरे देशांतून येणाऱ्या अडदांड मुसलमान व्यापाऱ्यांचा त्यानें चांगलाच बंदोबस्त ठेवला होता. घाटमाथ्यावरील मुलखांत खेळण्याचाच भाग अति अवघड व भयंकर. म्हणूनच येथें शिर्के व मोरे यांचें कारस्थान यशस्वी होऊं शकलें.

आरंभीं दक्षिणेंत आलेले मुसलमान मूळचे इराणी व तुर्की होते. दक्षिणेंत बस्तान नीट बसल्यानंतर त्यांनीं आपले अनेक जातभाई इकडे आणविले. दक्षिणेंतील मुसलमानी राज्यात हबशी लोकही बहुत होते. तत्कालीन इतिहासकारानीं ज्या परदेशी लोकांना मोगल अशी संज्ञा दिलेली आहे त्या वर्गांत बहुसंख्य भरणा सय्यदांचा होता. सय्यद हे महंमद पैगंबराचे वंशज असल्यामुळें त्यांना मुसलमान समाजांत विशेष मान देण्यांत येत असे. यामुळें त्यांची वृत्ति फार चढेल असे. कडवे लढवय्ये असा त्यांचा लौकिक होता. हे लोक व्यापाराच्या निमित्तानें इकडे येऊन स्थायिक झाले होते. त्यांचें व दक्षिणेच्या मुसलमानांचें वांकडें होतें. त्यांच्या आपसांत झटापटी व एकमेकांविरुद्ध

दरबारी कारस्थानें नेहमीं चालू असत. मलिक् उत्तुजारानें तोंवर केलेल्या मोहिमांत दक्षिणी व हबशी सैनिकांची मदत घेतली नव्हती. कारण या जमातींची निष्ठा व शौर्य यांवर त्याचा बिलकुल विश्वास नव्हता.

फेरिष्ता सांगतो, "शिर्क्यांच्या वचनावर भरंवसा ठेवून मलिक् उत्तुजार खेळण्यावर स्वारी करायास निघाला. आरंभींच कांहीं दक्षिणी व हबशी कामगारांनीं पहाडांत शिरण्याचें नाकबूल केलें आणि ते उत्तुजारास सोडून मागें राहिले. शिर्क्यानें पूर्वींच वचन दिल्याप्रमाणें पहिल्या दोन दिवस एका रुंद व चांगल्या वाटेनें मुसलमानी सैन्यास नेलें, परंतु तिसऱ्या दिवशीं त्यानें अशा बिकट वाटेनें त्यास नेलें कीं त्या घोर अरण्यास भिऊन मर्द वाघही गर्भगळित होईल आणि त्याचें पुरुषत्व जाईल. घाटांतील वाटा इतक्या वांकड्यातिकड्या होत्या कीं त्यांची तुलना केंसांच्या कुरळेपणाशीं केली तरी बरोबरी होणार नाहीं. त्या पर्वतांचा भयंकर देखावा पाहून प्रत्यक्ष राक्षस व भुतें ही तेथील कड्यांपाशीं व गुहांपाशीं आल्यावर दचकून जातील. या अरण्यांत कधींही सूर्याचा कवडसासुद्धां पडत नसे. तेथें वाढलेलें गवत सुद्धां सर्पाच्या सुळया दांतांप्रमाणें चिवट तीक्ष्ण होतें आणि हवा तर अजगराच्या श्वासासारखी दुर्गंधि होती. तेथील पाण्यामध्यें मृत्यूच मूर्तिमंत वास करीत होता आणि प्रत्येक वाऱ्याची झुळूकही विषानें प्रफुल्लित होती. अशा वांकड्यातिकड्या व भयंकर वाटेने जाऊन मुसलमान लोक अगदीं भिऊन व थकून गेल्यावर पुढें याहून गडद व घोर अरण्यांत शिरले. तेथील वाट तर अशी बिकट होती कीं त्यावरून वाऱ्यास सुद्धां वाहतां येण्याजोगें नव्हतें. त्या वाटेच्या तिहीं बाजूंस गगनचुंबित पर्वत होते आणि चौथ्या बाजूस एक खाडी आली होती. त्यामुळें तेथून पुढें जाण्यास मार्ग नव्हता किंवा ज्या वाटेनें तेथें गेले त्या वाटेशिवाय मागें परतण्यास मार्ग नव्हता. या घोर प्रसंगीं मलिक् उत्तुजार आजारी पडून त्यास रक्ताची हगवण लागली. यामुळें त्यास नियमितपणें कूच करतां येईना व सैन्यांत शिस्त राखण्याविषयीं हुकूमही देतां येईना. सैन्यांतील लोक दिवसभर थकून जागा सांपडेल तेथें विश्रांति घेण्यास पडत. कारण जवळ जवळ दोन तंबू मारण्यास सुद्धां जागा सांपडत नसे. याप्रमाणें थकून भागून

अव्यवस्थित रीतीनें मुसलमानी फौज विश्रांति घेत पडली असतां विश्वास-घातकी शिर्का शंकररायाकडे गेला आणि सर्व मुसलमानांस तुझ्या जबड्यांत आणून सोडिलें आहे असें त्यानें त्यास कळविलें. शंकरराय मोठी फौज घेऊन निघाला. आपणांवर कोणीकडून एकाएकीं छापा येईल अशी मुसलमानांस बिलकुल धास्तीही नसल्यामुळें सारा दिवस श्रम करून थकून ते झोंपीं गेले होते. अशा या पराधीन व दुर्बल स्थितींत असतां मेंढ्यांप्रमाणें कट्यारींनीं व तरवारींनीं शंकररायाच्या लोकांनीं सात हजार मुसलमान शिपायांस कापून काढलें. त्या वेळीं वारा जोराचा सुटला होता. त्यामुळें झाडांच्या खांद्या एकामेकांवर आदळून जो मोठा गोंगाट चालला होता त्यांत मुसलमानांच्या किंकाळ्या सुद्धां एकमेकांस ऐकूं आल्या नाहींत. मदिना, कर्बला आणि नजफ येथील बड्या बड्या पांचशें सय्यदांसहवर्तमान मलिक् उत्तुजार या कत्तलींत ठार झाला. त्याचप्रमाणें जे दाक्षिणी व हबशी कामगार आपल्या दोन हजार लोकांसह बरोबर होते त्यांचीही हीच अवस्था झाली. उजाडण्यापूर्वीच हें रक्तस्रावाचें काम पुरें करून त्या अरण्यांतून शंकरराय आपल्या लोकांसहवर्तमान परत गेला."

उतारा थोडासा लांबला. एकाद्या दुसऱ्या द्विरुक्तीला काट मारून तो पुरा दिला आहे. हा वृत्तांत ही या प्रसंगाची सर्वांत प्राचीन अशी लिखित हकीकत आहे. हें लिखाण एका मुसलमान इतिहास-काराचें आहे, हें ध्यानांत ठेवून ज्यानें त्यानें आपआपल्या बुद्धीप्रमाणें व्यापारी आंकडा बाद घालून त्यांतील सत्याचें ग्रहण केलें पाहिजे. फेरिश्ता ( १५७०–१६११ ) हा निजामशाही व आदिलशाही यांच्या पदरीं होता. सबब या वर्णनांत कांहीं अतिशयोक्ति व आरोप असले तर ते मराठ्यांच्या विरुद्ध असणार हें उघड आहे. इतर इतिहासकार व फेरिश्ता यांच्या कथनांत फरक पडतो तो एका तपशीलाबाबत ; इतर सांगतात कीं विशाळगडच्या कत्तलींत शिर्क्यांचाही हात होता ; शंकररायानें आघाडीवर हल्ला चढविला आणि शिर्क्यांनीं पिछाडीवर, आणि उभयतांनीं शत्रुसैन्याचा उच्छेद केला. हा तपशील मान्य करावयास कांहीं हरकत नाहीं.

हा प्रसंग अनेक दृष्टींनीं चिरस्मरणीय आहे ; महाराष्ट्रांतील, विशेषतः घाटमाथ्यावरील स्थानिक राजांच्या शक्ति परस्परांशीं प्रतिस्पर्धी होत्या, सहकारी क्वचितच होत्या. महाराष्ट्रांत यादवांचें राज्य होतें, म्हणूनच कीं काय, कोण जाणे, यादवी हाच महाराष्ट्राला शाप आहे! या प्रसंगीं शिर्के व मोरे या उभयतांनीं सहकार्य करून स्वधर्म आणि स्वातंत्र्य यांचें संरक्षण केलें, म्हणून. असें सहकार्य मराठ्यांच्या इतिहासांत क्वचितच आढळतें. महाराष्ट्राच्या नैसर्गिक परिस्थितीचा, विशेषतः सह्याद्रींतील डोंगराचा व जंगलांचा, फायदा राजकारणासाठीं घेण्यांत आल्याचा हा पहिलाच प्रसंग. प्रबळ शत्रूंना हुलकावून किंवा फसवून, संख्याबलानें व शस्त्रसामर्थ्यानें दुर्बल अशा संरक्षकांनीं आक्रमकांना अपरिचित व स्वतःला सोईस्कर अशा मोक्याच्या ठिकाणीं आणून, तेथें त्यांजवर चोहींकडून हल्ला चढवून त्यांची दाणादाण करणें किंवा त्यांचा फन्ना उडविणें, हें गनीमी काव्याचें एक स्वरूप या वेळीं प्रथमच प्रकट झालें, म्हणून. शिवाजी व राजारामाचे सेनापति यांनीं या वैशिष्ट्याचा पुढें पुरेपूर उपयोग करून घेतला. सह्याद्रि आपल्या पाठीशीं उभा आहे याची यापूर्वीच्या राज्यकर्त्यांना दादही नव्हती. महाराष्ट्रांत, ऐतिहासिक कालाच्या आरंभीं, अहिंसाप्रधान बौद्ध धर्माचा प्रसार बराच झाला होता. बौद्ध धर्म बुडाला आणि येथेंही त्याची जागा अतिरिक्त अहिंसेचा पुरस्कार करणाऱ्या जैन धर्मानें घेतली. राजकारणांतील व क्रान्तिकालांतील अहिंसातत्त्वाच्या पुरस्काराच्या मर्यादा हा विषय विवाद्य आहे. विशाळगडचें युद्ध हें धर्मयुद्ध नव्हे, हा शुद्ध विश्वासघात आहे, अशा वल्गना आतां, त्या प्रसंगानंतर पांचशें वर्षांनीं, तथाकथित आचार्यपीठावरून करणें सोपें आहे. अहिंसेच्या अतिरेकाचें जवळजवळ समकालीन असें एकच उदाहरण (राजपूत संस्कृति–देशपांडे, पृ. २०) येथें सांगतों :—"अनहिलवाड्याचा राजा जैन धर्मीय होता आणि शत्रु अंगावर आला तरी देखील पावसाळ्याच्या दिवसांत सैन्याच्या हालचाली त्यानें बंद ठेविल्या होत्या. पावसामुळें रस्ते सैन्याच्या हालचाली करण्याच्या कामाचे राहिले नव्हते म्हणून नव्हे, तर मोठ

मोठ्या सैन्याच्या हालचालीनें पावसाळयांत उत्पन्न होणाऱ्या नैसर्गिक जीवजंतूंची अतिशय हानि होईल म्हणून!" या प्रसंगीं आणि केव्हांही मराठे अशा विघातक प्रवृत्तींच्या आहारीं गेले नाहींत, म्हणून. कोणत्याही प्रसंगाची नैतिक युक्तायुक्तता तत्कालीन परिस्थितीवर अवलंबून असते; संकटाच्या गांभीर्यावर आणि सामनेवाल्याच्या वृत्तीवर. हीं कशीं होतीं, तें पाहा:—

दुसरा बहमनी बादशहा महमदशहा (१३५८–१३७५) याच्या कारकीर्दीत कांहीं कारवान लोक घोडे विकण्यास घेऊन आले. ते घोडे शहानें नापसंत केले. तेव्हां कारवानांनीं शहाकडे तक्रार केली कीं आम्ही खास आपल्यासाठीं उत्तम घोडे आणले होते आणि तसें सांगितलें असतांही वेलंपट्टण येथें विनायकदेवानें जबरीनें कमी किंमतीस ते आमच्याकडून विकत घेतले. लगेच या अपमानाचा सूड घेण्याचा शहानें निश्चय केला. आपल्या सैन्यानिशीं वेलंपट्टणाजवळ आल्यानंतर फौजेपैकीं कांहीं कसलेल्या लोकांना अंगावर फाटक्या चिंध्या घालून कारवानाच्या वेषानें आपणांस मार्गांत चोरांनीं लुटलें आहे असें सांगत शहरात जाण्याचा शहानें हुकूम केला. वेशीचे रखवालदार त्यांची चौकशी करीत होते. तोंच शहाचें सैन्य आलें; वेषधारी कारवानांनीं रखवालदारांना वेशीचीं दारे बंद करूं दिलीं नाहींत. शहरांत शिरल्यानंतर शहानें नागरिकांची कत्तल केली आणि उद्धट उत्तर देणाऱ्या विनायकदेवाची जीभ कापून नंतर त्यास जिवंत जाळलें! आणखी एक उदाहरण देतों: दोन चिजा ऐकून खुष झालेल्या महंमदशहानें दारूच्या धुंदींत गवयांना विजयानगरच्या राजाच्या खजिन्यावर वराता दिल्या. त्या मानल्या नाहींत म्हणून शहानें एक लाख हिंदु ठार करण्याची प्रतिज्ञा केली आणि संकल्पित संख्येपेक्षां दुप्पट हिंदूंची कत्तल केली! दक्षिणेंतील मुसलमानी राज्यकर्त्यांच्या अमदानींत घडलेल्या अशा अत्याचारांचीं उदाहरणें सांगावीं तेवढीं थोडींच होतील. संगमेश्वर व विशाळगड या ठाण्यांभोंवतालचा प्रदेश कधींही, कोणाही परक्याकडून जिंकला गेला नव्हता. या भागाचे राज्यकर्ते जे शिलाहार त्यांचीं राज्यें यादवांनीं बुडविलीं; यादवांना खलजी सुलतानांनीं बुडविलें; दिल्लीच्या

सुलतानांचें दक्षिणेंतील राज्य बहमनी घराण्यानें बंड करून बळकावलें. यादवांचे राजकीय वारसदार, एवढाच, व तोही असलाच तर, त्यांचा या भागावर अधिकार होता. शिर्के किंवा मोरे हे बहमन शहांचे मांडलिक कधींही नव्हते. परिस्थितीच्या प्रादुर्भावामुळें पराभूत झालेल्या मांडलिकांनाही स्वातंत्र्यसंपादनासाठीं बंड करण्याचा अधिकार असतो. शिर्के व मोरे यांनीं या वेळीं हें कारस्थान रचलें व तडीला नेलें नसतें तर महाराष्ट्राच्या इतिहासाला वेगळेंच वळण लागलें असतें. या काळांतील घनांधकारांत महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याची ज्योत तेवत ठेवण्याचें श्रेय त्यांनीं या वेळीं मिळविलें. बेगुन्हा मराठ्यांवर हा हल्ला चढविण्यास आलेल्या सैन्याची वृत्ति कशी होती तें पहा. विशाळगडच्या कत्तलींतून जे थोडे मोंगल वांचले ते मोठ्या कष्टानें चाकणच्या किल्ल्यावर पोंचले. ऐन वेळीं दक्षिणी मुसलमान फौज सोडून मागें राहिले, त्यांनीं लढाईंत भाग घेतला नाहीं, त्यांच्या भ्याड व फितूर वर्तनामुळे हा दुर्धट प्रसंग ओढवला, असे उद्गार कांहीं मोंगल अधिकाऱ्यांनीं काढले. राजधानीला परतल्यावर ते हा आरोप दरबारीं जाहीर करतील व तसें झालें तर शहाची मर्जी खफा होईल, हे जाणून दक्षिणी गटाच्या पुढाऱ्यांनीं शहाला खबर दिली कीं आम्हीं दिलेला सावधगिरीचा इषारा न जुमानतां शिर्के या जमेदाराच्या चिथावणीवरून आणि सय्यद व मोंगल यांच्या सल्ल्यानें मलिकनें अविचाराचें कृत्य केलें आणि या कत्तलींतून वांचलेल्या मोगलानीं आतां चाकणचा किल्ला ताब्यांत घेतलेला असून कोंकणच्या राजास बंड करण्यास प्रवृत्त करून त्यास सहाय्य देण्यास ते सिद्ध झालेले आहेत. शहा दारू पिऊन तर्र झालेला आहे अशा संधीस ही वर्दी त्याला देण्यांत आली. क्षणभर सुद्धां विचार न करतां शहानें हुकूम दिला, कीं चाकणच्या किल्ल्यावर जाऊन सर्व परदेशी लोकांना ठार मारावें. या आज्ञेनुसार दक्षिणी फौजेनें किल्ल्याला वेढा घातला. वेढल्या गेलेल्या मोंगलांनीं किल्ल्यांतील सामग्री संपेपर्यंत वेढणारांना दाद दिली नाहीं; अखेरीस जिवावर उदार होऊन किल्ल्याबाहेर पडून लढण्याचा त्यांनीं निश्चय केला. हें समजतांच दक्षिणी पुढारी घाबरून गेले. मोंगलांना माफी केलेली आहे असा बनावट हुकूम त्यांस

दाखविण्यांत आला आणि अल्लाच्या व कुराणाच्या शपथा घेऊन किल्ला सोडून बाहेर येण्याविषयीं त्यांचें मन वळविण्यांत आलें. दक्षिणी पुढाऱ्यानीं ठळक ठळक अशा पवित्र सय्यद व शूर मोंगल पुढाऱ्यांना मेजवानीला बोलावलें आणि जेवण चालू असताना त्यांची आणि छावणींतील बेसावध मोंगलांची व सुमारें बाराशें सय्यदांची कत्तल केली. दक्षिणी लोकांनीं त्यांचे तंबू लुटले, त्याच्या बायकांची विटंबना केली आणि अंगावरल्या मुलांनासुद्धां जिवंत ठेवलें नाहीं! शंकरराय व शिर्के यांना या वृत्तीच्या शत्रूंशीं लढावयाचें होतें, हें लक्षांत आणलें म्हणजे या युद्धाला बैठ्या, कोरड्या व धुवट नीतितत्त्वांचा कस लावणें अप्रस्तुत आहे, असाच निष्कर्ष निघतो.

विशाळगडच्या कत्तलीची मुसलमानांनीं एवढी धास्ती घेतली कीं यानंतर सोळा वर्षे ते या बाजूकडे फिरकलेही नाहींत. पुढें महमद-शहा बहमनी याचे कारकीर्दींत (१४६३ ते १४८२) त्याचा पेशवा महंमद गवान यानें कोंकणावर स्वारी (१४६९) केली. खेळण्याच्या पहाडी प्रदेशांत घोडेस्वारांचा इलाज चालत नाहीं असें पाहून त्यानें घोडदळ परत पाठविलें आणि फार मोठें पायदळ बरोबर घेऊन जंगलें जाळीत व तोडीत तो पुढें गेला आणि खेळण्यास वेढा घालून त्यावर हल्ले चढवीत राहिला. पांच महिने लोटले तरी किल्ला पडला नाहीं. पुढें पावसाळा सुरू झाल्यामुळें त्यानें वेढा उठविला आणि पावसाळा कोल्हापुरास काढून तो पुढील सालीं खेळण्याकडे परतला. फेरिष्ता सांगतो, जो किल्ला आजपर्यंत मुसलमानांच्या हातीं गेला नव्हता तो त्यानें युक्तिप्रयुक्तीनें व लोकांना पुष्कळ पैसा वाटून ताब्यांत घेतला; पुढील वर्षी गवानानें शंकररायाचा सर्व मुलूख सर केला आणि मलिक् उत्तुजाराचे वेळीं झालेल्या कत्तलीचा सूड घेतला. हा सूड किती भयंकर असेल याची आतां आपल्याला कल्पना करणें अशक्य नाहीं.

यानंतर सुमारें दोनशें वर्षे हा गड मुसलमानांच्या ताब्यांत होता. अफजलखानाच्या वधानंतरच्या उठावणींत शिवाजीनें खूप शर्तीनें लढून खेळण्यावर कबजा (१६५९) केला आणि त्याला विशाळगड हें नांव दिलें. मराठेशाहींतही हा गड बहुत गाजला. शिवाजीचा निकाल लावण्या-

साठीं आदिल, मोंगल, सिद्दी, सावंत, वगैरेनीं एकजूट होऊन त्याला पन्हाळयांत घेरलें. बाहेरून हल्ले चढवून वेढा उठविण्याचे मराठ्यांचे प्रयत्न फसल्यामुळें आणि पन्हाळयाचा किल्ला दिसतो तेवढा मजबूत नाहीं हें टपून बसलेल्या शत्रूंच्याही ध्यानीं आलेलें असल्यामुळें वेढ्याची अभेद्य व अफाट कोंडी फोडून बाहेर पडणें त्याला भाग होतें. या आणी-बाणीच्या प्रसंगीं तहाची हुलकावणी दाखवून एका मध्यरात्रीं फक्त दोन-तीन माणसें बरोबर घेऊन शिवाजी पन्हाळयावरून निसटला आणि चौक्या पहारे चुकवून विशाळगडाकडे रवाना झाला. हें लक्षांत येतांच शत्रूनें पाठलाग सुरू केला. विशाळगडाच्या पायथ्याशीं पांढरपाण्याच्या खिंडींत शिवप्रभूच्या रक्षणासाठीं शूर वीर बाजी प्रभु आपल्या निवडक मावळयांसह खडा राहिला. जगाच्या इतिहासांत ज्याच्या तोडीचे युद्ध प्रसंग क्वचितच आढळतात असा संग्राम या वेळीं या खिंडींत झाला. बाजी प्रभूनें आत्मार्पण केलें आणि महाराष्ट्राच्या प्राणाचें रक्षण केलें आणि बाजी प्रभु अमर झाला.

## श्री शिवछत्रपति : दुर्गराज

सह्याद्रींतील कोणत्याही किल्लयाचें दर्शन किंवा स्मरण झालें कीं लगेच श्री शिवरायाची मूर्ति मनासमोर उभी राहते आणि त्याच्या प्रतापांचा चित्रपट चित्तासमोर झळकूं लागतो; मग त्या किल्लयाला शिवाजीचा पदस्पर्श झालेला असो किंवा नसो. वास्तु व मूर्ति यांचें हें साहचर्य अत्यंत निकट आहे.

प्राचीन व मध्ययुगीन राज्यकर्त्यांना त्यांच्या सैन्याच्या वैशिष्ट्या-नुसार नरपति, हयपति, गजपति अशीं विशेषणें लावण्यांत येत असत. या दृष्टीनें शिवाजीला दुर्गपति किंवा दुर्गराज हें अभिधान यथार्थ ठरेल.

शिवाजीचा जन्म शिवनेरीवर झाला. राजकीय धामधुमीमुळें बालपणीं त्याला अनेक गडांवर वास्तव्य करावें लागलें, सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यां-तून धावपळीचें जीवन कंठावें लागलें. महाराष्ट्राचा आद्य सम्राट शालिवाहन हा बालपणीं मातीचे हत्ती, घोडे तयार करून त्यांच्या लढायांचा खेळ आपल्या सवंगड्यांसह खेळत असे; शिवाजी बालपणीं

मातीचे हत्ती, घोडे तयार करून व दगडांचे गड उभारून त्यांच्या लढायांचा खेळ आपल्या मावळी सोबत्यांसह खेळत असे. शेष नागानें अमृतसिंचन करून शालिवाहनाचें सैन्य सजीव केलें; शिवाजीनें स्वतःच स्वातंत्र्याचा मंत्रोच्चार केल्यामुळें त्याचें लुटुपुटीचें सैन्य सचैतन्य व सर्वसमर्थ झालें आणि सह्याद्रीच्या कडेकपारीं जणुं स्वयं-स्फूर्तीनें शत्रूंशीं लढूं लागल्या. शिवाजीच्या राजकीय महत्त्वाकांक्षा सह्याद्रीच्या मावळ भागांतच रुजल्या व फोंफावल्याही. त्याच्या राजकीय कर्तृत्वाचा प्रारंभ तोरण्यास झाला. मराठेशाहींत फक्त त्यानेंच अनेक गड व दुर्ग उभारले. जलदुर्ग हें तर त्याचें वैशिष्ट्य. पन्हाळ्यानंतर महाराष्ट्राची पहिली अस्सल डोंगरी राजधानी शिवाजीनेंच रायगड येथें स्थापन केली. शिवाजीला राज्याभिषेक रायगडावर झाला; शिवाजीच्या सिंहासनाची जागा रायगडावर आहे; त्यानें जें थोडेंफार कौटुंबिक जीवन उपभोगलें तें येथेंच आणि त्याचें देहावसानही रायगडावरच झालें; अर्थातच शिवाजीची समाधीही येथेंच आहे. शत्रूच्या तावडींत सांपडून त्याला काहीं काळ कैदेंत कंठावा लागला, तोही आग्र्याच्या किल्ल्यांत. स्वराज्यासाठीं जन्मभर वणवण करणाऱ्या शिवाजीला उभ्या आयुष्यांत जी थोडीबहुत विश्रांति मिळाली ती फक्त येथेंच; महापुरुषाना बंदिवास हीच विश्रांति. हिंदुस्थानांत हा एकच असा राजा होऊन गेला कीं ज्यानें दुर्गनिर्मितीसाठीं जातीनें परिश्रम केले; कीं ज्याच्या राज्यांत जास्तींत जास्त गड व दुर्ग होते. कोणीं हिशोब केलेला नाहीं, केलाच तर दिसून येईल कीं शिवाजीच्या वांट्याला जें आयुष्य आलें त्यापैकीं बहुतेक त्यानें किल्ल्यांवर किंवा किल्ल्याशीं झगडण्यांत काढलें; अर्थातच हा काळ त्यानें सह्याद्रीच्या सान्निध्यांत काढला.

शिवाजी हा मराठ्यांचा राजा; नागपुरापासून भटकलपर्यंत महा-राष्ट्राचा विस्तार आणि पुढें मराठ्यांचें साम्राज्य हिंदुस्थानच्या अर्ध्या-अधिक भागावर प्रत्यक्षपणें पसरलें; या परिस्थितीमुळें शिवाजीच्या राज्याच्या विस्ताराबद्दल अवास्तव अशा कल्पना आपल्या मनांत ठाणें देऊन राहिलेल्या असतात. शिवाजीनें आपल्या मुलखाचें स्वराज्य व मोंगलाई असे दोन भाग केलेले होते. स्वराज्य म्हणजे संपूर्णपणें

स्वतःच्या ताब्यात असलेला प्रदेश आणि मोंगलाई म्हणजे परक्यांच्या ताब्यांतील, पण खंडणी देणारा प्रदेश. मोंगलाईच्या पलीकडचीं राज्यें शिवाजीच्या दृष्टिपथांत आलेलीं नव्हतीं. शिवाजीच्या स्वराज्याचा व त्यातील किल्ल्यांचा तपशील ( सरदेसाई–शककर्ता शिवाजी. पृ. २३० ) देतों :—

| क्र. | प्रादेशिक तपशील | | किल्ल्यांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | वडिलोपार्जित जहागीर : | पुणें जिल्ह्याचा मध्य भाग. | |
| २ | मावळ प्रांत : | ,, ,, पश्चिम भाग व भोरचा प्रदेश. | १८ |
| ३ | वाई प्रांत : | सातारा जि. पश्चिम भाग. | १५ |
| ४ | पन्हाळा प्रांत : | कोल्हापूर जि. पश्चिम भाग. | १३ |
| ५ | दक्षिण कोंकण : | रत्नागिरी जिल्हा. | ५८ |
| ६ | उत्तर कोंकण : | ठाणें जिल्हा व सुरत जिल्ह्याचा दक्षिण भाग. | १२ |
| ७ | बागलाण प्रांत : | नाशिक जि. पश्चिम भाग. | ६२ |
| ८ | कर्नाटक प्रांत : | कृष्णेच्या दक्षिण तीरावरील प्रदेश. | १८ |
| ९ | वनगड प्रांत : | धारवाड जि. दक्षिण भाग. | २२ |
| १० | बेदनूर प्रांत : | म्हैसूरचा ईशान्य भाग. | १८ |
| ११ | वेल्लोर प्रांत : | अर्काट जिल्हा. | २५ |
| १२ | तंजावर प्रांत : | कावेरी दुआबाचा प्रदेश. | ६ |
| | | | २६७ |
| | पैकीं कर्नाटकांतील (क्र. ८ व ९) चाळीस आणि तेलंगणांतील (क्र. १०, ११ व १२) एकुण पन्नास, मिळून एकुणनव्वद वजा जातां महाराष्ट्रांतील शिवाजीचे किल्ले : | | १७८ |

वेगवेगळ्या बखरकारांनीं व इतिहासकारांनीं शिवाजीच्या ताब्यांतल्या किल्ल्यांच्या याद्या व संख्या दिलेल्या आहेत. त्यांमध्यें एकवाक्यता नाहीं. वरील यादींत अशा किल्ल्याची संख्या २६७ दिलेली आहे. शिवदिग्विजयांत सांगितलें आहे कीं "नवे जुने तीनशें साठ किल्ले हजरतीस आहेत." विश्वकोशांत तर या किल्ल्यांची संख्या सव्वीसशें दिलेली आहे. एकवाक्यतेच्या अभावाचें कारण हें कीं कोणीं फक्त मुख्य गडाची गणना केलेली आहे, तर कोणी अगदीं क्षुद्र अशा गढ्याचीही मोजदाद केलेली आहे. वरील तक्त्यावरून दिसून येईल कीं शिवाजीचें महाराष्ट्रांतील राज्य मुख्यत्वेंकरून घाटमाथा व कोंकणपट्टी या भागापुरतें मर्यादित असें होतें. पश्चिम किनाऱ्यावरलीं अनेक ठाणीं परक्यांच्या कबजांत होतीं. वसई, चौल व गोवें हीं ठाणीं पोर्तुगीजांच्या ताब्यांत होतीं; मुंबई बेट इंग्रजांच्या हातीं होतें आणि जंजिऱ्यावर सिद्दीचें राज्य होतें. शिवाजीच्या या छोटेखानी राज्याची पूर्व सरहद्द चंचल होती. साल्हेर व चांदवड यांसारखीं तुटक ठाणीं त्याच्या कबजांत होतीं. सरहद्दीनजीकचीं कांहीं ठाणीं आज शिवाजीच्या तर उद्यां मोंगलांच्या कबजांत जात येत होतीं. शिवाजीनें अनेक वेळां जुन्नरची लूट केली व शिवनेरीवर हल्ले चढविले, पण हीं ठाणीं कांहीं त्याच्या हातीं आलीं नाहींत.

शंकर हा सह्याद्रीचा स्वामी. शिंगणापूरचा शंभुमहादेव हें भोंसल्याचें कुलदैवत. यात्रेकरूंच्या सोयीसाठीं मालोजीनें येथें मोठा तलाव बांधला. तुळजापूरची भवानी ही भोंसल्यांची कुलस्वामिनी. तिच्या कृपाप्रसादामुळें मालोजीला माहात्म्य प्राप्त झालें. तुळजापुराला भवानीच्या दर्शनाला वारंवार जाणें शक्य नसल्यामुळें शिवाजीनें भवानीची स्थापना प्रतापगडावर केली. शहाजी व शिवाजी यांच्या संभवाबाबतच्या आख्यायिकांमध्यें केवढा फरक आहे, पहा: मालोजीला बरेच दिवस संतति होत नव्हती म्हणून दीपाबाईनें नगरच्या शहाशरीफ या मुसलमान फकीराला नवस केला व त्याच्या कृपेमुळें प्राप्त झालेल्या पुत्रांचीं नांवें मालोजीनें शहाजी व शरीफजी अशीं ठेवलीं. शिवनेरीच्या शिवाईच्या कृपाप्रसादामुळें शिवाजी जन्माला आला. शहाजी व शिवाजी यांच्या

कर्तृत्वाची सांगता या आख्यायिकाच्या अनुरोधानें लावतां येते. शिवाई, भवानी व पार्वती या एकच. गिरिजा, गिरिकन्या, गिरिवासिनी. महाराष्ट्रांतल्या निरनिराळ्या किल्ल्यावर भवानी वेगवेगळ्या नांवानीं विराजत आहे. शंकर हा पुरुष आणि पार्वती ही प्रकृति. शिवाजीला भवानी प्रसन्न होती आणि परशुरामही. परशुराम हा अपरान्ताचा स्वामी. अपरान्त हेंच शिवाजीचें राज्यक्षेत्र. शिवाजी हें जाणून होता. राज्याभिषेकाच्या पूर्वी शिवाजीने प्रथम चिपळूणास जाऊन परशुरामाचें दर्शन घेतलें; मग प्रतापगडावर जाऊन तुळजाभवानीचें दर्शन घेतलें; नंतर रायगडावर राज्याभिषेक-समारंभ झाला. शंकराप्रमाणेंच भवानी व परशुराम यांचीं स्थानेंही सह्याद्रीच्या सुळक्यांवरच आहेत..

शिवाजीनें स्वराज्यस्थापनेचा उद्योग सह्याद्रीच्या सहकार्यानेंच सुरू केला. संकटसमयीं सह्याद्रीनेंच शिवाजीचें संरक्षण केलें. सह्याद्रि हा स्वातंत्र्याचा व स्वराज्याचा मूलाधार आहे याची शिवाजीला जाणीव होती. सह्याद्रीबद्दल शिवाजी काय म्हणतो तें पहा: "आमच्या या कठीण प्रदेशांत नुसता कल्पनेचा घोडा सुद्धां नाचविणें कठीण आहे. आमचा प्रदेश अवघड व डोंगराळ आहे. त्यांतून नदीनाले उतरून जाण्यास वाट नाहीं." कल्याणी व बेदरचे मैदानी किल्ले काबीज केल्यामुळें उन्मत्त झालेल्या व महाराष्ट्रावर सर्वांतक स्वारी करावयास सज्ज झालेल्या मोंगली सेनापतींच्या उद्योगाला अनुलक्षून हे उद्गार शिवाजीनें काढलेले आहेत, हें लक्षांत घेतलें म्हणजे सह्याद्रीबद्दल त्याला किती विश्वास वाटत होता हें दिसून येतें; आणि हा विश्वास कोरडा नव्हता. सह्याद्रीचा कानाकोपरा शिवाजीला अवगत होता. हा प्रदेश त्यानें अक्षरशः पादाक्रांत केलेला होता. म्हणूनच त्याच्या मोहिमा व त्याचें राजकारण, हीं वेळोवेळीं यशस्वी झालीं. डांगणांतील खिंडींची माहिती होती, म्हणूनच एकाएकीं गणदेवीवर उतरून त्याला सुरतेची लूट करतां आली आणि पाठलाग करणाऱ्या सैन्याला चकवून औंधा व पट्टा या किल्ल्यांवरून ही लूट त्याला रायगडावर पोंचवितां आली. प्रतापगडाजवळ शिवाजीनें अफझुलखानाचा कोथळा काढला व त्याच्या सैन्याची दाणादाण केली; पन्हाळ्याला वेढा पडलेला असतांना त्यानें

सिद्दी जौहर सलाबतखानाच्या हातावर तुरी दिल्या; विशाळगडा-नजीक बाजी प्रभूच्या नेतृत्वाखालीं मावळयांच्या छोट्या टोळीनें अफाट सेनासागराच्या प्रचण्ड वादळी लाटा थोपवून धरल्या. हीं अलौकिक कृत्यें यशस्वी झालीं याचें कारण सह्याद्रि, सह्याद्रीवरील गडकोट व सह्याद्रीचे सुपुत्र. हे सुपुत्र म्हणजे नाणावलेल्या घराण्यांतले व वतनासाठीं झगडणारे नामवंत मराठे नव्हेत, तर मावळांतले व कोंकणांतले अज्ञात शेतकरी. मावळे व हेटकरी यांच्याबद्दलची शिवाजीची आस्था व्यक्त होणारी आज्ञा पहा: " मोंगलाई राज्यांत बिकट जागा सह्याद्रीची ओळ, या मुलखांतील लोक माहितगार; पावसांत डोंगरावर चढणें, झाडींत चढणें, त्यास मावळे व कोकणे यांवांचून घडणें नाहीं. हेच आधीं ठेवावे. " शिवाजीनें निवडलेल्या या जमातींनीं वेळोवेळीं जें अतुल शौर्य व दुर्दम्य स्वातंत्र्यभक्ति व्यक्त केली त्याचेंही आदिकरण सह्याद्रि.

मध्ययुगीन सम्राटांनीं, त्यांच्या सामन्तांनीं व स्थानिक राज्यकर्त्यांनीं जागोजाग अनेक लहानमोठे गड उभारले होते; स्वकीयांनीं व परकीयांनींही; गिरिशिखरांवर आणि पठारावर. सामन्तांना सम्राटांनीं हतप्रभ केलें आणि सम्राटांना परकी आक्रमकांनीं व त्यांच्या हस्तकांनीं. ह्या सत्तासंक्रमणामुळें कांहीं गड परान्नपुष्ट व बलिष्ठ झाले होते, कांहीं लुळेपांगळे झाले होते आणि कांहीं निर्जीव होऊन पडले होते. इस्लामी आक्रमकांनीं दक्षिणेंत स्थिर झाल्यानंतर व स्थिर होण्यासाठीं यांपैकीं कांहीं विशेष महत्त्वाच्या लढाऊ किल्ल्यांची डागडुजी, मजबुती केली आणि निवडक मोक्याच्या ठिकाणीं कांहीं नवे किल्ले उभारले. जणुं शिवाजीच्या सोयीसाठीं जागोजाग किल्ले बांधून ठेवण्याची त्यांना सह्याद्रीनें आगाऊ प्रेरणा दिली होती! स्वराज्यस्थापनेचें ध्येय निश्चित झाल्यानंतर शिवाजीची नजर साहजिकपणें सह्याद्रींतील गडांकडे वळली. महाराष्ट्रांतील किल्ले ह्या स्वराज्याच्या किल्ल्या आहेत हें त्यानें जाणलें. आतां जे पारतंत्र्याचे आधारस्तंभ आहेत ते हस्तगत करून घेतले असतां त्यांवरच स्वातंत्र्याचें मंदिर उभारतां येईल, हें ओळखून त्यानें कार्यक्रमाची आंखणी केली. साहसी प्रवाशांनीं व संशोधकांनीं नवा प्रदेश शोधून काढला कीं त्यावरील मोक्याच्या जागीं खुंट्या ठोकून

किंवा निशाणें रोंवून त्यावरील आपला वैयक्तिक किंवा आपल्या राष्ट्राचा कबजा जाहीर व प्रस्थापित करावयाची प्रथा विशेषतः गेल्या शतकांत आफ्रिका, अमेरिका, वगैरे नव्या खण्डांत पाश्चिमात्यांकडून अवलंबिली गेली. शिवाजीनें सतराव्या शतकांत याच पद्धतीचा पुरस्कार केला होता. सह्याद्रींतील अनेक किल्ले काबीज किंवा स्वाधीन करून घेऊन शिवाजीनें त्यांवर मराठी झेंडे फडकावले. सिंहगड हा मावळांचा अधिपति व भोंसल्यांच्या जहागिरीचा नैसर्गिक स्वामी. दादोजी कोंडदेवानें शिवाजीच्या नांवानें चढाई करून सिंहगड काबीज केला व भावी स्वराज्याची मुहूर्तमेढ रोंवली. हा किल्ला काबीज झाला न झाला तोंच शिवाजीनें तोरण्याच्या किल्लेदाराशीं संधान बांधून तोही हस्तगत केला आणि आगामी स्वराज्याचें तोरण बांधलें.

सिंहगड व तोरणा यांचा कबजा ही शिवाजीच्या आयुष्यांतली पहिली अलौकिक घटना. हा वेळपर्यंतचे शिवाजीचे उद्योग आडदांड मराठा तरुणाला साजेसे असेच होते. जाणतीं माणसें त्याच्या वृत्तीला उच्छृंखल म्हणत. मुसलमानी दरबारी राजकारणांत मुरलेलीं माणसें भविष्य वर्तवीत कीं हा बापदादांनीं कमावलेली जहागीर बुडविणार, इतकेंच नव्हे तर महाराष्ट्रावर शाही इतराजीचें संकट ओढवून घेणार. त्यांचीं भविष्यें तत्कालीन परिस्थितीवर व व्यवहाराच्या गतीवर आधारलेलीं होतीं. शिवाजीच्या उद्योगाला कांहीं उद्दिष्ट असणें शक्य आहे असें त्यांच्या स्वप्नींही येणें अशक्य होतें. पण तोरण्याला आणखी एक अलौकिक घटना घडली. तोरण्याची तटबंदी दुरुस्त करीत असतांना शिवाजीला मौल्यवान् भूमिगत द्रव्यसंचय सांपडला. भूमिगत द्रव्यप्राप्तीचें भोंसल्यांना जणुं वरदानच होतें असें दिसतें. जाधवरावांच्या तोलाची संपत्ति संग्रहीं नसल्यामुळें शहाजीचें लग्न अडलें तेव्हां भवानीनें दृष्टांत देऊन मालोजीला वेरूळच्या वारुळांतील द्रव्यसंचय दाखविला. यानंतर लवकरच निजाम दरबारनें मालोजीला पुणें व सुपें हे परगणे आणि शिवनेर व चाकण हे किल्ले जहागीर दिले, पंचहजारी मनसब व राजे हा किताब दिला आणि भोंसल्यांच्या उत्कर्षाचा पाया घातला.

तोरणा व कल्याण येथें कोट बांधतांना शिवाजीला अपरंपार धन मिळालें. प्रधानगड (प्रवाळगड, प्रबळगड?) सर झाल्यावर महाराज वर चढून जात असतां मार्गी "बोरीची कांटी पालखीस लागली, तेव्हां महाराज बोलले, काय निमित्त कांटी अटकावते. खालीं खणावें. खणल्यावर बावीस घागरी व चार कढया मोहरा, होन, सोन्याच्या कांबींनीं भरलेल्या सांपडल्या." अचानक व भूमिगत द्रव्यलाभ हा महालक्ष्मीचा प्रसाद, अशी सर्वसाधारण समजूत असल्यामुळें तेवढ्या-वरूनच भोंवतालच्या भोळ्या लोकांना वाटलें कीं हा अवतारी पुरुष आहे, आणि त्याचे आदेश आपण मानले पाहिजेत.

तोरण्याला मिळालेल्या द्रव्याचा व्यय शिवाजीनें राजगड (१६४५) उभारण्यांत केला. यावरून दिसतें कीं या वेळींच त्यानें आपल्या जीवनाचें उद्दिष्ट निश्चित केलेलें होतें. गुजरातपासून कर्नाटकापर्यंत परराज्यांत लुटालूट करून व सुलतानांच्या छावण्यांवर छापे घालून शिवाजीनें अपरंपार द्रव्य संपादन केलें. या ना त्या मार्गानें मिळविला तो बहुतेक पैका त्यानें किल्ल्यांच्या डागडुजींत व उभारणींत खर्च केला. संपत्ति संपादन कशी करावयाची व संपादित संपत्ति कोठें गुंतविली असतां विशेष फलप्रद होईल, हें यशस्वी संपादक धनीच निश्चित करूं शकतो. शिवाजीच्या उद्योगाचें उद्दिष्ट त्याच्या सहकाऱ्यांच्याही नीटसें लक्षांत आलेलें नव्हतें; मग ते त्याच्या दप्तरांतील कारकुनांना कसें उमगणार? किल्ल्यासाठीं पैका बहुत खर्च होतो असा फडाणिसांनीं अर्ज केला असतां शिवाजी म्हणाला, "जैसा कुळंबी शेतास माळा घालून शेत राखतो, तसे किल्ले राज्यास रक्षण आहेत ... राज्यास बळकटी किल्ल्यांची आहे ... आपणांस धर्मस्थापना व राज्यसंपादन करणें; शत्रुप्रवेश न होय, तें किल्ल्यांमुळें होतें. दिल्लींद्रासारखा शत्रु उरावर आहे. तो आला तरी नवेजुने तीनशेसाठ किल्ले हजरतीस आहेत. एक एक किल्ला वर्ष वर्ष लढला तरी तीनशें साठ वर्षें पाहिजेत." शिवाजीची एवढी तयारी होती व त्याची एवढी उभारी होती. एक एक किल्ला एक एक वर्ष लढूं शकत नाहीं आणि व्यवहारांत असा हिशोब चुकतो, याचा प्रत्यय शिवाजीला त्याच्या हयातींतच आला;

मात्र त्यानें केलेल्या तयारीचा खरा उपयोग महाराष्ट्राला राजारामाच्या कारकीर्दीत झाला. एक एक किल्ला पडत राहिला तरी हातीं आहे तो एक एक किल्ला लढवीत रहावयाचें, हें निर्वाणीचें धोरण महाराष्ट्रांत शिवाजीनेंच प्रथम आंखलें व परिस्थित्यनुसार शक्य तेवढें यशस्वी केलें. शिवाजीनंतरही गडांविषयीं मराठ्यांची भावना अशीच होती. रामचंद्र नीलकंठ अमात्य आपल्या विख्यात आज्ञापत्रांत सांगतात : "संपूर्ण राज्याचें सार तें दुर्ग. दुर्ग नसतां मोकळा देश परचक्र येतांच निराश्रय, प्रजाभग्न होऊन उध्वस्त होतो ... गडकोट हेंच राज्य ; गडकोट म्हणजे राज्याचें मूळ, गडकोट म्हणजे खजिना, गडकोट म्हणजे सैन्याचें बळ, गडकोट म्हणजे राज्यलक्ष्मी, गडकोट म्हणजे आपलीं वसतिस्थळें, गडकोट म्हणजे सुखनिद्रागार, गडकोट म्हणजे प्राण-संरक्षण." शिवाजीच्या उद्योगाच्या बैठकीविषयीं अमात्यांनीं यथायोग्य निष्कर्ष काढलेला आहे. ते सांगतात : "हें राज्य तर तीर्थरूप थोरले कैलासस्वामी यांनीं गडांवरूनच निर्माण केलें, जो जो देश स्वशासन-वश न होय त्या त्या देशीं स्थलविशेष पाहून गड बांधिले ; त्यावरून आक्रमण करीत करीत सालेरी अहिवंतापासून कावेरी तीरापर्यंत निष्कंटक राज्य संपादिलें."

मोऱ्यांच्या कबजांतील रायरीचा मजबूत किल्ला सर केल्यानंतर जावळीच्या आसमंतांतील प्रदेशाच्या बंदोबस्तासाठीं घाटमाथ्याच्या पश्चिम कडेवर, पार घाटाच्या नाक्यावर, मोक्याची जागा निवडून शिवाजीनें प्रतापगड ( १६५६ ) उभारला. शिवाजीनें हा गड उभारण्याची आज्ञा दिली त्या वेळीं या परिसरांत लवकरच केवढी रणधुमाळी उडणार आहे व भवानीला केवढा मोठा बळी मिळणार आहे याची खुद्द शिवाजीला स्वप्नांतही कल्पना आली नसेल! जंजिऱ्याच्या सिद्दीच्या ताब्यांतील तळें व घोसाळे हे किल्ले काबीज केल्यानंतर या प्रांताच्या बंदोबस्तासाठीं त्याच्या अंतर्भागांत शिवाजीनें बिरवाडीस किल्ला ( १६५८ ) बांधला. दापोलीजवळ पालगड व मण्डणगड आणि शृंगारपुराजवळ प्रचीतगड हे किल्ले यानंतर लवकर उभारण्यांत ( १६६१ ) आले. समुद्रकिनाऱ्यावर शिवाजीनें विजयदुर्ग ( १६५३ ),

पद्मगड उर्फ कांसें ( १६६१ ), सिंधुदुर्ग ( १६६४ ), खांदेरी ( १६७८ ), अलीबाग ( १६७९ ) व उंदेरी ( १६८० ) हे जलदुर्ग बांधले. वेलोर-भोंवतालच्या प्रदेशाच्या संरक्षणासाठीं त्यानें साजरागोजरा ही किल्ल्यांची जोडी ( १६७८ ) उठविली. शिवाजीनें उभारलेल्या गडांची ही यादी पुरी नाहीं. तरी या तपशिलावरून अनेक निष्कर्ष काढतां येतात. कालमानानें पाहिलें असतां दिसतें कीं त्याचा हा उद्योग आयुष्याच्या अखेरीपर्यंत चालू होता. सह्याद्रींत होते त्या मानानें फारसे किल्ले शिवाजीनें उभारले नाहींत; आणि जे उभारले ते मुख्यत्वेंकरून कोंकणांत व समुद्रकिनाऱ्यालगत. लुटालूट करून मिळविलेली संपत्ति त्यानें बहुंशीं किल्ल्याच्या उभारणींत खर्च केली, हें खरें असलें तरी मध्ययुगीन राज्यकर्त्यांनीं उभारलेल्या प्रचण्ड गडांशीं शिवाजीच्या किल्ल्यांची तुलना केली असतां दिसून येतें कीं त्यांच्या मानानें याचीं बांधकामें अगदीं किरकोळ स्वरूपाचीं आहेत. कारण त्यांच्याएवढी संपत्ति याच्यापाशीं केव्हांही नव्हती; शिवाय चुन्या-दगडांशीं खेळत बसण्याइतकें स्वास्थ्यही याला कधीं लाधलें नाहीं. किल्ला बांधून पुरा झाला न झाला तोंच त्यावरून तोफा धडाडूं लागाव्या, एवढ्या निकडीचींच कामें त्यानें हातीं घेतलीं. स्वराज्याच्या धारणेसाठीं जरूर तेवढे किल्ले घाटमाथ्यावर व लगतच्या प्रदेशांत होतेच; शिवाजीनें त्यांची फक्त डागडुजी व मजबुती केली. वरील तपशिलावरून असेंही दिसून येतें कीं शिवाजीनें दुर्गनिर्मितीचा उद्योग मुख्यत्वेंकरून कोंकणपट्टींत केला. यावरून स्पष्ट होतें कीं दुर्गनिर्मितीच्या बाबतींत शिवाजीच्या दृष्टीसमोर कांहीं निश्चित योजना असली पाहिजे आणि ती त्यानें तत्कालीन परिस्थितीच्या अनुरोधानें आंखलेली असली पाहिजे.

घाटमाथ्यावर असलेले असंख्य नवेजुने किल्ले लढवून आपण आपल्या राज्याच्या पूर्व सीमेचें संरक्षण करूं शकूं असा शिवाजीला भरंवसा वाटत होता. या भागांत कमतरता किल्ल्याची नव्हती, निष्ठेचें दौर्बल्य होतें. या भागांतले वतनदार मातबर मराठे स्वार्थाच्या व इभ्रतीच्या भरीनें कधीं इस्लामी शाह्यांच्या वतीनें लढत, तर कधीं शिवाजीला सामील होऊन त्यांच्यावर शस्त्र उपशीत. एका घराण्याची एक

शाखा शिवाजीच्या बाजूची असे तर दुसरी मोंगलांच्या बाजची. शिवाय पूर्व सरहद्दीपलीकडे विस्तीर्ण इस्लामी राज्यें होतीं आणि उत्तर हिंदुस्थानी फौजांच्या आक्रमणाला महाराष्ट्राचें पठार मोकळें होतें. म्हणूनच शिवाजीनें आपलें राज्य सह्याद्रीच्या आश्रयानें कोंकणपट्टींत स्थिर करण्याचें निश्चित केलें असलें पाहिजे. शिवाय या भागांत वतनदारीचा एवढा बुजबुजाट झालेला नव्हता. कोंकणपट्टीच्या उत्तरेस इंग्रज, मध्यभागीं हबशी व दक्षिणेस पोर्तुगीज या महाराष्ट्राच्या नव्या शत्रूंच्या हालचाली उग्र स्वरूप धारण करूं लागल्या होत्या. त्यांचें उच्चाटन केल्या-वांचून स्वराज्य निष्कंटक होणार नाहीं अशी त्याची खात्री झालेली होती. पन्हाळयाच्या वेढ्याचे वेळीं राजापूर येथील इंग्रजांच्या वखारी-वरील प्रमुख अधिकाऱ्यानें सिद्दी जौहरला तोफा, दारूगोळा व गोलं-दाज पुरविले होते; एवढेंच नव्हे, ही टोळी या वेळीं इंग्रजी निशाण फडकावून शिवाजीशीं लढली होती! इंग्रजांना हिंदुस्थानांत व्यापारी सवलती प्रथम मुसलमानांकडून मिळालेल्या असल्यामुळें मुसलमानांचे शत्रु ते आपले शत्रु असेंच ते मानीत असत. राजापूरच्या वखारवाल्यांना शिवाजीनें पुढें प्रायश्चित्त दिलें. एवढें मात्र खरें कीं इंग्रजांनीं कोंकणपट्टींतल्या रयतेवर कधीं जुलूम केला नाहीं. हबशी व फिरंगी यांनीं कोंकणच्या लोकांचे अनन्वित हाल केले. जंजिऱ्याचा सिद्दी हा तर महाराष्ट्राच्या कुशींत सलणारा विषारी कांटा. सिद्दी हे निजामशाहीचे हस्तक. जयसिंहानें शिवाजीवर स्वारी केली तेव्हां सिद्दी मोंगलांचे आरमारी सरदार बनले व दिल्लीच्या नांवानें मराठ्यांशीं लढूं लागले. जंजिऱ्याकडे आपणांस पुन्हा यावयाचें आहे म्हणून आतांच तपशिलांत शिरत नाहीं. एवढेंच सांगतों कीं जंजिऱ्याचा कबजा ही शिवाजीच्या आकांक्षांपैकीं एकच एक, अखेरपर्यंत अतृप्त राहिली. पोर्तुगीज दर्यावर्दी आपल्या आरमाराच्या बळावर सुरतेपासून कारवारपर्यंत किनाऱ्यालगतच्या मराठी मुलखांत एकदम कोठेंही झडप घालीत आणि लुटालूट, जाळपोळ व बाटवाबाटवी करून दुबळ्या रयतेला मदत येण्यापूर्वींच आपल्या वसई व गोंवें या बंदिस्त ठाण्यांत निसटून जाऊं शकत. महाराष्ट्राच्या या तीन आरमारी शत्रूंना कह्यांत आणण्याची

प्राथमिक योजना व जिंकण्याची पूर्वतयारी म्हणून शिवाजीनें कोंकण-पट्टींत व समुद्रकिनाऱ्यालगत किल्ले व जंजिरे उभारले असले पाहिजेत, हें स्पष्ट दिसतें. यासाठींच त्यानें कोंकणपट्टींत नवीं व्यापारी बंदरें सज्ज केलीं आणि स्वयंपूर्ण मराठी आरमार सिद्ध केलें.

मालवण हें शिवाजीनें स्थापन केलेलें पहिलें व्यापारी बंदर; आणि त्यानें उभारलेल्यांपैकीं नांव घेण्याजोगा जंजिरा सिंधुदुर्ग. जंजिरा काबीज करण्याचे बाबतींत हताश झाल्यानंतर त्यानें मालवण बंदराची व सिंधुदुर्गाची योजना आंखली. समुद्रकांठीं शिवाजीला 'अधिकोत्तर' स्थळ हवें होतें. तें त्यास मालवणास सांपडलें. हें स्थळ पाहतां "चौऱ्यांशीं बंदरीं ऐसा जागा नाहीं" असें त्याला वाटलें. पद्मगड, राजकोट, सर्जेकोट व सिंधुदुर्ग हे चार किल्ले मालवण बंदराच्या रक्षणासाठीं उभारलेले आहेत. सुरत व हुबळी येथील समृद्ध पेठा लुटून आणलेली अमूप संपत्ति शिवाजीनें सिंधुदुर्गावर खर्च केली. या दुर्गाचे बाबतींत शिवाजीचा उत्साह इतका होता कीं त्यानें किल्ला बांधण्यास मुहूर्त करून स्वहस्तें चिरा बसविला; इतकेंच नव्हे, बांधकाम झटपट व्हावें म्हणून स्वहस्तें सामानसुमान वाहिलें. किनाऱ्यापासून सुमारें एका मैला-वरील खडकावर हा जलदुर्ग उभारलेला आहे. "मार्ग कठीण सर्पाकार, तरांडी होडी मात्र चालतें. सभोंवते सारे खडक. दुसरीं तरांडी तीन कोशपर्यंत यावयास अगदीं गति नाहीं." अशा ठिकाणीं "पांच खंडी शिसें आणून जंजिरेचा पाया शोधून घातला." निवडक हुन्नरवंत कारागीर कामाला लावले. सिंधुदुर्गाच्या तटबंदीचा घेर सुमारें दोन मैलांचा आहे. तटाची उंची सुमारें तीस फूट व रुंदी बारा फूट आहे. तटबंदीला बेचाळीस बुरूज आहेत. बखरींतील सिंधुदुर्गाबद्दलचे उल्लेख पाहिले म्हणजे अंतःकरण भरून येतें. चित्रगुप्त सांगतात: "चौऱ्यांशीं बंदरांत हा जंजिरा मोठा. अठरा टोपीकरांचे उरावर शिवलंका अजिंक्य जागा निर्माण केला. सिंधुदुर्ग जंजिरा, जगीं अस्मानी तारा, जैसें मंदिराचें मंडन श्रीतुलसीवृंदावन, राज्याचा भूषणप्रद अलंकार, चतुर्दश महारत्नांपैकींच पंधरावें रत्न महाराजांस प्राप्त झालें. जंजिरा मुस्तेद करावयासाठीं कोटि होनांचें उदक महाराजांनीं सोडिलें. धोंड्यांत

शिसेबंदी आरपार घालून पक्कें काम पाण्यास भीति न खाय असें बांधलें. बांधावयासी सारी युक्ति महाराजांनीं सांगितली." सिंधुदुर्ग हें महाराजांचें हृदयकमल. सिंधुदुर्गावर शिवाजीचें मंदिर आहे. त्यांत शिवाजीची मूर्ति काळया पाषाणाची आहे. हें मंदिर राजारामानें उभारलें. कोटाजवळ शिवाजीचा पंजा कोरलेला आहे आणि पादुकाही आहेत. मालवण व सिंधुदुर्ग येथें शिवाजीनें केलेल्या योजना पाहून नेर्न साहेबानें तर्क केला आहे कीं सर्व बाजूंनीं माघार घ्यावी लागली तर अखेरचें आश्रयस्थान म्हणून शिवाजीनें सिंधुदुर्गाची उभारणी केलेली असावी. शक्य आहे. अखेरचें आश्रयस्थान व निर्वाणीचें संग्रामस्थान !

रायगड ही शिवरायाची अधिकृत राजधानी. शिवाजीनें स्वतःच्या राजधानीसाठीं म्हणून प्रथम राजगड उभारला. प्रतापगड हा शिवाजीचा आवडता गड. येथें त्यानें आपल्या कुलदेवतेची स्थापना केली. यावरून येथें स्थायिक होण्याचा त्याचा विचार होता, असें वाटतें. पन्हाळा ही आदिलशाहीची पश्चिमेकडील दुय्यम राजधानी. येथेंही राजधानी स्थापन करण्याचा विचार कांहीं काळपर्यंत त्याच्या मनांत घोळत होता. आयुष्याच्या उत्तरार्धांत हीं ठाणीं सोडून शिवाजीनें रायगडावरच राजधानी कां स्थापन केली ?

शहाजीची जहागीर भीमथडींत होती आणि शिवाजीचें वास्तव्य पुण्यास होतें. या वेळीं स्वराज्याच्या कांहीं प्राथमिक योजना आंखून शिवाजीनें राजगड उभारला. शिवाजीच्या महत्त्वाकांक्षेचें क्षेत्र मर्यादित होतें तोंवर त्याची राजधानी राजगडावर असावी हें युक्त होतें. कोंडाणा, तोरणा, कंगोरी व रोहिडा या गडांच्या चौकटींत असलेली ही राजधानी मावळाच्या सामन्ताच्या सोयीची होती, प्रबल शत्रूंनीं वेढलेल्या महाराष्ट्राच्या सम्राटाला साजेशी नव्हती. राजगड उत्तुंग (४६१४′) आहे आणि रायगड (२८२९′) विस्तीर्ण (पूर्व-पश्चिम लांबी दीड मैल व दक्षिण-उत्तर रुंदी १ मैल) आहे. राजगड हा शिवाजीच्या महत्त्वाकांक्षेची उंची दर्शवितो आणि रायगड हा तिचा विस्तार. राजगड घाटमाथ्याच्या तोंडाशीं रहदारीच्या खोऱ्याच्या कडेवर आहे आणि मैदानी आक्रमणाच्या आटोक्यांत आहे.

प्रतापगडच्या पश्चिमेकडील व उत्तरेकडील बाजू म्हणजे प्रचण्ड कडेच आहेत; यामुळें आणि भोंवतालच्या दुर्लंघ्य पर्वतश्रेणी व अगम्य जंगल यामुळें हा किल्ला अजिंक्य व अभेद्य समजला जात असे. सह्याद्रीच्या बालाघाट व महादेव या श्रेणींच्या नाक्यावर हा गड उभारलेला आहे. देशावरील आदिलशाही ठाण्यांवर जरब ठेवण्याइतका तो पठाराच्या नजीक असला तरी तो मैदानी सत्तांच्या आक्रमणापासून सुरक्षित नाहीं हें शिवाजीला दिसून आल्यामुळें येथें स्थायिक होण्याचा विचार त्यानें रद्द केला असावा. पन्हाळ्याचा पुरातन गड दिसतो तेवढा मजबूत नाहीं हेंही शिवाजीच्या निदर्शनास आलेलें होतें. सभासद सांगतात: शहाजी व शिवाजी या उभयतांनीं दक्षिणेंतील डोंगर तपासले (१६६२) व रायरी हा "गड बहुत चखोट, चौतर्फा गडाचे कडे तासल्याप्रमाणें, दीड गांव उंच, पर्जन्यकाळीं कडियावर गवत उगवत नाहीं आणि धोंडा तासीव एकच आहे, असें देखोन बहुत संतुष्ट जाले आणि बोलले, तक्ता जागा गड हाच करावा." डोंगरी हालचालींत तरबेज व गनीमी डावपेंचांत पटाईत अशा या पितापुत्रांनीं भौगोलिक परिस्थिति लक्षांत घेऊन आणि राजकीय घटना जमेस धरून मोठ्या दूरदृष्टीनें राजधानीसाठीं रायगडाची निवड केली, ती सर्वतोपरि यथायोग्य अशीच होती. रायगड मैदानी आक्रमकांच्या टप्प्याच्या पलीकडे, सह्याद्रीच्या आडोशाला, संचारशून्य प्रदेशांत, अगदीं एकाकी अशा पहाडावर उभारलेला आहे. गरुडाच्या घरट्यासारखा. गरुड आपलें घरटें पर्वताच्या सुळक्यावर, अगम्य कपारींत बांधतो, असें जाणते सागतात. शिवनेरीवर जन्मलेल्या वैनतेयानें आपल्या घरट्या-साठीं योग्य स्थानाची निवड केली यांत संशय नाहीं. रायगड हा सह्यांद्रीच्या एका प्रचंड चौथऱ्यावर उभारलेला आहे. त्याचें यथार्थ दर्शन जवळून अगर आसपासच्या डोंगरावरून होऊं शकत नाहीं. रायगडाचें अनेक बाजूंनीं दर्शन घेऊन आलेले सांगतात कीं त्याच्या नैसर्गिक माडणीची व मजबुतीची कल्पना फक्त तोरण्यावरून होऊं शकते. शक्य आहे कीं शिवाजीनें तोरणा सर केला तेव्हांपासून त्याची रायरीवर नजर असेल. रायगडाची मांडणी इतकी अजिंक्य व

उभारणी इतकी भक्कम आहे कीं अनेक इंग्रजी लष्करी अधिकाऱ्यांनीं रायगडाला "पूर्वेकडील जिब्राल्टर" अशी संज्ञा दिलेली आहे. महाराष्ट्राचे नवेजुने शत्रु आपल्या टप्प्यांत राहतील, पण आपण त्यांच्या आक्रमणापासून सुरक्षित राहूं, अशा ठिकाणीं, तत्कालीन स्वराज्याच्या मध्यभागीं, शिवाजीनें आपली राजधानी प्रस्थापित केली. पोर्तुगीज व इंग्रज यांच्या संसर्गामुळें तत्कालीन संग्रामांत तोफांचा उपयोग मोठया प्रमाणावर होऊं लागला होता. रायगडाच्या परिसरांत मात्र अवजड तोफखान्याच्या कार्यक्षम हालचाली जवळजवळ अशक्य आहेत आणि रायगडाच्या चौथऱ्यावर तत्कालीन तोफखान्याच्या भडिमाराचा परिणाम होणें अशक्यप्राय होतें. भोंवतालच्या किल्ल्यांमुळें मिळणाऱ्या संरक्षणाच्या दृष्टीनें पाहिलें असतां रायगड, प्रतापगड व पन्हाळा यांपेक्षां रायगड अनेक पटींनीं मजबूत आहे. शिवाय सावित्री, कुण्डलिका व अम्बा या नजीकच्या नद्या, कांठांवर बंदरें असलेल्या खाड्यांमार्फत पश्चिम समुद्राला मिळत असल्यानें दळणवळणाच्या दृष्टीनेंही रायगड ही राजधानी विशेष सोईस्कर होती. रायगड व त्याभोंवतालचा प्रदेश यांचें महत्त्व शिवाजी किती मानीत होता, हें पुरंदरच्या तहावरून (१६६५) दिसून येतें. जयसिंहामार्फत औरंगजेबाशीं झालेल्या या तहनाम्याचे अन्वये शिवाजीकडे रहावयाच्या बारा किल्ल्यांचा तपशील पहा : राजगड, तोरणा, लिंगणगड, कुंवारी, भोरप (सुधागड), घोसाळें, तळें, रायरी, पालगड, महाडगड (महातगड), अलवारी (?) व उदयदुर्ग (?). शिवाजीनें आपल्याकडे ठेवून घेतलेल्या किल्ल्यांच्या यादीवरून दिसतें कीं रायगडाचा परिसर हा स्वराज्याचा गाभा आहे, असेंच तो मानीत असला पाहिजे. अशा अनेक दृष्टींनीं रायगड ही राजधानी शत्रूंनीं वेढलेल्या स्वतंत्र महाराष्ट्राच्या राजाला सर्वतोपरि लायक अशी होती. १६६२ पासून शिवाजी रायगडावर राहूं लागला. तेव्हांपासून ही राजधानी त्याला चांगली लाभलीही. येथें स्थायिक झाल्यानंतर पूर्वी कधीं मिळाली नव्हती अशी लूट अल्प आयासानें त्याच्या हातीं येऊं लागली आणि कधीं हटणार नाहींत असे शत्रु नामोहरम होऊं लागले. शिवाय शिवाजीला येथें कौटुंबिक जीवन उपभोगावयास

मिळालें. आणि कधीं कधीं मला असेंही वाटतें कीं घाटमाथ्यावर पूर्वीपासून स्थायिक झालेल्या मराठ्यांच्या अहंमन्य, स्वसंतुष्ट, स्वार्थी, फुटीर व फितूर वृत्तीला विटून त्यांच्यापासून सर्वस्वीं अलिप्त असें हें ठिकाण असल्यामुळें शिवाजीनें राजधानीसाठीं रायगडाची निवड केलेली असेल!

शिवाजीनें जेवढ्या निर्धारानें किल्ले संपादन केले तेवढ्याच निकरानें त्यानें ते लढविलेही. महाराष्ट्रांतील विशिष्ट नैसर्गिक परिस्थितीचा लष्करी उपयोग त्यानेंच प्रथम एवढ्या मोठ्या प्रमाणावर केला.

इस्लामी आक्रमकांच्या नेटाच्या धडकीसरशीं तोंवर अजिक्य गणले गेलेले मैदानी किल्ले कोलमडून पडलेले उत्तर हिंदुस्थाननें पाहिले होते. तुटक टेंकड्यांवर उभारलेले व अटकावाच्या अनेक योजनांमुळें अभेद्य मानले गेलेले देवगिरीसारखे किल्ले त्यांच्यासमोर टिकाव धरूं शकले नाहींत, हें महाराष्ट्रानें पाहिलें होतें. युद्धसामग्रीनें सुसज्ज असा डोंगरी किल्ला निधड्या छातीच्या गडकऱ्यानें नेटानें लढविला तर तो शत्रूला वर्षानुवर्षें तोंड देऊं शकतो, हें राजस्थानांत सिद्ध झालें होतें. इस्लामी परचक्र आलें तेव्हां देवगिरी, वरंगळ, द्वारसमुद्र येथील अधिपतींनीं विपरीत बुद्धीनें स्वतःला राजधानीच्या किल्ल्यांत कोंडून घेतलें होतें आणि म्हणूनच राजधानी पडतांच त्यांचीं राज्यें लयाला गेलीं. किल्ल्यांच्या प्रतिकारशक्तीला मर्यादा असतात आणि राजानें स्वतःला राजधानींत कधींही कोंडून घेऊं नये, या युद्धशास्त्रांतील मूलभूत तत्त्वांचा त्यांना विसर पडला होता. नाग नायकाच्या नेतृत्वाखालीं सिंहगड लढविणाऱ्या मराठा कोळ्यांनीं मुहम्मद तुघ्लुकाला सात महिने दाद दिली नाहीं; अखेरीस भोंवतालच्या प्रदेशांतील रहिवाश्यांचा पाठिंबा नसल्यामुळें व अन्नसामग्रीचे अभावीं त्यांना किल्ला सोडावा लागला. मलिक् काफूरनें मलबारवर स्वारी (१३११) केली तेव्हां तेथील लढवय्यांनीं सह्याद्रीचा आश्रय केला आणि वीर पाण्ड्य व विक्रम पाण्ड्य यांच्या नेतृत्वाखालीं मुसलमानांच्या मैदानी छावण्यांवर हल्ले चढवून आक्रमकांना हैराण केलें. इकडे सह्याद्रींत, विशाळगडनजीकच्या जंगलांत शिर्के व मोरे यांनीं एकजूट होऊन मलिक् उत्तुजाराच्या प्रचण्ड सैन्याची कत्तल करून स्वातंत्र्याचें रक्षण

केलें. जव्हारचा डोंगराळ प्रदेश काबीज होईना, म्हणून दिल्लीच्या सुलतानांना तेथील कोळी राजा नेमशहा याचें स्वातंत्र्य व भोंवतालच्या बावीस किल्ल्यांवरील त्याचें स्वामित्व, यांना मान्यता (१३४३) द्यावी लागली. अगदीं अलीकडे डोंगरी किल्ल्याच्या आधारानें गनीमी काव्याची लढाई करून शहाजीनें उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांतील सुलतानांच्या व शहांच्या फौजांना हैराण केलें होतें. पाऊण लाख फौज बरोबर घेऊन दक्षिणदिग्विजयासाठीं आलेल्या शहाजहानाला शहाजीनें सहा किल्ले व सात हजार स्वार यांच्या बळावर नामोहरम केलें होतें. गनीमी काव्याची युद्धपद्धति मलिक् अंबरनें सुरू केली, असें सांगतात. शहाजीनें या युद्धपद्धतीची सह्याद्रीशीं सांगड घातली आणि महाराष्ट्रापुरती डोंगरी लढाईची एक स्वतंत्र युद्धपद्धति निर्माण केली. या युद्धाच्या धामधुमींत शिवाजीचा जन्म झाला आणि या वेळच्या धालमेलींत सह्याद्रींतील वेगवेगळ्या गडांवर त्याला वास्तव्य करावें लागलें. यामुळें सह्याद्रींतील दुर्गश्रेणींचें महत्त्व त्याच्या ध्यानांत आलें. या शक्तिकेंद्रांची एकछत्री संघटना करतां आली तर महाराष्ट्र कोणत्याही आक्रमकाला तोंड देऊं शकेल, एवढेंच नव्हे, हिंदुस्थानांतील कोणत्याही सत्तेला भारी होऊं शकेल, हें त्याच्या लक्षांत आलें. बालपणींच शिवाजीला शहाजीच्या युद्धपद्धतीचीं प्रात्यक्षिकें पाहावयास मिळालीं. शिवाजी पुण्यास स्थायिक झाला तेव्हां शहाजीच्या तालमींत तयार झालेले मुत्सद्दी व नेतृत्वाखालीं लढलेले लष्करी अधिकारी त्याच्या दिमतीस होते. त्यांनीं या युद्धपद्धतींत शिवाजीला तरबेज केलें. शिवाजीनें स्वराज्य-साधनेसाठीं जे प्रयोग केले त्या वेळीं मावळांतील किरकोळ काठीच्या दुबळ्या दिसणाऱ्या काटक शेतकऱ्यांचें शौर्य त्याच्या निदर्शनास आलें. ही शक्ति तोंवर सुप्तावस्थेंत होती, निष्क्रिय होती; शिवाजीनें ती जागृत केली, कार्यक्षम केली. शिवाजीनें या शक्तीची निष्ठा संपादन केली व शहाजीच्या युद्धपद्धतीला जनतेच्या उठावणीचें व स्वातंत्र्ययुद्धाचें पवित्र स्वरूप दिलें. शहाजीच्या लढाया पगारी सैनिकांनीं लढविल्या आणि शिवाजीच्या आम जनतेनें, स्वयंस्फूर्तीनें.

म्हणून स्वराज्य मिळालें व तें टिकलें. शिवाजीच्या शिस्तींत व या युद्ध-पद्धतींत पटाईत झालेल्या मराठ्यांनीं राजारामाच्या कारकीर्दींत महाराष्ट्राच्या शौर्याचा व निष्ठेचा प्रभाव मोंगलांच्या प्रत्ययास आणून दिला.

महाराष्ट्रांतील किल्ले शिवाजीच्या आमदानीपासून आक्रमकांशीं नेटानें लढूं लागले. किल्ल्यांतील लढवय्यांना भोंवतालच्या प्रदेशांतील रहिवाशांकडून मदत होऊं लागली, आक्रमकांची रसद तुटली आणि वेढा घालणारांवर चोहींकडून छापे पडूं लागले, हेंही एव्हांपासूनच. चाकणचा भैदानी किल्ला केवढासा. तो फिरंगोजी नरसाळ्यानें शायिस्ताखानाशीं अशा नेटानें लढविला कीं या एका अनुभवावरून मराठ्यांचे किल्ले काबीज करणें दुर्घट आहे असा अहवाल खानानें बादशहाला सादर केला. प्रतापगडला वेढा पडला तेव्हां प्रतापराव गुजरानें किल्ल्याखालीं उतरून व त्याला साथ देणाऱ्या नेताजी पालकरानें भोंवतालच्या भागांतून, रात्रीं अपरात्रीं छापे घालून विजापुरी फौजेची दाणादाण केली. एक किल्ला पडला तरी इतरांनीं लढत रहावयाचें, फार काय, किल्ला पडला तरी बालेकिल्ल्यानें लढत रहावयाचें, ही प्रथा एव्हांपासूनच सुरू झाली. दिलीरखानानें पुरंदरला वेढा घातला तेव्हां मुरारबाजीनें पठाणांवर हल्ला करून लांडगेतोड केली आणि शत्रूनें एक कोट काबीज केला तरी त्यानें वरचा कोट लढवीत ठेवला. साल्हेरच्या लढाईच्या वेळीं प्रतापरावानें प्रथम मोंगलांवर हल्ला केला, नंतर आपण घाबरलों असें दाखवून पळ काढला; पुढें मोंगलांची फौज फांकलेली दिसतांच त्यानें उलटून अशा निकराची लढाई दिली कीं मोंगलांचे तीस सरदार आणि दहा हजार लोक पडले. दिलीरखानानें मोठ्या फौजेनिशीं कण्हेरा किल्ल्याला वेढा घातला असतां हशमांचा सरदार रामाजी पांगेरा यानें प्राणार्पण करण्यास सज्ज असलेल्या सातशें निवडक इसमांनिशीं किल्ल्यावरून उतरून खानावर हल्ला चढविला आणि घनघोर रणकंदन करून बाराशें पठाण कापले. या लढाईंत मराठ्यांकडील एकेकास वीस-तीसपावेतों जखमा झाल्या; पण या चढाईमुळें दिलीरखान हतवीर्य होऊन निघून गेला. असे किती प्रसंग सांगावे ? हें सर्व शक्य झालें, कारण शिवाजीच्या उद्योगाला

सह्याद्रीचा आधार होता आणि नवचैतन्य जागृत झालेल्या महाराष्ट्राचा पाठिंबा होता.

शिवाजीच्या पूर्वी सह्याद्रींतील किल्ले दक्षिणी सुलतानांच्या राजनिष्ठ अशा स्वकीय व परकीय अमलदारांच्या हातीं होते. स्वतंत्र महाराष्ट्राच्या राज्यकर्त्यांनीं उभारलेल्या सह्याद्रींतील गडांच्या श्रेणींनींच महाराष्ट्राला शृंखलाबद्ध केलें होतें. आतां हीं महाराष्ट्राच्या गुलामगिरीचीं प्रतीकें होऊन बसलीं होतीं. त्यांच्या भारामुळें महाराष्ट्राला धाप लागली होती, कारण या गडांवरील डागडुजीचीं कामें महाराष्ट्राच्या उरावर उभारलेलीं होतीं. ही उपमा नाहीं, वस्तुस्थिति आहे. एकच उदाहरण देतों : पुरंदर येथील बालेकिल्ल्याच्या एका तोटक्या कड्याच्या कांठावर शेंडे ऊर्फ शेंदरी नांवाचा बुरूज आहे. पाया घेण्याला जागा नव्हती आणि कड्याचा धोंडा कुजका होता. यामुळें या बुरुजाचें बांधकाम वारंवार ढासळूं लागलें. किल्ल्याच्या मजबुतीसाठीं हा बुरूज बांधणें तर जरूर होतें. त्यामुळें बेदरचा बादशहा बेचैन झाला. शेवटीं त्याला स्वप्नांत दृष्टान्त झाला कीं बुरुजाला ज्येष्ठ पुत्र व ज्येष्ठ सून यांचा बळी हवा आहे. जागृत होताच पातशहानें हें वर्तमान आपला इमानी इनामदार येसाजी नाईक चिचे याला सांगितलें. नाइकानें स्वतःचा पुत्र व सून यांना बळी देण्याची तयारी दर्शविली, पण शहानें नकार दिला. अखेरीस बहिरनाक सोननाक याचा पुत्र नाथनाईक व त्याची पत्नी देवकाई या उभयतांना एका आश्विन वद्य अष्टमीस बुरुजाच्या पायात जिवंत गाडण्यांत आलें. प्रत्येकीं चोवीस तोळे वजनाच्या सोन्याच्या पन्नास हजार विटा त्यांच्याभोंवतीं ठेवण्यांत आल्या होत्या. बळींच्या पुण्याईमुळें बुरुजाचें बांधकाम तडीला गेलें. या कामाबद्दल येसाजीला पुरंदरची किल्लेदारी व दोन खेडीं इनाम देण्यांत आलीं आणि बहिर्जीला नऊशें दहा होनांचें इनाम मिळालें. या इनामांचा वृत्तान्त एका ताम्रपटावर आधारलेला आहे. त्याचें भाषांतर कॅप्टन मॅकिन्टॉश् यानें उमाजी नाइकाच्या चरित्रांत दिलेलें आहे. हा ताम्रपट बनावट आहे असें त्यांत नमूद केलेल्या ५८७ या अरबी सनाच्या अंतर्गत पुराव्यावरून मानण्यांत आलेलें आहे. डॉ. एच्. गोट्झ यांचा पुरंदर

किल्ल्यावरील लेख ( Purandhar : Its Monuments & History. Annals of the Bhandarkar Oriental Research Institute, Vol XXX. Parts III–IV. Pages 215-240 ) अगदीं अलीकडे प्रसिद्ध झालेला आहे. डॉक्टर मजकूर हे बडोदा स्टेट म्यूझियमचे मुख्य अधिकारी. ते वंशानें जर्मन असल्यामुळें गेल्या दुसऱ्या महायुद्धाचे वेळीं इंग्रज सरकारनें त्यांना इतर जर्मनांबरोबर पुरंदर किल्ल्यावर स्थानबद्ध करून ठेवलें होतें. स्थानबद्धतेच्या काळांत त्यांनीं पुरंदर किल्ल्याचें संशोधन इतर जर्मन स्थानबद्धांच्या सहकार्यानें केलें. शेंदरी बुरुजाच्या प्रकरणाबद्दल त्यांनीं व्यक्त केलेले विचार मननीय आहेत. ते सांगतात : "हा ताम्रपट बनावट आहे. तो सतराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास तयार करण्यांत आलेला असावा. मात्र त्यांत नमूद केलेला वृत्तान्त खरा असणें संभवनीय आहे. ताम्रपट खोदणारानें नजरचुकीनें हिजरी ८८७ ( = १४९१ ई. ) ऐवजीं हिजरी ५८७ ( = ११९१ ई. ) हा आंकडा खोदलेला असणें शक्य आहे. या सुमारास बेदरच्या बहमनींची सत्ता नाममात्र उरलेली होती. शिंदी बुरुजाचें अधांतरी बांधकाम फार अवघड होतें. त्यासाठीं ठिसूळ झालेला कडा तोडणें जरूर होतें. या कामावर असलेले अनेक कामगार मृत्युमुखीं पडले असतील. अनेक किल्ल्यांच्या व राजवाड्यांच्या बाबतींत नरबलींची कथा ऐकण्यांत येते; मुसलमानी अमदानींतही. दाक्षिणेतील मुसलमान सुलतान व त्यांचे सरदार यांपैकीं अनेक जातकुळीनें हिंदू होते. त्यांची हिंदी मंत्रतंत्रांवर श्रद्धा होती. पुरंदरची किल्लेदारी बहुशः हिंदूंचेच हातीं असे असें दिसतें. राजकीय अस्वास्थ्याच्या काळांत मूढ श्रद्धेला ऊत येतो. अंध श्रद्धेला मान्य होईल अशा एखाद्या कृत्याचा आधार घेऊन भोळ्या कारागिरांना या अवघड कामाकडे प्रवृत्त करणें इष्ट व जरूर वाटलेलें असणें संभवनीय आहे. बळींच्या भोंवतीं ठेवलेल्या सोन्याची कथा मात्र खोटी असावी. कारण त्या वेळची राजकीय परिस्थिति घालमेलीची असल्यामुळें बळींबरोबर एवढी संपत्ति पुरण्यांत आलेली असणें असंभवनीय आहे. परंपरागत मंत्र व आकृति खोदलेलीं, सोन्याचें पाणी दिलेलीं तांब्याचीं यंत्रें त्या भुयारांत बळींबरोबर पुरलेलीं असावींत.

या बुरुजांत पुरलेली संपत्ति शोधून काढण्यासाठीं येथील इंग्रज शिपायांनीं सुरुंग लावून तो उडविण्याचा प्रयत्न केला होता; त्याची खूण अद्याप दिसून येते." अशाच दंतकथा अनेक किल्ल्यांचे बाबतींत ऐकूं येतात. दंतकथा खऱ्या असोत वा खोट्या ठरोत ; त्या विशिष्ट वृत्तीची साक्ष देतात, विशिष्ट मनोवृत्तीची जोपासना करण्यांत येत होती अशी ग्वाही देतात, एवढें मात्र खरें. गुलामगिरी चिरस्थायी व्हावी म्हणून आत्मार्पण करणारांना त्या काळीं हुतात्मे मानण्यांत येत होतें; त्यांना इनामांच्या सनदा देण्यांत येत होत्या, सामान्य जनांना समजणार नाहीं अशा भाषेंत किताब देण्यांत येत होते; आणि या सनदांच्या व किताबांच्या घमेंडींत महाराष्ट्रांतील कर्तृत्ववान् पुढारी माजलेल्या रानडुकरांसारखे धुडगूस घालीत होते. ही वृत्ति जोंवर थैमान घालीत आहे व तिचीं प्रतीकें अस्तित्वांत आहेत तोंवर केवळ वैयक्तिक मर्दुमकीच्या, सह्याद्रीच्या व त्यावरील गडांच्याही आधारावर स्वराज्याचें राजकारण यशस्वी होणार नाहीं हें ओळखून शिवाजीनें मराठ्यांच्या वृत्तींत क्रान्ति घडवून आणली. स्वराज्यनिर्मितीला अनुकूल होते त्यांची जोपासना केली आणि प्रतिकूल होते त्यांचा बीमोड केला. सह्याद्रींतील किल्ले व त्यांच्या परिसरांतील प्रदेश परक्यांना किंवा त्यांच्या प्रतिनिधींना केवळ धास्तीमुळें खालीं करून देणारे मराठे शिवाजीच्या नेतृत्वाखालीं त्याच किल्ल्यांवर पुन्हां आरोहण करूं लागले; हरकामी गुलाम म्हणून नव्हे, कणखर भारवाहक म्हणून नव्हे; हक्क प्रस्थापित करण्यासाठीं लढण्याकरितां आलेले मालक म्हणून, स्वराज्याचा भार वाहण्यासाठीं सिद्ध झालेले स्वातंत्र्योन्मुख जनतेचे प्रतिनिधि म्हणून! किल्ल्यांच्या पायांत बळी जाण्यासाठीं नव्हे, किल्ल्यांवर बिगरहक्कानें हुकमत गाजविणाऱ्या परक्यांचा बळी घेण्यासाठीं! दुबळे दिसणारे व गबाळ भासणारे मावळे शस्त्रसज्ज होऊन अंधाऱ्या रात्रींही, वानरांच्या टोळीप्रमाणें, झेंपेसरशीं कडेकपाऱ्या ओलांडून, तोंवर अगम्य मानल्या गेलेल्या सडेसोट तटबंदीवर आरोहण करून, गडावर एकाएकीं प्रकट होऊन तेथील नामवंत योद्धयांबरोबर कसलेल्या वीरांसारखे लढूं लागले. एखाद्या खानाच्या खिजमतगारालाही हरघडीं लाचारीनें लवून

लवून कुर्निसात करणारे व परस्परांशीं किरकोळ मानापमानासाठींही प्राण-पणानें झगडण्याकरितां विख्यात असणारे मराठे एकजूट होऊन कर्दन-काळासारखे लढूं लागले; विस्तीर्ण प्रदेश परक्यांच्या ताब्यांत गेला तरी बेफिकीर राहणारे मराठे तसूतसू जमिनीसाठीं हट्टानें लढूं लागले; किल्ल्यांमागून किल्ले व जिल्ह्यांमागून जिल्हे मराठ्यांच्या ताब्यांत जाऊं लागले; तेव्हां दखनचे शहा व दिल्लीचे सुलतान स्तिमित झाले. त्यांना विचार पडला कीं हें परिवर्तन एकाएकीं झालें कसें? पुढें मराठ्यांनीं जवळजवळ संपूर्ण हिंदुस्थान आपल्या प्रभुत्वाखालीं आणलें तेव्हां अनेक राज्यकर्त्यांनीं परस्परांना विचारलें असेल कीं मराठ्यांच्या सत्तेचा हा विस्तार झाला कसा?

या विस्ताराचें कारण महाराष्ट्राच्या घाटमाथ्यावरील लोकांची विशिष्ट मनोवृत्ति आणि महाराष्ट्राच्या नेत्यांचें माहात्म्य.

महाराष्ट्रांतला प्रत्येक मनुष्य स्वतंत्र, समर्थ, सदर्प असतो, असें प्राचीन वर्णनांत नमूद केलेलें आहे. महारथी व महाभोज हे सातवाहनांचे सामन्त. अपरान्तातील लेण्यांत त्यांचे उल्लेख आढळतात. त्यांच्या अभिधानांवरूनच त्यांचें महत्त्व व सामर्थ्य दिसून येतें. मध्य-युगीन सम्राटांचे सामन्त स्वतःला महामण्डलेश्वर म्हणवीत. हिंदुस्थाना-तील प्राचीन व मध्ययुगीन साम्राज्यांची संघटना विस्कळित होती; मुसलमानी अमदानींतही अशीच स्थिति होती. सम्राटाची व सामन्तांची सत्ता राजधानीच्या आसपास; अपरान्तांतील व पठारावरील खोरीं स्थानिक राज्यकर्त्यांच्या ताब्यांत; मावळासारख्या बंदिस्त जागा स्थानिक पुढाऱ्यांच्या हातांत. शिवपूर्वकालांतील मावळ खोऱ्यांतील परिस्थिती-बाबत श्री. सरदेसाई (शककर्ता शिवाजी, पृ. २६) सांगतात: या भागांत "प्राचीन देशमुखांचीं घराणीं नांदत असून त्यांनींच बहुधा हा प्रांत आरंभीं वसविला असावा. हे मावळे देशमुख घरंदाज, इभ्रतदार, वतनदार, द्रव्यवान्, शिकलेले व व्यवहारचतुर असत. त्यांच्या दिमतीस प्रभु देशपांडे व ब्राह्मण कुलकर्णी दप्तर सांभाळण्यास असत. स्वभावानें ते भांडखोर असून मानाखातर जिवाचीसुद्धां पर्वा ते करीत नसत. वतनांच्या वगैरेसंबंधानें एकाच घराण्यांत किंवा अनेक घरा-

ण्यांत कैक शतकें कलागती चालून खून, मारामाऱ्या, जाळपोळ हे प्रकार नित्याचे झाले होते...बायकामुलांचे खून होणें, देशोधडीस लागणें, फिरून सावरासावर करून सूड घेणें, अशी अंदाधुंदी शिवाजीच्या पूर्वी शें-दोनशें वर्षे सारखी चाललेली आढळते. नेहमींचेच हे प्रसंग झाल्यामुळे त्यांतून निभावून जाण्याच्या युक्त्या बायकांमुलांससुद्धां सुचत असत. उपाशीं लपून बसणें, उन्हांतून किंवा थंडीवाऱ्यांतून रात्रींअपरात्रीं दूरच्या मजला मारणें, विरुद्ध पक्षाचे कट फोडून आपले कट जमविणें, त्याबद्दल आपल्या कटांतील लोकांस उत्पन्नें लिहून देणें, हुलकावण्या दाखवून वेळ मारून नेणें, केव्हां समोर लढाई करणें, असे हे मावळातील देशमुखाचे वर्तनप्रकार लोकांच्या अंगवळणीं पडलेले होते." या कपटप्रचुर पद्धतीचा शेवट शिवाजीनें केला असें श्री. सरदेसाई सांगतात, पण हें विधान पटत नाहीं. केंद्रसत्तेचा अमल घाटमाथ्यावर व मावळ भागांत यथातथाच असल्यामुळे जवळजवळ स्वतंत्र असलेले या बाजूचे देशमुख या काळात मातले होते; परकी राज्यकर्त्यांच्या प्रोत्साहनामुळें — कारण, परकी राज्यकर्त्यांचा या भागावरील अमल त्यांच्या साह्यावरच अवलंबून होता; आणि स्वतःच्या सामर्थ्याच्या फुशारकीमुळें — कारण, यांच्या मानाने त्या भागांतली सामान्य जनता अगदींच दुर्बल होती. देशमुख हे देशाचे पुढारी; देशाचीं हीं मुखें जनतेच्या आकांक्षा सशब्द करीनाशीं झालीं होतीं. स्वदेशाच्या व स्वजनाच्या हितसंबंधाचें रक्षण करण्याऐवजीं ह्यांनी आपल्या कर्तृत्वाचे क्षेत्र स्वार्थापुरते मर्यादित केलें होतें. शिर्के व मोरे हे एका काळचे स्वातंत्र्ययुद्धातील सहकारी. शिर्के हे मुसलमानांचे हाडवैरी. पण पुढें आदिलशाहीचे वतीनें मोऱ्यांनी शिर्क्यांच्या सामर्थ्याचा उच्छेद केला! पुढें शिवाजीनें मोऱ्यांचें उच्चाटण केलें आणि संभाजीने निवळ देशमुखी वृत्तीनें शिर्क्यांची कत्तल केली. शिरकाणानंतर शिर्के मोगलांना मिळाले! रोहिडखोऱ्याचा खेळोजी जेधे देशमुख विजापूरकरांपासून मिळालेलीं वतनाचीं फर्मानें घेऊन आपल्या गांवाकडे येत असता त्याच वतनावर हक्क सांगणाऱ्या खोपडे देशमुखांनीं एका खिंडींत जेध्यांवर

हल्ला करून खेळोजीला ठार केलें. नंतर जेध्यांनीं खोपड्याच्या लग्नावर हल्ला चढवून त्यांचीं साठ माणसें कापून काढलीं. शेवटीं रोहिडा किल्ल्यावरील मुसलमान काजीनें त्यांच्याच वतनाची फाळणी करून हा तंटा मिटाविला ! कान्होजी जेधे हा आदिलशाही फौजेवरील अधिकारी; तो प्रथम शहाजीला सामील झाला व नंतर शिवाजीला. कान्होजीच्या पाठिंब्यामुळें मावळांतले अनेक मातबर लोक शिवाजीला मिळाले. अफझलखानाच्या स्वारीचे वेळीं जेधे आदिलशाहीला फितले नाहींत, पण संभाजीच्या कारकीर्दींत ते मोंगलांना सामील झाले. खंडोजी खोपड्यानें तर शिवाजीला धरून देतों म्हणून अफझलखानाशीं कबुलाती केली; आणि ही मोहीम फसल्यानंतर त्यानें जंगलांत फसलेलीं अफझलखानाचीं मुलेंमाणसें कऱ्हाडास पोंचविलीं. यासाठीं शिवाजीनें हातपाय तोडून खंडोजीचा वध केला! संताजी घोरपडे व धनाजी जाधव या जोडीदारांनीं राजारामाच्या कारकीर्दींत मराठ्यांचें नांव गाजविलें व मराठेशाहीचें संरक्षण केलें. त्यांचेमध्यें पराक्रमाचे बाबतींत चुरस होती, तिचें रूपांतर वैमनस्यांत झालें. धनाजीनें संताजीची फौज फितूर केल्यामुळें संताजी देशोधडीला लागला. रानोमाळ हिंडून थकलेला संताजी ओढ्यावर स्नानासाठीं थांबला असतां नागोजी माने म्हसवडकर यानें खाजगी वैमनस्यावरून त्याला एकाकी गांठून ठार केलें. नागोजी हा राजारामाचा बारा महाल देशमुखीचा इनामदार; पण त्यानें संताजीचें शिर औरंगजेबापुढें हजर केलें आणि त्याच्याकडून सनद मिळविली! वाईचा देशमुख सूर्याजी पिसाळ यानें वतनासाठीं फितूर होऊन भोंसल्यांच्या कबिल्यासह रायगड मुकर्रबखानाचे हवालीं केला; पुढें वतनासाठीं त्यानें मुसलमानी धर्मही स्वीकारला; किल्ला हातीं आल्यावर खानानें शिवाजीचें सिंहासन फोडलें व खजिना लुटला. सातारचा किल्ला औरंगजेबानें सर केला तेव्हां तटावर मोंगलांचें निशाण बाबाजी डफळे यानें लावलें. असा इतिहास किती घराण्यांचा व किती कालखण्डांचा सांगावा? घाटमाथ्यावरील घराण्याच्या इतिहासाचा एक खण्ड सुवर्णाक्षरांनीं लिहिण्याजोगा असतो तर दुसरा कालकूटानें.

असे प्रकार या भागांत पुनः पुनः कां होतात ? या भागांत आणि महाराष्ट्राच्या पठारी प्रदेशांतही ?

कारण सह्याद्रीची व तज्जन्य महाराष्ट्राची निर्मिति ज्वालामुखींपासून झालेली आहे. येथील नैसर्गिक ज्वालामुखी शांत झालेले आहेत ; पण त्यांची आग अद्याप येथील व्यक्तिमात्राच्या अंतःकरणांत धुमसत आहे; कधीं ती उपकारक स्वरूपांत प्रकट होते तर कधीं हानिकारक. घाटमाथ्याची नैसर्गिक रचना व्यक्तिमत्त्वाला विशेष पोषक आहे. येथील व्यक्तिमात्राचें व्यक्तिमत्त्व प्रभावी आहे, पण असहिष्णु. हा प्रदेश बेलगाम बंडखोरांचा, शिरजोर शिलेदारांचा व बेगुमान माण्डलिकांचा आहे. हा प्रदेश वैयक्तिक उठावणीचा आहे, दीर्घकालीन सहकार्याचा नाहीं. घाटमाथा व मावळें हा डोंगराळ प्रदेश बंदिस्त आहे; पठारापासून अलग, कोंकणापासून तुटक आणि शेजारच्या खोऱ्यापासून पृथक्. येथील रहिवाशाची वृत्तिही अशीच आहे. ती नैसर्गिक परिस्थितीमुळें निर्माण झालेली आहे व ऐतिहासिक घडामोडींमुळें उत्क्रांत झालेली आहे. येथील रहिवाशांच्या वसाहती बहुधा विशिष्ट पोटजमातीच्या अगर विशिष्ट कुळांच्या आहेत. त्यांचा पुढारी किंवा राजा आणि सामान्य बहुसंख्य प्रजा यांचा धार्मिक व सामाजिक दर्जा समान असल्यामुळें व्यक्तिमात्राच्या स्वतःच्या माहात्म्याबद्दल अवास्तव कल्पना असतात. डोंगराळ स्कॉटलंडमधील खोऱ्यातील लोकांची वृत्ति अशीच आहे. खडकाळ मॉंटेनिग्रोमधील सारेच रहिवासी स्वतःला राजकुलाचे सदस्य समजतात. डोंगराळ बंदिस्त प्रदेशांतील रहिवासी नागरिकांपासून पृथक् राहतात आणि वन्य जमातींपासूनही. मैदानी शहरांतल्या लोकांना ते परके मानतात आणि जंगलांतल्या आदिवासींनाही ; फार काय, आपल्या खोऱ्याच्या पलीकडच्या रहाळांतील आपल्याच जमातीच्या लोकांनाही ते परके मानतात ; आपल्याच खोऱ्यांत पिढ्यान् पिढ्या स्थायिक झालेल्या, पण भिन्न व अल्पसंख्य जमातीच्या लोकांना ते परके मानतात. बाह्य जगाशीं क्वचितच संबंध येत असल्यामुळें आणि मैदानांतील राजकीय व सांस्कृतिक चळवळीपासून अलिप्त असल्यामुळें स्वसंतुष्ट व अल्पसंतुष्ट. संकटाशीं सारखें झगडावें लागत असल्यामुळें

स्वावलंबी व स्वयंपूर्ण. आपल्या खोऱ्यांत आपलेंच किंवा आपल्यापैकीं कोणाचें तरी राज्य असावें आणि तें कोणत्याही बाह्य संघटनेपासून पृथक् व स्वतंत्र असावें, अशी त्यांची भावना असते. म्हणूनच अशा भागांतील स्थानिक ग्रामसंस्था प्रबळ असतात. स्वित्झरलँडमध्यें नैसर्गिक परिस्थिति अशीच आहे आणि तेथील राजकीय संघटनेंत स्थानिक संस्थांना विशेष महत्त्व आहे. परचक्राचें संकट आलें किंवा आक्रमणाचा संभव दिसूं लागला तरच घाटमाथ्यावरील रहिवासी परस्परांशीं किंवा बाह्य संघटनेशीं सहकार्य करावयास उद्युक्त होतात. अशाच परिस्थितीमुळें स्वित्झरलँडमध्यें संघराज्याची प्रस्थापना झाली; अशा परिस्थितीच्या अभावीं बाल्कन राज्याचें एकीकरण होऊं शकलें नाहीं. परिस्थितीच्या प्रभावामुळें डोंगरी लोकांनाही मैदानांत यावेंच लागतें; अतिरिक्त उत्पादनाच्या विक्रीसाठीं, दुष्प्राप्य पण आवश्यक वस्तूंच्या खरेदीसाठीं, हंगामाव्यतिरिक्त मोलमजुरीसाठीं, मैदानांतील संचित संपत्तीच्या लुटीसाठीं. डोंगरी रहिवाशाची लुटीची प्रवृत्ति नैसर्गिक आहे. आरंभीं ते जंगली संपत्तीची लूट व नासधूस करतात आणि जंगलाच्या नाशामुळें डोंगर नागवे झाले कीं ते लूटमार करण्यासाठीं मैदानांकडे धाव घेतात. हिंदुस्थानच्या इतिहासांत गाजलेली मराठ्यांची मुलूखगिरी ही सह्याद्रीची प्रेरणा आहे; घाटमाथ्यावर ती नैसर्गिक आहे व पठारांवर सांसर्गिक वा संपादित. अफगाणिस्तानातील टोळ्यांनीं अशाच प्रेरणेमुळे हिंदुस्थानांतील सिंधु व गंगा मैदानावर स्वाऱ्या केल्या. आता पाकिस्तानांत इस्लामी राज्य झालेलें आहे, तरी यापुढेंही ते तेथलि सुपीक मैदानांवर आक्रमण करीत राहतील. या वृत्तींत खंड पडतो तो व्यवसायमग्नतेमुळें, परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळें व नेत्याच्या अभावामुळें; आणि शिक्षणाच्या नियंत्रणामुळें. डोंगरी रहिवाशांची स्वतःच्या मोठेपणाबद्दल एवढी अवास्तव कल्पना असते कीं ते आपसांत परस्पराना तुच्छ मानतात; सामान्य व्यक्तीच्या नेतृत्वाला ते सहसा मान्यता देत नाहींत. त्यांची जूट करण्याची व त्यांना विशिष्ट उद्दिष्टाकडे प्रवृत्त करण्याची शक्ति अलौकिक महापुरुषाच्या ठायींच संभवते. अशा

पुरुषाचा उदय होईपर्यंत पठारी व डोंगरी जमातींच्या शक्ति सुप्तावस्थेंत राहतात, परस्परांतील संघर्षामुळें त्या एकमेकींना घातुक होतात, सहकार्याचे अभावीं विफल होतात. अलेक्झँडर व सायरस यांनीं अनुक्रमें ग्रीस व इराण यांच्या सुप्त शक्ति जागृत केल्या. चंद्रगुप्त व अशोक यांच्या राजवटींत साधलेलें हिंदुस्थानचें राजकीय ऐक्य ही अलेक्झँडरच्या स्वारीची प्रतिक्रिया. चंगीजखानाने मंगोलियांत चैतन्य निर्माण करून दोन खंडें पादाक्रांत केलीं. महंमद पैगंबरानें मध्य आशियांतील पठारांवरल्या व डोंगरांवरल्या रहिवाशांमध्यें संघभावना व आक्रमणाची प्रेरणा निर्माण केली आणि लगोलग त्याच्या अडदांड अनुयायांनीं सुसंस्कृत जगाची उलथापालथ केली. महंमद पैगंबर व त्याचे अनुयायी सेनापति हे धर्मयुद्धांचे आद्यप्रवर्तक. ज्ञात इतिहासाच्या आरंभापासून सुप्तावस्थेंत अगर निष्क्रिय असलेल्या या जमातींच्या शक्ति या महापुरुषांच्या नेतृत्वामुळें एकाएकीं जागृत व कार्योद्युक्त झाल्या. अकस्मात् सचेतन झालेल्या शक्तीचा प्राथमिक आविष्कार विध्वंसकच असतो.शिवाजी हा असाच महापुरुष होता. त्याचें माहात्म्य अलौकिक आहे अशी सह्याद्रींतील व विशेषतः घाटमाथ्यावरील रहिवाशांची भावना होती, म्हणूनच त्याच्या नेतृत्वाला त्यांनीं मान्यता दिली व त्याच्या कार्यक्रमाशीं सहकार्य केलें. त्याच्या प्रेरणेमुळें सर्व मराठे-ब्राह्मण, क्षत्रिय व शूद्र आणि मावळे व हेटकरी सचेतन झाले, त्याच्या नेतृत्वाखालीं संघटित झाले, म्हणून सर्वत्र विजयी झाले. त्यांच्या वृत्तीला अनुकूल असें कार्यक्षेत्र शिवाजीनें त्यांना उपलब्ध करून दिलें. घरंदाज घराण्यांच्या नव्हे, सामान्य जनतेच्या सहकार्यानें शिवाजीनें स्वराज्य प्रस्थापित केलें; त्याच्या नांवावर मराठ्यांनीं स्वराज्याचें संरक्षण व संवर्धन केलें. यादवी हा महाराष्ट्राला शाप आहे. शिवाजीनें या शापातून महाराष्ट्राला कांहीं काळपर्यंत मुक्त केलें, स्वातंत्र्योन्मुख केलें, स्वातंत्र्याप्रीत्यर्थ सर्वांचें सहकार्य संपादन केलें. सह्याद्रींतील किल्ले, हीं या सहकार्याचीं, महाराष्ट्राच्या विजिगीषु संभूयसमुत्थानाचीं प्रतीकें आहेत. शिवाजीनें महाराष्ट्राची राजकीय उंची वाढविली, याचीं हीं प्रतीकें आहेत, आणि हेंच त्याचें माहात्म्य.

## सह्याद्रींतील लेणीं :

**प्रास्ताविक :**

आपण सह्याद्रींतील एखादा घाट कामकाजानिमित्त कष्टानें ओलांडीत असतों, औत्सुक्यानें प्रेरित होऊन डोंगरपठारावरील एखाद्या किल्ल्याची चढण चढत असतों किंवा भक्तिभावानें प्रेरित होऊन एखाद्या तीर्थक्षेत्राचें दर्शन घेण्यासाठीं गिरिशिखरावर जाण्याची अवघड पायवाट तोडीत असतों; श्रमामुळें दम लागला म्हणजे विश्रांतीसाठीं कडेच्या शिलातलावर क्षणभर बसून आजूबाजूला पाहूं लागतों, तों एखाद्या कड्याच्या पोटीं पिंपळपानासारखी कमान दृष्टीस पडते अगर एखादी भव्य मूर्ति दृष्टिपथांत येते, तेव्हां आपण चकित चित्तानें स्वतःलाच विचारतों कीं हें धर्मकृत्य कोणाचें, तें कोणीं केलें व केव्हां; ही मूर्ति कोणाची; अशा आडवाटेला असें शिल्पकृत्य कां करण्यांत आलें; या अलौकिक कलाकृति निर्माण करणाऱ्या कुशल कारागिरांची व त्यांच्या संपन्न आश्रदात्यांची, त्यांमध्यें व्यक्त होणाऱ्या धर्माची व संस्कृतीची वाताहत कां झाली? आपल्याला दिसलेली कमान सह्याद्रींत असंख्यात असलेल्यांपैकीं एखाद्या लेण्याची असते, मूर्ति बहुधा बुद्धाची आणि संस्कृति प्राचीन हिंदुस्थानची, महाराष्ट्राची.

हिंदुस्थानांत मोजदाद करतां येण्याजोग्या अवस्थेंत असलेली अशीं सुमारें बाराशें लेणीं आहेत; काळाच्या करणीमुळें आणखी किती तरी नष्ट होऊन गेलीं. हिंदुस्थानची फाळणी झाली तरी हीं सारीं लेणीं भारताच्या वांटणीस आलेलीं आहेत. यांपैकीं अर्धीं-अधिक लेणीं बौद्ध आहेत; बाकीचीं जैन व ब्राह्मणी आहेत. हिंदुस्थानांतील लेण्यांपैकीं नऊ-दशांश महाराष्ट्रांत आहेत; एवढेंच नव्हे, तर हिंदुस्थानांत नांवाजण्याजोगीं अशीं जीं लेणीं आहेत तीं सर्व महाराष्ट्रांतच आहेत. अर्थातच हीं लेणीं सह्याद्रींत आहेत; कांहीं मुख्य दक्षिणोत्तर श्रेणींत आणि कांहीं कोंकणात व देशावर पसरलेल्या सह्याद्रीच्या पूर्व-पश्चिम शाखांत.

हिंदुस्थानांत अनेक पर्वत आहेत; वैदिक धर्मांतील देव-देवतांना

व्यक्तिमत्त्व व मूर्त स्वरूप देण्यांत आलें त्या प्रदेशांत आणि बौद्ध व जैन धर्मांची प्रस्थापना व प्राथमिक प्रसार झाला तेथेंही; तेथें फारशीं लेणीं नाहींत व येथें आहेत, याचीं अनेक कारणें आहेत.

कारण सह्याद्रीचा गाभा कणखर व एकसंधी आहे. खोदकामाला अनुकूल अशी येथील धोंड्यासारखी वास्तु इतरत्र उपलब्ध नाहीं. हें याचें नैसर्गिक कारण. हिंदुस्थानांत लेणीं खोदण्याची प्रथा प्रस्थापित किंवा प्रसृत झाली तेव्हां आणि प्रचलित होती तोंवर प्रबल, स्वतंत्र व संपन्न अशा सत्ता महाराष्ट्रांतच अस्तित्वांत होत्या, हें याचें राजकीय कारण. मौर्यांच्या सत्तेला उतरती कळा लागली त्या सुमारास महाराष्ट्रांत सातवाहनांची सत्ता प्रस्थापित झाली आणि कांहीं कालपर्यंत तरी भारताचें चक्रवर्तित्व सातवाहनांचे हातीं होतें. सातवाहन, वाकाटक, चालुक्य व राष्ट्रकूट या महाराष्ट्रीय सत्तांनीं व त्यांच्या सामन्तांनीं या प्रथेचा पुरस्कार केल्याचे पुरावे येथील लेण्यांतील शिलालेखांत जागोजाग आढळून येतात. या कालखण्डांत हिंदुस्थानचा परदेशांशीं चालणारा व्यापार महाराष्ट्राच्या पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांमार्फत चालत असल्यामुळें येथील व्यापाऱ्यांची भरभराट होती, हें यांचें आर्थिक कारण. वैजयन्तीचा (आधुनिक वनवासी, उत्तर कानडा जिल्हा) व्यापारी भूतपाल यानें कार्ल्यांचें लेणें उभारलें असा निर्देश तेथील शिलालेखांत करण्यांत आलेला आहे. महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाचें सहकार्य हें याचें सामाजिक कारण. महाराष्ट्रांतील औद्योगिक संघांनीं आणि ठिकठिकाणच्या धनाढ्य कारागिरांनीं व सामान्य नागरिकांनीं दिलेल्या देणग्यांचे उल्लेख अनेक लेण्यांतील शिलालेखांत आढळतात. कोणीं एका खांबाच्या खोदाईचा खर्च केलेला आहे तर कोणीं पाणपोईचा. सामान्य जनतेनें वर्गणी गोळा करून धर्मकृत्यें उभारण्याची परंपरा महाराष्ट्रांत कमींत कमी इतकी जुनी आहे. पंढरपूरचें मंदिरही याच पद्धतीनें उभारण्यांत आलेले आहे; याची साक्ष तेथील चौऱ्याएंशीचा शिलालेख देत आहे. धार्मिक बाबतींत या सहकार्याची परंपरा अजूनही प्रचलित आहे. इतर क्षेत्रांत अशा सहकार्याचा अभाव दिसून येत असला तर तो दोष कार्यकर्त्यांचा, स्वयंभू पुढाऱ्यांचा, महाराष्ट्राचा नव्हे.

आणि महाराष्ट्राची धार्मिक सहिष्णुता हें याचें सांस्कृतिक कारण, किंवा आदिकारण. सहिष्णुता हें सुसंस्कृततेचें एक मुख्य लक्षण आहे; तिच्या मर्यादा परिस्थित्यनुसार आगेमागें होत असतात एवढेंच. सह्याद्रि बाह्यतः खण्डित, अनावृत व प्रतिकारक दिसत असला तरी त्याचें अंतर्याम एकसंधी, भावनार्द्र व विशुद्ध आहे; अगदीं महाराष्ट्राप्रमाणेंच. महाराष्ट्राची वृत्ति बाह्यतः व सकृद्दर्शनीं रांगडी, तुसडी व कठोर दिसत असली तरी ती अंतर्यामीं सभ्य, वत्सल व सुसंस्कृत आहे; सहिष्णु भक्तिभावानें ओथंबलेली आहे. सह्याद्रीच्या डोंगरपठारांवर असंख्य संग्राम-क्षेत्रें आहेत व सनातन धर्मक्षेत्रेंही आहेत; आणि सह्याद्रीच्या अंतर्यामीं बौद्ध, जैन व ब्राह्मणी लेणीं आहेत. महाराष्ट्राच्या सुसंकृत सहिष्णुतेचें हें प्रत्यंतर आहे. मात्र धर्मप्रचारांत व पुरस्कारांत आक्रमणाचा अंश नसेल तोंवरच महाराष्ट्र सहिष्णु आहे; धर्माच्या बुरख्याखालीं महाराष्ट्रावर आक्रमण करण्याचे जे जे प्रयत्न झाले ते महाराष्ट्रीयांनीं हाणून पाडले आहेत.

भारतीय संस्कृतीचा परमोच्च प्रदेश मानण्यांत आलेल्या आर्यावर्तांतील धार्मिक असहिष्णुतेचा एक प्रसंग तुलनेसाठीं सांगतों; विशेषतः नर्मदेच्या उत्तर तीराकडे मार्गदर्शनार्थ नजर लावून बसलेल्या महाराष्ट्रीयांसाठीं; महाराष्ट्राच्या रक्तरंजित इतिहासांतील कांहीं प्रसंगांची आठवण होतांच मान खालीं घालणाऱ्या न्यूनगंडांसाठीं. स्थानेश्वरचा परम भट्टारक महाराजाधिराज प्रभाकरवर्धन (५८० ते ६०५ इ.) आणि कर्णसुवर्णाचा चक्रवर्ती शशांक नरेंद्र गुप्त (५९० ते ६२० इ.) यांची राजकीय अग्रतेच्या बाचतींत चुरस होती. हूणांनीं नष्ट केलेलें गुप्तांचें वैभव पुन्हा प्राप्त करून घेण्याची शशांकाची महत्त्वाकांक्षा होती. यासाठीं त्यानें माळव्याच्या गुप्त वंशांतील परम भट्टारक महाराजाधिराज परमेश्वर देवगुप्त याचें सहकार्य मिळविलें. प्रभाकरवर्धन हा देवगुप्ताचा आतेभाऊ. इतकें जवळचें नातें असूनही देवगुप्त शशांकाला सामील झाला. प्रभाकरवर्धन मृत्यु पावला त्या वेळीं त्याचे पुत्र राज्यवर्धन व हर्षवर्धन हे अज्ञान होते. या राजपुत्रांचा मेहुणा ग्रहवर्मा मौखरी हा त्यांच्या हितसंबंधांचें रक्षण करीत असावा. या परिस्थितीचा फायदा

घेऊन गुप्तांच्या संयुक्त सैन्यानें वर्धनांच्या कनोजवर चढाई (६०६ ई.) केली. या लढाईत ग्रहवर्मा मारला गेला आणि त्याची राणी राज्यश्री ही गुप्तांचे हातीं लागली. नंतर दोस्तांच्या संयुक्त सैन्याला तोंड देण्यासाठीं राज्यवर्धन पुढें झाला. त्याची तयारी पाहून शशांकानें तहाचें बोलणें सुरू केलें. शशांकाशीं तह करावयास राज्यवर्धन उत्सुक होता. स्वदेशीं प्रतिस्पर्ध्यांचा पिछाडीवर हल्ला होऊं नये अशी खबरदारी घेणें त्याला इष्ट वाटत होतें; कारण या वेळीं वर्धन-साम्राज्याच्या पश्चिम सरहद्दीवर हूणांची उठावणी सुरू झाली होती. पित्याच्या आज्ञेनुसार त्यांच्या बंदोबस्तासाठीं काढलेली मोहीम अपुरी सोडून शशांकाला तोंड देण्यासाठीं त्याला राजधानीकडे परत यावें लागलें होतें. शशांकानें त्याला आपली कन्या देण्याचें कबूल केलें आणि वाङ्निश्चयाच्या मेजवानीसाठीं आपल्या छावणींत बोलावलें. राज्यवर्धन राजकारणांत मुरलेला नव्हता. आमंत्रणाप्रमाणें भोळया भावानें इतमामापुरता लवाजमा बरोबर घेऊन तो शशांकाच्या छावणींत आला. तो बेसावध असतांना गुप्तांच्या हस्तकांनी त्याला ठार मारलें. कोणी हें पाप शशांकाच्या मस्तकीं लादतात तर कोणी देवगुप्ताच्या. हर्षवर्धनानें या अत्याचाराचा सूड घेण्याची प्रतिज्ञा केली; पण अनेक वर्षें प्रयत्न करूनही ती सिद्धीला जाऊं शकली नाहीं. राज्यव्यवस्था सुरळीतपणें सुरू झाल्यानंतर हर्षानें बौद्ध धर्माचा स्वीकार केला. बौद्धांनीं त्याला शीलादित्य हें अभिधान अर्पण केलें आहे; कारण त्यांच्या मतें शीलाची महति विक्रमाहून अधिक. यानंतर सुमारें पंधरा वर्षांनीं शशांकानें वर्धनांवर चढाई केली आणि पहिल्या धडाक्यास बुद्धगया काबीज केली. हें बौद्धांचें अव्वल दर्जाचें धर्मक्षेत्र. गौतम बुद्धाला येथील बोधिवृक्षाखालीं पूर्ण ज्ञान प्राप्त झालेलें. शशांकानें हा वृक्ष तोडला, मुळयांसकट उखडून काढला आणि त्याच्या गड्यांत एक प्रचण्ड चिता अहोरात्र पेटती ठेवून तें स्थान भस्मसात् केलें. शशांकाची मोहीम यापुढें गेलेली दिसत नाहीं. हें कृत्य त्यानें धार्मिक अभिनिवेशानें केलें कीं राजकीय द्वेषामुळें केलें तें कळण्यास साधन नाहीं. सम्राट् अशोकाच्या वंशातला मगधाचा अखेरचा राजा पूर्णवर्मन् हा या

अत्याचारांची बातमी ऐकून बुद्धगेयला आला. पवित्र बोधिवृक्षाच्या आसपासची जागा शुद्ध करून त्यानें तो फिरून सजीव करण्यासाठीं उपाय-योजना सुरू केली. एक हजार गाईंच्या ताज्या दुधाचा अहोरात्र अभिषेक अनेक दिवसपर्यंत केल्यानंतर त्या पुरातन वृक्षाच्या दग्ध अवशेषांना फिरून पालवी फुटली. दंतकथा सांगते कीं हें वृत्त कानीं येतांच शशांकाची छाती फाटली व त्यानें प्राण सोडला. एवढी राक्षसी असहिष्णुता यादवीनें धुमसणाऱ्या महाराष्ट्राच्या इतिहासांत कोठेंही आढळून येत नाहीं. असो.

लेणें हा वास्तु व शिल्पप्रकार विशेषतः महाराष्ट्राच्याच संस्कृतीशीं व शिल्पपद्धतीशीं संलग्न आहे. श्री. राजारामशास्त्री भागवत ( मऱ्हाठ्याच्या-संबंधीं चार उद्गार, पृ. ८८ ) सांगतात : " खोदणें व कोरणें हे दोन्ही अस्सल मऱ्हाठी धातु. लेणें हा शब्दही अस्सल मऱ्हाठी होय. यास क्वचित् 'लयन' असें संस्कृतांत रूप दिलेलें आढळतें. तरी 'लयन' शब्द काव्यादिकांत बिलकुल येत नाहीं, त्या पक्षीं तो अस्सल संस्कृत शब्द नव्हे, याविपयीं शंका नको. वरील दोन धातूंवरून व लेणें या शब्दावरून पाहतां खोदीव काम व कोरीव काम या दोहोंबरोबर मऱ्हाठ्यांचा पूर्वी पुष्कळ संबंध होता, हें उघड होय." शास्त्रीबुवांचे हे सडेतोड उद्गार यथार्थ आहेत यांत संशय नाहीं.

सह्याद्रींतील लेणीं हीं महाराष्ट्रांतील सर्वांत प्राचीन ज्ञात धर्मक्षेत्रें. पुराणांत महाराष्ट्रांतील अनेक ब्राह्मणी धर्मक्षेत्रांचा उल्लेख आढळतो आणि अनेक देवदेवतांच्या अवतारकृत्यांशीं त्यांचा संबंध जोडण्यांत येतो. नाशिक हें अशा क्षेत्रांमध्यें अग्रगण्य; येथेंही बौद्ध लेण्यांहून प्राचीन व पौराणिक असे अवशेष अद्याप उपलब्ध झालेले नाहींत. महाराष्ट्रांतील प्राचीन ऐतिहासिक संग्रामक्षेत्रेंही सह्याद्रींतील लेण्यांच्या परिसरांतच होतीं, असा निष्कर्ष त्यांतील खोदीव लेखांवरून काढतां येतो. शक, क्षत्रप व अभीर यांजबरोबर सातवाहनांचे संघर्ष याच भागांत झालेले आहेत. महाराष्ट्राच्या प्राचीन व मध्ययुगीन राजधान्याही मुख्यत्वेंकरून याच भागांत होत्या. शूर्पारक, कल्याण, चौल वगैरे पश्चिम किनाऱ्यावरील बंदरें आणि मथुरा, वाराणसी, पाटलीपुत्र वगैरे उत्तर

हिंदुस्थानांतील शहरें यांचें महाराष्ट्राच्या अंतर्भागांतील पैठण, तगर वगैरे संपन्न व्यापारी पेठांबरोबरचें दळणवळण ज्या हमरस्त्यांवरून वाहत असे त्यांच्या कांठाकांठावरच सह्याद्रींतील लेणीं खोदलेलीं आहेत. दळणवळणाचे मार्ग बदलल्यामुळें तीं आडवाटेला आहेत असें आज आपल्याला वाटतें, इतकेंच. प्राचीन व मध्ययुगीन महाराष्ट्राच्या भक्तीचा व संपत्तीचा ओघ या लेण्यांकडे लोटला आणि येथेंच महाराष्ट्राच्या कलाकौशल्यानें परमोच्च बिंदु साधला. खरोखर, हीं लेणीं हीं महाराष्ट्राचीं व सह्याद्रीचीं लेणीं आहेत!

## लेणीं: स्तूप, चैत्य व विहार:

सह्याद्रींतील लेण्यांची महती वर्णन करण्यापूर्वी स्तूप, चैत्य व विहार यांची संक्षिप्त माहिती सांगतों; महाराष्ट्रांतील सर्वसाधारण वाचकांना या विषयाची माहिती नसते म्हणून; आणि हें आतांच सांगितलें तर पुढें द्विरुक्ति टाळतां येईल म्हणून. आरंभीं संक्षिप्त माहिती सांगतों असें आश्वासन देऊन पुढें लांबण लावली आहे, असा आक्षेप येथें संभवनीय आहे; उपलब्ध माहितीच्या मानानें संक्षिप्त, एवढेंच या विस्ताराचें समर्थन; कारण हिंदी संस्कृतींतील दुसऱ्या कोणत्याही अंगाचा अभ्यास या इतक्या प्रमाणांत झालेला नाहीं.

ईजिप्त व असीरिया या प्रदेशांत प्रस्तर–शिल्पाची प्रथा पुरातन आहे. ग्रीकांनीं लीसिया येथें आणि रोमन लोकांनीं पेट्रा येथें, आणि अखेमेनिड व ससानियन घराण्यांतील राजांनीं इराणांत लेणीं खोदलेलीं आहेत. नक्ष–इ–रुस्तुम येथें उत्कृष्ट शिल्पकृत्यें आहेत. सायरसच्या थडग्यावर आणि बेहिस्तुन येथील कड्यावर ऐतिहासिक महत्त्वाचे शिलालेख खोदलेले आहेत; पण या शिल्पकृत्यांना हिंदुस्थानची सर येत नाहीं. प्रस्तर-शिल्पाचे बाबतींत हिंदुस्थानांतील प्राचीन कारागिरांनीं अद्वितीय साहस व कल्पनाशक्ति व्यक्त केलेलीं आहेत. इराणी लेण्यांत ऐहिक ऐश्वर्य आहे, आमच्या लेण्यांत धार्मिक प्रभुत्व आहे; त्यांचीं लेणीं लौकिक आणि आमचीं अलौकिक!

**लेणें** या शब्दाला अर्थ अनेक आहेत: दागिना, गौरीच्या उत्सवात

भिंतीवर गोपुर वगैरे आकृति काढतात त्या, डोंगर पोखरून केलेली गुहा, प्रार्थनामंदिर आणि भिक्षूंचें निवासस्थान. प्रस्तुत विषयाशीं अखेरचे तीन अर्थ संबंधित आहेत. या शब्दाच्या व्युत्पत्तीही अनेक कल्पिण्यांत आलेल्या आहेत. पाइयसद्दमहण्णवो या कोशांत याची व्युत्पत्ति ‘ लयन ’ अशी दिलेली आहे ; महाराष्ट्र शब्दकोशांत ‘ लेपन – लयन–लेणें ’ आणि व्युत्पत्तिकोशांत ‘ सं. लयनम् > लअणॅ > लेणें ’ अशा दिलेल्या आहेत. लयनम् म्हणजे निवासस्थान : लेपन म्हणजे माखणें, गिलावा करणें. या दोन्ही व्युत्पत्ति उघडपणें कृत्रिम दिसतात, लक्षणें लक्षांत घेऊन बसविलेल्याशा दिसतात ; कारण कांहीं लेण्यांचा वापर राहण्यासाठीं करण्यांत येत असे व कांहीं लेण्यांच्या भिंतींना गिलावा करण्यांत येत असे. डोंगराच्या कड्यांत खोदून केलेलें स्थान हा या संज्ञेचा अर्थ या व्युत्पत्तींहून व्यापक आहे आणि तो या व्युत्पत्तींनीं ध्वनितही होत नाहीं.

लेण्यांचें हें वर्गीकरण पाहा :




जैनांनीं बौद्धांच्या जोडीनें लेणीं खोदण्यास सुरवात केली आणि ब्राह्मणांनीं बऱ्याच उत्तर कालांत. बौद्धांच्या लेण्यांत दिसून येणारी विविधता जैनांच्या लेण्यांत दिसत नाहीं. जैनांचीं बहुतेक सर्व लेणीं

बौद्धांच्या विहारांच्या धर्तीचीं आहेत. त्यांच्या धार्मिक विधींना स्तूपाचीं किंवा सभागृहांची जरूर नसल्यामुळें त्यांनीं बौद्धांप्रमाणें विस्तीर्ण चैत्यगृहें खोदलीं नाहींत. जैनांमध्येंही स्तूपांची प्रथा होती; पण ती त्यानीं लवकरच सोडून दिली. त्यांचीं लेणीं एकाच धर्तीचीं असल्यामुळें वरील कोष्टकात त्यांचें वर्गीकरण केलेलें नाहीं. ब्राह्मणी लेण्यांची शिल्पपद्धति बौद्धांहून अलग व स्वतंत्र असल्यामुळें त्यांचें वेगळें वर्गीकरण केलेलें आहे; मात्र या वर्गाच्या वैशिष्ट्यांची चर्चा पुढें ढकललेली आहे.

लेण्यांचे मुख्य वर्ग दोन : ऐहिक व धार्मिक. इराणांतील बहुतेक लेणीं ऐहिक आहेत. फक्त मीडियाच्या मार्गावर तख्त–इ–सुलेमान पर्वताजवळ करफ्तो येथें हेरॅक्लिसचें लेणें आहे. हा ग्रीक व रोमन लोकांचा विजयाचा देव; अर्थात् तो तद्देशीयांना परका आहे. हिंदुस्थानात ऐहिक अशीं लेणीं फारच थोडीं आहेत. महाराष्ट्रात ऐहिक लेणें एकच आहे; नाणे घाटांतील सातवाहनांचें देवकुल; देवकुल म्हणजे कीर्तिमंदिर, पूर्वजांच्या प्रतिमाचे मंदिर. महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाच्या दृष्टीनें येथील शिलालेख अत्यंत महत्त्वाचा आहे. बेहिस्तुन येथील दरायसचा लेख, अशोकाचे शिलालेख, आणि हाथीगुंफेंतील खारवेलाचा शिलालेख यांच्याइतकें या लेखाचें महत्त्व आहे. धार्मिक लेण्यांचे धर्मवार वर्ग तीन : बौद्ध, जैन व ब्राह्मणी. येथें **ब्राह्मणी** हा शब्द ब्राह्मण्याच्या अभिनिवेशानें वापरलेला नाहीं. पाश्चिमात्य विद्वानांनीं व संशोधकांनीं योजिलेल्या Brahmanical याचा प्रतिशब्द म्हणून वापरलेला आहे. या लेण्याना कांहीं संशोधकांनीं 'हिंदु' ही संज्ञा दिलेली आहे. मला ती मान्य नाहीं; कारण हिंदुस्थानात निर्माण झालेले देव, अवतार व धर्म मानतात ते हिंदु; आणि ती मान्य केली तर बौद्ध व जैन हे हिंदु नाहींत असें ध्वनित होतें, म्हणून ती स्वीकारलेली नाहीं. इतिहास, पुराणांत वर्णिलेल्या देवदेवतांच्या व त्यांच्या अवतारकृत्यांच्या प्रतिमा ज्यांवर खोदलेल्या आहेत अशा लेण्यांना अनुलक्षून 'ब्राह्मणी' ही संज्ञा योजिलेली आहे. हिंदुस्थानाप्रमाणें महाराष्ट्रांतही बहुसंख्य लेणीं बौद्ध

आहेत. हिंदुस्थानांत जैन लेण्यांचें मुख्य संच दोन आहेत : एक महाराष्ट्रांत वेरूळ येथें आणि दुसरा ओरिसांत भुवनेश्वरनजीक. ब्राह्मणी लेण्यांचे मुख्य संच महाराष्ट्रांत घारापुरी व वेरूळ येथें आणि मद्रास प्रांतांत महाबलिपुरम् येथे आहेत.

लेण्यांची बहुसंख्या सह्याद्रींत आहे आणि हिंदुस्थानांतील उत्कृष्ट लेणीं येथेंच आहेत, हें खरें असलें तरी निश्चितपणें सर्वांत प्राचीन अशीं लेणीं बिहार प्रांतांत, गया जिल्ह्यांत, राजगृहानजीक बराबर व नागार्जुनी पर्वतांत आहेत; तीं तेथें सातघर या नांवानें ओळखलीं जातात. हीं लेणीं ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या उत्तरार्धांत खोदलेलीं आहेत. मौर्यकालीन शिल्पकृत्यांना विशिष्ट असलेली वज्रलेप जिल्हई त्यांच्या भिंतींवर चढविलेली आहे. या जिल्हईची प्रक्रिया संशोधकांना अद्याप सांपडलेली नाहीं. बराबर पर्वतावरील लेण्यांपैकीं सुदाम व लोमश हीं लेणीं विशेष प्रसिद्ध व महत्त्वाचीं आहेत; प्राचीन इतिहासाच्या दृष्टीनें व शिल्पाच्याही. सुदाम ऊर्फ न्यग्रोध लेण्यांत अशोकाच्या राजवटीच्या बाराव्या वर्षींचा शिलालेख आहे. या लेखाच्या अन्वयें त्यानें हें लेणें आजीवक पंथाला अर्पण केलेलें आहे. अशोकाचा नातू दशरथ याचे लेख नागार्जुनी पर्वतातील लेण्यांत खोदलेले आहेत. या लेण्यांची खोदाई वैशिष्ट्यपूर्ण आहे. सुदाम लेण्याचा आकार गोल आहे आणि लोमश लेण्याची दर्शनी कमान स्तूपाच्या आकाराची आहे. कालमानानुसार लेण्यांचे तीन **कालवर्ग** कल्पिण्यांत आलेले आहेत. ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकापासून ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या अखेरीपर्यंत; पांचव्या शतकाच्या मध्यापासून सातव्या शतकाच्या मध्यापर्यंत; आणि सातव्या शतकाच्या उत्तरार्धापासून दहाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत. या कालखण्डांचा मुकाबला हिंदुस्थानच्या राजकीय इतिहासाशीं जुळता आहे. ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या अखेरीस अशोकाच्या मृत्यूमुळें व मौर्य सत्तेच्या ऱ्हासामुळें बौद्धांचा राजाश्रय एकाएकीं तुटला आणि धर्मचक्राचें प्रवर्तन कांहीं काळपर्यंत स्थगित झालें. नव्या परिस्थितींत बौद्ध धर्मप्रचारकांनीं ठिकठिकाणीं स्थानिक राज्यकर्त्यांचा, धनिक वैश्यांचा व स्थायिक परकीयांचा आश्रय

मिळवून धर्मप्रचाराचें कार्य फिरून सुरू केलें. त्याच्या या कार्याचा मुकाबला सातवाहनांच्या अमदानीशीं जुळतो. सातवाहन सत्तेच्या अस्तापासून महाराष्ट्रांत चालुक्याची सत्ता प्रस्थापित होईपर्यंतच्या काळांत लेण्यांची फारशी निर्मिति झाली नाहीं. कारणें, प्रबल केंद्रवर्ती सत्तेचा अभाव, राजकीय अस्थैर्य व आर्थिक दौर्बल्य. बौद्ध धर्माच्या **हीनयान** व **महायान** या दोन प्रमुख पंथांच्या श्रद्धांचा परिणाम लेण्यांच्या शिल्पपद्धतीवर झालेला असल्यामुळें त्यांच्या अनुरोधानेंही लेण्यांचें वर्गीकरण करण्यांत येते. वर निर्दिष्ट केलेल्या पाहिल्या कालखंडांत निर्माण झालेलीं लेणीं हीनयान पंथाचीं आहेत. या लेण्यांत बुद्धाच्या मूर्ति आढळत नाहींत ; कारण या काळांत बुद्धाला देवत्व प्राप्त झालेलें नव्हतें. भाजें, कोंडाणें, पितळखोरें, अजंठा (क्र. १०), बेडसें, अजंठा, (क्र. ९), नाशिक व कार्लें हीं लेणीं हीनयान पंथाचीं असून तीं बहुधा याच अनुक्रमानें खोदण्यांत आलेलीं असावींत. कार्लें हें या लेण्यांचें केंद्र. येथील देवडीवर बुद्धाची मूर्ति आहे, ती निःसंशय उत्तरकालीन व महायान धर्तीची आहे. कुषाण सम्राट् कनिष्क (१२३ ते १५३ ई.) यानें बुद्धधर्माचा स्वीकार केला आणि महायान पंथाचा पुरस्कार केला. नागार्जुनानें या पंथाचा प्रसार केला. सप्तसिंधूंच्या प्रदेशांत व गांधार प्रांतांत अशोकाचें राज्य होतें. मौर्य सत्तेचा ऱ्हास झाल्यानंतर हा भाग ग्रीक यवनांच्या ताब्यांत गेला. अनेक देव-देवतांना मान्यता देणाऱ्या व त्यांची पूजा-अर्चा करणाऱ्या मूर्तिपूजक ग्रीकांच्या सहवासामुळें या भागांतील बौद्धांनीं अनेक देवदेवता निर्माण केल्या व त्यांना मूर्त स्वरूप दिलें. ब्राह्मणी अवतार-कल्पनेचा मूल-संस्कार त्यांच्या मनावर होताच ; त्याच्या अनुरोधानें त्यांनीं बुद्धाला देवत्व दिलें आणि ब्राह्मणी धर्मातील अनेक देवदेवतांचा स्वीकार केला व सोयीनुसार त्यांचें परिवर्तनही केलें. कनिष्काच्या राज्याचा गाभा याच प्रदेशांत होता. पुरुषपुर (पेशावर) ही त्याची राजधानी. बौद्ध धर्माच्या पुनर्घटनेसाठीं अश्वघोष व वसुमित्र या विद्वानांच्या अध्यक्षतेखालीं त्यानें काश्मीरांत कनिष्कपूर येथें पांचशें विख्यात बौद्ध धर्मगुरूंची महासभा भरविली, या सभेचे निर्णय ताम्रपटांवर खोदवून घेतले

आणि ते सुरक्षित रहावे म्हणून त्यांवर स्तूप उभारला. या स्तूपाचा मागमूसही अद्याप लागलेला नाहीं; हे भूमिगत अवशेष कोणत्या सुदैवी संशोधकाची वाट पहात आहेत कोण जाणे! या महासभेपासून महायान पंथाचा प्रारंभ झाला, बौद्ध धर्मांत मूर्तिपूजेचा प्रवेश झाला, कर्मकाण्डाची सुरवात झाली. रोमन बादशहा कॉन्स्टन्टाइन् दि ग्रेट (राज्यकाल ३०६ ते ३३७ ई.) यानें जाहीरपणें ख्रिस्ती धर्माचा स्वीकार व पुरस्कार करून त्याला युरोप खण्डांत प्रामुख्य प्राप्त करून दिलें. पुढें पोप ग्रेगरी दि ग्रेट (अधिकारकाल ५९० ते ६०४ ई.) यानें ख्रिश्चन धर्माची पुनर्घटना केली. यामुळें ख्रिस्ती धर्मांत मूर्तिपूजेचा प्रवेश झाला, कर्मकाण्डाचें महत्त्व वाढलें. धर्मदृष्टीनें व कालदृष्टीनें ख्रिस्ती धर्माच्या उत्क्रांतींत यांचीं जीं स्थानें तींच बौद्ध धर्माच्या बाबतींत अशोक व कनिष्क यांचीं. कनिष्क व ग्रेगरी यांच्या कार्यामुळें मूळ धर्माची अवनति झाली असें कोणी प्रतिपादन करतात तर कोणी त्यांच्या कर्तृत्वामुळें झालेल्या धर्मप्रसारावर भर देतात. महायान पंथानें पुरस्कृत केलेल्या अनेक बौद्ध देवदेवतांच्या विशिष्ट धर्तीच्या मूर्ति गांधार प्रांतांत उपलब्ध झालेल्या आहेत. हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवर बौद्ध धर्माला वेगळें वळण मिळत होतें त्याच वेळीं पतंजलीच्या प्रेरणेनें आर्यावर्तांत शुंगांच्या आणि महाराष्ट्रांत सातवाहनांच्या नेतृत्वाखालीं वैदिक धर्माच्या पुनरुद्धाराची तयारी चालली होती. गुप्त कालांत (३२० ते ४५५ ई.) वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन होऊन त्याला पौराणिक ब्राह्मणी धर्माचें स्वरूप प्राप्त झालें. गुप्त काळांत हिंदुस्थानांत शांतता, सुबत्ता व सहिष्णुता नांदत होती. या काळांत उत्तर हिंदुस्थानांत सांस्कृतिक संघटन झालें आणि वाकाटकांच्या मार्फत या घटनेचे पडसाद महाराष्ट्रांत उमटले. चंद्रगुप्त विक्रमादित्य (३८० ते ४१५ ई) याची कन्या प्रभावतीगुप्ता ही रुद्रसेन (दुसरा) वाकाटकाची (३८५ ते ३९० ई.) पट्टराणी. या संबंधामुळें दक्षिणापथांतही सांस्कृतिक पुनरुज्जीवन झालें. या अनुकूल परिस्थितींत बौद्धांनींही उचल घेतली आणि मध्यंतरीं खण्डित झालेलें शिल्पकार्य फिरून सुरू केलें. या काळांत महाराष्ट्रांत

निर्माण झालेल्या लेण्यांवर महायान पंथाचें व शिल्पपद्धतींचें प्रभुत्व (४५० ते ६५० ई.) दिसून येतें. या काळांतील या धर्तीची लेणीं मुख्यत्वेंकरून अजंटा, वेरूळ व औरंगाबाद या केंद्रांच्या परिसरांत आढळतात. **सामान्य, सशिल्प** व **सचित्र** असेंही लेण्यांचें वर्गीकरण त्यांवरील अलंकारांच्या अनुरोधानें करण्यांत आलेलें आहे. अजंटा हें सचित्र लेण्यांचें अग्रस्थान. छत्तीसगड स्टेट एजन्सीमधील सुरगुजा संस्थानांत रामगड पर्वतावर जोगीमारा लेणीं आहेत. हें सचित्र लेण्यांचें आद्यस्थान. या लेण्यांतील चित्रें ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकांत रंगविण्यांत आलीं असलीं पाहिजेत असा संशोधकांचा अंदाज आहे. महाराष्ट्रांतील अनेक लेण्यांत चित्राचे अवशेष आढळलेले आहेत. लेणीं रंगविण्याची प्रथा सार्वत्रिक होती असें यावरून अनुमान करतां येतें. आतां उघड्या दिसणाऱ्या मूर्तींवरही पूर्वी पातळ गिलावा करून त्या रंगविण्यांत आलेल्या असाव्यात असें अनुमान करण्यास जागा आहे.

**चैत्य, स्तूप** व **दागोबा** या संज्ञा संलग्न आहेत. त्यांचा वापर ढिलाईनें करण्यात येतो. चैत्य व स्तूप आणि चैत्य व चैत्यगृह हे शब्द समानार्थी म्हणून ही वापरण्यांत येतात. या संज्ञांतील भेद ध्यानांत येण्यासाठीं त्यांचे अर्थ देतों. महाराष्ट्र शब्दकोशांतील अर्थ पहा. चैत्य : बौद्धांनीं कोरलेल्या लेण्यांतील मोठें दालन, यांत स्तूप असतो [ सं.चैत्य ]. स्तूप : बुद्धाच्या अवशेषांवर बांधलेली एक विशिष्ट आकाराची इमारत [ सं. स्तूप : ढीग घालणें. ]. दागोबा = ( बुद्धाचा ) स्तूप, दांत, इ. अवयव पुरून त्यावर उभारलेला खांब, मनोरा, समाधि, इमारत, स्मारक [ पाली. डाबग ]. चैत्य या शब्दाचे अनेक अर्थ इतरत्र आढळतात : चैत्य म्हणजे वेदी (altar), देवालय, सभागृह, यक्षस्थान, यज्ञस्थान, समाधि, स्मारक, पूजा–प्रतीक ( symbol ), पिंपळपार. या शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल विद्वानांचें एकमत नाहीं. ‘ चि ’ = आच्छादणें, जमविणें, बांधणें ; ‘ चित् ’ = ध्यान, विचार; ‘ चित ’ = जमविलेलें, झाकलेलें; ‘ चिता ’ = मृत देहाला अग्नि देण्याकरितां त्याभोंवतीं रचलेला किंवा प्रज्वलित केलेला सरपणाचा ढीग. कनिंगहॅम् व कुमारस्वामी यांना चित् ही व्युत्पत्ति

मान्य आहे. कनिंगहॅम् यांचा निष्कर्ष आहे कीं चैत्य ही संज्ञा पूजा-प्रतीकाची द्योतक आहे, मग ही वस्तु जडदेहाचा अवशेष असो, किंवा चिता भस्माची चिमूट असो, पूज्य व्यक्तीच्या वापरांतील वस्तु असो अगर अशा व्यक्तीची मूर्ति असो, अथवा धर्मचक्र वा त्रिरत्न यासारखें प्रतीक असो. बर्गेस हे चैत्याचा संबंध चितेशीं व पर्यायानें मृत व्यक्तीच्या स्मारकाशीं जोडतात.

चैत्यांचा संबंध बुद्धाशीं व अशोकाशीं जोडण्यांत येतो. ठोकळ मानानें हें विधान बरोबर आहे. बुद्धपूर्वकालांतही चैत्य अस्तित्वांत होते. आश्वलायन गृह्यसूत्रांत चैत्याच्या सन्मानार्थ करण्यांत आलेल्या यज्ञाचा उल्लेख आहे. बुद्ध-पूर्वकालात चिताभस्मावर उभारलेल्या वारुळांना व यक्ष-स्थानांना चैत्य अशी संज्ञा देण्यांत येत असे. हीं यक्षस्थाने शहराबाहेर, दैनिक दर्शनाच्या आटोक्यांत असत; वेशीजवळ, तळ्याचे पाळीं, नदीवरील घाटाजवळ, पिंपळपारावर अगर शेजारच्या टेंकडीवर. चैत्य, वृक्ष व पार हीं यक्षस्थानें; हीं सामान्य जनांचीं पूजास्थानें बौद्धांनीं आत्मसात् केलीं. चैत्यांना सन्मान द्यावा आणि रिवाजाप्रमाणें दानें द्यावींत अशी आज्ञा खुद्द बुद्धानें वैशालीच्या रहिवाशाना दिलेली होती. बौद्धाप्रमाणेंच प्राचीन जैनांनींही स्तूप उभारले होते हें निश्चित. व्हिन्सेंट स्मिथ याना मथुरा येथील उत्खननांत कुषाणकालीन जैन स्तूप उपलब्ध झालेला आहे; मात्र तो अद्वितीय आहे. स्तूप उभारण्याचे बाबतींत जैनांनीं बौद्धांचें अनुकरण केलेलें असावें आणि पुढें ही प्रथा आपल्या धर्म-तत्त्वांशीं जुळत नाहीं असें निदर्शनास आल्यानंतर त्यांनीं ती सोडून दिलेली असली पाहिजे, असें दिसतें.

निर्वाणानंतर बुद्धाच्या देहाला अग्नि देण्यांत आला तेव्हां ह्या संस्काराच्या दर्शनासाठीं व धर्मगुरूच्या चितेंत राहतील ते अवशेष पूजनाकरितां हस्तगत करण्यासाठीं अनेक राजे व जमातींचे पुढारी आपआपल्या अनुयायांसह स्मशानांत जमले होते. अवशेषांच्या प्राप्ती-साठीं जरूर तर युद्ध करण्याच्या तयारीनें हे जमले होते. विझलेल्या चितेंतील अवशेष गोळा करण्यांत आल्यानंतर त्यांच्या वांटणीचें प्रकरण हातघाईवर येणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं, तेव्हां तेथें उपस्थित

असलेल्या एका ब्राह्मणानें मध्यस्थी करून सर्वांना शांत केलें. सर्वांच्या संमतीनें त्यानें अवशेष व भस्म हीं एकत्रित केलीं आणि त्यांवर हक्क सांगणाऱ्या आठ जमातींना तीं सम प्रमाणांत वाटून दिलीं. या अवशेषांपैकीं एक दांत त्यानें चोरला व तो आपल्या पागोड्यांत लपविला असाही आरोप बिचाऱ्यावर करण्यांत आलेला आहे. या ब्राह्मणानें अवशेषांची वांटणी एका सुवर्णपात्रांतून केली. तें त्यानें ठेवून घेतलें आणि त्यावर एक स्तूप उभारला. ज्यांना अवशेष मिळाले त्यांनीं ते आपल्या मुलखांत नेले आणि ते सुरक्षित रहावे व त्यांची पूजाअर्चा होत रहावी म्हणून त्यांवर आपआपल्या कुवतींप्रमाणें लहानमोठे स्तूप उभारले. मगध सम्राट् अजातशत्रु याच्या कारकीर्दींत ( खि. पू. ५५४ ते ५२७ ) बुद्ध निर्वाण ( खि. पू. ५४३ ) झालें. त्यानें बुद्धाच्या चिताभस्मावर स्तूप उभारला होता अशी आख्यायिका आहे. बुद्धाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीच्या पार्थिव अवशेषांना एवढा मान मिळालेला नाहीं. मानवदेहाच्या अवशेषांची पूजा प्राचीन इतिहासाला अज्ञात आहे. ईजिप्त, असीरिया, बाबीलोन, ग्रीस, रोम यांपैकीं कोणत्याही प्राचीन सुसंस्कृत देशांत ती आढळत नाहीं. यावरून वाटतें कीं ही प्रथा हिंदुस्थानांतील बहुजनसमाजांत, आर्य संस्कृतीपासून अलिप्त असलेल्या जमातींत पूर्वीपासून अस्तित्वांत असली पाहिजे. प्ल्यूटार्क सांगतो कीं हिंदुस्थानचा ग्रीक राजा मीनँडर याचे अवशेष असेच आठ शहरांच्या रहिवाशांनीं वांटून घेतले होते ; पण त्यांची पूजा-अर्चा होत असे असें तो सांगत नाहीं. मीनँडरनें बौद्ध धर्माचा स्वीकार केला होता. उत्तरकालीन बौद्ध-वाङ्मयांतील विख्यात मिलिंद तो हाच. राजाश्रयासाठीं हपापलेल्या बौद्धांनीं याचा फार उदो उदो केलेला आहे. पार्थिव देहाच्या अगर वापरत्या वस्तूंच्या अवशेषांना **धातु** व त्यांवर उभारलेल्या स्तूपांना **धातुगर्भ** अशा संज्ञा आहेत. **दागोबा** ( Dagoba, Dagaba ) हें धातुगर्भ शब्दाचें सिंहली स्वरूप आणि **टोपे** ( Tope ) हा थूप ( सं. स्तूप ) या प्राकृत शब्दाचा इंग्रजी अपभ्रंश. इंग्रजी लिखाणांत टोपे ही संज्ञा बहुशः मैदानी बांधीव

स्तूपांना आणि दागोबा ही लेण्यांतील डोंगरी खोदीव स्तूपांना अनुलक्षून वापरण्यांत येते.

बौद्ध धर्माच्या स्वीकारानंतर अशोकानें धर्मप्रसाराच्या अनेक योजना अमलांत आणल्या. बुद्धाचे मूळ अवशेष ज्यांना मिळाले होते त्यांच्या राज्यांवर स्वाऱ्या करून व तेथलि अनेक स्तूप उघडून त्यानें हे अवशेष एकत्रित केले. रामग्राम येथील नागांचा सशस्त्र खडा पहारा असलेल्या स्तूपांतील अवशेष मात्र त्याला मिळूं शकले नाहींत. अशोकानें या अवशेषांची पुनर्विभागणी केली आणि त्यावर व बुद्धाच्या जीवनाशीं वा धर्माशीं संलग्न असलेल्या स्थानांवर चौऱ्यांशीं हजार स्तूप उभारविले अशी आख्यायिका आहे. त्याच्या धर्माधिकाऱ्यांनीं राज्यांत संचार करून स्तूप उभारण्याची प्राथमिक योजना निश्चित केली. ज्या गांवाची एकत्रित संपत्ति एक लक्ष सुवर्णमुद्रांहून अधिक आहे तेथें तेथें स्तूप उभारण्यांत यावा, प्रत्येक स्तूपासाठीं एका करंडकांतून बुद्धाच्या संकलित अवशेषांपैकीं चिमूटभर अंश देण्यात यावा आणि या सर्व स्तूपांमध्यें या अवशेष करंडकांची स्थापना एकाच मुहूर्तावर करण्यात यावी, अशी त्याची योजना होती. ती त्यानें यशस्वी केली. यासाठीं त्याला केवढी संघटना करावी लागली असेल याची आतां ही नीटशी कल्पना करतां येत नाहीं. त्यानें जेवढे स्तूप उभारले तेवढीं झाडेंही आम्हांला लावतां आलीं नाहींत! अशोकाच्या योजनेला मूर्तस्वरूप प्राप्त झालें तेव्हांपासून स्तूप हें बौद्ध धर्माचें प्रतीक मानण्यांत येऊं लागलें. अशोकाच्या योजनेपैकीं पांच अवशेष करण्डक महाराष्ट्राच्या वांट्याला आले होते आणि त्यांवर तेथें स्तूप उभारण्यांत आले होते, असें युआन च्वंगनें नमूद केलेलें आहे. सोपारा येथील एका स्तूपाचें उत्खनन पण्डित भगवानलाल इंद्रजी यांनीं केलें, तेव्हां त्यांना एका सुवर्ण करण्डकांत मृत्तिकापात्राचे तुकडे मिळाले. प्रस्तर, ताम्र, रजत, स्फटिक व सुवर्ण यांचीं पात्रें एकांत दुसरें अशीं ठेवलेलीं होतीं. ताम्रपात्रांत छोट्या बुद्धमूर्ति, रजतपात्रांत सुवर्णपुष्पें आणि श्री यज्ञ सातकर्णी याची एक अद्वितीय रजतमुद्रा आणि सुवर्णपात्रांत हिरकणी व पाच हीं रत्नेंही त्याना आढळलीं. सुवर्णपात्रांतील मृत्तिकापात्राचे

हे तुकडे गौतम बुद्धाच्या भिक्षापात्राचे असावेत असें त्यांचें अनुमान आहे. सोपारा येथें अशोकाचें त्रुटित शिलाशासन उपलब्ध झालेलें आहे. बौद्ध धर्मांच्या आद्य कालखण्डांतील या स्थानाचें ऐतिहासिक महत्त्व अनेक प्रमाणांनीं सिद्ध होत असल्यामुळें हा स्तूप अशोकाच्या योजनेच्या अंगीं लावावयास फारशी हरकत नाहीं. कोल्हापूर नजीकच्या ब्रह्मगिरी टेंकडीवर उत्खनन झालें तेव्हां तथेंही एक प्रस्तर-करण्डक मिळाला. त्यांतील अवशेष मात्र गैरमाहितगारांच्या निष्काळजीपणामुळें नष्ट झाले. येथेंच सातवाहनांची व समकालीन अशीं अनेक नाणीं मिळालेलीं आहेत. प्राचीन परदेशी प्रवाशांनीं उल्लेखिलेल्या हिप्पोकुर या शहराची कोल्हापुराशीं ओळख पटविण्यांत आलेली आहे. नळदुर्ग जिल्ह्यांत तेर येथे एक बांधीव स्तूपाकार मंदिर आढललेले असून तें अद्याप अस्तित्वांत आहे. त्याच्या विटा फार मोठ्या (१७" × ९" × ३") असल्यामुळें हें बांधकाम शकपूर्वकालीन असावें असा अंदाज आहे. सातवाहन कालांत तगर या नगराचा उल्लेख व्यापारी शहर म्हणून अनेकांनीं केलेला आहे. कान्हेरीच्या लेण्यांत अनेक बांधीव स्तूप होते. यांपैकीं एक स्तूप डॉ. बर्ड यांनीं १८३९ सालीं उघडला तेव्हां त्यांत त्यांना एक सुवर्ण करंडक मिळाला; त्यांत जीर्ण वस्त्राचा एक तुकडा होता असें त्यानीं नमूद करून ठेवलें आहे. महाराष्ट्रांतील सर्वांत प्राचीन लेणीं कार्लें, जुन्नर, नाशिक व अजंटा याच्या परिसरांत आहेत. या भागांत अशोककालीन अवशेष आढळणें संभवनीय आहे. लोणावळें हें नांव त्याभोंवतीं असलेल्या लेण्यांच्या रांगावरून पडलेलें असावें असें वाटतें. मळवली व लोणावळें यांच्या दरम्यान, इंद्रायणीच्या खोऱ्यांत, गर्द झाडी असलेली एक टेंकडी आहे. आजूबाजूच्या सपाट प्रदेशांत ती इतकी उठून दिसते व भोंवतालच्या नैसर्गीक परिस्थितीच्या मानानें एवढी वेगळी दिसते कीं या टेंकडीवर एखाद्या प्राचीन स्तूपाचे अवशेष आढळावे असें मला राहून राहून वाटतें. केवळ कल्पना; पुरावा कांहींही नाहीं.

स्तूपाचा आकार वर्तुलाकार, ढोलावर नगारा उपडा ठेवावा तसा असतो. त्यांना हा आकार कां देण्यांत आला याचा उलगडा होत नाहीं.

गोळा केलेल्या चिताभस्माचा ढीग या आकाराचा करण्याची पद्धत त्या काळीं प्रचलित असावी आणि त्या नमुन्यावरून हा आकार ठरविण्यांत आलेला असावा असें वाटतें. या आकाराचीं घरें त्या काळीं अस्तित्वांत होतीं, त्यांवरून हा आकार घेतलेला असावा, असा कांहीं संशोधकांचा अंदाज आहे; पण तो पटत नाहीं. स्तूपाचा आकार पालथ्या भिक्षापात्रासारखा असावा असें बुद्धाचें वचन आहे. जमिनीलगत वर्तुलाकार बैठक, तीवर अण्डाकृति घुमट, त्यावर चौकोनी हर्मिका आणि टोंकावर छत्र, अशी स्तूपाची उभारणी असते. स्तूपांभोंवतीं प्रदक्षिणापथ असतो. मैदानी स्तूपांच्या बैठकीच्या कडेवर, अण्डाभोंवतीं आणखी एक प्रदक्षिणापथ असे; अशा पथावर चढण्यासाठीं जिन्यांची सोय केलेली असे. प्रदक्षिणापथाभोंवतीं दगडी कठडा असे. याचें नांव **वेदिका.** वेदिकेचा आकार आंतील स्तूपासारखा असे. बुद्धगया येथील अशोककालीन वेदिका चौकोनी आहे, कारण आंतील मंदिरही चौकोनी आहे. भरहूत येथील शुंगकालीन वेदिका वर्तुलाकार असून तिचा परीघ सुमारें पावणेतीनशें फूट लांबीचा आहे. या वेदिकेला चार महाद्वारें आहेत. स्तूप चवाठ्यावर उभारावा, निदान तिवाठ्यावर, अशी बुद्धाची आज्ञा आहे; म्हणून वेदिकेला चार दरवाजे ठेवलेले असतात आणि चैत्यगृहांना तीन. भरहूत येथील वेदिकेचे अवशेष कलकत्त्याच्या अजबघरांत मांडून ठेवलेले आहेत. या वेदिकेच्या पूर्वेकडील महाद्वारावर तोरण उभारलेलें होतें; तें उध्वस्त झालेलें आहे. सांची येथील महास्तूपाभोंवतालच्या वेदिकेला चारी दिशांना महाद्वारें व तोरणें आहेत. हीं तोरणें चौतीस फूट उंचीचीं आहेत. या एका मापावरून त्यांच्या प्रचण्ड आकाराची कल्पना करतां येईल. यांपैकीं उत्तरेकडील तोरणावरील नक्षी व मूर्ति अत्यंत प्रेक्षणीय आहेत. दक्षिण तोरणही याच्या तोडीचें असून हें सातकर्णीच्या कारकीर्दींत उभारलेलें आहे. स्तूपाच्या बैठकीवर चढण्याचा जिना समोर असल्यामुळें हेंच मुख्य महाद्वार होय. पुराणांतील आंध्र किंवा सातवाहन राजांच्या वंशावळींत अनेक सातकर्णी आहेत. यांपैकीं सांची तोरणाचा कर्ता कोणता याबद्दल वाद आहे. सातवाहन हे दक्षिणापथाचे सम्राट; त्यानीं या

स्तूपाचे दक्षिण तोरण उभारावें हें युक्तच आहे. अशाच कांहीं योजने-नुसार हीं तोरणें त्या त्या दिशांच्या अधिपतींनीं उभारलेलीं असावींत असा माझा कयास आहे. या चार तोरणांच्या उभारणीचें काम कमींत कमी पन्नास वर्षेपर्यंत चाललें असलें पाहिजे. अमरावती येथील स्तूपाभोंवतालची वेदिका हिंदुस्थानांतील शिल्पकृत्यांत अग्रगण्य आहे. या सर्व वेदिकांवर अतिशय सुंदर व प्रमाणबद्ध मूर्ति खोदलेल्या आहेत आणि प्रेक्षणीय नक्षीकाम केलेलें आहे. त्यांवर आणि स्तूपाभोंवतालीं लावलेल्या लाद्यांवर समकालीन व जातककथातील प्रसंग खोदलेले आहेत. तत्कालीन परिस्थितीचीं हीं प्रात्यक्षिकें ऐतिहासिक दृष्टयाही अत्यंत महत्त्वाचीं आहेत. ज्या अवशेष करंडकांवर स्तूप उभारण्यांत येत ते साधारणतः त्यांच्या बैठकीच्या मध्यभागीं पुरून ठेवण्यांत येत. कांहीं स्तूपांमध्यें हे करंडक आणि धनिक भक्तांनीं अर्पण केलेल्या मौल्यवान् वस्तूंचे करंडक अण्डाच्या मध्यभागीं आणि इतरत्रही ठेवलेले आढळले आहेत. कुषाण सम्राट् कनिष्क यानें गौतम बुद्धाचें एक भिक्षापात्र मिळवून त्यावर पेशावर येथें एक प्रचंड व उत्तुंग स्तूप उभारला होता. दैनिक पूजेच्या वेळीं भक्तजनाना या भिक्षापात्राचें दर्शन होत असे असें फा हिआन यानें नमूद करून ठेवलें आहे. दुसऱ्या कोणत्याही स्तूपामध्यें अशी तजवीज केलेली आढळलेली नाहीं. कांहीं स्तूपांवर वेगवेगळ्या कालखण्डांत एकावर एक अशीं आवरणें चढविलेलीं आहेत. नव्या स्तूपांची उभारणी करण्याप्रमाणेंच अस्तित्वांत असलेल्या स्तूपांची डागडुजी करणें व त्यांवर आच्छादन, अलंकार चढविणें हेंही पुण्यकृत्य मानण्यांत येत असे. सांची स्तूपांवरील अखेरचें आच्छादन खि. पू. पहिल्या शतकांतील आहे. स्तूपांमध्यें पुरलेल्या अवशेषांचें व वस्तूंचें मौल्य वस्तुस्थितीपेक्षां आख्यायिकांमध्येंच अधिक असतें. यामुळें अशा भूमिगत संपत्तीसाठीं चोरट्यांनीं अनेक स्तूप उध्वस्त केलेले आहेत. त्यांनींही केला नाहीं एवढा विध्वंस पाश्चिमात्य संशोधकांनीं केलेला आहे; कारण चोरांचें काम चोरटेपणीं चालावयाचें आणि यांचें राजरोस, राजाश्रयाखालीं आणि संशोधनाच्या सबबीवर! सांची येथील स्तूपानजीक अशोक-

कालीन सिंहस्तंभ आहे. अवशेष करंडक आणि अण्डाभोंवतालचा प्रदक्षिणापथ यांव्यतिरिक्त स्तूपांचीं सर्व वैशिष्ट्यें लेण्यांतील चैत्यांत आढळून येतात. काहीं खोदीव स्तूपांच्या बैठकींत व हर्मिकेंत आढळून आलेल्या खोबणींवरून अनुमान करण्यांत आलेलें आहे कीं त्यांमध्यें कधीं काळीं पवित्र अवशेष ठेवण्यांत आलेले असावेत.

हिंदुस्थानांतील सर्वांत प्राचीन लेणीं वर्तुलाकार आहेत; जणुं स्तूपासाठीं एखादा सांचा करावा अशा आकाराचीं आहेत. सुदाम, लोमश व गुंतुपल्ली येथील लेणीं वर्तुलाकार आहेत व त्यांचे घुमट अर्धवर्तुलाकार. कोंडिवटें येथील लेणें वर्तुलाकार आहे, मात्र त्याचें छत सपाट आहे. यांपैकीं कोणत्याही लेण्यांत खोदीव स्तूप नाहींत, बांधीव असावेत असा अंदाज आहे व ते नष्ट झालेले आहेत. ब्राह्मणी देवळांत गाभाऱ्यानजीक सभामंडप असतो, त्याप्रमाणें या वर्तुलाकार लेण्यांलगत चौकोनी दर्शनी लेणीं खोदलेलीं आहेत. सुदामनजीकच्या दर्शनी लेण्याची रचना कोल्हाटी किंवा तोडा अशा आदिवासी जातींच्या लोकांच्या बांबूच्या झोंपड्यांसारखी अर्धवर्तुलाकार आहे. लोमशनजीकच्या लेण्याची मांडणी गवताच्या गंजीसारखी किंवा दुपाखी पडळीसारखी आहे. त्याचा दर्शनी भाग बंदिस्त असून त्यावर सुतारी किंवा बुरुडी कामाच्या धर्तीच्या व स्तूपाच्या आकाराच्या कमानी खोदलेल्या आहेत. या लेण्याचें हें वैशिष्ट्य अद्वितीय आहे. हीं लेणीं खोदून झाल्यानतर सुमारें शंभर वर्षांनीं सह्याद्रींत लेणीं खोदण्यास सुरवात झाली; प्रथम विहार आणि नंतर चैत्यगृहें. येथील शिल्पकारांनीं बौद्ध चैत्यगृहांचा आकार एकदां निश्चित केला, एकादा अपवाद सोडून त्यानीं तो बदलला नाहीं. दीर्घचतुरस्त्र दालनाला जोडलेला अर्धवर्तुलाकार गाभारा, गाभाऱ्यांत स्तूप, दालनाच्या दोहों बाजूंना व स्तूपाच्या पिछाडीनें प्रदक्षिणापथ, प्रदक्षिणापथाच्या आंतल्या अंगाला स्तंभांची रांग आणि अर्धवर्तुलाकार छत, अशी या चैत्यगृहांची मांडणी असते. अर्धवर्तुलाकार छत हें हिंदुस्थानचें वैशिष्ट्य आहे. अजंटा क्र. ९ या चैत्याच्या गाभाऱ्याची पिछाडी वर्तुलाकार नाहीं; आणि जुन्नर येथें एक वर्तुलाकार चैत्यगृह आहे; एवढेच या मांडणीला अपवाद. सह्याद्रींतील लेण्यांमध्यें कालमानानें आद्यस्थान कोंडाणें येथील चैत्याला दिलें पाहिजे

आणि शिल्पकौशल्याच्या दृष्टीनें अग्रस्थान कार्लें येथील चैत्याला. प्रवेश-द्वारावरील पिंपळपानाच्या किंवा नालाच्या आकाराचें गवाक्ष, हें महाराष्ट्रांतील लेण्यांचें वैशिष्ट्य. कोंडाणें येथील लेण्यांत अशी कमान प्रथम खोदण्यांत आली. भाजाच्या कमानींची ढब लोमश लेण्याच्या कमानीपेक्षां आकर्षक आहे, पण ती कार्ल्यांच्या कमानीइतकी डौलदार नाहीं. हा डौल साधण्यासाठीं येथील कारागिरांना कमींत कमी दोनशें वर्षें खोदकाम करावें लागलेलें आहे. उत्तरकालीन लेण्यांमध्यें या गवाक्षाचा आकार कमी कमी होत गेलेला आहे. भाजें येथील लेण्याच्या भिंती व त्यांतील खांब वरच्या अंगाला थोडे कलते आहेत. छताचा दाब बाहेरच्या बाजूला असावा आणि खांब कलते ठेवले तरच ते असा दाब तोलूं शकतील. या कल्पनेनें ही योजना हेतुपुरस्सर केलेली दिसते. पुरेसा अनुभव आल्यावर शिल्पकारांनीं हा विफल कल सोडून दिला. कार्लें येथील लेण्यांत तो मुळींच दिसत नाहीं. भाजें येथील लेण्यांतील खांब अष्टकोनी व साधे आहेत. कार्लें येथील अष्टकोनी खांबांना कंगोरेदार चौकोनी बैठक असून त्यांचीं अग्रें लोट्याच्या आकाराचीं आहेत. शिवाय त्यांच्या ऊर्ध्वाग्रावर हत्तींवर अधिष्ठित झालेलीं जोडपीं खोदलेलीं आहेत. हें काम परकीय शिल्पकारांचें असावें असा कांहीं संशोधकांनीं तर्क केलेला आहे. कार्लें येथील चैत्यासमोर दगडी खोदीव जवनिका आहे आणि तीवर मूर्ति खोदलेल्या आहेत. भाज्यासारख्या आतां उघड्या दिसणाऱ्या इतर लेण्यांच्या पुरोभागीं उन्हापावसापासून संरक्षणासाठीं लांकडी जवनिका (Screen) बसविलेल्या असल्याच पाहिजेत, असें तेथील खोबणींवरून दिसतें. दगड तोडून काढावयाचा आणि मग लांकडी पडदा उभारावयाचा, या यातायातीपेक्षां दगडी जवनिका कां ठेवूं नये, अशा विचारानें कार्लें येथील लेण्यांत ही सुधारणा करण्यांत आलेली असावी. सांची स्तूपा-प्रमाणें कार्लें व कान्हेरी येथील लेण्यांसमोर सिंहस्तंभ खोदलेले आहेत. हीनयान कालखण्डांत खोदलेल्या लेण्यांच्या पुरोभागावर वेदिका, व गवाक्षें खोदलेलीं आढळतात. चौथ्या शतकाच्या सुमारास महायान पंथाचा महाराष्ट्रांत प्रवेश झाला; त्याचा परिणाम चैत्यगृहांच्या मांडणीवर फारसा झाला नाहीं; या पंथाला संमत असलेल्या मूर्तिपूजेमुळें खुद्द स्तूपाची उभारणी मात्र बदलली आणि विहार मूर्तींनीं अलंकृत झाले.

मैदानी बांधीव स्तूपांसारखीच लेण्यांतील स्तूपांची रचना असते. खि. पू. दुसऱ्या शतकांतील खोदीव स्तूपांची बैठक मजबूत व खडी असते आणि अण्ड अर्धवर्तुलाकार असतें; अण्डाच्या मानानें हर्मिका फार मोठी असते. पहिल्या शतकाचे सुमारास बैठकीच्या कडा बाहेरल्या अंगानें कललेल्या दिसतात आणि दुसऱ्या शतकाचे सुमारास अण्डाचा आकार अर्धवर्तुलाहून अधिक झालेला आढळतो. पांचव्या शतकाचे सुमारास चैत्यांवर बुद्धमूर्ति खोदण्यांत येऊं लागल्या. यामुळें नगाऱ्याची उंची वाढली आणि अण्डाचा आकार बसका होऊं लागला. कांहीं प्राचीन खोदीव चैत्यांवरील हर्मिका जवळजवळ छतापर्यंत जाऊन पोंचणाऱ्या असल्यामुळें त्यांवरील छत्र छतावर खोदलेलें आढ-ळतें. कार्लें येथील चैत्यावरील मूळचें लंबवर्तुलाकार लांकडी छत्र अद्याप अस्तित्वांत आहे. हें छत्र अद्वितीय आहे. आठव्या शतकाचे सुमारास एकावर एक अशीं अनेक छत्रें स्तूपांवर चढविण्यांत येऊं लागलीं, मात्र ती प्रस्तुत विषयाच्या क्षेत्राबाहेर.

**विहार** म्हणजे लौकिकदृष्ट्या क्रीडा किंवा क्रीडास्थान; प्रस्तुत विषयाच्या दृष्टीनें, भिक्षूंचें निवासस्थान, मठ. कधीं ही संज्ञा सरसकट सर्वच लेण्यांना अनुलक्षून वापरण्यांत आलेली दिसते; याचें कारण उत्तरकालीन जैन प्राकृत वाङ्मयांतील या अर्थाचे उल्लेख. युआन च्वंग यानें बुद्धगया येथील उत्तुंग महामंदिराचा व नालन्द येथील बौद्ध विद्यापीठाचा उल्लेख विहार या संज्ञेनें केलेला आहे. फा हिआन यानें एका विहाराचें वर्णन केलेलें आहे. तो सांगतो : या विहारांत तळ-मजल्यावर पांचशें खोल्या होत्या आणि पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या मजल्यांवर अनुक्रमें चारशें, तीनशें, दोनशें व शंभर. यावरून दिसतें कीं त्याची उभारणी इजिप्शियन पिरॅमिडच्या किंवा दाक्षिणी गोपुराच्या धर्तीची असावी. या उल्लेखांवरून दिसतें कीं खोदीव लेणीं आणि बांधीव इमारती व मंदिरें यांचाही समावेश या संज्ञेंत होत असे. फार काय, बिहार हें प्रांतनाम त्या प्रदेशांत एका काळीं अस्तित्वांत असलेल्या अगणित विहारांमुळें सिद्ध झालेलें असावें असेंही अनुमान करण्यांत आलेलें आहे. महाराष्ट्रांत खोदीव विहार

शेंकडों आहेत, पण बांधीव विहारांचे अवशेष आढळलेले नाहींत. कान्हेरी येथील लेण्यांतील.एका शिलालेखांत कल्याणनजीक असलेल्या अम्बालिक या बौद्ध मठाचा उल्लेख केलेला आहे; हा मठ अम्बरनाथ जवळच असला पाहिजे, असा संशोधकांचा कयास आहे; आणि येथील शिलाहारकालीन मंदिरानजीक कांहीं जुनाट पाये आहेतही.

प्रारंभीं बौद्ध भिक्षु फक्त पावसाळयात विहारांत मुक्कामाला (वस्स) येत आणि येथें पवित्र शास्त्रांचें अध्ययन व तपश्चर्या करीत. या काळांत लेण्यांची संख्या फार अल्प असल्यामुळेंच फिरस्त्या बौद्ध भिक्षूंना विहारांत तीन दिवसांहून अधिक काळपर्यंत राहण्याची मनाई करण्यांत आलेली होती. पुढें लेणीं खोदण्याची प्रथा सार्वत्रिक झाली आणि धार्मिकांच्या देणग्यांतून भिक्षूंच्या चरितार्थाची सोय करण्यांत आली; यामुळें विहारांतील रहिवाशांची संख्या वाढली आणि त्यांना प्रचार व शिक्षण केंद्रांचें स्वरूप प्राप्त झालें. अध्यापक येथें कायमचे राहूं लागले आणि प्रचारक विश्रांतीसाठीं व नवदीक्षित हंगामापुरते अभ्यासासाठीं तेथें वस्तीला येऊं लागले. यामुळें विहारांची मांडणी संकीर्ण झाली. वैयक्तिक वापरासाठीं व कडेलगत झोंपण्यासाठीं दगडी बाक असलेली तुटक खोदीव छोटीशी खोली, हें विहाराचें मूलस्वरूप. कांहीं विहार दर्शनी पडवी (पडसाल) लगत खोदलेले आहेत; कांहींच्या प्रवेशद्वारालगत वरल्या अंगाला कपारींत रांगेनें खोबणी खोदून खोलीसमोर छप्पर उभारण्याची तजवीज केलेली आढळते. भिक्षूंची संख्या वाढली व ते संघ करून राहूं लागले, तेव्हा मध्यवर्ती समाईक दालनाच्या अंतर्भागांतील तीन बाजूंना भिक्षूंसाठीं अनेक खोल्या खोदण्याची पद्धत सुरू झाली. अंतर्भागांतील विहारांच्या प्रवेशद्वारावर चैत्याची द्योतक असलेली पिंपळपानी आकाराची महिरप खोदलेली असते. भाजें येथील चैत्यगृहालगतचा विहार हें दक्षिणेंतील सर्वांत प्राचीन शिल्पकृत्य मानण्यांत येतें. त्याच्या भिंती काटकोनांत नाहींत, खोल्यांची मांडणी अव्यवस्थित आहे, त्यांचीं प्रवेशद्वारें कलतीं आहेत, त्यांचें खोदकाम ओबडधोबड आहे आणि येथें मूर्ति-शिल्पाचा पूर्ण अभाव आहे.

या प्रमाणांवरून या विहाराचा काळ ठरविण्यांत आलेला आहे. बेडसें येथील चैत्यानजीकचा विहार जवळजवळ समकालीन असला तरी त्याची मांडणी व्यवस्थित आहे. मध्यवर्ती दालनाचा आकार चैत्यगृहासारखा असून त्याचें छत अर्धवर्तुलाकार आहे. या दोन्ही बाबतींत हा विहार अद्वितीय आहे. या दालनाभोंवतीं नऊ खोल्या आहेत आणि त्यांपैकीं आठ खोल्यांमध्यें दोन्ही अंगा-लगत बाक खोदलेले आहेत. या व इतर अनेक विहारांचा दर्शनी भाग आतां उघडा पडलेला आहे. पूर्वी तो लाकडी फळ्यांच्या जवनिका बसवून झांकलेला असला पाहिजे आणि अंतर्भागांतील भिक्षूंच्या खोल्यांनाही लांकडी दारें बसविलेलीं असलीं पाहिजेत, असें जमिनींतील, भिंतींतील व छतांतील खोचणींवरून दिसून येतें. भिक्षूंच्या खोल्यांतून व मध्यवर्ती दालनातून कपडे वगैरे टांगण्याकरितां खुंट्या मारण्यासाठीं भिंतींत भोंकें पाडलेलीं असत. मधल्या दालनाचा उपयोग संघगृहासारखा होत असे. येथें भिक्षूंचें शिक्षण चाले व भोजनही येथेंच होई. नंतरच्या काळांत खोदण्यांत आलेल्या विहारांच्या मध्यवर्ती दालनाच्या छताला आधार देण्यासाठीं खांबांची योजना करण्यांत येऊं लागली. मध्यवर्ती दालन विस्तृत केलें तर त्या-भोंवतीं अधिक खोल्या अल्प आयासानें खोदतां येतील आणि भिक्षूंची संघ-भावना दृढतर होईल, अशा इराद्यानें हा प्रयोग करण्यांत आलेला असावा. दालनाच्या विस्ताराबरोबर त्यांतील खांबांची संख्या जरूरी-प्रमाणें वाढवावी लागली. अजंटा क्र. ११ या दालनांत (३७′×२८′) चार खांब आहेत आणि क्र. २ या दालनांत (४८′×४८′) बारा. महायान पंथाच्या प्रसारानंतर विहारांचा विस्तार वाढूं लागला. हिंदुस्थानांतील सर्वांत विस्तीर्ण असा विहार बाग (संस्थान ग्वालेर, जिल्हा अमझेरा) येथें आहे. त्याची लांबीरुंदी ९६′ आहे. त्याच्या छताला आधार देण्यासाठीं छत्तीस खांब ठेवलेले आहेत. मध्यवर्ती दालनाच्या अंतर्भागाभोंवतीं चोवीस खोल्या खोदलेल्या आहेत. शेजारीं शाळेचें सोळा खांबी स्वतंत्र दालन (९४′×४४′) आहे. या दोन्ही भागाना जोडणारी पडवी २२०′ लांबीची असून तिचें छत पेलण्यासाठीं

तेवीस खांब ठेवलेले आहेत. खांबांच्या योजनेमुळें विहारांचा विस्तार वाढला, त्यांना डौल आला. खांबांना निरनिराळे आकार देऊन व त्यांवर नक्षीकाम करून शिल्पकारांनीं विहारांच्या शोभेंत भर घातलेली आहे. महायान पंथाचा प्रवेश महाराष्ट्रांत झाल्यानंतर विहारांच्या भिंतींवर प्रथम बुद्धाच्या वेगवेगळ्या आसनांच्या व नंतर नवनिर्मित देवदेवतांच्या मूर्ति खोदण्यांत येऊं लागल्या आणि हरप्रकारचीं चित्रें रंगविण्यांत येऊं लागलीं. महायान पंथीयांनीं जुन्या विहारांचाही कायापालट केला. ज्या विहारांत बुद्धमूर्ति खोदलेल्या असतात व त्यांभोंवतीं प्रदक्षिणापथ ठेवलेले असतात त्यांना **चैत्यगृह** अशी संज्ञा देण्यांत येते. विहारांत कोणत्या मूर्ति खोदावयाच्या व कोणतीं चित्रें रंगवावयाचीं याबाबत विशेष निर्बंध नसावेत असें दिसतें. अजंटा येथील विहारांत जातककथांतील, समकालीन व काल्पनिक प्रसंग रंगविलेले आहेत आणि बाग येथील विहारांत प्रेमप्रसंगही !

या प्रास्ताविक माहितीच्या अनुरोधानें आपणांस सह्याद्रींतील लेण्यांचा अभ्यास करावयाचा आहे.

## सह्याद्रींतील लेण्यांचे गट :

सह्याद्रींत असंख्य लेणीं आहेत. सर्वसंग्राहक सरकारी गॅझेटीयर्स-मध्यें ही त्यांची निश्चित संख्या दिलेली नाहीं. कारण अशी गणना करणें अशक्य आहे. सह्याद्रीच्या कानाकोपऱ्यांत अशीं किती तरी लेणीं आहेत कीं त्यांच्या अस्तित्वाची साक्षर समाजाला खबरही नाहीं. जरा कोठें विषय निघाला कीं सह्याद्रींत वावरलेला कोणी तरी एखाद्या अज्ञात लेण्याची माहिती सांगतोच. मावळ भागात अशीं कैक लेणीं आहेत कीं त्यांच्या अस्तित्वाची माहिती स्थानिक गुराख्यांना मात्र आहे ; कारण त्यांना वेळप्रसंगीं त्यांचा आश्रय घ्यावा लागतो. ते त्यांना गडद ( गडद = अंधारी, खड्डा ) म्हणतात. जुन्नरजवळ बारा गडद या नांवाचा क्षुद्र लेण्यांचा एक संचच आहे. जुन्नर व देवगिरी-भोंवतालचे डोंगर तर मधमाशांच्या मोहोळांसारखे पोखरून काढण्यांत आलेले आहेत. अशा अनिर्दिष्ट लेण्यांपैकीं कांहीं पूर्णावस्थेंत आहेत ;

कांहींची पडझड झालेली आहे, कांहीं अपुरीं सोडून दिलेलीं आहेत; कांहीं केवळ खडकाच्या अंतर्भागाची चांचणी करण्याकरितां खोदलेलीं आहेत, आणि कांहीं प्रागैतिहासिक जमातींनीं अंत्यविधीकरितां. सह्याद्रींतील लेण्यांपैकीं ज्याचा तपशील कोठें ना कोठें नमूद केलेला आहे त्यांपैकीं या ना त्या कारणाकरितां विशेष महत्त्वाच्या अशाच लेण्यांचा समावेश सोबतच्या कोष्टकांत केलेला आहे आणि मजकुरांत त्यांपैकीं कांहीं लेण्यांचा तपशील दिलेला आहे.

सह्याद्रींतील लेण्यांचें तपशिलवार वर्णन देणें हें या लेखाच्या संकल्पित कक्षेबाहेरचें आहे. शिल्पशास्त्रज्ञांनीं व संशोधकांनीं या विषयावर मोठमोठे ग्रंथ लिहिलेले आहेत. तेही आतां इतके दुर्मिळ झालेले आहेत कीं केवळ संदर्भासाठींही ते मिळूं शकत नाहींत. प्रस्तुत विषयाचा सूक्ष्म अभ्यास करण्यास अर्धा जन्म पुरणार नाहीं. खोलांत जावें तों अधिकाधिक खोलांतच जावें लागतें आणि उलगडा होण्याऐवजीं जीव कंटाळून जाईल एवढा घोंटाळा मात्र माजतो. सर्वसाधारण वाचकाला तपशीलांत जाण्याची जरूर नाहीं. विषयाची स्थूल, पण सशास्त्र कल्पना आली म्हणजे झालें. शास्त्रशुद्ध वर्गीकरणानुसार किंवा ऐतिहासिक पद्धतीनें विषयाचें विवेचन केलें तर वेताळ पुन्हां पुन्हां पूर्वपदावर आणून सोडावा लागतो; म्हणून मी या लेखांत संमिश्र पद्धतीचा अवलंब केलेला आहे.

सह्याद्रींतील मुख्य लेण्यांचे स्थानिक गट पडतात ते असे :

१ पुणें गट : ( अ ) लोणावळें गट : कार्लें, कोंडाणें, बेडसें व भाजें; ( आ ) जुन्नर गट : जुन्नर, नाणे घाट.

२ मुंबई गट : कान्हेरी, कोंदिवटें, घारापुरी, जोगेश्वरी, मंडपेश्वर व लोणाड.

३ नाशिक गट : अंकाई-टंकाई आणि नाशिक नजीकचीं चांभार लेणीं व पाण्डव लेणीं.

४ देवगिरी गट : अजण्टा, औरंगाबाद, घटोत्कच, पाटण, पितळखोरें व वेरूळ.

५ कुन्तल गट : कऱ्हाड, कुण्डल, पन्हाळा, बदामी, लोहारी व शिरवळ.

६ अपरान्त गट : करसंबळें, कुडें, खेड, चिपळूण, चौल, नाडसूर व महाड.

भौगोलिकदृष्ट्या मुंबई गटांतील लेण्यांचा समावेश अपरान्त गटांतच केला पाहिजे. स्थान महात्म्यामुळें, एककेंद्रीयत्वामुळें आणि अंतर्गत वैशिष्टयांमुळें मुंबई गट वेगळा केलेला आहे. माझे मित्र श्री. दीक्षित यांनीं आपल्या प्रबन्धांत (Buddhist Settlements in Western India) नाशिकच्या लेण्यांचाही समावेश मुंबई गटांतच केलेला आहे. मी ज्या गटाला देवगिरी ही संज्ञा दिलेली आहे त्याला आजवर हैद्राबाद गट अशी संज्ञा देण्यांत येत असे. कोठें हैद्राबाद व कोठें हीं लेणीं ? कोठें तेथें आजवर जतन करण्यांत आलेली बांडगुळी वृत्ति आणि कोठें येथें आढळणारी उच्च भारतीय संस्कृति ? जी संस्कृति या लेण्यांची तीच देवगिरीची ; म्हणून या गटाला मी हें नांव दिलेलें आहें. कुन्तल गटातील फक्त बदामीचीं लेणीं तेवढीं नांवाजण्याजोगीं आहेत. अपरान्त गटांतील लेणीं क्षुद्र आहेत ; त्यापैकीं कांहींची वैशिष्ट्यें मात्र ध्यानांत घेण्याजोगीं आहेत.

लेखाची मर्यादा व विशिष्ट लेण्याचें महत्त्व यांचा समन्वय करावयाचा असल्यामुळें कांहीं लेण्यांचें तपशीलवार वर्णन करावें लागलें आहे आणि कांहींची बोळवण त्रोटक उल्लेखावर करावी लागली आहे ; कोठें तुलनात्मक चर्चा करावी लागली आहे ; आणि कोठें वर्ण्य विषय महत्त्वाचा असूनही काट द्यावा लागला आहे. घारापुरीच्या लेण्यांवर मी एक स्वतंत्र लेख लिहिलेला आहे. अजंटा व वेरूळ हे विषय इतक्या विस्तारानेंच सांगितले पाहिजेत कीं त्यांवर स्वतंत्र लेख लिहिण्याची मी उमेद बाळगून आहे. म्हणूनच त्यांचा उल्लेख या लेखांत अगदीं त्रोटक आलेला आहे.

सोबतच्या कोष्टकात सह्याद्रींतील लेण्यांचा विशेष महत्त्वाचा तेवढाच तपशील दिलेला आहें. स्थानिक कोष्टकांत याहून अधिक तपशील दिलेला आहे. हा तपशील मुख्यत्वेंकरून सरकारी गॅझेटीयर्स व अधिकृत

ग्रंथ यांवरून घेतलेला आहे. स्थानिक कोष्टकांतील लेण्यांच्या व शिला-लेखांच्या क्रमांकांचा मुकाबला गॅझेटीयर्सशीं ठेवलेला आहे.

## (१) पुणें गटांतील लेणीं

सह्याद्रींतील लेण्यांमध्यें कालमानाच्या, स्थापत्याच्या व संस्कृतीच्या शुद्धतेच्या दृष्टीनें आद्य व अग्रस्थान पुणें गटांतील लोणावळ्याभोंवतालच्या लेण्यांचें. या भागांतील सर्व लेणीं बौद्ध व हीनयान पंथाचीं आहेत. जुन्नर गटांत बौद्ध, जैन व ब्राह्मणी या तीनही धर्मोचीं लेणीं आहेत. नाणें घाटांतील सातवाहन देवकुल हें लेणें ऐहिक व स्वतंत्र आहे. याच अनुक्रमानें या लेण्यांचा तपशील सांगतों.

### (अ) लोणावळें गट

लोणावळ्याभोंवतीं अनेक प्राचीन लेणीं आहेत; त्यांवरूनच या वस्तीला हें नांव मिळालेलें असणें संभवनीय आहे.

लोणावळें गटांत मुख्य लेणीं चार : कोंडाणें, भाजें, बेडसें व कार्लें. कालमानाच्या दृष्टीनें या लेण्यांतील आद्यस्थान कोंडाणें व भाजें येथील लेण्यांचें. कोंडाण्याचीं लेणीं खि. पू. दुसऱ्या शतकाच्या पूर्वार्धांतलीं आणि भाजें येथील लेणीं याच शतकाच्या उत्तरार्धांतलीं. या लेण्यांचें शिल्पही सारखें आहे. बेडसें येथील लेणीं खि. पू. पहिल्या शतकांतलीं आणि कार्लें येथील लेणीं खिस्तोत्तर पहिल्या शतकांतलीं. कोंडाण्यापासून कार्ल्यापर्यंत शिल्पांत झालेली प्रगति तुलनात्मक दृष्टीनें पाहाणाऱ्या निरीक्षकाला सहज दिसून येईल इतकी स्पष्ट आहे.

उल्हास नदीच्या खोऱ्यांत, मर्कट पर्वताच्या दरींत, राजमाची श्रेणीच्या पहिल्या पदावर, तुटलेल्या कड्याच्या पायथ्याशीं कोंडाण्याचीं लेणीं खोदलेलीं आहेत. डोंगरी लांबणीचा रस्ता, वाहनांचा अभाव, शिवाय लेणींही फारशीं नाहींत व आहेत त्यांची पडझड झालेली; यामुळें हौशी प्रवासी इकडे फारसे फिरकत नाहींत. इंद्रायणीच्या खोऱ्याच्या दक्षिणेस मळवलीजवळ भाजाचीं लेणीं आहेत आणि उत्तरेस कार्ल्याचीं. विश्रांतीसाठीं आसावलेल्या व चमत्कृतीसाठीं उत्सुक असलेल्या नागरिकांची रीघ सुगमतेमुळें सुटीच्या दिवशीं या लेण्यांकडे लागलेली

असते. बेडशाचीं लेणीं पवन मावळांत कामशेतपासून सुमारें पांच मैलांवर आहेत. कोंडाण्याइतकीं दुर्गम नसलीं तरी हीं लेणीं हौशी नागरिकांच्या प्रवासकक्षेबाहेरचीं आहेत. यामुळें नजीकच्या पुणें-करांनाही त्यांची फारशी माहिती नाहीं. उजाड प्रदेशांतल्या पायीं प्रवासाचा त्रास सहन करण्याची तयारी असल्यास श्रमांचा परिहार व मनाचें समाधान होईल अशीं अद्वितीय वैशिष्ट्यें आपण दाखवूं असें त्यांचें आश्वासन आहे.

कलते खांब, झुकल्या भिंती, खोदकामांत अर्ध्या उठावाच्या चैत्या-कार गवाक्षांची व वेदिकांची योजना, स्तूपावर विस्तीर्ण हर्मिका आणि चैत्याच्या अर्धवर्तुलाकार छताला फांसळ्यासारख्या लांकडी कड्या, हीं लेण्याच्या प्राचीनत्वाचीं गमकें या गटांतील लेण्यांमध्यें स्पष्टपणें दिसून येतात. भाजें येथील चैत्याचे खांब ओळंब्याबाहेर सुमारे पांच इंच झुकवि-लेले आहेत. लेण्याच्या छताचा स्तंभांवर दाब पडत नाहीं असें अनुभवास आल्यानंतर शिल्पकारांनीं कलाला काट दिला. या गटांतील चैत्यांच्या आगाशीच्या उजव्या डाव्या बाजूंवर चैत्याकार कमानी व वेदिकांच्या आकृति खोदलेल्या आहेत. भाजें व बेडसें येथील विहारांतील भिक्षु-गृहांच्या द्वारांवरही अशा कमानी खोदलेल्या आहेत आणि त्या वेदिका-कृतींनीं एकमेकींना जोडलेल्या आहेत. लेण्यांच्या खोदकामांतील वेदिकांची योजना उत्तरोत्तर कमी कमी होऊं लागली. चवथ्या किंवा पांचव्या शतकांनंतरच्या लेण्यांत त्यांचा मागमूसही आढळत नाहीं. या सुमारास बौद्ध धर्माचा कायापालट झाल्यामुळें जुने संकेत नष्ट झाले व नवे अस्तित्वात आले, त्याचा हा परिणाम असावा. या गटांतील चारी लेण्यांच्या छतांना वर्तुलाकार कड्या बसविल्या होत्या. बेडसें चैत्याच्या लांकडी कड्या गेल्या शतकाच्या प्रथमार्धाच्या अखेरीपर्यंत अस्तित्वांत होत्या. कार्लें येथील चैत्याच्या सागवानी फांसळ्या अजून जशाच्या तशा आहेत. फक्त प्रवेशद्वारालगतची जोडी नवी आहे. हिंदुस्थानांतील पुराण-वस्तूंच्या संरक्षणाची कायमची तजवीज करण्याचें श्रेय मिळविणारे लॉर्ड कर्झन हीं लेणीं पाहावयास आले होते तेव्हां त्या बसविलेल्या आहेत.

या फांसळ्यांचें उद्दिष्ट संशोधकांना अद्याप उमगलेलें नाहीं. अर्धवर्तुलाकार छताला मजबुती देण्यासाठीं त्यांची योजना केलेली असावी, असें म्हणतां येणार नाहीं ; कारण बेडसें येथील समकालीन विहाराचें छत अर्ध-वर्तुलाकार असूनही तेथें फासळ्यांची योजना केलेली नाहीं. ज्या लेण्यांना अशा कड्या बसविलेल्या आहेत तेथें प्रतिध्वनि उमटत नाहीं असा अनुभव आहे. ध्वनिलहरींच्या नियंत्रणासाठीं या कड्या बसविण्यांत आलेल्या असाव्यात, असा कांहीं तज्ञांचा कयास आहे. बौद्ध चैत्यांच्या मांडणीवरून त्यांची तुलना ख्रिस्ती चर्चोशीं करण्यांत येते. अनेक विख्यात ख्रिस्ती मंदिरांत प्रतिध्वनी घुमलेला ऐकूं येतो. हा दोष बौद्धांनीं चैत्यांत येऊं दिलेला नाहीं. कोणत्या पदार्थाच्या आलेपनामुळें या फळ्या सुमारें दोन हजार वर्षें टिकूं शकल्या याचाही उलगडा आधुनिक सरकारी शास्त्रज्ञांना त्यांवरील लुकणाचें रासायनिक पृथक्करण करूनही झालेला नाहीं. उत्तरकालीन चैत्यांमध्यें लाकडी फांसळ्यांची जागा आंगच्या खोदीव दगडी फांसळ्यांनीं घेतलेली आढळते. कोंडाणें व भाजें येथील लेण्यांचा पुरोभाग आतां खुला आहे. हीं लेणीं वापरांत होतीं तेव्हां ऊन व पाऊस यांपासून अंतर्भागाचें संरक्षण करण्यासाठीं त्यांच्या तोंडावर लांकडी फळ्यांच्या जवनिका ( Screen ) बसविलेल्या असल्याच पाहिजेत. भाजें येथील लेण्याच्या कमानीच्या कपाळपट्टीवर एकशें-सत्तर खोचणी हारीनें खोदलेल्या आहेत. लांकडी मेखा ठोकून पाठ भिंतींत जवनिका पक्की करण्यासाठीं त्या खोदलेल्या असल्या पाहिजेत असा संशोधकांचा अंदाज आहे. भाजाच्या एका विहारांतही अशीच योजना केलेली होती. चैत्याची दर्शनी कमान आरपार खोदा-वयाची आणि नंतर आडोशासाठीं लांकडी कनात उभारावयाची, ही यातायात टाळण्यासाठीं आपल्या कारागिरांनीं चैत्यासमोर प्रवेशद्वारें असलेला दगडी पडदा व आघाडीला आगाशी ( Veranda ) ठेवण्याची पद्धत सुरू केली. बेडसें येथील चैत्यात अशी आगाशी आहे आणि कार्लें येथील चैत्यासमोर खोदकाम केलेली दगडी कनात आहे. कोंडाण्यांचीं लेणीं राजमाचीच्या कड्याच्या पायथ्याशीं खोद-लेलीं आहेत. खडकाच्या अंतर्भागांतील अज्ञात व अगम्य अशा रंध्रां-

तून अहोरात्र झरणाऱ्या जलबिंदूंच्या पाझरामुळें त्यांची पडझड झालेली आहे. आपल्या प्राचीन कारागिरांनाही हा दोष व त्याचें कारण याचा अंदाज तेव्हांच आलेला असावा असें दिसतें; कारण यांशिवाय दुसरीं कोणतींही लेणीं इतकीं खालीं खोदलेलीं नाहींत. याच शतकांत यांच्या मागोमाग खोदलेल्या भाजाच्या लेण्यांवर डोंगर अगदीं थोडा आहे.

चैत्यांच्या दर्शनी कमानीला असतो तो विशिष्ट आकार कसा व कां निश्चित झाला? हा आकार स्तूपाच्या बाह्य रेषेच्या अनुरोधानें निश्चित करण्यांत आलेला आहे असें कांहीं संशोधकांचें म्हणणें आहे. कोणी सांगतात की या कमानीचा आकार पिंपळपानाच्या नमुन्यावरून घेतलेला आहे आणि चैत्य-गवाक्ष हें बौद्ध धर्माचें प्रतीक आहे; कारण गौतमबुद्धाला बोधिवृक्षाखालीं ध्यानस्थ असतांना पूर्ण ज्ञान प्राप्त झालें. लोमश लेण्याची कमान ही चैत्य-गवाक्षाची प्राथमिक स्थिति; कोंडाणें व भाजें येथील चैत्यांच्या कमानी ही माध्यमिक अवस्था आणि कार्ल्यांच्या चैत्याची कमान ही पूर्णावस्था. लोमश कमान कपाळपट्टीसारखी, दर्शनी उठाव दाखविण्यापुरती खोदलेली आहे. कोंडाण्याची कमान आरपार खोदलेली आहे. पुढें हीच पद्धत चालू राहिली. या कमानीचा आकार अर्धवर्तुलाहून थोडा अधिक असतो. शिल्पकारांनीं हा एकदां निश्चित केला तो हीनयान काळाच्या अखेरीपर्यंत कायम ठेवला. गवाक्षांच्या या विशिष्ट आकारामुळें लेण्याच्या अंतर्भागांत प्रसन्न प्रकाश पडण्याची खाशी सोय झालेली आहे; हा प्रकाश स्तूपावर केंद्रित होतो; शिवाय त्यामुळें स्तंभांचीं अग्रें प्रकाशित होतात. हा अनुभव आल्यामुळेंच, मला वाटतें, हीनयान काळाच्या उत्तरार्धांत लेण्यांच्या अंतर्भागांतलि स्तंभशीर्षांवर मूर्ति खोदण्याची


लोमश गवाक्ष

प्रथा आपल्या शिल्पकारांनीं सुरू केली असावी. यासाठीं नमुना म्हणून अशोक स्तंभ त्याच्या नजरेसमोर होतेच. त्यांत त्यांनीं जरूर ते फेरफार केले; प्रथम या धर्तीचे खांब त्यांनीं दर्शनी भागांत खोदले आणि नंतर चैत्यांच्या अंतर्भागांत त्यांची प्रस्थापना केली.

प्रस्तर स्तंभांची प्रथा पुरातन व सार्वत्रिक आहे. असीरिया व बाबीलोन या देशांत अशा स्तंभांची पूजा करण्यांत येत असे; ग्रीस देशांत त्यांवर धर्माज्ञा खोदण्यांत येत असत. अशोकानें आपल्या साम्राज्याच्या मूल प्रदेशांत, बुद्धाच्या जन्मभूमींत, बुद्धाच्या जीवनांतील विशिष्ट प्रसंगामुळें पवित्र झालेलीं क्षेत्रें निर्दिष्ट करण्यासाठीं व विशेष महत्त्वाच्या स्तूपांनजीक असे मिळून सुमारें तीस प्रचण्ड एकसंधी प्रस्तर स्तंभ उभारले. त्यांना लाट अशी संज्ञा आहे. या स्तंभांवर मौर्य कांति चढविलेली असून अशोकाच्या दयाधर्माच्या आज्ञा त्यांवर खोदलेल्या आहेत. त्यांचा आकार देवदाराच्या सोटासारखा असतो. यामुळें त्यांचा संबंध प्राचीन वृक्षपूजेशीं जोडण्यांत आलेला आहे. या स्तंभांची सर्वसाधारण उंची सुमारें पन्नास फूट व वजन सुमारें पन्नास टन आहे. सिंह, किंवा हत्ती, अगर त्यांचा चौकडा, त्यावर क्वचित् धर्मचक्र, त्रिरत्न अशीं धार्मिक प्रतीकें खोदलेले प्रस्तर त्यांच्या अग्रांवर बसविलेले आहेत. सारनाथ येथील स्तंभशीर्ष हें स्वतंत्र भारताचें मानचिन्ह मानण्यांत आलेलें आहे. भारतीय स्थापत्य व शिल्प कृत्यांत हे स्तंभ व त्यांवरील मूर्ति यांना अग्रस्थान देण्यांत येतें. उत्तरकालीन ब्राह्मणी व जैन स्तंभांची मांडणी अशोक लाटेसारखीच असते. खि. पू. दुसऱ्या शतकांत बेसनगर येथें उभारलेला हेलिओडोरसचा गरुडस्तंभ हें यांचें पहिलें अनुकरण. जैनांच्या स्तंभांवर चार दिशांना अभिमुख असलेल्या जिनमूर्ति बसविलेल्या असतात. हिंदी कीर्तिमंदिरें, शैव दीपमाला व मुसलमानी मिनार या नमुन्यांवरूनच उत्क्रांत झालेले आहेत.

महाराष्ट्रांत सिंहस्तंभ दोनच ठिकाणीं आहेत; कार्लें चैत्यासमोर एक आणि कान्हेरी चैत्यासमोर दोन. कार्ल्यांचा स्तंभ लेण्याच्या कड्या-


कार्लें सिंह-स्तंभ

पासून तुटक आहे आणि कान्हेरीचे स्तंभ कडेलगत आहेत. कार्लें चैत्यासमोर डाव्या अंगाला सुमारें पंचेचाळीस फूट उंचीचा एकसंधी सिंहस्तंभ आहे. त्याची बैठक वर्तुलाकार असून अंग सोळा कोनी आहे. अग्रभागीं वाटोळा कंगोरेदार कळस असून त्यावर चौकोनी हर्मिका आहे. या बैठकी-वर पाठीला पाठ लावून उकिडवे बसलेले चार सिंह आहेत. या सिंहांच्या मध्यभागी धातूचें धर्मचक्र बसविलेलें असावें असा कांहीं संशोधकांचा कयास आहे. महारथी अग्निमित्रनक यानें हा स्तंभ खोदविला असा त्यावर लेख आहे. चैत्याच्या उजव्या अंगालाही असाच आणखी एक स्तंभ असावा असें आजूबाजूच्या खुणांवरून वाटतें. हा स्तंभ संपूर्णतया नष्ट झालेला असून त्या जागीं एकवीरा देवीचें देऊळ बांधलेलें आहे. कान्हेरीचा चैत्य ही कार्लें चैत्याची भ्रष्ट प्रतिकृति आहे ; तेथें सिंहस्तंभांची जोडी आहे ; यावरून वरील तर्कास बळकटी येते. अशोकाचें शिलाशासन महाराष्ट्रांत सोपाऱ्यास मिळालेलें आहे आणि वर नमूद केलेलें सिंहस्तंभ या अशोकस्तंभांच्या प्रतिकृति आहेत.

कोंडाणें व भाजें येथील लेणीं खोदून होईपर्यंत अशोकस्तंभांचें अनुकरण करण्याची कल्पना आपल्या कारागिरांना सुचलेली दिसत नाहीं. या लेण्यांतील खांब साधे, अष्टकोनी आहेत. खि. पू. पहिल्या शतकांत खोदण्यांत आलेल्या बेडसें येथील चैत्याच्या अंतर्भागांतील खांब असेच आहेत. भाजें व बेडसें येथील खांबांवर अलंकारार्थ किंवा पूजेसाठीं प्रतीकें खोदलेलीं आहेत. बेडसें येथील चैत्याच्या आघाडीला आगाशी आहे व तिच्या पुढोशाला पर्सिपोलिटन धर्तीचे खांब आहेत ;

मध्यभागीं दोन पूर्ण व दोन्ही कडांना दोन पाऊण. हे साडेतीन खांब हिंदुस्थानांत अद्वितीय आहेत. त्यांच्या अग्रभागीं चौफळी चौकोनी बैठकीवर, चोहों बाजूंना, परस्परविरोधी दिशांना अभिमुख अशा हत्ती, घोडे, बैल यांच्या जोड्या, आणि त्यांवर अधिष्ठित असलेल्या सालंकृत स्त्रीपुरुषांच्या सुंदर, प्रमाणबद्ध मूर्ति कोरलेल्या आहेत. त्यांचें खोदकाम इतकें हुबेहुब केलेलें आहे व त्यांचे अंगविक्षेप इतके सहज व नैसर्गिक आहेत कीं पाहता पाहतां या मूर्ति कांहीं हालचाल करतील, हत्ती सोंड उचलतील, घोडे खिंकाळतील, मस्तकावरील मदाभोंवतीं घोंगावणारीं



बेडसें स्तंभ

घुंगुरटीं उडवून लावण्याकरितां बैल मानेला हिसका देतील, असें वाटतें. लक्षांत घेण्याजोगे आणखी एक दोन तपशील येथेंच सांगतों. येथील घोड्यांना लगाम नाहींत व त्यांवर जीनही नाहीं. या काळीं हें सामान वापरांत होतें, हें निश्चित. यावरून वाटतें कीं हा तपशील येथें रंगांत दाखविलेला असावा. येथील हत्तींना सुळे नाहींत ; सुळे असतात तेथें खोबणी मात्र आहेत. यावरून वाटतें कीं त्यांमध्यें खरे हास्तिदंत बसविलेले असावेत. तुळईला आधार देण्यासाठीं खांबावर मोरवा ( कीचक ) बसवितात ; येथें असे मोरवे ठेवून त्यांवर हें खोदकाम केलेलें आहे ; म्हणूनच ते पर्सिपोलिटन धर्तीचे आहेत असें मानण्यांत येतें. आगाशीच्या छताला या खांबांचा आधार आहे ; तरीही त्यांचें स्थान स्वतंत्र आहे, असें संशोधकांचें म्हणणें आहे ; कारण चैत्याच्या अंतर्भागाशीं या स्तंभांचें साधर्म्य नाहीं. हे स्तंभ या अशोक स्तंभाच्या दक्षिणी प्रतिकृति आहेत असें काहीं तज्ञांचें म्हणणें आहे ; कारण त्यां-वर तशा यांवरही पशुमूर्ति आहेत आणि यांच्याही चबुऱ्याखालीं कलशाकृति खोदलेली आहे. या स्तंभांचा आकार अशोकस्तंभासारखा निमुळता आहे, पण गोल नाहीं, यांचें अंग अष्टकोनी आहे. अशोकस्तंभांना बुंध्यांशीं कलश नसतो, यांना आहे. एवढा त्यांच्या व यांच्या उभारणींत फरक आहे.

स्तंभांना वरखालीं कलशांचा आकार देणें ही योजना परकीय आहे असें मला वाटत नाहीं. लक्ष्मी व कुंभ यांचें साहचर्य खात्रीनें अधिक पुरातन आहे. मला वाटतें, सातकर्णी स्तंभ ( Pot–Lota–Capital ) या भागांतच प्रथम उत्क्रांत झाला असावा. तळाशीं चौकोनी चौथरा ( खुर्ची ), त्यावर लोटयाच्या आकाराची बसकी उखळी, अष्टकोनी अंग, वर लोटयाच्या आकाराची उभट कुंभी आणि तिच्यावर चबुत्रा, अशी साध्या सात-

कर्णी स्तंभांची घडण असते. कोठें कुंभी व चबुतरा यांचे दरम्यान चौकोनी हर्मिका असते. ही हर्मिका कोंपऱ्यांजवळ आरपार कोरलेली असून आंत रायआवळयाच्या आकाराचा मूळ खडकाचा भाग ठेवलेला असतो. या स्तंभांना आन्ध्र किंवा सातकर्णी स्तंभ अशी संज्ञा गॅझेटीयरकारांनीं दिलेली आहे. कार्ले येथील चैत्याच्या अंतर्भागांतील स्तंभ याच धर्तीचे आहेत ; मात्र त्यांवरील हर्मिकांवर पशु व स्वार यांच्या प्रतिमा खोदलेल्या आहेत. या स्तंभप्रकाराला मीं सालंकृत सातकर्णी स्तंभ अशी संज्ञा दिलेली आहे. मला वाटतें कार्ले चैत्य खोदणाऱ्या शिल्पकारांनींच हा स्तंभप्रकार प्रथम उत्क्रांत केला आणि नंतर जुन्नर व नाशिक येथील शिल्पकारांनीं त्यांचा स्वीकार केला. बेडसें आगाशीच्या स्तंभांपेक्षां यांचें साधर्म्य सांची तोरणाशीं अधिक आहे.

कार्ले येथील चैत्य सर्व बौद्ध चैत्यांत विस्तीर्ण आहे. याचें क्षेत्रफळ भाजें चैत्याच्या साडेतीन पट व बेडसें चैत्याच्या सहा पट आहे. भाजें चैत्यांत २७ व बेडसें चैत्यांत २६ खांब आहेत. आणि येथें ३७. सर्व चैत्यांत कार्ले चैत्य उत्तुंग आहे. बेडसें व भाजें चैत्यांची उंची अनुक्रमें २८′ व २७′ आहे. आणि याची ४५′. बेडसें चैत्याच्या आगाशीपेक्षां ( ३०′ × १२′ ) कार्ले चैत्याची आगाशीही विस्तीर्ण ( ५२′ × २५′ ) आहे. सर्व बौद्ध चैत्यांत कार्ले चैत्य अधिक सालंकृत आहे. या चैत्यासमोर सिंहस्तंभ आहे आणि अंतर्भागांतील स्तंभांपैकीं डावी उजवीकडे समसमान असे तीस सालंकृत सातकर्णी धर्तीचे आहेत. कान्हेरी चैत्यासमोरचे सिंहस्तंभ बेढब आहेत व त्यांना उठाव नाहीं; त्याचप्रमाणें अंतर्भागांतील स्तंभांपैकीं डावीकडील अकरा व उजवीकडील सहा स्तंभ सालंकृत आणि बाकीचे साधे असल्यामुळें लेण्याचा तोल बिघडलेला आहे. कोंडाणें, भाजें व बेडसें येथील स्तंभ साधे आहेत. कार्ले चैत्यातील साधे स्तंभ स्तूपाचे पिछाडीस आहेत. हे स्तंभ साधे ठेवण्यांत

शिल्पकारांनीं फार औचित्य दाखविलेलें आहे. कार्लें येथील चैत्य सर्वांत निर्दोष आहे. कोंडाणें व भाजें येथील चैत्यांसमोर आगाशी किंवा जवनिका नसल्यामुळें ते भकास दिसतात. बेडसें चैत्यासमोर आगाशी आहे व जवनिकाही आहे; पण सालंकृत स्तंभांसमोरचा खडक फोडलेला नसल्यामुळें चैत्याच्या अंतर्भागांत अंधार झालेला आहे. कोंडाणें, भाजें व बेडसें चैत्यांतील खांब कलते आहेत; शिवाय वास्तूच्या मानानें ते दुबळे दिसतात. कार्लें चैत्यांतील स्तंभ सरळ आहेत. मजबूत आहेत. कार्लें चैत्याचें ऐश्वर्य अद्वितीय आहे. चैत्यांतील स्तंभांवरील हत्तींच्या व त्यांवरील स्त्रीपुरुषांच्या काळजीपूर्वक खोदलेल्या जोड्या पाहिल्या कीं याचा प्रत्यय येतो. येथील कलाकारांनीं ऐहिक ऐश्वर्यांचीं हीं प्रतीकें स्तंभाच्या अग्रभागीं ठेवलेलीं आहेत. साध्याभोळ्या भाविकाला आपल्या दौर्बल्याची जाणीव टोंचणार नाहीं आणि गजपतींच्याही भक्तिभावाचें केंद्र असलेल्या स्तूपाबद्दल त्याच्या उपस्थितीमुळें अधिक आदर वाटेल अशीच व तेवढीच या प्रतीकांची मांडणी व योजना शिल्पकारांनीं केलेली आहे. महायान चैत्य व विहार यांमध्यें प्रतिमांची व चित्रांची एवढी गर्दी असते कीं या अजबघरांत प्रेक्षक रंगून किंवा भांबावून जातो आणि बिचाऱ्या पूजास्थानाकडे तेवढें त्याचें दुर्लक्ष होतें. कार्लें



भाजें गवाक्ष

चैत्याची कमान सर्वांत अधिक डौलदार आहे. कोंडाण्यापेक्षां भाजाची कमान अधिक डौलदार आहे; तरीही ती पसरट व छुळी

वाटते. तिच्या बाह्यरेषेंत निश्चयाचा अभाव दिसतो. भाजापेक्षां काल्यांची कमान विस्तीर्ण व ढबदार आहे. अखेर साधली, असा विश्वास व कौशल्याची कृतार्थता तिच्या ठेवणींत व्यक्त होतात. या कमानीला जणूं टिपण आहे असें भासतें. महायान चैत्यांच्या कमानी ढेबऱ्या आहेत. त्या निर्जीव, नटव्या दिसतात.



कार्लें गवाक्ष

काल्यांची कमान खोदताना किरण असें साधलें आहे कीं ऋतुमान



अजंटा ( क्र. १९ ) गवाक्ष

कोणतेंही असलें तरी अंतर्भागांत पुरेसा व प्रसन्न एवढाच प्रकाश आंत येत रहावा आणि त्यामुळें स्तूपाला विशेष उठाव मिळावा. कार्लें चैत्याची माडणी अत्यंत प्रमाणबद्ध आहे. लांबी,

रुंदी व उंची यांचें प्रमाण येथें असें साधलेलें आहे कीं त्यांत वावरणाराला विस्तारामुळें एकलकोंडें वाटत नाहीं किंवा संकोचामुळें कोंदटल्यासारखें वाटत नाहीं. या मानानें इतर चैत्य लांबट किंवा उभट वाटतात. येथील स्तूपही अत्यंत ढबदार आहे. नगारा, गाभारा व पेटारा यांचें प्रमाण चांगलें साधलेलें आहे. पूर्वकालीन स्तूपांवरील पेटारा बेढब दिसेल इतका लहान किंवा मोठा असतो. महायान स्तूपांवर बुद्धमूर्ति खोदण्याची प्रथा सुरू झाली; यामुळें नगाऱ्याची उंची वाढली आणि अण्डाचा संकोच झाला; शिवाय ऐश्वर्याच्या प्रचलित कल्पनांच्या अनुरोधानें छत्रांची संख्या वाढविण्यांत आली. यामुळें स्तूप बेडौल दिसूं लागले. येथील हर्मिकेवरील मूळचें लांकडी आडवें नक्षीदार छत्र अद्याप शाबूत आहे. दुसऱ्या शतकात स्तूपांवरील छत्र छतावरच अर्ध्या उठावात खोदण्यांत येऊं लागलें. कार्लें चैत्याची आगाशी विशेष कसोशीनें अलंकारिलेली आहे. येथें बाजूंच्या तळांशीं प्रचण्ड हत्ती खोदलेले असून त्यांवर अर्ध्या उठावांत चैत्याकार गवाक्षें व वेदिका यांचे मजल्यांवर मजले उठविलेले आहेत. बेडसें चैत्यालगतची जवनिका साधी आहे. कार्लें येथील जवनिकेवर सातकर्णी वेषभूषा केलेल्या सशक्त स्त्रीपुरुषांच्या जोड्या खोदलेल्या आहेत. या प्रतिमा दात्यांच्या किंवा समकालीन राज्यकर्त्यांच्या असाव्यात. त्यावर पूर्वी गिलावा व रंग चढविलेले असलेच पाहिजेत. हें ऐहिक ऐश्वर्य शिल्पकारांनीं हेतुपुरःसर चैत्याबाहेर ठेवलेलें आहे असें वाटतें. कार्लें येथील आगाशीच्या समोर आणखी एक खोदीव जवनिका आहे. हिच्या अग्रभागावर आडवें तीन खणी लांकडी दालन बसविलेलें असावें असें भोंवतालच्या खोबणींवरून आणि लटकणाऱ्या तुटक्या स्तंभांवरून अनुमान करतां येतें. या दालनाचा उपयोग नगारखान्यासाठीं करण्यांत येत असावा असें वाटतें. कार्लें चैत्यातील शिल्पकृत्यें सर्वांत अधिक सुरक्षित राहिलेलीं आहेत. छताच्या मूळच्या सागवानी फांसळ्या आणि स्तूपावरील मूळचें लांकडी छत्र आजही शाबूत आहेत. बेडसें चैत्य एवढा बंदिस्त, तरी त्याच्या फांसळ्या ढळून नष्ट झालेल्या आहेत. एकूण कार्लें येथील चैत्य सर्व बौद्ध चैत्यांत

विस्तीर्ण, उत्तुंग व उत्कृष्ट आहे; प्रसन्न, गंभीर आणि उदात्त आहे. हीनयान सातकर्णी शिल्पसरणीचा हा चूडामणी. येथें ऐश्वर्य आहे. डामडौल नाहीं; येथें अभिजात कला आहे, ओसंडती कृत्रिमता नाहीं; कौशल्याचें प्रदर्शन नाहीं; मूर्तींची गर्दी नाहीं; धर्मप्रवर्तकांची आग्रही टोंचणी नाहीं, स्वसंतुष्टतेचा बीडवार नाहीं! वस्तुतः स्तूप हें मृत्यूचें प्रतीक, पण येथें तें जीवनाची प्रेरणा देतें. वैजयंतीचा भूतपाल सेठी हा या लेण्याचा निर्माता. हें लेणें जम्बुद्वीपांत अद्वितीय आहे असें त्यानें येथील आपल्या लेखांत नमूद केलें आहे, तेंच खरें आहे. या पूर्वी शिल्पकारांनीं अनेक लेणीं खोदलीं व यानंतरही; पण या सारखें हेंच; त्याला जोड नाहीं, त्याला तोड नाहीं!

भाजयाच्या लेण्यांत अगदीं अखेरीस धबधब्यानजीक सूर्यगुंफा आहे. वरून कोसळलेला कडा तोंडाशींच पडल्यामुळें या गुंफेच्या अस्तित्वाची कोणालाही जाणीव नव्हती. १८७९ सालीं दगड व माती काढून याची साफसुफी करण्यांत आली. येथें इंद्र व सूर्य यांच्या प्रतिमा खोदलेल्या आहेत. पुष्पमाला धारण करणारा इंद्र ऐरावतावर आरूढ झालेला आहे, त्याच्या हातीं अंकुश आहे, हातीं पताका घेतलेला सेवक त्याच्या मागें बसलेला आहे, दुचाकी रथांत सूर्य व त्याच्या दोन बायका उभ्या आहेत, एकीचे हातीं छत्र व दुसरीचे हातीं चवरी आहे, रथाला चार घोडे जोडलेले आहेत, जमिनीवर पडलेल्या राक्षसीला किंवा राहूला हे घोडे तुडवीत आहेत. हें शिल्प प्राचीन, महायान पंथाचा प्रसार होण्या-पूर्वीचें आहे, यात संशय नाहीं. पण तें बौद्ध आहे कीं ब्राह्मणी? श्री. जॉनस्टन (Journal of the Indian Society of Oriental Art. June–December, 1939) सांगतात कीं हत्तीवर बुद्धाचा शत्रु मार हा आरूढ झालेला आहे आणि रथावर आरूढ झालेला शक्र आहे; बुद्धाला भिवविण्यासाठीं मारानें एक प्रचण्ड हत्ती निर्माण केला असें संयुत्तनिकायांत सांगितलेलें आहे; शुक्र व असुर यांचा संग्राम कुला-वक जातकात वर्णिलेला आहे; ह्या प्रसंगाचीं हीं दृश्यें आहेत. उलट-पक्षीं या लेण्यांतील शिल्पांचा बौद्धाशीं कांहींही संबंध नाहीं असं फर्ग्यूसन सांगतात. श्री. केतकर सांगतात कीं हें मगांच्या सूर्योपासनेचें दृश्य

आहे. हें लेणें सातवाहनांच्या अमदानींत खोदण्यांत आलेलें आहे, सातवाहन हें कुलनाम सप्तवाहन या सूर्याच्या अभिधानावरून सिद्ध झालेलें आहे, असें माझें म्हणणें आहे. सातवाहन हे सूर्याचे उपासक होते व वैदिक धर्माचे अनुयायी होते, हें ध्यानीं आणलें म्हणजे या लेण्यांतील प्रतिमा इंद्र व सूर्य यांच्याच आहेत अशी खात्री पटते.

## ( आ ) जुन्नर गट :

प्राचीन काळीं जुन्नर हें फार महत्त्वाचें ठाणें होतें. धार्मिक, राजकीय व आर्थिक दृष्टींनींही. सर्वसाधारण मराठी वाचकांना या विधानाची व्याप्ति उमजणार नाहीं म्हणून सांगतों : जुन्नर—जुनें नगर—जीर्ण नगर. जुण्ण हें जीर्णचें प्राकृत रूप. येथील एका लेण्यांतील लेखांत जुन्नि–नगर असें नांव आलें ही आहे. वयस्कर, अनुभविक या अर्थानेंही जुण्ण या शब्दाचा उपयोग करण्यांत येतो. जुन्नर ही प्राचीन महाराष्ट्राची राजधानी होती. जुन्नरच्या दाक्षिणेस मीना नदी व मीन्नेर खोरें आहे. शक जातीला मीन असेंही नांव होतें. मीननगर—मीन्नर नांवाची वस्ती जुन्नरच्या आसपास असावी. महाक्षत्रप नहपान हा शकांच्या क्षहरात या पोट-जमातींतला राजा. त्याचा मंत्री अयम वत्स याचा लेख भीमाशंकर लेण्यांत खोदलेला आहे. त्याची राजधानी येथेंच होती. सोपारा, कल्याण व चौल या पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांशीं तगर, पैठण वगैरे देशावरील व्यापारी पेठांचा संबंध जुन्नरनजीकच्या नाणे घाटानें जोडलेला होता. या घाटांतील लेण्यांत ख्रि. पू. दुसऱ्या शतकांतील आद्य सातवाहनांचे शिलालेख आहेत. जुन्नरभोंवतालच्या डोंगरांत सुमारें दीडशें लेणीं आहेत. मूळच्या हीनयान लेण्यांवर उत्तर कालांत महायान, जैन व ब्राह्मणी संस्कार झालेले आहेत. या लेण्यांतील शिलालेखांत कल्याण, भडोच वगैरे भरभराटलेल्या बंदरांतील व्यापाऱ्यांचे व रहिवाशांचे आणि शक, यवन वगैरे परकीयांचे दोन लेख आहेत. या सर्व प्रमाणांवरून या शहराचें महत्त्व सिद्ध होतें आणि येथील लेण्यांच्या संख्येचा उलगडा होतो.

| अ. नं. | लेण्यांच्या पोट-गटाचें नांव. | लेण्याची संख्या. | क्रमांक (गॅझेटीअर अनुसार.) | मोजमाप. | प्रकार. | काल, शतक. | महत्त्वाच्या तपशिलांचें टिपण. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | भीमाशंकर गट. | १० | २ | ३४'×१३½' | चैत्य. | ...... | लेणें अपुरें, कारण खडक खराब. उत्तरकालीन बैठी स्त्रीमूर्ति. छतावर रंगीत चौकटी व वर्तुळें. |
| | ,, | | ६ | ............... | मण्डप. | १ | महाक्षत्रप नहपान याचा मंत्री अयम वत्स याचा लेख. |
| (२) | अम्बिका गट. | १९ | १६ | ............... | जैन. | १०-११ | आम्रवृक्षाखालीं सिंहावर अधिष्ठित अम्बिका. चक्रेश्वरी, आदिनाथ, नेमिनाथ व क्षेत्रपाल. |
| | ,, | | २० | ............... | चैत्य. | १ | सातकर्णी स्तंभ. |
| | ,, | | २१ | ............... | ,, | १ | सातकर्णी स्तंभ. या गटांतील मुख्य लेणें. अपूर्ण. बेडसें धर्तीचें खोदकाम. |
| (३) | भूतलिंग गट. | १६ | ३६ | | चैत्यगृह. | | खोदीव फांसळ्या. धर्मचक्र. त्रिरत्न. |
| | ,, | | ३८ | ३०'×१२'×१०' | चैत्य. | | स्तूपाच्या अण्डाचा आकार पालथ्या भिक्षापात्रासारखा. गजलक्ष्मी, नागराज व गरुड. हे बुद्धाच्या प्रभावानें वैर विसरून एकत्र आले. |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (४) | शिवनेर गट. | ६२ | २ | .............. | चैत्य. | १ | सातकर्णी स्तंभ. लेण्यांत बाधीव स्तूप असावा. |
| | ,, | | १९ | ........... | ........ | ........ | दुर्गा, गणेश, बटुक. |
| | ,, | | २३ | ........... | ........ | ........ | भरधांव घोडा; जीन व लगाम आहेत, रिकबी नाहीं. |
| | ,, | | ४४ | २०¼'×२१'×९' | ........ | ........ | शिवाईचें मंदिर |
| (५) | तुळजा गट. | ११ | २ | ........... | चैत्य. | ........ | अद्वितीय वर्तुलाकार लेणें. |
| | ,, | | ३ | ........... | ........ | ........ | तुळजाईचें मंदिर. |
| | ,, | | ७ | ........... | ........ | ........ | नागराज, गंधर्व, पूजक. |
| (६) | गणेश गट. | २६ | ६ | ........... | चैत्य. | १ | सालंकृत सातकर्णी स्तंभ. स्तंभशीर्षावर हत्ती, स्फिन्क्स, वाघ, सिंह यांच्या मूर्ति. कल्याणच्या व्यापाऱ्याची देणगी. |
| | ,, | | ७ | ५७'×५१'×११' | ........ | ........ | सालंकृत सातकर्णी स्तंभ. स्तंभशीर्षांवर पशुमूर्ति. लेण्याद्रि गणपति मंदिर—अष्टविनायकापैकीं. |
| | ,, | | १४ | ........... | चैत्यगृह. | ........ | सातकर्णी स्तंभ. |
| (७) | सुलेमान गट. | ६ | ........ | ........... | ........ | ख्रि. पू. | जुन्नरच्या लेण्यांपैकीं सर्वांत प्राचीनांपैकीं एक. |

जुन्नरभोंवतालचीं लेणीं लोणावळें व नाशिक या गटांतील लेण्यांच्या मानानें कलेच्या व वैभवाच्या दृष्टीनें कमी दर्जाचीं आहेत. मात्र स्थापत्याच्या दृष्टीनें हीं लेणीं अधिक महत्त्वाचीं आहेत. लेण्यांचे व त्याच्या अंगोपागांचे आणि उत्क्रांतीचे सर्व नमुने येथें पहावयास मिळतात. ऐतिहासिक लेखांच्या अभावीं या लेण्यांचें वयोमान ठरविणें अशक्य असलें तरी शिल्पशास्त्रानें मान्य केलेल्या प्रमाणांवरून दिसून येतें कीं सह्याद्रींत लेणीं खोदण्यांत येऊं लागलीं तेव्हांपासून तों ही प्रथा लुप्त झाली तोंवर येथें शिल्पकार्य सुरू होतें.

जुन्नरभोंवतालच्या लेण्यांची स्थूल कल्पना येण्यासाठीं मागील कोष्टक पहा :

जुन्नरचीं लेणीं सात गटांत विभागलेलीं आहेत. कोष्टकांत दिलेलीं त्यांचीं नांवें उघडपणें आधुनिक आहेत. भीमाशंकर व अम्बिका हे गट ज्या टेकडींत आहेत तिचे नांव मानमोड; मूळचें नांव मानमुकुट. भीमाशंकर गटाचें मूळचें नांव ‘ गिध-विहार. ’ हीं दोन्ही नांवें येथील लेखांत नमूद आहेत. अम्बिका गटाला हें नांव त्यांतील अम्बिकेच्या मूर्तीवरून प्राप्त झालेलें आहे. ही मूर्ति फार तर दहाव्या किंवा अकराव्या शतकांतील आहे. मूळचें बौद्ध लेणें जैनांनीं आत्मसात् करून उत्तरकालीं त्यांत ही व इतर मूर्ति खोदल्या, हें निःसंशय. शिवनेर गटांतील शिवाई आणि तुळजा गटातील तुळजाई या देवतांची स्थापना मध्ययुगीन आहे. कार्ले येथील चैत्यासमोर एकवीरा देवीचें देऊळ आहे. या भागांतील मूळच्या रहिवाशांच्या या देवता असणें संभवनीय आहे. त्यांच्या ठाण्यांवर बौद्धांनीं लेणीं खोदलीं आणि यांचा जोर ओसरल्यानंतर त्या देवता मूलस्थानांवर अधिष्ठित झाल्या, हेंही संभवनीय आहे. जुन्नरभोंवतालच्या लेण्यांमध्यें गणेश गटांतील क्र. ७ हें लेणें सर्वांत विस्तीर्ण आहे. महाराष्ट्रांत गाणपत्यांचा पंथ पुरातन आहे, हें खरें; पण या लेण्यांतील गणपतीची स्थापना निःसंशय मध्ययुगीन आहे. अष्टविनायकांमध्यें लेण्याद्रींची गणना करण्यांत येते, यावरूनच हें स्पष्ट होतें. हें लेणें मूळचें बौद्धांचें. भिंतीवर अर्ध्या उठावांत खोदलेल्या चैत्यालाच गणपतीचें रूप देण्यांत आलें असलें पाहिजे.

नाशिक येथील क्र. ३ या लेण्याच्या पाठभिंतीवर अर्ध्या उठावाचा दागोबा आहे. असेंच खोदकाम तेथील क्र. १० या लेण्यांतही होतें; त्यावर खोदकाम करून भैरवाची मूर्ति निर्माण करण्यांत आलेली आहे. तेथें हें उघड दिसण्याइतकें स्पष्ट आहे आणि येथें हें शेंदरी कवचाखालीं लपलेलें असणें संभवनीय आहे, इतकेंच. चालुक्य, राष्ट्रकूट व शिलाहार यांच्या अमदानींत सह्याद्रींत अनेक लेणीं खोदण्यांत आलीं. त्यांच्या राजधान्या इतरत्र दूरवर होत्या; त्यांच्या राजवटीचा फायदा या भागाला मिळाला नाहीं हें तत्कालीन शिल्पकृत्यांच्या व उल्लेखांच्या अभावामुळें स्पष्ट दिसतें. नवीं लेणीं खोदण्याचें काम मोठ्या खर्चाचें. तें परवडण्यासारखें नसल्यामुळें या कालखण्डात या भागांतील जैनांनीं व ब्राह्मणांनीं येथील ओसाड पडलेल्या बौद्ध लेण्यांवर हीं आक्रमणें केलेलीं असावीत, असें वाटतें. जुन्नरच्या लेण्यांत एकूण ३५ लेख आहेत. बहुतेक लेख किरकोळ दानांचे आहेत. जुन्नरच्या लेण्यांत ऐतिहासिक महत्त्वाचा असा लेख एकच असून तो भीमाशंकर गटांतील क्रमांक ६ या लेण्यांत आहे. महाक्षत्रप स्वामी नहपान याचा मंत्री अयम वत्सगोत्री यानें हें धर्मकृत्य केलें, असा या लेखात उल्लेख आहे.

नहपान हा विषय येथेंच चर्चिला पाहिजे. कार्ले व नाशिक येथील लेण्यांनही नहपानाचे उल्लेख आहेत. नहपानाचा जावई उषवदात याचे कार्ले येथें एक आणि नाशिक येथें चार लेख आहेत. नहपानाची कन्या दक्षमित्रा हिचा लेखही नाशिक येथेंच आहे. सबब या विषयाची चर्चा नाशिकच्या लेण्यांच्या सदरांत करणें उचित, पण ती येथें केली आहे; कारण कार्लें व नाशिक येथील हे लेख त्याच्या किंवा त्याच्या कुलाच्या कारकीर्दीच्या बेचाळिसाव्या वर्षाचे आहेत आणि येथील लेख शेचाळिसाव्या वर्षाचा आहे; शिवाय तेथें तो क्षत्रप आहे व येथें महाक्षत्रप. जुन्नर येथें क्षहरातांचा उत्कर्ष झाला व नाशिक येथें उच्छेद. या लेखांतील उल्लेखावरून दिसतें कीं या चार वर्षांत नहपानानें महाक्षत्रपपद मिळविलें असलें पाहिजे व तें जुन्नर ही प्राचीन महाराष्ट्राची राजधानी काबीज केल्यानंतर त्याला मिळालेलें असलें पाहिजे. क्षहरात

ही शकांची एक पोटजमात. नहपान हा या जमातीचा स्वामी. महाराष्ट्रांत शकांचा प्रवेश कसा झाला हें इतिहासांतील एक कूट आहे. ख्रि. पू. दुसऱ्या शतकांत मीनँडर व त्याच्या ग्रीक टोळ्या भडोचपर्यंत आल्या होत्या. ख्रि. पू. पहिल्या शतकांत शक उज्जयिनीस स्थायिक झाले होते. सौराष्ट्रांत शक हे ग्रीकांचे उत्तराधिकारी. चिमट्याची चढाई ही ग्रीकांची लढाईची योजना. भडोचहून शक निघाले ते एकीकडे डांगणां-तून नाशिकला आले व कल्याणवरून काल्यांला आले. नंतर चिमटा आंवळून त्यांनीं जुन्नर काबीज केलें. महाराष्ट्रांत लोकप्रिय होण्यासाठीं त्यांनीं मोठमोठीं दानें दिलीं व लोकोपयोगी कार्यें केलीं. आपण ब्राह्मणांना सहा लाख गाई व संघाला करजक ( कर्जत कीं करंजगांव ? ) ग्राम दान दिल्याचें उषवदात कार्लें लेखांत सांगतो. सालोसाल शत-सहस्र ब्राह्मणभोजनें दिलीं, धर्मशाळा बांधल्या, घाट बांधले, धरमतरी ठेवल्या, वगैरे दानांचा उल्लेख त्यानें नाशिकच्या लेखांत केलेला आहे. पण या दानांच्या अंतर्यामींचा हेतु महाराष्ट्रीयानीं ओळखला. गौतमी-पुत्र सातकर्णीच्या नेतृत्वाखालीं संघटित होऊन त्यानीं क्षत्रपांचा उच्छेद केला. या अंतिम संग्रामाचें क्षेत्र नाशिकच्या परिसरांत असलें पाहिजे असें मला वाटतें.

स्थापत्याच्या दृष्टीनें जुन्नरच्या लेण्यांतील महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे येथील सातकर्णी स्तंभ – साधे व सालंकृत, भूतलिंग गटांतील क्र. ३८ या लेण्यांतील स्तूप आणि तुळजा गटांतील क्र. २ या लेण्याची रचना. साधे व सालंकृत या दोन्ही जातींचे सातकर्णी स्तंभ येथील लेण्यांत आढळतात. कार्लें चैत्यांत आहेत तसेच सालंकृत स्तंभ गणेश गटांतील क्र. ७ लेण्यांत आहेत; येथें ते दर्शनी आहेत, एवढेंच. जुन्नर लेण्यांत सर्व जातींचे स्तूप आहेत. भूतलिंग गटांतील क्र. ३८ या लेण्यांतील स्तूप हा येथील सर्वांत प्राचीन. स्तूपाचा आकार पालथ्या भिक्षापात्रासारखा असावा असें बुद्धाचें वचन आहे. या स्तूपाचा आकार अगदीं तसा आहे. येथील कांहीं स्तूपांवरील छत्रें छतावर अर्ध्या उठावांत खोदलेलीं आहेत, कांहीं छताला भिडतील इतकीं उंच आहेत. पहिल्या शतकाच्या अखेरीपासून ही प्रथा सुरू झाली. शिवनेर गटांतील क्र. २ या लेण्या-

तील स्तूपाच्या सध्यांच्या अवस्थेवरून तो प्रारंभीं बांधीव असावा असें दिसतें. तुळजा गटांतील क्र. २ हें लेणें अद्वितीय आहे. मध्यमार्गी वर्तुलाकार उभट स्तूप, त्याभोंवतीं सुमारें चार फुटांवर समांतर असे अष्टकोनी जिल्हईदार बारा खांब व त्याभोंवतीं सुमारें चार फूट रुंदीचा प्रदाक्षिणापथ अशी या लेण्याची मांडणी आहे; याचें छतही अर्ध-वर्तुलाकार आहे. बारा खांबावर खोदलेल्या वर्तुलाकार बह्यालावर तें उभारलेलें आहे. सुदाम, लोमश व कोंडिवटें हीं लेणींही वर्तुलाकार आहेत; याहून याचा घाट अगदीं वेगळा आहे. तेथें खांब नाहींत, येथें आहेत.

भीमाशंकर गटांतील क्र. २; शिवनेर गटांतील क्र. २८, २९, ३२, ३६, ३८, ४२ व ४३; तुळजा गटांतील क्र. २ आणि गणेश गटांतील क्र. ११, १२ व १३ या लेण्यांत रंगकाम केलेलें होतें. येथें अजंट्यासारखीं चित्रें नव्हतीं, रंगीत रेखाकृति होत्या. काळाच्या ओघामुळें व पाण्याच्या झिरपण्यामुळें या आकृति आतां अस्पष्ट झालेल्या आहेत. कांहीं अजून इतक्या स्पष्ट आहेत कीं त्याचीं छायाचित्रेंही घेतां येतात. मेजर वौछोप यांनीं एक छायाचित्र प्रसिद्धही (Buddhist Cave Temples of India : Pl. XXIX) केलेलें आहे. याच काय, सह्याद्रींतील सर्वच लेण्यांच्या भिंतींवर व खांबांवर तुसाचा गिलावा चढविलेला होता आणि त्यांवर चित्रें काढलेलीं होतीं व मूर्ति रंगविलेल्या होत्या असें तज्ञांचें म्हणणें (Dr. Kramrisch : B.C. Law Volume I. p. 614) आहे. बेडसें येथील चैत्याच्या छतावर आणि स्तंभांवर बुद्ध व त्याचे साथी आणि सेवक यांचीं चित्रें रंगविलेलीं होतीं. १८६१ सालापर्यंत हीं चित्रें शाबूत व चमकदार होतीं. सांगतात कीं कोणी बडे अधिकारी हीं लेणीं पहावयास येणार होते, म्हणून त्यांची साफसुफी करून ठेवण्याचा हुकूम सुटला असतां एका स्थानिक अधिकाऱ्यानें त्यावरील पडक्या रंगीत खरपुड्या खरडून काढल्या आणि रंगसफेती देऊन लेण्यांची सफाई केली!

**नाणे घाट :**

नाणे घाटाचा त्रोटक उल्लेख पूर्वीं येऊन गेलेला आहे. या घाटाच्या व त्याच्यानजीकच्या लेण्यांच्या सध्यांच्या अवस्थेवरून त्यांच्या प्राचीन

वैभवाची व माहात्म्याची यत्किंचितही कल्पना आतां करता येणार नाहीं. नाणे घाटाचा पायथा कल्याणपासून सुमारें चाळीस मैलांवर असून माथा जुन्नरपासून सुमारें वीस मैलांवर आहे. चौल, कल्याण व सोपारा या बंदरांशीं देशभागाचा संबंध सातवाहन कालांत मुख्यत्वेंकरून याच घाटामार्फत जुळलेला होता. घाटाच्या पायथ्याशीं वैशाखरें (वैश्यगृह), प्रधानपाडा व पुलु सोनाळें हीं खेडीं आहेत. पैकीं पुलु सोनाळ्याजवळ कणिकेर (सुवर्णवाहिनी) नदी व अकरा क्षुद्र लेणीं आहेत. यांपैकीं एका लेण्यांत आतां महिषासुरमर्दिनीची मूर्ति आहे. या घाटाची लांबी सुमारें तीन मैलांची आहे. वाटेंत शिंगरू पठार व गणेशस्थल येथें खोदीव रांजण आहेत. घाटमाथ्यावरील चौथऱ्यावरही असेच रांजण आहेत. त्यांना जकातीचे रांजण म्हणतात. हे रांजण बहुतकरून मध्ययुगीन असावेत. शिंगरू पठारावर एक टांकें आहे. वासिष्ठीपुत्र चतुर्पण सातकर्णी याच्या राजवटीच्या तेराव्या वर्षीं कामवन येथील दामघोष यानें हें टांकें खोदविलें असा त्यावर लेख आहे. हा राजा कोण याचा मात्र उलगडा होत नाहीं. याच्या आजूबाजूला आणखी अनेक टांकीं आहेत. समोर नानाचा आंगठा या नांवानें प्रसिद्ध असलेला सुमारें दीडशें फूट उंचीचा तुटलेला कडा आहे. नाणे घाटाची नळी सुमारें अडीचशें फूट लांब व सात ते सोळा फूट रुंद आहे. घाटमाथ्यावर उभें राहिलें असतां कळसूबाईपासून भीमाशंकरपर्यंत अर्धचद्राकृति पसरलेला सह्याद्रीचा सुमारें साठ मैलांचा प्रदेश दिसतो. उत्तरेस हरिश्चंद्रगडाचा प्रचंड चौथरा आणि दक्षिणेस ढाकचा किल्ला, वायव्येस खंडित शिखरांची माहुली श्रेणी आणि नैर्ऋत्येस सिद्धगड व मलंगगडाचीं अणकुचिदार शिखरें, पश्चिमेस सह्याद्रीच्या पायथ्याशीं कोंकणचें मैदान आणि पूर्वेस कुकडनेरचें उतरतें पठार व जीवधन हडसरचे किल्ले. कोंकणच्या ओलया उकाड्यामुळें कासावीस व घाटचढणीमुळें दमछाट झालेला जीव या पठाराच्या कडेवर येऊन उभा राहतांच वाहत्या वाऱ्याच्या झोंतांमुळें किती उल्हसित होतो हें प्रत्यक्ष अनुभव घेऊन पाहिल्याशिवाय कळावयाचें नाहीं.

अर्वाचिन काळांत आगगाड्याच्या वाहतुकीमुळें निरुपयोगी व ओसाड पडलेल्या या घाटाला पुन्हां ऊर्जितावस्था येणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. प्राचीन काळीं दुथडी भरून चाललेल्या नदीच्या प्रवाहासारखा हा घाट वाहता होता. टॉलेमीनें तर याचा उल्लेख ननगुण नदी असाच केलेला आहे ! घाटमाथ्याच्या चौथऱ्यापासून सुमारें अडीचशें फुटांवर नळीच्या दोहों बाजूंना अनेक लहानमोठीं लेणीं आहेत. विश्रांतीसाठीं व निवाऱ्यासाठीं वाटसरू त्यांचा उपयोग करीत असत. यांपैकीं बऱ्याच लेण्यांची आतां पडझड झालेली आहे.

यांपैकीं एका विस्तीर्ण दालनांत सातवाहनांचें देवकुल आहे. त्याच्या एका भिंतीवर देवी नायनिकेचा लेख आहे आणि पाठभिंतींत आद्य सातवाहन व त्यांचे आप्त यांच्या मूर्ति व नामलेख आहेत. अक्षरांच्या ठेवणीवरून दिसतें कीं हे लेख खि. पू. तिसऱ्या शतकाच्या उत्तरार्धांतील अगर दुसऱ्या शतकाच्या प्रथमार्धांतील आहेत. पुराणांत सातवाहनांना आन्ध्र म्हटलेलें असून त्यांचा वंश दिलेला आहे. बृहत्कथेंत सातवाहनांचा वृत्तांत आहे, पण येथें त्यांना आन्ध्र म्हटलेलें नाहीं. इंद्रायणीला मिळणाऱ्या आन्ध्र नदीच्या खोऱ्याचे, आन्ध्र मावळाचे, सातवाहन हे रहिवासी होते, म्हणून त्यांना हें अभिधान देण्यांत आलें असावें, असें माझें म्हणणें आहे. पुराणांतील सिमुक, कृष्ण व श्री सातकर्णी या तीन आद्य सातवाहनांचा उल्लेख वस्तुस्थितीला धरून आहे हें नाणे घाट व नाशिक येथील शिलालेखांवरून सिद्ध होतें. नाणे घाटांतील देवकुलातल्या प्रतिमावरील नामलेखांवरून त्यांच्याविषयीं अधिक तपशील मिळतो तो असा : श्री सातकर्णीच्या राणीचें नांव देवी नायनिका. त्याला कुमार भाय नांवाचा धाकटा भाऊ होता आणि कुमार हकुश्री व कुमार सातवाहन उर्फ वेदश्री असे दोन पुत्र होते. देवकुलांत कृष्णाची प्रतिमा नाहीं पण पुराणात त्याचा उल्लेख आहे व नाशिक येथें लेख आहे. यावरून वाटतें कीं सिमुकाच्या मृत्यूनंतर त्यानें वारसाला बाजूला सारून राज्य बळकावलें असावें. कांहीं पुराणांत सातकर्णी हा कृष्णाचा पुत्र असा उल्लेख आहे, तो बरोबर नाहीं, असें येथील लेखावरून सिद्ध

होतें. सिमुकानें काण्वायनांचा व शुंगांचा पाडाव केला असें पुराणें सांगतात. हें शक्य दिसत नाहीं. सिमुकाचें कार्य फार तर शहाजीच्या कामगिरीइतकें असावें, असें मला वाटतें. त्यांच्या पोटीं सातकर्णी व शिवाजी यांसारखे वीर आले, म्हणूनच त्यांचें नांव राहिलें. सातवाहन हे जातीनें ब्राह्मण होते असें नाशिकच्या गौतमी बालश्रीच्या लेखावरून दिसतें. ते वैदिक धर्माचे अभिमानी व पुरस्कर्ते होते असें त्या व नाणे घाटांतील लेखावरून सिद्ध होतें. नायनिकेच्या लेखाच्या आरंभीं इंद्र, संकर्षण, वासुदेव, वगैरे वैदिक देवांना व लोकपालांना वंदन केलेलें आहे. या लेखांत सातकर्णीनें किंवा नायनिकेनें केलेले यज्ञ व त्या प्रसंगीं दिलेलीं दानें यांचा तपशील नमूद केलेला आहे. सातकर्णीनें कमींत कमी बावीस प्रकारचे यज्ञ केले, त्यांपैकीं अनेक दोन दोन वेळां केले. वाजपेय, राजसूय, अश्वमेध हे अटीतटीचे व सम्राट्पदप्राप्तीचे यज्ञ त्यानें केले आणि अप्रतिहतचक्र, दाक्षिणापथपति हें यथार्थ अभिधान मिळविलें. सातकर्णीनें अशीं कोणतीं महत्कृत्यें केलीं कीं तीं साजरीं करण्यासाठीं त्यानें इतके यज्ञ करावे? बौद्ध व जैन धर्मांच्या आक्रमणामुळें वैदिक धर्म नष्ट होण्याचा प्रसंग येऊन ठेपला तेव्हां पतंजलीनें यज्ञ संस्थेचा पुनरुद्धार केला; उत्तरेंत पुष्यमित्र शुंग व दक्षिणेंत सातकर्णी सातवाहन यांनीं या संस्थेचा पुरस्कार केला. केवळ ते ब्राह्मण होते व संपन्न होते म्हणून नव्हे: त्यांनीं आपल्या शौर्यानें व कर्तृत्वानें हे यज्ञ करण्याची पात्रता सिद्ध केली होती. परंपरागत राज्यकर्त्यांच्या दौर्बल्यामुळें आणि बौद्ध व जैन धर्मप्रवर्तकांच्या अदूरदर्शी राजकीय कारवायांमुळें हिंदुस्थानावर परचक्रें आलीं आणि स्वराज्यें नष्ट होऊं लागल्यामुळें स्वदेशावर पारतंत्र्याचा प्रसंग येऊन ठेपला, तेव्हां पुष्यमित्र व सातकर्णी यांनीं परकीय आक्रमकांच्या व त्यांच्या एतद्देशीय साथीदारांच्या योजना हाणून पाडल्या. या कार्यांत यशस्वी झाल्यानंतर पुष्यमित्रानें व सातकर्णीनें दोन दोन अश्वमेध आणि सातकर्णीनें आणखी अनेक इतर यज्ञ केले. नायनिकेचा नाणे घाटांतील लेख या यज्ञांची साक्ष देत आहे. यज्ञांच्या संख्येवरून पाहतां या महत्कार्यांत पुष्यमित्रापेक्षां सातकर्णीचें श्रेय अधिक असावें असें वाटतें. सातवाहनांनीं हें कार्य एकदांच नव्हे, अनेकदा केलेलें आहे, याचा उल्लेख पुढें येईलच.

नाणे घाटांतील प्रतिमा झडून गेल्या आहेत. कांहींचे पाय मात्र शाबूत आहेत. या प्रतिमांवरील नामलेख व बाजूचा नायनिकेचा शिलालेख हे शाबूत आहेत. म्हणून वाटतें कीं या मूर्ति हे हेतुपूर्वक नष्ट करण्यांत आल्या असल्या पाहिजेत. असो. भक्ताला अंगुष्टाचेंही दर्शन पुरतें ! या न्यायानें व याच भावनेनें आपण त्यांचें दर्शन घेतलें पाहिजे. आपण शिवनेरीस किंवा रायगडास जातों, त्याच भावनेनें या स्थानाचें दर्शन घेतलें पाहिजे; कारण येथें ज्यांच्या प्रतिमा आहेत त्याच महात्म्यांनीं महाराष्ट्राचें माहात्म्य प्रथम प्रस्थापित केलें.

**( २ ) मुंबई गट :**

घारापुरी व कान्हेरी येथील लेणीं हीं मुंबई गटांतलीं मुख्य. घारापुरीचीं लेणीं ब्राह्मणी आहेत आणि कान्हेरीचीं बौद्ध. या गटांतील कान्हेरीशिवाय बाकीच्या लेण्यांचा तपशील कोष्टकांत दिलेला आहे.

मुंबई गटांत सर्वांत जास्त लेणीं कान्हेरी येथें आहेत. लहानमोठीं मिळून सुमारें सवाशें लेणीं येथें खोदलेलीं आहेत; यांहून जास्त लेणीं फक्त जुन्नर येथें आहेत. खि. पू. पहिल्या शतकापासून नवव्या-दहाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत लेणीं खोदण्याचें काम या भागात चालू होतें. कान्हेरीची अखेर हीच सह्याद्रींतील लेण्यांची अखेर. यानंतरही शेंदोनशें वर्षेपर्यंत येथील लेण्यांत वस्ती होती. बौद्ध धर्म नष्ट झाल्यानंतर तीं गोसावी बैराग्यांनीं व्यापलीं, एवढेंच. जुन्नरचीं लेणीं यापूर्वींच ओसाड पडलीं होतीं. कान्हेरीच्या लेण्यांमध्यें बहुसंख्या छोट्या कोठड्यांची आहे. मुंबईच्या मजूर वस्तींतल्या चाळींमध्यें एकेरी कोठड्या असतात. समोर आगाशी व आंत गाळा, तशाच धर्तीचीं हीं लेणीं आहेत. चाळी बांधीव असतात व त्यांत गाळ्यांचा गट असतो; येथील कोठड्या खोदीव आहेत व अलग आहेत, एवढाच फरक. अर्थातच हीं लेणीं अगदीं दरिद्री आहेत.

कान्हेरीचा चैत्य हें येथील उत्कृष्ट लेणें. वासिष्ठीपुत्र यज्ञश्री सातकर्णीच्या कारकीर्दीत दत्तमित्रीच्या गजसेन व गजवीर या व्यापारी बंधूंनीं हा चैत्य बांधला. कान्हेरीचा चैत्य हें कार्लें चैत्याचें भ्रष्ट अनुकरण आहे. तेथें होते तसे दोन सिंह-स्तंभ येथें आहेत. तेथला एक नष्ट झाला

आहे, येथले दोन्ही अस्तित्वांत आहेत. यांपैकीं एकावर सिंह आहेत व दुसऱ्यावर यक्ष. हे स्तंभ निकृष्ट दर्जाचे आहेत. प्रांगणाच्या कोंपऱ्यांत स्थान दिल्यामुळें हे उठून दिसत नाहींत. तेथल्या जवनिकेवर दात्यांच्या जोडप्यांच्या प्रतिमा खोदलेल्या आहेत, तशाच येथेंही आहेत. या प्रतिमांचें खोदकाम कार्ल्याहून अधिक सुबक आहे. तेथली आघाडीची अगाशी पडलेली आहे, येथली शाबूत आहे, पण बेढब आहे. तेथें आहेत तसेच सालंकृत सातकर्णी स्तंभ येथेंही आहेत; पण येथें ते दोन्ही बाजूंना समसमान नसल्यामुळें चैत्याचा तोल बिघडलेला आहे. या चैत्यासमोर सुमारें पंचवीस फूट उंचीच्या बुद्धाच्या प्रचण्ड मूर्ति आहेत. या चैत्यासमोर एक बांधीव स्तूपही होता. तरीही कार्ल्याची सर कान्हेरीला नाहीं. तेथे सजीव कला आहे, येथें निर्जीव कृत्रिमता; तेथें कल्पनासामर्थ्य आणि येथें अनुकरणशील दौर्बल्य!

यज्ञश्री सातकर्णीच्या कारकीर्दींत कान्हेरीची विशेष भरभराट होती, असें येथील लेखांवरून दिसतें. सोपारा येथील स्तूप पंडित भगवानलाल इंद्रजी यांनीं उघडला तेव्हां त्यांत त्याना यज्ञश्रीचें अपूर्व चांदीचें नाणें मिळालें. हे नाणें क्षत्रप धर्तीचे आहे. सौराष्ट्रांतील क्षत्रपांचा यज्ञश्रीनें पराभव केला असें यावरून अनुमान करण्यांत आलेले आहे. गौतमीपुत्र यज्ञश्री सातकर्णी आणि वासिष्ठीपुत्र पुळुमावि यांच्या अमदानींतले अनेक लेख कान्हेरी लेण्यांत आहेत. सौराष्ट्राचा महाक्षत्रप रुद्रदामन् आपल्या गिरिनार शिलालेखांत सांगतो कीं आपण सातकर्णी कुलांतील आपल्या जांवयाचा पराभव केला. कर्दमककुलोत्पन्न महाक्षत्रपकन्या व वासिष्ठीपुत्राची राज्ञी हिचा अमात्य सातेरक यांचा संस्कृत भाषेंत लिहिलेला लेख कान्हेरीच्या क्र. ५ या लेण्यानजीकच्या एका टांक्यावर खोदलेला आहे. हा लेख संस्कृतांत लिहिलेला आहे. हें मुद्दाम सांगण्याचें कारण कीं या काळातले इतर सर्व शिलालेख ब्राह्मी लिपींत व प्राकृत भाषेंत लिहिलेले आहेत. सातवाहन हे प्राकृताचे पुरस्कर्ते होते हें प्रसिद्ध आहे. हा वासिष्ठीपुत्र कोण आणि ही महाक्षत्रपकन्या कोणाची मुलगी याची ओळख पटविण्यास कांहीं साधन नाहीं. याबद्दल संशोधकांत वाद आहे. या वादांत न शिरतां या सर्व लेखांचा समन्वय

केला असतां दिसून येतें कीं महाक्षत्रप रुद्रदामन् यानें सातवाहनांचा पराभव करून अपरान्त काबीज केला होता आणि यज्ञश्रीनें युद्ध करून व महाक्षत्रपांचा पाडाव करून हा प्रदेश परत जिंकून घेतला.

## (३) नाशिक गट :

नाशिकनजीक लेण्यांचे दोन गट आहेत. उत्तरेस जैनांचीं चाभार-लेणीं व दक्षिणेस बौद्धांचीं पांडवलेणीं. चांभार गटांत चार लेणीं आहेत, शिलालेख एकही नाहीं आणि नावाजण्यासारखें शिल्पकृत्यही नाहीं; हीं लेणीं अकराव्या शतकाच्या सुमारास खोदलेलीं आहेत. पाण्डवगटांत चोवीस लेणीं आहेत, सत्तावीस शिलालेख आहेत, यांपैकीं पंधरा लेख महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासावर प्रकाश टाकणारे आहेत आणि अनेक शिल्पकृत्यें बारकाईनें अभ्यासण्याजोगीं आहेत.

नाशिकच्या दक्षिणेस सुमारें पांच मैलांवर, मुंबई रस्त्यालगत, त्रिरश्मि टेंकडींत खोदलेल्या बौद्ध लेण्यांना दन्तकथेनें पाण्डवलेणीं हें नांव दिलेलें आहे. हीं लेणीं पाण्डवांच्या अंगीं लावण्यांत येतात, कारण जें अद्‌भुत त्याचें श्रेय पाण्डवांना देण्याची आपली प्रथा आहे. त्रिरश्मि ही टेंकडी त्रिकोणी आहे; भोंवतालींही याच आकाराच्या अनेक टेंकड्या आहेत. त्रिरश्मि टेंकडीच्या मध्यावर भोंवतालच्या जमिनीच्या सपाटी-पासून सुमारे तीनशें फूट उंचीवर हीं लेणीं खोदलेलीं आहेत. बहुतेक सर्व लेणीं हीनयान पंथाचीं असून त्यांपैकीं कांहींवर उत्तरकालीन महायानांनीं संस्कार केलेले आहेत.

पाण्डवलेण्यांतील क्र. १९ हें लेणें सर्वांत प्राचीन. या लेण्याच्या प्रवेश-द्वारावर चैत्य गवाक्ष आणि वेदिकांची नक्षी खोदलेलीं आहेत. सात-वाहन कुलांतील दुसरा राजा कृष्ण याच्या अमदानींत श्रमण महामात्यानें हें लेणें खोदलें असा लेख त्यांत कोरलेला आहे. सातवाहन साम्राज्याचा संस्थापक सिमुक याचा कृष्ण हा धाकटा भाऊ. खि. पू. दुसऱ्या शतकाच्या आरंभीं यानें अठरा वर्षें राज्य केलें. श्रमण हें व्यक्तिनाम नसावें. धर्मप्रसारासाठीं अशोकानें धर्ममहामात्य नेमले होते. कृष्ण सातवाहनाच्या अशाच अमात्यानें हें लेणें धर्मकृत्य म्हणून खोदलेलें

असावें. शकपूर्व पहिल्या शतकांत महाराष्ट्रावर क्षहरात क्षत्रपांचें राज्य होतें. महाक्षत्रप नहपान हा त्यांचा नेता. त्याची कन्या दक्षमित्रा व जांवई उषवदात शक यांचे कोरीव लेख क्र. १० ते १४ या लेण्यांत आहेत. सातवाहन कुलातील गौतमीपुत्र सातकर्णी हाच शककर्ता शालिवाहन. यानें क्षहराताचा उच्छेद केला आणि महाराष्ट्र फिरून स्वतंत्र केला. त्याचीं महत्कृत्यें नमूद करणारा त्याची माता महादेवी गौतमी बालश्री हिचा शिलालेख क्र. ३ या लेण्यांत कोरलेला आहे. यावरून क्र. १० या लेण्याला नहपान–विहार आणि क्र. ३ ला गौतमीपुत्र–विहार अशीं नांवें देण्यांत आलीं आहेत. सातवाहनांची महाराष्ट्रांतील सत्ता अभीरांनीं नष्ट केली. योगायोग असा कीं अभीरांचा नेता ईश्वरसेन यालाही आपला लेख क्र. १० याच लेण्यांत खोदण्याची प्रेरणा व्हावी.

नहपान विहाराचें मध्यवर्ती दालन सुमारें पंचेचाळीस फूट औरस चौरस लांबीरुंदीचें व दहा फूट उंचीचें आहे. दालनाच्या तिहीं बाजूंस मिळून सोळा खोल्या खोदलेल्या आहेत. पाठभिंतीवर अर्ध्या उठावांत चैत्य खोदलेला होता. क्र. ३ या लेण्यांत असाच चैत्य आहे. अकराव्या शतकाच्या सुमारास या उठावाला भैरव मूर्तीचें रूप देण्यांत आलें आहे. चैत्याच्या बाजूच्या नर्तिका व वरची हर्मिका कायम आहेत. मध्यवर्ती दालनासमोर आगाशी ( २७$\frac{१}{३}$′×९$\frac{१}{३}$′×१२$\frac{३}{४}$′ ) आहे. आगाशीच्या आघाडीला चार पूर्ण व दोहों बाजूंस अर्धे सालंकृत सातकर्णी खांब आहेत. या स्तंभांच्या अग्रभागांवर आडव्या तुळईलगत पशूंच्या प्रतिमा खोदलेल्या आहेत; यांपैकीं कांहीं पशु वाघ, सिंह, असे यथार्थ आहेत व कांहीं स्फिन्क्ससारखे काल्पनिक आहेत. गौतमीपुत्र विहाराचा विस्तार जवळजवळ एवढाच आहे. दालनाच्या तिहीं बाजूंस मिळून अठरा खोल्या आहेत. या विहाराची ( ४७′×८′×१३′ ) आगाशी अधिक विस्तृत आहे. आगाशीच्या आघाडीला सातकर्णी धर्तीचे सहा पूर्ण व दोन अर्धे सालंकृत स्तंभ आहेत. प्रवेशद्वारासमोरच्या मधल्या दोन खांबांवर मनुष्यांच्या आकृति आहेत; बाकीच्या खांबांवर पशूंच्या, यथार्थ व काल्पनिक.

## नाशिक येथील लेण्यांचें कोष्टक

| क्रमांक. | प्रकार. | मोजमाप. | शिल्पाचा तपशील. | काळ. | शिलालेख. |
|---|---|---|---|---|---|
| १ | विहार. | ३८$\frac{1}{4}$'×६$\frac{1}{2}$'×१२$\frac{3}{4}$' | कपाळपट्टी व सुंदर पशुमूर्ति; उदा: चौखूर उधळलेला बैल, मागल्या पायानें तोंड खाजविणारा हरिण, किरण घेणारा वाघ. | | |
| २ | चैत्यगृह. | | बुद्धाचीं महायान ध्यानें; विद्याधर, लोकेश्वर, नागराज, आधुनिक लिंग, नन्दी. | खि पू. १ आणि ५ वें व ६ वें. १ लें. | (१) वासिष्ठीपुत्र श्री पुळुमायि. वर्ष ६.<br>(२) वासिष्ठीपुत्र श्री पुळुमायि. वर्ष १९. (गौतमीबालश्री)<br>(३) वासिष्ठीपुत्र श्री पुळुयामि. वर्ष ११.<br>(४) गौतमीपुत्र सातकर्णी<br>(५) ,, –महादेवी जीवसुता. |
| ३ | विहार. | ४५'×४१'×१०$\frac{1}{2}$' | गौतमीपुत्र विहार. सालंकृत सातकर्णी स्तंभ. | | |
| ४ | सत्र. | | सालंकृत सातकर्णी स्तंभ. हत्तीवर स्त्रिया, एकीचे हातीं आरसा. | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १० | विहार. | ४५ $\frac{1}{2}$'×४०' ते ४४ $\frac{1}{2}$' × ९ $\frac{3}{4}$' | नहपान–विहार. सालंकृत सातकर्णी स्तंभ. पाठ भिंतींतील चैत्याला बाराव्या शतकाचे सुमारास भैरवरूप दिलेलें असून त्याची अद्याप पूजा होते. | १ लें. | (१०) उषवदातं. (११) दक्षमित्रा. (१२) उषवदात. (१३) ,, (१४) ,, (१५) ईश्वरसेन अभीर. |
| ११ | विहार. | | अकराव्या शतकाचे सुमारास या विहारांत आद्य जैन तीर्थंकर ऋषभदेव याच्या मूर्तीची स्थापना. अम्बिका. वीर मणिभद्र. | | |
| १५ | विहार. | | बुद्ध, बोधिसत्त्व, नागराज. महायान मूर्ति. | ६ वें. | |
| १६ | चैत्यगृह. | | महायान चैत्यगृह. सिंहासनस्थ बुद्ध, बोधिसत्त्व, लोकेश्वर वज्रधर. इंद्र, नागराज ; मूळच्या विहारांत उत्तरकालीन मूर्ति. | | |
| १७ | विहार. | २३'×३२'×११' | सालंकृत सातकर्णी स्तंभ. मध्ययुगीन लिंग. सिंहावर बसलेल्या स्त्रीनें अंचाडा घातलेला असून तिच्या कपाळावर पांच बटा. हत्तीवर बसलेल्या स्त्रीच्या केसांत लमाणी झुमके. बुद्ध-निर्वाण. | ६ वें. | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १८ | चैत्य. | ३९$\frac{१}{२}$'×२१$\frac{१}{२}$'×१८' अर्धवर्तुलाकृति छत. | सातकर्णी स्तंभ. लांकडी कड्या बसविणेसाठीं छतांत खांचा खोदलेल्या आहेत. भूतलिंग लेण्यासारखी कमान व तीवर पशूंच्या प्रतिमा. | १ लें-अखेरीस. | (१९) महाहकुश्री. |
| १९ | विहार. | | | ख्रि पू. २रें | (२२) कण्ह सातवाहन. |
| २० | विहार. | ४५×४१ | विशिष्ट धर्तीचे सालंकृत स्तंभ. उत्तरकालीं महायान चैत्यगृहांत रूपांतर. १४'×१४'×१२$\frac{१}{४}$' मापाच्या गाभाऱ्यांत सिंहासनस्थ दहा फूट उंचीचा बुद्ध. बुद्धाच्या अनेक मूर्ति. स्थानिक लोक गाभाऱ्यातील बुद्धाला धर्मराज मानतात; श्रावणांतल्या तिसऱ्या सोमवारीं येथें यात्रा भरते. | २रें व ६ वें. | (२४) गौतमीपुत्र श्रीयज्ञ सातकर्णी. वर्ष ७. |
| २३ | विहार. | | महायान सिंहासनस्थ बुद्ध, अनेक बुद्ध मूर्ति, विद्याधर, विद्याधरी, चवरी ढाळणारे, नागराज, आर्य तारा, तारा देवीचीं अनेक ध्यानें. येथील उत्कृष्ट महायान शिल्प. | ६ वें. | (२५) वासिष्ठीपुत्र पुलुमायि. वर्ष २. |

नहपान विहाराचे स्तंभ गौतमीपुत्र विहाराच्या स्तंभांहून अधिक डौलदार आहेत. शिल्पशास्त्रज्ञ सांगतात कीं दुसऱ्या कोणत्याही विहाराचा दर्शनी भाग इतका प्रमाणशीर किंवा प्रेक्षणीय नाहीं. श्री. फर्ग्यूसन यांचा अंदाज आहे कीं नहपान विहाराचे कारागीर माळव्यांतले आणि गौतमीपुत्र विहाराचे दक्षिणेंतले, माळव्याचे कारागीर कसलेले व दक्षिणेंतले नवशिके, याचा हा परिणाम असावा! या दोन विहारांतील वैशिष्ट्यांचें वर्गीकरण सांगतों : (१) नहपान विहाराचे स्तंभ इराणी धर्तीचे आहेत. हे खांब षट्कोनी असून त्यांच्या दोन्ही अग्रांभोंवतीं कलश आहेत. आंत अमलक असलेली हार्मिका त्यांच्या अग्रभागीं आहे. गौतमीपुत्र विहाराचे स्तंभ अष्टकोनी आहेत. त्यांच्या बैठकीला खुर्ची नाहीं, कलश नाहीं. उध्वाग्रावरील कलश बसका आहे. वर हार्मिका नाहीं. (२) नहपान लेण्यांतील स्तंभांच्या दरम्यानची जागा मोकळी आहे. गौतमीपुत्र विहारांत या जागेंत खोदीव कठडे बसविलेले आहेत. अमरावती स्तूपाभोंवतालची समकालीन वेदिका याच धर्तीची आहे. या कठड्यांमुळेंच या खांबांच्या खालीं खुर्ची व कलश ठेवतां आला नाहीं. बांधीव मंदिरांमध्यें सभामण्डपाभोंवतालच्या स्तंभांच्या दरम्यान असेच कठडे बसविलेले असतात; कोठें उभे, कोठें कलते. मला वाटतें गौतमीपुत्र विहाराच्या नमुन्यावरूनच हा प्रघात सुरू झालेला असावा. (३) गौतमीपुत्र विहारांत महादेवी बालश्री हिचा लेख आहे.



नहपान स्तंभ



गौतमीपुत्र स्तंभ

त्यांत या लेण्याला विमान म्हटलेलें आहे. यक्ष-किन्नर आकाशांत भ्रमण करूं शकतात, म्हणून स्वर्गीय विमानांची वाहतूक त्यांनींच करावयाची, अशी समजूत. या विहार – विमानाचा भार वाहणारे सहा प्रचण्ड यक्ष ओट्याच्या तळालगत खोद-लेले आहेत. त्यांच्या आविर्भावावरून त्यांना होत असलेल्या श्रमांची कल्पना करता येते. बाधीव मंदिरांच्या तळाशीं वउंबऱ्यांच्या दर्शनी कडावर कीर्तिमुखें खोदलेलीं असतात. मला वाटतें, या विहाराच्या तळालगतच्या यक्षांच्या नमुन्यावरूनच कीर्तिमुखाचा प्रघात सुरू झालेला असावा. (४) गौतमीपुत्र विहाराच्या कपाळपट्टीवर सुमारें सहा इंच रुंदीचे नक्षीदार खोद-कामाचे दोन आडवे पट्टे आहेत. वरच्या पट्टीवर एक लाबलचक माळ खोदलेली आहे. खालच्या पट्टींतल्या अठ्ठावीस चौकटींत निर-निराळ्या पशूंच्या आकृति खोदलेल्या आहेत. (५) नहपान विहाराचें प्रवेशद्वार साधें आहे आणि या विहाराचें मुख्य प्रवेशद्वार सालंकृत आहे. येथील शिल्पकारांनीं ही कल्पना सांची तोरणावरून घेतलेली दिसते. महाद्वाराच्या उजव्याडाव्या बाह्यांवर प्रत्येकीं सहा आणि वर सात, सुमारें एक फूट औरसचौरस अशा खोदीव चौकटी

आहेत. त्यावर अर्ध्या उठावाचें खोदकाम केलेलें आहे. कपाळ-पट्टीवरील मधल्या चौकटीवर स्तूप, वर छत्र आणि दोहों बाजूंस रक्षक खोदलेले आहेत. डाव्या बाजूच्या चौकटींत बोधि वृक्ष आणि उजव्या चौकटींत सस्तंभ धर्मचक्र इतर चौकटींत भक्तांच्या प्रतिमा आहेत. उजव्या व डाव्या बाह्यांवरील सहा सहा चौकटींमध्यें एकेका घटनेंतील मुख्य प्रसंग खोदलेले आहेत. डावीकडील कथा प्रथम सांगतों : एक विवाहित जोडपें सुखानें संसार करीत होतें. भिक्षुणीचा वेष धारण करणाऱ्या दूतीनें पत्नीला जंगलांतल्या एका यतीकडे नेलें. यति पत्नीशीं ओढाताण करूं लागला, तेव्हा ती दूतीला बिलगली. इतक्यात तिचा पति तेथें आला व त्यानें तिची सुटका केली. आतां उजवीकडील गोष्ट ऐका : एक विवाहित जोडपें होतें. पत्नी रंगेल होती. नोकराबरोबर ती जंगलात पळून गेली. पतीनें त्यांना गाठलें. घरीं परतण्याबद्दल तो तिची विनवणी करूं लागला. ती ऐकेना; तेव्हा त्यानें तिला जबरदस्तीनें घरीं आणलें. या गोष्टींतील प्रसंग खोदतांना शिल्पकारांनीं किती दक्षता घेतलेली आहे हें पहा. भिक्षुणींना घरोघर प्रवेश असल्यामुळें त्यांचा वेष परिधान करून कुंटिणी सभ्य कुटुंबांत वावरत असत. पहिल्या कथेंतील दूती ही खरी भिक्षुणी नाहीं हे दाख-विण्यासाठीं शिल्पकारांनीं तिच्या पायांत नूपुर ठेवले आहेत ! दुसऱ्या गोष्टींतील पत्नी रंगेल आहे हें दर्शविण्यासाठीं शिल्पकारांनीं तिच्या मस्तकावर ऐटदार उष्णीष ठेवलेलें आहे, मोठ्या नखऱ्यांत ती एका झाडाला टेंकलेली असून हंसाला दाणा चारीत आहे, असें दाखविलेलें आहे ; घरधनी व त्याचा तरुण नोकर यांमधील फरक व्यक्त केला आहे ; पत्नीनें मुख खालीं वांकविलेलें आहे, तिरपें वळविलेलें आहे ; या आवि-र्भावावरून ती पतीबरोबर परतण्यास प्रतिकूल आहे, असें दर्शविलेलें आहे. या चौकटीच्या उभ्या उजव्या डाव्या चौकटींपलीकडे सुमारें सवा-सहा फूट उंचीचे द्वारपाल खोदलेले आहेत. चालुक्यकालीन मंदिरा-तील गाभाऱ्यांच्या प्रवेशद्वारांवर खोदीव उभेआडवे पट्टे आणि द्वारपाल व द्वारपालिका दिसतात. मला वाटतें, चालुक्य कारागिरांनीं हा तपशीलही येथील नमुन्यावरूनच घेतलेला असावा. प्रस्तरोत्खननांतून प्रस्तररचना निर्माण झाली, या सिद्धांताला या पुराव्यानें बळकटी येते.

वर ज्या दोन गोष्टी सांगितल्या त्यांच्या अभिप्रेत अर्थाचा उलगडा अद्याप झालेला नाहीं. नाशिक गॅझेटीयरचे कर्ते सांगतात कीं या गोष्टी सती व असती पत्नींच्या आहेत; प्रोत्साहनानें सती व्यभिचाराला प्रवृत्त होत नाहीं आणि अनुनयानें असती व्यभिचारापासून परावृत्त होत नाहीं, हा या कथाचा निष्कर्ष आहे. अनुरक्त वा उदासीन पतिपत्नी आणि व्यभिचारी परपुरुष याच्या आसक्तींचा संघर्ष अनादिसिद्ध आहे; प्रामाणिक कौटुम्बिक जीवनांतच सौख्य आहे, पातिव्रत्य हेंच स्त्रीच्या जीवनाचें सर्वस्व, हे सिद्धांत सत्य आहेत, हें खरें; पण त्यांचीं हीं ठळक प्रात्याक्षिकें या लेण्याच्या प्रवेश-द्वारांवर खोदण्याचें काय कारण? भिक्षु, भिक्षुणी व परिजन यांविषयीं कुटुंबप्रमुखांनीं सावध राहावें ही साधी सूचना देण्यासाठीं हा खटाटोप केलेला असेल असें वाटत नाहीं. सातवाहन कालांतील ग्रामीण व्यभिचाराचे अनेक उल्लेख गाथासप्तशतींत आलेले आहेत. ह्या समाज-स्थितीचें हें प्रात्यक्षिक असावें, असाही तर्क करतां येत नाहीं. ओरिसा प्रांतांत भुवनेश्वरनजीक उदयगिरीवर 'राणी का नूर' व 'गणेश गुंफा' या नांवांनीं विख्यात असलेलीं लेणीं आहेत. असेच अपहरण-प्रसंग त्यांच्याही प्रवेशद्वारांवर खोदलेले आहेत. तेथें तर या घटनांचें पर्यवसान संग्रामांत झालेलें आहे. कान्हेरी येथील लेण्यांनजीक अशाच आशयाचे प्रसंग खोदलेल्या शिला आढळल्या आहेत. तीन-चारशें वर्षेंपर्यंत एवढ्या विस्तीर्ण प्रदेशांत लोकांच्या नजरेसमोर असलेल्या या घटनांचा विषय कुटाळकीचा नसून गंभीर असला पाहिजे, हें उघड आहे. समकालीन वाङ्मयांतील उल्लेखांच्या अभावीं हें कोडें सुटलेलें नाहीं. पराक्रमी विक्रमादित्याचा पराभव विशिष्ट लक्षणांनीं युक्त असलेल्या एका बालकाच्या हातून होईल असें भविष्य वर्तविण्यांत आलें होतें, त्याचा पडताळा घेण्यासाठीं त्यानें वेताळाची योजना केली आणि पुष्कळ शोध केल्यानंतर वेताळाला तें बालक पैठणच्या कुंभारवाड्यांत आढळलें, अशी मध्ययुगीन कथा आहे. हें बालक म्हणजे पैठण येथें नुकत्याच स्थापन

झालेल्या शालिवाहन सत्तेचें द्योतक असावें असा श्री. जयस्वाल यांनीं तर्क केलेला आहे. त्याच धोरणानें या चित्रपटाची संगति लावतां येणें शक्य आहे असें मला वाटतें. घरधन्याच्या—म्हणजे सम्राट सातवाहनांच्या कुलांत सुखानें नांदणारी गृहिणी म्हणजे राजलक्ष्मी, भिक्षुणीच्या प्रेरणे-मुळें म्हणजे धार्मिक फितव्यामुळें, जंगलात ठाण मांडून बसलेल्या बकध्यानी जतीच्या कचाट्यांत गुरफटली, तिला तिच्या स्वामीनें जबरीनें ओढून स्वगृहीं आणली ; स्वामीच्या हरामी सेवकानें म्हणजे मुख्य मंत्र्यानें केलेल्या अनुनयामुळें हुरळलेली गृहस्वामिनी त्याला वश झाली, हें समजतांच गृहस्वामीनें तिला जबरदस्तीनें स्वगृहीं ओढून आणली ; असा तर या चित्रपटांचा आशय नसेल? महाराष्ट्राच्या राजलक्ष्मीचें हरण क्षहरात क्षत्रपांनीं केलें आणि स्वामी गौतमीपुत्रानें तिला स्वगृहीं आणलें. क्षहरात क्षत्रपांचें महाराष्ट्रावर सुमारें पन्नास वर्षें-पर्यंत राज्य होतें हें निश्चित. सातवाहनांचें राज्य त्यांच्या कबजांत कसें गेलें याचा धागाही इतिहासांत आढळत नाहीं. म्हणून या सत्तान्तराच्या मुळाशीं धर्माधिष्ठित हरामखोरी असावी असा संशय येतो. गौतमीपुत्राचें महत्कार्य या चित्रपटात चित्रित केलेलें असणें संभवनीय आहे, असा माझा तर्क आहे.

नहपान व गौतमीपुत्र विहारांतील शिलालेख विशेष महत्त्वाचे आहेत.

नहपानाचा मंत्री अयम याचा लेख जुन्नरच्या लेण्यांत कोरलेला आहे. हा केवळ दानलेख आहे. नहपानाच्या मंत्र्याचें नांव व त्याचें गोत्र याहून अधिक माहिती या लेखांत मिळत नाहीं. नहपानाचा जांवई उषवदात याचे लेख कार्लें व नाशिक येथील लेण्यांत आहेत. कार्लें येथील लेख हा केवळ दानलेख आहे. या लेखांच्या स्थानांवरून अनुमान करण्यांत आलेलें आहे कीं क्षहरात क्षत्रपांच्या महाराष्ट्रांतील राज्याचे दोन विभाग होते; दक्षिण भागाचें ठाणें जुन्नर येथें होतें आणि उत्तर- भागाचें नाशिक येथें. खुद्द नहपानाचे लेख कोठेंही मिळालेले नाहीत ; त्याचीं नाणीं मात्र पुष्कळ मिळालेलीं आहेत. त्याची राजधानी कोठें होती याचा तलास

लागलेला नाहीं. दंतकथा सांगते कीं त्याची राजधानी भडोच येथें होती ; मीन्नगर या नांवाच्या आधारानें संशोधक अनुमान करतात कीं ती मन्दसोर येथें होती. नहपान हा क्षहरात होता आणि उषवदात हा शक. उषवदाताच्या नाशिकच्या लेखांत त्याच्या दानांची बरीच माहिती आलेली आहे ; ऐतिहासिक अशी एकच घटना त्यांत नमूद केलेली आहे. तो सांगतो, उत्तमभद्रांनीं मालवांना कोंडलें होतें, भट्टारकाच्या (नहपानाच्या) आज्ञेवरून आपण स्वारी केली, आपण येत आहों असें कळतांच मालवांनीं पळ काढला आणि उत्तमभद्र क्षत्रियांच्या प्रभुत्वाला मान्यता दिली. या लेखांत त्यानें आपलीं कांहीं धर्मकृत्यें नमूद केलीं आहेत ; त्यानें ब्राह्मण-भोजनें घातलीं व गोदानें दिलीं ; भडोच, गोवर्धन, सोपारा वगैरे ठिकाणीं धर्मशाळा बांधल्या ; दमन, तापी, करबेना ( कृष्णा ? ), दाहनुका वगैरे नद्यांवर घाट बांधले व धरमतरी ठेवल्या. गौतमीपुत्र सातकर्णीनें शकांचा नाश केला, क्षहरातांच्या वंशाचा उच्छेद केला आणि सातवाहन-कुलाच्या यशाची व कीर्तीची प्रस्थापना केली, असें महादेवी, महाराज-माता, महाराजपितामही गौतमी बालश्री हिनें आपल्या लेखात नमूद केलें आहे. नाशिक जिल्ह्यांतील जोगळटेम्बी या गांवीं नहपानाच्या रुप्याच्या नाण्यांचा एक मोठा निधि सांपडला ; या नाण्यांवर गौतमी-पुत्राचें मोर्तब ठोकलेलें आहे. गौतमी बालश्रीच्या लेखांतील क्षहरातांच्या उच्छेदाबद्दलच्या विधानाचा हा प्रत्यक्ष पुरावा आहे. नहपान व उषवदात हे दोघेही अहिंदु ; त्यांनीं बौद्ध धर्माचा स्वीकार केला होता हें निश्चित. बौद्ध धर्माचा स्वीकार ही जणुं हिंदुस्थानावरील आक्रमणाची सनद, असेंच तत्कालीन परकीय आक्रमक मानीत असत. पाहिल्या सातकर्णीप्रमाणेंच गौतमीपुत्र हाही वैदिक धर्माभिमानी होता. गौतमी बालश्री सांगते, तो एकाङ्कुश, एकधनुर्धर, एकशूर, एकब्राह्मण होता ; त्याचा पराक्रम राम, अर्जुन, भीमसेन यांच्या तोडीचा होता ; त्याचें तेज सगर, राम, अंबरीष यासारखें होतें. या समकालीन उद्गारांवरून वाटतें कीं नहपान व सातकर्णी यांच्या युद्धाला धर्मसंग्रामाचें स्वरूप होतें. या संग्रामात जैन तटस्थ होते. आवश्यक सूत्रांवरील निर्युक्ति टीकेंत भद्रबाहूनें या युद्धाची माहिती दिली आहे, ती अशी : नहवन

( नहपान ) हा भडोचचा राजा. त्याच्या खजिन्यात अगणित संपत्ति होती. प्रतिष्ठानचा सालवाहन हा त्याचा प्रतिस्पर्धी. ह्याचें सैन्य-सामर्थ्य विख्यात होतें. ह्यानें चढाई करून भडोचला वेढा घातला. दोन वर्षें लोटलीं तरी भडोच पडलें नाहीं. तेव्हां हा पैठणला परत गेला. नंतर सालवाहनाचा एक मंत्री भडोचला आला. आपल्या राजाची आपल्यावर गैरमर्जी झालेली आहे, आपल्याला त्यानें हाकून दिलें आहे, अशा यानें थापा दिल्या. त्या खऱ्या मानून नहपानानें त्याला नोकरीस ठेवलें. या मंत्र्याच्या सांगण्यावरून चिरंजीव कीर्ति मिळविण्यासाठीं नहपानानें



श्रीयज्ञ सातकर्णी स्तंभ

खूप दानधर्म केला आणि मोठमोठीं धर्मकृत्यें केलीं. यामुळें त्याचा खजिना रिता झाला. ही बातमी मिळतांच सातवाहनानें भडोचवर स्वारी केली. खजिन्यांत द्रव्य नसल्यामुळें नहपानाचा पराभव झाला आणि या वेळ्यांतच तो मरण पावला. ही कथा ऐतिहासिक सत्यावर आधारलेली आहे असें मानावयास हरकत नाहीं. शिवाय व्यावहारिक दृष्टीनें पाहतां खजिन्याचें महत्त्व जैनांहून अधिक कोणाला वाटणार? आणि लष्करी सामर्थ्याचें महत्त्व मराठ्यांहून कोणाला जास्त वाटणार?

क्र. २० या लेण्यांत गोतमीपुत्र श्रीयज्ञ सातकर्णी याचा लेख कोरलेला आहे. गोतमीपुत्र सातकर्णीनें महाराष्ट्रांत स्थायिक झालेल्या क्षहरातांचा उच्छेद केला आणि गोतमीपुत्र श्रीयज्ञ सातकर्णी यानें सौराष्ट्रांतील क्षत्रपांचा मोड केला. ही घटना दुसऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास घडली. या लेण्यांतील स्तंभ स्वतंत्र धर्तीचे आहेत. कलश, हर्मिका, पशुमूर्ति इत्यादि प्रतीकें व अलंकार स्तंभांवर कोरण्याची प्रथा हा वेळपावेतों नष्ट झालेली असून त्यांवर येथून पुढें पर्णपुष्पांची व भिन्न आकृतींची नक्षी खोदण्यांत येऊं लागली. यज्ञश्री विहारांतील एका स्तंभाची आकृति वर दिलेली आहे.

## (४) देवगिरी गट :

औरंगाबाद, वेरूळ व अजंटा येथील लेणीं हीं या गटांतील मुख्य. अजंट्याचीं लेणीं त्यांवरील भित्तिचित्रांबद्दल जगप्रसिद्ध आहेत; वेरूळचीं लेणीं त्यांवरील मूर्ति व मांडणी यांबद्दल विख्यात आहेत; औरंगाबादचीं लेणीं तितकीं विख्यात नाहींत. औरंगाबादेस मुक्काम ठेवून लेण्यांचे हे तीनही संच सोयीनें पाहतां येतात.

### औरंगाबादचीं लेणीं :

प्रेक्षणीय स्थळें पाहण्यासाठीं औरंगाबादेस येणारे प्रवासी देवगिरीचा किल्ला आणि वेरूळचीं लेणीं पाहण्यासाठीं इतके उत्सुक असतात व त्यांना सुटीच्या तोकडीमुळें सवड इतकी थोडी असते कीं बिचाऱ्या येथील लेण्यांकडे सहसा कोणी फिरकतही नाहींत. औरंगाबाद छावणीच्या लष्करी नकाशांत भोंवतालच्या लेण्यांचे पांच गट दाखविलेले

आहेत. पैकीं पश्चिम व दक्षिण गट क्षुद्र आहेत. बेगमपुऱ्याचे उत्तरेकडील टेंकड्यांवर लेण्यांचे तीन गट आहेत आणि त्यांत अनुक्रमें ५, ४ व ३ लेणीं आहेत. पुढें दिलेल्या कोष्टकावरून या लेण्यांचा तपशील ध्यानांत येईल. श्री. यझदानी यांच्या The Rock-Hewn Temples of Aurangabad (Indian Arts & Letters. XI. I) या लेखावरून हा तपशील घेतलेला आहे आणि क्रमांकही तेच कायम ठेवले आहेत.

| क्रमांक | वर्ग | मोजमाप | काल | शिल्पाचा तपशील |
|---|---|---|---|---|
| १ | विहार | आगाशी : ७६ १/२′ × ९′ | ६ वें ते ७वें श. | खडकांत मूर असल्यामुळें काम अपुरें सोडलें. आगाशींत तऱ्हेतऱ्हेच्या नक्षीचे खांब; त्यांच्या अग्रभागीं स्त्रियांच्या मूर्ति. |
| २ | विहार | २१ १/२′ × १३′ | ७वें श. | अनेक बुद्ध मूर्ति, भोंवतीं प्रदक्षिणापथ, प्रचंड द्वारपाल. |
| ३ | विहार | ४१ १/२′ × ४२ १/२′ | | स्तंभावर अवर्णनीय नाजुक नक्षी आणि नृत्य, प्रणय, मद्यपान वगैरे विलासप्रसंग कोरलेल्या चौकटी. प्रचंड बुद्ध मूर्ति, दोहोंचाजूंस कुरळ्या केसांच्या गुडघे टेंकलेल्या भक्तिणींचे ताफे. सुतसोम जातकांतील प्रसंग खोदलेली कपाळपट्टी. |
| ४ | चैत्य | ४०′ × ३२′ | २ रें ते ३ रें श. | स्तूप; लहान हर्मिका; फांसळ्यांचें अर्धवर्तुलाकृति छत. साधे स्तंभ. |

| क्रमांक | वर्ग | मोजमाप | काल | शिल्पाचा तपशील |
|---|---|---|---|---|
| ५ | विहार | | ७वें श. | बुद्ध-मूर्ति-मंदिर ; भोंवतीं प्रदक्षिणापथ. ही मूर्ति महावीराची, अशा समजुतीनें जैन तिची पूजाअर्चा करीत. |
| ७ | विहार | ३८′ × २८′ | ७वें श. | मागील भिंतीवर अवलोकितेश्वर किंवा पद्मपाणीची उभी मूर्ति ; दोहोंबाजूंस संकटमुक्तीच्या प्रार्थनांचे प्रसंग. दालनाचे मध्यभागीं मूर्तिमंदिर व भोंवतीं प्रदक्षिणापथ. बौद्ध शक्तींच्या मूर्ति ; भृकुटि तारा, उग्र तारा व त्यांच्या सेविका. नृत्याचें उत्कृष्ट शिल्प. |
| ९ | | आगाशी : ८६′ × २०′ | ७वें श. | आंतील अंगास पांच दालनें. प्रचंड बुद्ध व शक्ति मूर्ति ; भोंवतीं प्रदक्षिणापथ ; प्रचंड द्वारपाल व उडते गंधर्व. खडकांत मूर असल्यामुळें मूर्ति भंगलेल्या व झिजलेल्या ; छतावर रंगीत चित्रें व नक्षी. |

औरंगाबादच्या लेण्यांपैकीं क्र. ४ हा चैत्य हीनयान धर्तीचा आहे. बाकीचीं लेणीं महायान शिल्पाचा महाराष्ट्रांत प्रसार झाल्यानंतर आणि यानंतरही बऱ्याच वर्षांनीं खोदलेलीं आहेत, किंबहुना बौद्ध लेण्यांच्या अखेरीच्या कालखण्डांत खोदलेलीं आहेत. अनुकरणाची आवड आणि कृत्रिमतेची पराकाष्ठा, अलंकारांचें बाहुल्य आणि सौष्ठवाचा ऱ्हास हीं या

कालखण्डांतील कलेच्या उतरत्या कळेच्रीं लक्षणें येथील लेण्यांत स्पष्ट-पणें दिसून येतात. या लेण्यांचें खोदकाम करणारे कारागीर व्यक्तिशः अत्यंत कुशल होते, सुवर्णकारानें अलंकारांची नाजुक घडण करावी एवढी बारकाईची नक्षी येथील स्तंभावर व मूर्तींनीं धारण केलेल्या अलंकारांवरही खोदलेली आहे. पण या कौशल्यांत कलेचीं रंगत नाहीं. हे कारागीर कुशल होते, पण त्यांचे अंगीं स्वतंत्र निर्माणशक्ति नव्हती. कौशल्याच्या प्रदर्शनामुळें लेण्याच्या मांडणीचा तोल बिघडतो व त्याच्या व्यक्तित्वाला बेडौलपणा येतो. बहुमोल अलंकाराच्या व कृत्रिम प्रसाधनां-च्या अतिरेकामुळें नैसर्गिक सौंदर्यालाही बटबटीतपणा येतो; मग हे बाह्योपचार प्रत्यक्ष सौंदर्याची जागा कशी घेऊं शकतील ? त्यामुळें विरस मात्र होतो; तशीच स्थिति येथें झालेली आहे. काळया बाजारांत किंवा लांड्यालबाड्या करून गडगंज संपत्ति मिळविणाऱ्या एखाद्या नवधनिकानें सभ्यतेला अवश्य असणारी रसिकता आपल्याही अंगीं आहे असें भासविण्यासाठीं नाना तऱ्हांच्या मौल्यवान्, प्रेक्षणीय, कलाकुसरीच्या वस्तूंनीं आपला दिवाणखाना खचून सजवावा आणि आपल्यासारख्या अनाहूत गरिबांनीं आश्रिताचा आविर्भाव धारण करून, शिसारी छपवीत, जपून पावलें टाकीत, त्या बारकाईनें पहाव्या, त्यांचें कौतुक करावें, अशा अलभ्य वस्तूंचा संग्रह करणाराची प्रशंसा करावी आणि आपण आश्चर्यानें दडपून गेलों आहोंत हें पाहून प्रसन्न झालेल्या मालकांनीं त्यांची किंमत सांगत आपल्या-बरोबर ऐटींत पण नाखुषीनें चार पावलें टाकावींत आणि कलेच्या या मूल्यमापनामुळें आपण विरमून जावें, अशीच अवस्था औरंगाबादच्रीं लेणीं पाहतांना होते. एकेका स्तंभावर नजर स्थिर होते व मन चकित होतें, पण प्रसन्न होत नाहीं. येथील सौंदर्यांत सहजता, सौष्ठव किंवा लालित्य नाहीं; संयम, गांभीर्य व शुचिता नाहीं. येथील सौंदर्य कृत्रिम व संकीर्ण आहे; नकली व नटवें आहे; बेडौल व उच्छृंखल आहे. उन्मादाची ही उसळी तारुण्याच्या प्रारंभींची नसून प्रौढावस्थेच्याही अखेरची आहे. सौंदर्याच्या उणिवेची जाणीव झाल्यानंतरच अलंकारांची विपुलता वापरांत येते, साहित्यांत आणि शिल्पांतही.

क्र. १ या लेण्याचे दर्शनी खांब भक्कम आहेत. त्यांच्या ऊर्ध्व भागां-वर वरच्या तुळयांना आधार देण्यासाठीं चौकटी बसविलेल्या आहेत व आंतल्या अंगास स्त्रियांच्या प्रतिमा खोदल्या आहेत. व्यक्तिशः या मूर्ति सुंदर व प्रमाणबद्ध आहेत; पण त्यांची जागा इतकी अडचणीची आहे आणि खांबांच्या व तुळयाच्या मानानें त्याचा आकार इतका लहान आहे कीं त्याचें सौंदर्य नजरेंत भरत नाहीं आणि त्यांची योजना निरर्थक वाटते. या मूर्ति सांची तोरणावरील नमुन्यावरून घेतल्या आहेत असें दिसतें. सांची स्तूपानजीकच्या तोरणावर आडव्या तुळया पेलण्यासाठीं स्त्रियांच्या तिरप्या मूर्ति बसविल्या आहेत. त्यांचा आकार व धाटणी हीं शिल्पाशीं व उद्दिष्टाशीं प्रमाणबद्ध व प्रयोजक आहेत. वेरूळ व बदामी येथेंही अशा मूर्ति आहेत. त्यांशीं तुलना केली असतां येथील मूर्ति गौण दिसतात व निरर्थक वाटतात. क्र. २ या लेण्यांत आहेत तसे प्रचण्ड द्वारपाल वेरूळच्या क्र. ८ या बौद्ध लेण्यांत आहेत व ठिक-ठिकाणच्या शैव लेण्यांतहि आहेत. त्यांचे अंगीं जी एक ऐट व ऐश्वर्य आहे तें मात्र येथें आढळत नाहीं.

हें दोषदर्शन झालें. आतां गुणवर्णन करतों.

औरंगाबादच्या क्र. ३ या लेण्यात बुद्धासमोर गुडघे टेंकून व हात जोडून बसलेल्या स्त्रीपुरुषाच्या अनेक मूर्ति आहेत. हें शिल्प अद्वितीय आहे; अनेक दृष्टींनीं. यथार्थदर्शन व आविर्भाव प्रसंगानुकूल आहेत. गळ्यांत टपोऱ्या मण्याच्या माला, हातीं कडीं व तोडे, दण्डावर बाजू-बन्द, कानीं कुण्डलें व कमरेस मेखला, हे अलंकार बारकाईनें कोरलेले आहेत. सर्वांनीं मस्तकावर शिरस्त्राणें धारण केलेलीं असून त्यांच्या मध्य-भागीं तुरा आहे. त्याखालून सुटलेल्या केंसांच्या बटा स्कंधापर्यंत रुळत आहेत. वैशिष्ट्य हें कीं सर्वांचे केंस कुरळे आहेत. कुरळ्या बटांचा कृत्रिम टोप विलायतेंत विशिष्ट दर्जाचे अधिकारी अजूनही वापरतात. गेल्या शतकांत युरपियन श्रीमंत व सभ्य स्त्रीपुरुष समारंभसमयीं असे टोप धारण करीत असत. या लेण्यांतील मूर्ति परदेशीयांच्या आहेत हें स्पष्ट आहे. हे लोक कोणत्या देशींचे व जमातीचे आहेत याबद्दल संशोधकांमध्यें एकमत नाहीं. कोणी सांगतात कीं हे लोक ईजिप्शियन

असावेत तर कोणाचे मतें ते असीरियन आहेत. बौद्ध युगांत हिंदी लोकांचा व बौद्ध धर्माचा प्रसार मध्य आशियांत झालेला होता आणि परदेशी दर्यावर्दी, व्यापारी, प्रवासी व भक्त याची हिंदुस्थानांत रीघ लागलेली होती. अशाच कांहीं निमित्तानें इकडे आलेल्या एखाद्या टोळीचें दृश्य दृष्टीसमोर ठेवून येथील शिल्पकारांनीं हें खोदकाम केलेलें असलें पाहिजे.

औरंगाबाद लेण्यांपैकीं क्र. ७ हें अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें आहे. यांतील मध्यवर्ती दालनाचे मध्यभागीं मूर्तिमंदिर असून त्या-भोंवतीं प्रदक्षिणापथ आहे. हें स्वरूप बौद्ध लेण्यामध्यें अद्वितीय आहे. वेरूळ, घारापुरी वगैरे शैव लेण्यांमध्यें हीच योजना केलेली आढळते. या लेण्याच्या एका भिंतीवर अवलोकितेश्वर पद्मपाणीची उभी मूर्ति खोदलेली असून तिच्या दोहों बाजूंस संकट-मोचन प्रार्थना-पट खोदलेला आहे. संकटमोचनासाठीं अवलोकितेश्वराची प्रार्थना करण्याचा बौद्धांमध्यें प्रघात आहे. हातीं कमल व मस्तकावर बुद्धमूर्ति असें अवलोकितेश्वराचें ध्यान असतें. त्याच्या प्रार्थनेचा आशय असा : "हे अवलोकितेश्वर, तूं सर्वज्ञ व सर्वसमर्थ आहेस ; दयाळू आहेस, कृपाळू आहेस, प्राणिमात्राचा संरक्षणकर्ता आहेस. हे महासत्त्व, आम्हांला त्रासणाऱ्या अग्नीपासून आमचें रक्षण कर, शत्रूच्या तरवारी-पासून आमची मुक्तता कर ; बंदिवास व दास्य यांपासून आमची सुटका कर ; जहाज फुटलें असता आमचा बचाव कर ; हिंस्र व संतप्त श्वापदें आणि विषारी जीवजंतूंपासून आमचें रक्षण कर ; व्याधि व मृत्यु यां-पासून आमची मुक्तता कर." या प्रार्थनेंतील प्रसंग अनेक बौद्ध लेण्यां-मध्यें खोदलेले व रंगविलेले आहेत. वेरूळच्या क्रमांक ३ या लेण्यांत हा पट खोदलेला आहे. संकटाचें प्रतीक व रक्षणप्रार्थना करणारी व्यक्ति, एवढेंच दृश्य तेथें खोदलेलें आहे. येथें प्रार्थना करणाऱ्या अनेक व्यक्ति आहेत आणि पद्मपाणि त्यांच्या साह्यार्थ धांवून आलेला दाखविलेला आहे. या सर्व प्रार्थनापटांमध्यें औरंगाबादचा पट उत्कृष्ट आहे. या लेण्यांत आहेत तशी नक्षी कोरलेले खांब इतरत्रही आहेत, पण येथील स्तंभांवर हत्तींच्या रांगा खोदलेल्या आहेत, तशा इतरत्र कोठेंही आढळत नाहींत.

क्र. ७ या लेण्यांतील उग्र-तारा व भृकुटि-तारा यांच्या मूर्ति अत्यंत श्रेष्ठ दर्जाच्या आहेत; किंबहुना अखिल हिंदुस्थानांतील बौद्ध शिल्पांत या मूर्ति उत्कृष्ट आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. याच लेण्यांत नृत्याचें प्रेक्षणीय दृश्य आहे. दक्षिणी नृत्याला विशिष्ट असा अंगन्यास नर्तिकेनें धारण केलेला आहे, भोंवतीं बसलेल्या स्त्रिया बांसरी, मृदंग व ताल वाजवीत आहेत, असें हें दृश्य आहे. नृत्य रंगांत आलेलें आहे, नर्तिका व तिच्या साथकारिणी एकचित्त झालेल्या आहेत, हें दिग्दर्शित करतांना या पटाच्या कारागिरांनीं कौशल्याची कमाल केलेली आहे. अजंठ्याच्या लेण्यांत (क्रमांक १) राजदरबारांत चाललेल्या नृत्याचें दृश्य रंगविलेलें आहे. औरंगाबादीच्या मानानें त्या नर्तिकेचा आविर्भाव कृत्रिम वाटतो. औरंगाबादचें शिल्पकृत्य उत्तरकालीन व कलेच्या ऱ्हासकालांतील आहे, तरीही या लेण्याचें खोदकाम करणाऱ्या कारागिरांनीं अजंठ्यावरही कडी केलेली आहे यांत संशय नाहीं.

## वेरूळचीं लेणीं :

दंतकथा सांगतात अजंठ्याची म्हणून, पण ती लागू पडते वेरूळला.

एकदां देवादिकांना इच्छा झाली कीं आपण मृत्युलोकीं जाऊन एक रात्र चैनींत घालवावी. यासाठीं जरूर तो परवाना मिळविण्यासाठीं त्यांनी आपलें शिष्टमंडळ इंद्राकडे पाठविलें. इंद्रानें परवानगी दिली, पण ती एका अटीवर, कीं रात्र संपण्यापूर्वी सर्वांनीं स्वर्गांत परत आलें पाहिजे. देवांनीं ही अट कबूल केली. इन्ध्याद्रि पर्वतावरील रम्य वनश्री व त्यांतील गुंफा पाहून त्यांचें मन रमलें व त्यांनीं तेथेंच रात्र काढावयाचा निर्णय घेतला. देवदेवतांनीं रात्रभर धिंगाणा घातला, इतक्या बेहोषपणें कीं पहांट होऊन कोंबडे आरवूं लागले, तरी त्यांना परतण्याची शुद्ध राहिली नाहीं. रात्र संपत आली तेव्हां देव भानावर आले, परतण्याच्या तयारीला लागले; पण आतां तें अशक्य होतें; कारण सूर्यकिरणांच्या स्पर्शामुळें त्या सर्वांना प्रस्तररूप प्राप्त झालें होतें. अजंटा व वेरूळ येथील लेण्यांत ज्या मूर्ति आहेत त्या याच देवदेवतांच्या!

वेरूळचीं लेणीं अनेक दृष्टींनीं अद्वितीय आहेत.

आतांपर्यंत आपण पाहिलीं तीं सर्व लेणीं कड्यांच्या कुशींत विवरांसारखीं खोदलेलीं आहेत. वेरूळचीं लेणीं पर्वताच्या शिखरानजीकच्या

उतारावर खोदलेलीं आहेत. या नैसर्गिक परिस्थितीचा फायदा घेऊन येथील शिल्पकारांनीं लेण्यांसमोर बंदिस्त व विस्तीर्ण प्रांगणें ठेवलेलीं आहेत. या परिस्थितीमुळेंच, मला वाटतें, येथील कारागिरांनीं खोदीव लेण्यांना मंदिरांची घाटणी दिलेली आहे. महायान कालांत बौद्ध लेण्यांच्या दर्शनी भागावर व अंतर्भागांतील भिंतींवर खोदकाम करण्यांत येऊं लागलें. वेरूळच्या शिल्पकारांनीं उत्क्रांत केलेल्या विशिष्ट प्रकारामुळें येथील लेण्यांच्या प्राकारांच्या आंतल्या व बाहेरल्या अंगांवर आणि भोंवतालच्या भिंतींवर खोदकाम करणें शक्य झालें. आतांपर्यंत आपण पाहिलीं तीं सर्व लेणीं बौद्ध. वेरूळ येथें बौद्ध, जैन व ब्राह्मणी या तीन्ही धर्मांचीं लेणीं आहेत. नाशिकनजीक बौद्ध व जैन लेणीं आहेत; तीं वेगवेगळया कालखण्डांत व निरनिराळया टेंकड्यांवर खोदलेलीं आहेत; शिवाय तेथील जैन लेणीं अगदीं क्षुद्र आहेत. बदामी येथें समतोल व समकालीन अशीं ब्राह्मणी व जैन लेणीं एकाच कपारींत शेजारीं शेजारीं खोदलेलीं आहेत; पण त्यांची संख्या अल्प आहे. जुन्नर येथें या तीन्ही धर्मांचीं लेणीं आहेत; पण त्यांपैकीं जैन व ब्राह्मणी लेणीं स्वयंसिद्ध नसून संस्कारसिद्ध आहेत. फक्त वेरूळ येथें या तीन्ही धर्मांचीं स्वयंसिद्ध व तुल्यकौशल्य अशीं लेणीं आहेत. या धर्मांच्या अनुयायांचे महाराष्ट्रांत वेळोवेळीं झालेले राजकीय संघर्ष लक्षात घेतले असतां प्रत्यक्ष धर्मकृत्यांच्या बाबतींत परस्परांनीं एकामेकांविषयीं व्यक्त केलेल्या सहानुभूतीचें व सहिष्णुतेचें या लेण्यांची निर्मिति व अस्तित्व हें प्रात्यक्षिक आहे, असें अभिमानपूर्वक, नव्हे, चुकलों, विनयपूर्वक, सांगावयास कांहीं हरकत नाहीं. आम्ही धर्मभोळे आहों, धर्मोन्मत्त नाहीं; धर्मभोळे इतके कीं तीन ताल लेण्यांतील बुद्धाला रामचंद्र मानून आम्ही त्याची पूजाअर्चा करतों. वेरूळच्या लेण्यांत असंख्य मूर्ति आहेत. असहिष्णु व धर्मोन्मत्त परधर्मीय मूर्तिभंजकांनीं यांपैकीं अनेक विच्छिन्न व विद्रूप केलेल्या आहेत; आणि दुर्दैवानें हेंही आमच्या सहिष्णुतेचेंच प्रात्यक्षिक आहे!

वेरूळ येथें तेहतीस लेणीं आहेत. यांपैकीं क्र. १ ते १२ हीं बौद्ध आहेत; क्र. १३ ते ३२ हीं ब्राह्मणी आणि अखेरचा संच जैन.

## बौद्ध लेणीं:

सोबतच्या कोष्टकावरून वेरूळच्या बौद्ध लेण्यांचा विस्तार व त्यांतील मूर्ति यांची स्थूलमानानें कल्पना करतां येईल.

## वेरूळ येथील बौद्ध लेण्यांचें कोष्टक :

| क्रमांक | मोजमापें | मुख्य शिल्पवैशिष्ट्यें |
|---|---|---|
| २ | ४८′ × ४८′ × १८′ | प्रवेशद्वाराजवळ सुमारें १४′ उंचीचे द्वारपाल; एकाच्या जटेंत छोटी बुद्ध मूर्ति व हातीं माला; दुसऱ्याच्या नक्षीदार शिरस्त्राणावर स्तूप व गळ्यांत ब्राह्मणी जानवें. सिंहासनस्थ प्रचण्ड बुद्ध; भोंवतीं गंधर्व व सेवक; प्रचण्ड बोधिसत्त्व; बारा सालंकृत स्तंभ : बैठकीशीं चौकोनी व अग्रभागीं वर्तुलाकार, कोंपऱ्यावर छोट्या मूर्ति. |
| ३ | ४६′ × ४६′ × ११′ | पद्मासन बुद्ध, कमलाच्या देंठाला नागांचा आधार–पैकीं पुरुषांच्या मस्तकांवर तीन, पांच किंवा सात फडा आणि स्त्रियांच्या मस्तकांवर एक किंवा तीन. अवलोकितेश्वराचा संकट–मोचन प्रार्थना–पट. दालनाभोंवतीं बारा कोठड्या. |
| ४ | ३५′ × ३९′ | पद्मपाणि बुद्ध, त्याच्या जटांत बुद्ध-मूर्ति, अंगावर मृगाजिन; दोहों बाजूंस भक्तिणी, एकीचे हातीं माला, दुसरीचे हातीं कळी. संकट–मोचन प्रार्थना–पट. अग्रभागीं झुलती पर्णशाखा कोरलेले स्तंभ. |
| ५ | ११७′ × ५८½′ | दालनाभोंवतीं ओटे व वीस कोठड्या. घारापुरी धर्तीचे स्तंभ. संघगृह. पद्मपाणि, दोहों बाजूंस मुकुटधारिणी भक्तिणी. |

| क्रमांक | मोजमापें | मुख्य शिल्पवैशिष्ट्यें |
|---|---|---|
| ६ | तीन दालनें : २६′ × २९′, २७′ × ४३′ व २७′ × २९′ | प्रचण्ड द्वारपाल ; प्रचण्ड बुद्ध ; पद्मपाणीसारखा वेष धारण केलेली द्वारपालिका. सरस्वती, शेजारीं मोर व ग्रंथपठण करणारा पण्डित. अंतर्गृहांत बुद्ध व भक्त यांच्या अनेक मूर्ति. |
| ८ | दोन दालनें : २८′ × २५′ व २८′ × २७′ | आसनस्थ बुद्ध ; चतुर्हस्त पद्मपाणि ; क्र. ६ सारखी सरस्वती. अंतर्गृहात वज्रपाणि ; प्रदक्षिणापथ. |
| ९ | | पुरुष, स्त्री व बालक यांच्या मूर्ति. औरंगाबाद व अजंटा येथेंही अशाच मूर्ति आहेत. बुद्धाची बाल्यावस्था किंवा दात्याचें कुटुंब. |
| १० | ८६′ × ४३′ × ३४′ ( विश्वकर्मा ते तीन ताल यांचा काल : इ. ५०० ते ६०० ) | चैत्य. विश्वकर्मा ऊर्फ सुतार–झोंपडी. घुमटाकार छत ; अष्टकोनी २८ खांब ; नागमूर्तींच्या आधारावर उभारलेल्या खोदीव फांसळ्या ; २७′ उंचीचा स्तूप ; त्याच्या दर्शनी बाजूस ११′ उंचीची बैठी बुद्धमूर्ति, मस्तकावर बोधिवृक्षाची कमान, उत्तरकालीन गवाक्ष, आंत व बाहेर सज्जे. या बुद्धाला आपला ज्ञातिदेव विश्वकर्मा समजून सुतार त्याची पूजा करतात. |

| क्रमांक | मोजमापें | मुख्य शिल्पवैशिष्ट्यें |
|---|---|---|
| ११ | तळमजला : १०२′ × ९′ | दोन ताल, दुमजली, दुख्या घर. याचा मातींत बुजलेला तळमजला १८७६ सालीं उकरून काढण्यांत आला. विश्वकर्म्यानें हें लेणें स्वतः राहण्यासाठीं खोदलें अशी दंतकथा. तळमजल्यांत प्रचण्ड पद्मासन बुद्ध, बाजूस पद्मपाणि व वज्रपाणि. पहिल्या मजल्यावर सिंहासनस्थ बुद्ध, पद्मपाणि व वज्रपाणि, भोंवतीं स्त्री-पुरुष भक्तगण. दुसऱ्या मजल्यावर आसनस्थ बुद्ध, चतुर्हस्त पद्मपाणि आणि अनेक छोट्या बुद्धमूर्ति. स्थूल पुरुष, त्याच्या डाव्या हातीं पैशांची थैली, बहुधा लेण्याच्या दात्याची प्रतिमा. |
| १२ | तळमजल्याचें बाहेरचे दालन : ११५′ × ४३′; आतले दालन : ४२′ × ४३′; तिसऱ्या मजल्याचें बाहेरचें दालन : ११५′ × ७०′ | तीन ताल, तिमजली. या मजल्यांना पाताळ, मृत्यु व स्वर्गलोक म्हणतात. प्रत्येक मजल्यावर बुद्ध, पद्मपाणि, वज्रपाणि व द्वारपाल यांच्या व स्त्रीपुरुषांच्या अनेक लहानमोठ्या मूर्ति. बुद्धाचे सात अवतार व अनेक ध्यानें; बुद्धनिर्वाण; अनेक चतुर्हस्त ब्राह्मणी देवी. नवग्रह. तिसऱ्या मजल्यांतील प्रचण्ड बुद्धाला राम मानून लोक त्याची पूजा करतात. हातीं दण्ड, वज्र, तरवार, ग्रंथ, ध्वज, पुष्प, नारळ धारण करणाऱ्या व्यक्तींच्या अनेक मूर्ति. स्थूल पुरुष, डाव्या मांडीवर पैशाची थैली; बहुधा लेण्याच्या दात्याची प्रतिमा. |

या बारा बौद्ध लेण्यामध्यें क्र. १० हा एकच चैत्य आहे; बाकीचे विहार. विहारांपैकीं क्र. १ हा सर्वांत प्राचीन व अगदीं साधा. क्र. ७ हा विहार असाच साधा आहे, पण तो अपुरा आहे. क्र. १ ते ४ या लेण्यांना धेडवाडा असें स्थानिक नांव आहे. बौद्ध धर्मांत अतिशूद्र लोक प्रथम प्रविष्ट झाले, याचें हें द्योतक असावें; किंवा थेरवाडा याचें अपभ्रष्ट स्वरूप. क्र. ५ या लेण्याला महारवाडा असें नांव आहे. संभवनीय आहे कीं हीं लेणीं ओसाड पडल्यानंतर या जातींतील लोकांनीं तेथें वस्ती केली असेल. नाहीं तर ब्राह्मण आहेतच बळी देण्याला, कीं मानव-जातीच्या उन्नतीसाठीं प्रयत्न करणाऱ्या बौद्धांची हेटाळणी करण्यासाठीं त्यांनींच हीं नांवें दिलेलीं आहेत! क्र. १ व ७ यांशिवाय बाकीचीं सर्व लेणीं महायान मूर्तींनीं नटविलेलीं आहेत. क्र. १० व ११ यांचा काल सहाव्या किंवा सातव्या शतकांतला आणि क्र. १२ चा सातव्या किंवा आठव्या शतकांतला.

हीनयान चैत्यांतील साधा स्तूप हें बौद्ध धर्माच्या मूल व शुद्ध स्थितीचें प्रतीक. परिवर्तनासाठीं जनतेला उद्युक्त करण्यासाठीं स्तूपां-भोंवतीं अलंकृत चैत्य निर्माण करण्यांत आले. महायान चैत्यांतील अलंकृत स्तूप हें बौद्ध धर्माच्या विस्तीर्ण व संकीर्ण अवस्थेचें प्रतीक. परिवार्तित परदेशीयांच्या पुरस्कारामुळें व संसर्गामुळें बौद्ध धर्म संकीर्ण झाला. आपलें माहात्म्य स्थिर व वृद्धिंगत करण्यासाठीं ब्राह्मणी संस्कृतीच्या पुनरुत्थापनाच्या संघटित योजनाचें अनुकरण केल्यावांचून गत्यंतर नाहीं असें प्रत्यंतर आल्यामुळें बौद्धांनीं अनेक ब्राह्मणी वैशिष्ट्यांचा स्वीकार केला. मगधांतील बौद्ध धर्म साधा व सीधा होता. अशोकानंतर हिंदुस्थानच्या राजकारणाचें, धर्मकारणाचें व संस्कृतीचें केंद्र पश्चिमेकडे झुकलें; मथुरेस त्यांवर तत्त्वज्ञानाचे संस्कार झाले आणि तक्षशिलेस मूर्तिपूजेचे. कनिष्काच्या कालापर्यंत बौद्ध धर्मावर ग्रीक व मध्य आशियायी संस्कृतींचे संस्कार झाले आणि गुप्त काळांत पुनरुत्थापित ब्राह्मणी संस्कृतीचे; सातवाहन व गुप्त काळात ब्राह्मणी संस्कृतीच्या प्रवर्तकांनीं वरिष्ठ वर्गांच्या संघटनेसाठीं लुप्त झालेल्या यज्ञसंस्थेचें पुनरुज्जीवन केलें व तत्त्वज्ञान संघटित केलें; राष्ट्रीय संघटनेसाठीं

बहुजनसमाजाच्या धार्मिक श्रद्धांचें शुद्धीकरण करून त्यांस आर्य संस्कृतींत समाविष्ट करून घेतलें; नव्या-जुन्या देवदेवतांना व नैसर्गिक शक्तींना मूर्त स्वरूपें देऊन त्यांच्या ऐहिक जीवनाभोंवतीं अवतारकृत्यांचीं तेजोवलयें निर्माण केलीं. जें यांनीं केलें तेंच बौद्धांनीं केलें व जैनांनींही. याचें दृश्य स्वरूप आपणास वेरूळ व अजंटा येथील लेण्यांत पहावयास मिळतें.

वेरूळच्या क्र. १० या लेण्याला विश्वकर्मा अशी संज्ञा आहे. दर्शनी चैत्याकार विस्तीर्ण गवाक्ष, खोदकामांत अलंकारार्थ वेदिका व स्तूप या धार्मिक प्रतीकांची योजना, साधा प्रमाणबद्ध स्तूप व चौकोनी हर्मिका, हीं प्राचीन हीनयान चैत्यांचीं लक्षणें येथें आढळत नाहींत. येथील स्तूपावर बोधिवृक्षाच्या मखरांत अकरा फूट उंचीची आसनस्थ बुद्धमूर्ति कोरलेली आहे; आणि मखराला आधार देण्यासाठीं बाजूंना अनुचरांच्या मूर्ति. एवढ्या मोठ्या मूर्तींना जागा मिळावी म्हणून स्तूपाच्या नगाऱ्याची उंची वाढविलेली असून अण्डाला बसका आकार दिलेला आहे. यामुळें बिघडलेली ढब सांवरण्यासाठीं हर्मिका ताऱ्यासारखी कंगोरेदार कोरलेली आहे. पवित्र अवशेषांचें धारण हें हर्मिकेचें उद्दिष्ट. या आणि अजंटा येथील क्र. १८ व २६ या चैत्यांतील स्तूपांवरील हर्मिका हे स्तूपांचे डौलदार अलंकार मात्र आहेत. सौंदर्यवृद्धि हें अलंकारांचें उद्दिष्ट; या स्तूपांवरील अलंकारामुळें त्यांना बेढबपणा मात्र आलेला आहे. प्रत्यक्ष स्तूपांची ही कथा, मग विहारांबद्दल विचारावयासच नको. राजवाड्यांत जसे रंगमहाल, तसेच अजंटा व वेरूळ येथील विहार. अलंकार व ऐषआराम धार्मिक अधोगतीला पोषक असतात. हीनयान कालांतील विहार सर्वसंगपरित्यागी बौद्ध भिक्षूंच्या तात्पुरत्या निवासाला योग्य होते. ते विहार केवळ पारिभाषिक अर्थानें विहार होते; येथील विहार हे प्राकृत अर्थानें. नाशिकच्या उत्तरकालीन विहारांच्या पाठभिंतींवर स्तूप कोरलेले असून त्यांभोंवतीं प्रदक्षिणापथ ठेवलेले आहेत. ब्राह्मणी उपासनेचें एवढें अनुकरण पुरें झालें नाहीं म्हणूनच कीं काय कोण जाणे, महायान विहारांत पाठभिंतींवर बुद्ध, पद्मपाणि, वज्रपाणि, वगैरे

अनेक मूर्ति कोरलेल्या आहेत व त्यांभोंवतीं प्रदक्षिणापथ ठेवलेले आहेत. ब्राह्मणी अवतार-कल्पनेचा बौद्धांनीं स्वीकार केला, एवढेंच नव्हे, बौद्धांनीं व जैनांनींही वैदिक व पौराणिक देवदेवता उचलून आत्मसात् केल्या; त्याच्या पौराणिक कथांसह. जे त्यांना हवेसे वाटले त्यांचा त्यांनीं स्वीकार केला, नकोसे वाटले किंवा घेतां आले नाहींत त्यांचा धिक्कार केला. वेरूळच्या क्र. ६ व ८ या बौद्ध लेण्यात व जैन इंद्रसभेंत सरस्वतीच्या मूर्ति कोरलेल्या आहेत आणि इंद्रसभेंत इंद्र व इंद्राणी यांच्या. वेरूळच्या बौद्ध विहारांत असंख्य लहानमोठ्या मूर्ति कोरलेल्या आहेत : प्रचण्ड बुद्ध व बोधिसत्त्व; बुद्धाचे अनेक अवतार व ध्यानें; गंधर्व व अप्सरा; भक्त व भक्तिणी – राजघराण्यातील व बहुजनसमाजांतील; प्रचण्ड द्वारपाल व द्वारपालिका; आणि संकट–मोचन प्रार्थना–पट; जणुं श्रद्धेची जत्रा भरली आहे! बौद्धांच्या श्रद्धेचें कौतुक करावयाचें व ब्राह्मणी श्रद्धेला मात्र अंधश्रद्धा म्हणून तिची मस्करी करावयाची, हा तर आधुनिक शिष्टाचार!

## जैन लेणीं :

वेरूळ येथील लेण्यांच्या श्रेणीच्या अगदीं अखेरीस जैन लेणीं खोदलेलीं आहेत; कारण तीं उत्तरकालीन (इ. ८००–१०००) आहेत. हेंच त्यांचें दुर्भाग्य; कारण कैलासदर्शनामुळें तृप्त झालेल्या व भांबावलेल्या प्रेक्षकाला त्यांतील वैशिष्ट्यांचें निरीक्षण करावयाची इच्छाच राहत नाहीं; शिवाय साधारणतः येथें येऊन पोंचेपर्यंत संध्याकाळ होत असल्यामुळें प्रेक्षकाला परतण्याची घाई असते; म्हणून हीं लेणीं बहुधा वरवरच पाहिलीं जातात. म्हणून या विषयाकडे अगोदर वळतों.

जैनांनीं फारशीं लेणीं खोदलीं नाहींत; कारण त्यांच्या उपासना पद्धतींत संघप्रार्थनेची योजना नाहीं. ओरिसा प्रांतांत उदयगिरि व खंडगिरि, सौराष्ट्रांत जुनागड आणि महाराष्ट्रांत अंकाई, कन्नड, धाराशिव, नाशिक, पाटण, बदामी व वेरूळ येथेंच जैनांचीं लेणीं आहेत. उदयगिरि व खंडगिरि या समोरासमोर असलेल्या टेंकड्या

भुवनेश्वराजवळ आहेत. उदयगिरीवर ६६ व खंडगिरीवर १९ लेणीं आहेत. उदयगिरीवरील हाथी गुंफा हें लेणें, त्यातील कलिंग सम्राट् खारवेल याच्या शिलालेखासाठीं विशेष प्रसिद्ध आहे. हीं लेणीं खि. पू. दुसऱ्या शतकांतील आहेत. हाथी गुंफेच्या दर्शनी कमानीवर हत्तींच्या रांगा कोरलेल्या आहेत आणि व्याघ्र गुंफा तर वाघाच्या तोंडांत कोरलेली आहे. गणेश गुंफेंतील अपहरण-प्रसंग आणि गजलक्ष्मी हीं दृश्यें नामांकित आहेत. बदामीचें जैन लेणें सातव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास खोदलेलें आहे.

वेरूळच्या सर्व जैन लेण्यांना क्र. ३२ हा एकच अनुक्रमांक दिलेला आहे. कारण तीं एकामेकांना लागून आहेत व आतून जोडलेलीं आहेत. इंद्रसभा व जगन्नाथ सभा या नांवांनीं तीं ओळखलीं जातात. समोर जवनिका, आंत पटांगण व भोंवतीं लेणीं अशी यांची मांडणी आहे. इंद्र व इंद्राणी आणि पार्श्वनाथ, गोमत व महावीर यांच्या प्रचण्ड मूर्ति या लेण्यांत जागोजाग कोरलेल्या आहेत. कैलासच्या नमुन्याचें एक छोटें मंदिर पटांगणांत कोरून काढलेलें आहे. कैलासप्रमाणें पटागणांत हत्ती व ध्वजस्तंभ ठेवलेले आहेत. येथील ध्वजस्तंभ सुमारे साडेसदतीस फूट उंचीचा होता. स्तंभाचें अंग घारापुरी धर्तीचें होतें व त्याच्या अग्रभागीं चौमुखी जैन मूर्ति होती. सुमारें सत्तर वर्षांपूर्वी लॉर्ड नॉर्थब्रुक ( गव्हर्नर जनरल - १८७२ ते १८७६ ) हीं लेणीं पहावयास आले होते. ते दर्शन घेऊन गेले आणि दुसऱ्याच दिवशीं हा स्तंभ कोसळला. त्याला साहेब मजकुरांची दृष्ट लागली कीं काय नकळे! इंद्रसभा या लेण्यांतील इंद्र व इंद्राणी यांच्या समोरासमोर असलेल्या प्रचंड मूर्ति ( उंची १४½′ ) आणि या दालनांतील नक्षी कोरलेले स्तंभ प्रेक्षणीय आहेत. इंद्र हत्तीवर बसलेला आहे आणि इंद्राणी सिंहावर. त्याच्या मस्तकावर वटशाखेचें छत्र आहे आणि तिच्या मस्तकावर आम्रशाखेचें. इंद्रसभेंत अष्टभुजा सरस्वतीचीही एक मूर्ति कोरलेली आहे. जगन्नाथसभेंत एका जागीं महावीराच्या साठ व पार्श्वनाथाच्या दहा अशा एकाच धर्तीच्या मूर्ति कोरलेल्या आहेत. अजंटा येथील बौद्ध लेण्यांत बुद्धाच्या मूर्तींचा असाच एक संच रंगविलेला आहे. बौद्ध चित्रकारांनीं आणि

जैन शिल्पकारांनीं अथवा त्यांच्या प्रेरकांनीं ही निच्चयनिर्मिति कोणत्या हेतूनें केली असावी हें समजण्यास साधन नाहीं. जैन मूर्तींमधील भेद केवळ चिन्हांनीं व्यक्त केलेला असतो आणि तो इतका सूक्ष्म असतो कीं तो तज्ज्ञांशिवाय कोणाला उमगत नाहीं.

जनतेशीं जैन एकजीव होऊं शकले नाहींत. स्वसंतुष्ट आत्मप्रौढी-साठीं व बहुजनसमाजाला तुच्छ मानण्यासाठीं विख्यात असलेल्या ब्राह्मणांवरही जैनांनीं कडी केली. आणि स्वतःला इतकें द्वेष्य करून घेतलें कीं त्यांचें माहेरघर जें सौराष्ट्र तेथें म्हण प्रचलित आहे कीं "माकड, मच्छर जू ने जती, ए मार्यामें पापज नथी!"

## ब्राह्मणी लेणीं :

वेरूळ येथें एकोणीस ब्राह्मणी लेणीं आहेत. हीं असंख्य मूर्तींनीं अलंकृत केलेलीं आहेत. शब्दशः असंख्य; त्यांची मोजदाद कोणीं केलेली नाहीं व करणें शक्यही नाहीं, इतक्या मूर्ति येथें कोरलेल्या आहेत. तेहतीस कोटि ब्राह्मणी देवदेवतांची गणना या मूर्तींवरूनच केलेली आहे कीं काय, न कळे. या लेण्यांपैकीं क्र. २७ व २८ हीं वैष्णव आहेत, बाकीचीं शैव. या वर्गीकरणाच्या दृष्टीनें हीं लेणीं पाहतांना एक गोष्ट प्रामुख्यानें नजरेस येते, कीं येथील शैव लेण्यांतही जागोजाग वैष्णव मूर्ति कोरलेल्या आहेत. उदाहरणार्थ, खुद्द कैलास लेण्यांत गोवर्धनधारी, कालियामर्दन वगैरे विष्णूच्या अवतारकृत्यांचे पट खोदलेले आहेत. कर्नाटकाप्रमाणें महाराष्ट्रांत शैव व वैष्णव यांमधील द्वंद्वाचें बंड फारसें कधींच माजलें नाहीं. याचें मुख्य कारण, महाराष्ट्राची सहिष्णु वृत्ति. वेरूळच्या ब्राह्मणी लेण्यांची घाटणी खोदकामाला विशेष अनुकूल आहे व शिल्पकारांनीं या योजनेचा इतका उपयोग करून घेतलेला आहे कीं या लेखाच्या संकल्पित मर्यादेत ह्या लेण्यांतील व त्यांभोंवतालच्या कपाटांत कोरलेल्या मुख्य मूर्तींची त्रोटक यादी कोष्टकाच्या संक्षिप्त रूपांत देणेंही अशक्य आहे. नमुन्यासाठीं क्र. १४, रावणकी खाई (काल इ. ६५० ते ७५०) या लेण्यांतील मुख्य मूर्तींची यादी देतों. मध्यवर्ती मंदिरांतील मुख्य मूर्ति दुर्गा भवानीची आहे.

दक्षिण भिंतीवर : व्याघ्रारूढ महिषासुरमर्दिनी, शिवपार्वती सारीपाट; शिवताण्डव, रावण-कैलासोत्थापन, भैरव, गणपति व सप्तमातृका. आणि उत्तर भिंतींत : भवानी, गजलक्ष्मी, वराह-अवतार, विष्णु व लक्ष्मी-नारायण. प्रत्येक मूर्तीभोंवतीं गणांचे ताडे आहेत. एकीकडे शैव व दुसरीकडे वैष्णव, अशी या मूर्तींची मांडणी आहे. कैलास मंदिराभोंवतालच्या ओंवऱ्यांतही शैव व वैष्णव, या दोन्ही पंथांच्या मूर्ति कोरण्यात आलेल्या आहेत.

क्र. १५, दशावतार ( काल इ. ६५० ते ७५० ) हें लेणें दुमजली आहे. वेरूळ येथील ब्राह्मणी लेण्यांत हें सर्वांत प्राचीन असावें असा श्री. फर्ग्यूसन यांचा अंदाज आहे. या लेण्याच्या प्रांगणासमोर कोरींव जवनिका आहे. वेरूळच्या अनेक लेण्यांत ही योजना आढळते. पर्वताचा आकार व त्यावरील लेण्यांचें स्थान हीं या योजनेला पोषक आहेत. दशावताराच्या वरच्या मजल्याच्या विस्तीर्ण दालनाचें ( ९५′ × १०९′ ) छत ४२ चौकोनी नक्षीदार खांबांनीं तोलून धरलेलें आहे. प्रत्येक खांबावरील नक्षी उत्कृष्ट दर्जाची व वेगवेगळ्या प्रकारची आहे. पाठभिंतींतल्या मध्यवर्ती गाभाऱ्यांत शिवलिंग आहे. तें भंगलेलें आहे. भोंवतालच्या मूर्ति मुख्यत्वेंकरून शैव आहेत. यांपैकीं भैरव व मार्कण्डेय यांच्या मूर्ति विशेष प्रेक्षणीय आहेत. हें लेणें दशावतार या नांवानें ओळखलें जातें खरें, पण येथें फक्त वराह, नृसिंह, वामन व कृष्ण एवढ्याच अवताराच्या मूर्ति कोरलेल्या आहेत. वेरूळच्या लेण्यात वराह अवताराचीं दृश्यें जागोजाग दिसतात. येथील या मूर्तींचें वैशिष्ट्य हें कीं त्यांतील हिरण्याक्षाच्या मस्तकावर पाच नागफण्या आहेत. यावरून श्री. पंत प्रतिनिधि ( ' वेरूळ ', पृ. ५७ ) अदमास करतात कीं हें चित्र कोरलें त्या वेळीं हिरण्याक्ष हा नागराज होता आणि त्याच्यापासून आर्य देवानें पृथ्वीची सुटका केली व तिचा उद्धार केला, अशी कथा प्रचलित असावी.

क्र. २१, रामेश्वर ( काल इ. ६५० ते ७५० ) या लेण्याच्या उजव्याडाव्या बाजूस गंगा व यमुना यांच्या प्रचंड मूर्ति आहेत. या लेण्याच्या आघाडीचे चार पूर्ण व बाजूंचे दोन अर्धे खांब फार प्रेक्षणीय आहेत.

समोरासमोर येतील अशा सुंदर व पुष्ट स्त्रियांच्या त्रिभंग मूर्ति त्यांवर कोरलेल्या आहेत. बदामीच्या लेण्यांत याच धर्तीचे, पण घेराला जरा लहान असे स्तंभ आहेत. या लेण्याच्या विस्तीर्ण दालनाच्या (६९'×२५११'×१५') भिंतींवर अनेक प्रसिद्ध शैव दृश्यें कोरलेलीं आहेत. या लेण्यांतील मध्यवर्ती चित्र शिव–पार्वती विवाहाचें आहे. हा राम व सीता यांचा विवाह आहे असें कल्पून या लेण्याला रामेश्वर हें नांव दिलेलें आहे. क्र. २५ कुंभारवाडा–या लेण्यांतील गाभाऱ्या-पुढील मंडपीच्या छतावर सप्तसप्तिवाहन अरुणसारथि सूर्यनारायणाचें सुंदर चित्र कोरलेलें आहे. संज्ञा व छाया या सूर्याच्या बायका. येथें या त्याच्या दोहों बाजूंस आलीढासन धारण करून धनुष्यवेध करीत आहेत. श्री. खरे ('मूर्तिविज्ञान',पृ. १४४) सांगतात, हिंदुस्थानांत इ. स. आरंभ किंवा त्या पूर्वींच्या सूर्यमूर्ति आहेत व त्यांच्या बाजूंस अंधकारवेधी, धनुर्धारी, आलीढप्रत्यालीढासनी, उषा व प्रत्युषा खोदलेल्या असतात. येथील मूर्ति इतकी प्राचीन नसली तरी याच धर्तीची आहे. क्र. २९ या लेण्याचें नांव सीता–न्हाणी (काल इ. ७५० ते ८००) किंवा डुमाळ लेणें. श्री. धनेश्वर ('वेरूळचीं लेणीं', पृ. ६२) सांगतात, "डुमाळ लेणें म्हणजे विवाहमंदिर. या लेण्यांत एके ठिकाणीं शिव-पार्वतींच्या लग्नसमारंभाचा देखावा आहे, यावरून त्यास डुमाळ लेणें नांव मिळालेलें आहे." वेरूळचा धबधबा याच लेण्याजवळ आहे. पापक्षालनासाठीं भाविक लोक या प्रवाहांत स्नान करतात. या लेण्याची मांडणी हुबेहुब घारापुरीच्या मुख्य लेण्यासारखी आहे. त्याहून याचा विस्तार जास्त (घारापुरी १२९'×१३०'×१७' आणि सीतान्हाणी १४९'×१४८'×१८') आहे आणि याचें खोदकाम अधिक सुबक आहे. तेथें आहे तसेच व तितकेच खांब येथें आहेत. मण्डपांत चोहींकडून उजेड यावा म्हणून भोंवतालचा खडक खोदून काढलेला आहे. प्रवेशद्वारापाशीं तेथें आहेत तसेच, पण वेगळ्या आसनांत बसलेले सिंह येथेंही ठेवलेले आहेत. दक्षयज्ञविध्वंस, रावणकैलासोत्थापन, शिवताण्डव, शिवपार्वतीपरिणय, महायोगी शिव, वगैरे मूर्तिपट या मंडपाच्या भिंतींत कोरलेले आहेत; घारापुरी येथेंही

असेच पट आहेत. तेथल्या महामण्डपांत आहे तसाच गाभारा येथेंही आहे. तेथल्याप्रमाणेंच येथेंही गाभाऱ्यावर प्रचण्ड द्वारपाल आणि द्वार-पालिका व खुजे यांच्या मूर्ति खोदलेल्या आहेत. हे द्वारपाल सुमारें सोळा फूट उंचीचे आहेत. खुद्द कैलासांतही एवढे प्रचण्ड द्वारपाल आढळत नाहींत.

## कालभैरव व सप्तमातृका :

वेरूळच्या ब्राह्मणी लेण्यांत शैव मूर्तींना प्राधान्य देण्यांत आलेलें आहे. शिव-पार्वतीविवाह आणि शिव-पार्वती सारीपाट यांसारख्या मूर्ति मोहक, आणि वीरभद्र व असुरमर्दिनी यांसारख्या मूर्ति भयानक आहेत. यामुळें केवळ सौंदर्याची उपासना व शिल्पकृत्यांत केवळ लालित्याची अपेक्षा करणाऱ्या पाश्चात्य प्रेक्षकांच्या अंगावर शहारे येतात; आणि पाश्चात्यांच्या प्रेरणेनें शिक्षित झाल्यामुळें स्वतःला सुसंस्कृत समजणाऱ्या एतद्देशीयांच्याही ! म्हणून या विषयाची थोडीशी चर्चा केली पाहिजे.

भैरव व वीरभद्र यांच्या अनेक मूर्ति वेरूळच्या लेण्यांत आहेत. दशावतार लेण्यांतील भैरवाची मूर्ति प्रचण्ड व विक्राळ आहे; आवेशानें पुढें झुकलेली आहे; क्षणार्धांत आपल्यावर तुटून पडेल असें वाटतें; पण आपण कितीही पतित असलों तरी असुरांच्या अंगीं असतात असें सांगतात तितके व तेवढे दुर्गुण आपल्या अंगीं नसल्यामुळेंच तें भाग्य आपल्या वांट्याला येत नाहीं ! भैरवाच्या गळयांत मुण्डमाला, शरीरावर नागाचे विळखे; त्याच्या हातांतील त्रिशूळानें रत्नासुर विद्ध झालेला आहे; संहाराच्या उन्मादांत तो डमरू वाजवीत आहे; त्याच्या हातांतील बळीचें ठिबकणारें रक्त भुकेलेली व तहानलेली काली एका पात्रांत धारण करीत आहे; तिच्या हातीं कमानदार खंजीर आहे; अशी ही भयानक मूर्ति आहे. या मूर्तीची निर्मिति हें रोगट कल्पनाशक्तीचें दृश्य स्वरूप आहे असें श्री. बर्गेस् यांचें मत आहे. कोणाच्या, कोण जाणे! ब्रह्मदेवानें कन्यागमनाचें पातक केल्यामुळें किंवा स्वतःचा घोर अपमान केल्यामुळें त्याचें मुण्डकें काटणाऱ्या शंकराचें भैरव हें ध्यान. महादेवाला यज्ञांत हवि मिळूं नये अशी अपमानकारक योजना करणाऱ्या दक्षाच्या

यज्ञाचा विध्वंस करण्यासाठीं शंकरानें वीरभद्र निर्माण केलेला. या कथा त्यांतील तपशिलासह प्रेक्षकाच्या ध्यानांत याव्यात म्हणून तर हे चित्रपट निर्माण केलेले आहेत. घोर कृत्यांसाठीं निर्माण केलेल्या या देवाचें किंवा देवांशाचें या चित्रपटांतील स्वरूप रौद्र आहे म्हणून त्यांच्या निर्मात्यांवर रांगट मनोवृत्तीचा आरोप करणें हें कमींत कमी अक्षम्य धार्ष्ट्य आहे. भैरव या दैवताचा महाराष्ट्रांत इतका प्रसार आहे कीं सामान्यतः प्रत्येक खेड्यांत बहिरोबाचें देऊळ असतेंच. वेरूळच्या लेण्यांत सप्तमातृकांच्या मूर्ति अनेक ठिकाणीं आहेत. रावणकी खाई या लेण्यांत सप्तमातृकांच्या पट्टांत प्रारंभीं तीन अस्थिपंजर आहेत. पहिला कालाचा व दुसरा कालीचा. पुढें चामुंडा, इंद्राणी, वाराही, वैष्णवी, कौमारी, माहेश्वरी व ब्राह्मणी या सात माता व त्यांच्या बैठकींखालीं त्यांचीं वाहनें : घुबड, हत्ती, वराह, गरुड, मयूर, वृषभ व हंस. साधारणतः प्रेत हें चामुंडेचें वाहन. येथें तिला कौशिक-वाहन केलेलें आहे. येथें आहेत तसे अस्थिपंजर इतरत्र कोठें फारसे दृष्टीस पडत नाहींत. कैलास लेण्याच्या मातृकापट्टांतील कौमारीच्या बैठकीखालच्या मोराच्या चोंचींत सर्प आहे. साधारणतः मातांची संख्या सात असली तरी कांहीं ठिकाणीं अष्ट व नवमातृकाही आढळतात. वेरूळच्या क्र. २२ या लेण्यांत अष्टमातृकापट आहे. असुरांचा वध करण्यासाठीं देवांनीं मातृका निर्माण केल्या, असें पुराणें सांगतात. बहुधा प्रत्येक खेड्यांत पाणवठ्या-जवळ, एखाद्या निर्जन डोहाजवळ किंवा कपारींत सात अप्सरांची स्थानें असतात आणि त्यांच्या कर्तृत्वाबद्दल अनेक स्थानिक दंतकथा ऐकूं येतात.

शिव हा मूळचा व मूळच्या अनार्यांचा देव; आणि सप्तमातृका या मातृप्रधान व अनार्य जमातींच्या देवता. आर्यांनीं या देवताचें आर्यी-करण केलें. अनार्यांच्या आर्यीकरणाच्या योजनेंतील हा एक भाग होता. शंकराचें व त्याच्या आराधनेचें स्वरूप सुसंस्कृत व सौम्य करण्यांत आलें. गौरी ही दक्षकन्या, आर्या. पुराणांहून प्राचीन असलेल्या गाथासप्त-शतींत तिला अज्जा—आर्या म्हटलेलें आहे. आर्या गौरीचें शंकराशीं लग्न लावून देण्यांत आलें, त्याचे दुर्दम्य मनोविकार त्याच्या किंवा तिच्या

कक्ष्यांत राहावे म्हणून. आर्यांनीं एवढें केलें तरी आर्यांच्याच ग्रंथांत त्याचें मूलस्वरूप कधीं कधीं प्रकट झालेलें दिसतें; शिवाचें व शिवेचेंही; कारण गौरी ही आर्या असली तरी मूलतः पार्वती. भैरव हें महादेवाचें रौद्र स्वरूप आणि काली ही कालभैरवाची सहचरी. दशावतार लेण्यांतील भैरवमूर्तींत काळ व काळी यांचें मूलस्वरूप व्यक्त केलेलें आहे. शंकर मूलतः वेदबाह्य व वेदविरोधी होता. शंकराच्या चारित्र्याचा हा अंश वीरभद्रांत प्रकट झालेला आहे. म्हणूनच अवैदिक व चातुर्वर्ण्यविरोधी वीरशैव पंथांत वीरभद्रास प्रामुख्य देण्यांत आलेले आहे. सप्तमातृकांचीं नांवें व वर्णनें पाहिलीं असतां त्यांमध्यें आर्य व अनार्य या दोन्ही संस्कृतींचे अंश समाविष्ट करण्यांत आलेले आहेत, असे दिसून येतें. श्री. खरे (' मूर्तिविज्ञान ', पृ. १८६ ) सांगतात, " वाराही, ऐंद्री, वामनी, नारसिंही या वैदिक अंश दाखविणाऱ्या, तर गणेश, वीरभद्र, भैरव हे व माहेश्वरी, कौमारी, चामुंडा या अनार्य वंश सुचवितात." मातृप्रधान अनार्य संस्कृतींतील दैवतांचा स्वीकार करून ब्राह्मणांनीं त्यांचें शुद्धीकरण केलें, त्यांचीं रूपें व वाहनें निश्चित केलीं आणि त्यांच्या आख्यायिकांचें संपादन करून त्याना पुराणांत व मंदिरांत स्थान दिलें. ब्राह्मणांनीं शंकराचें शुद्धीकरण केलें, तेंही आंखडत्या हातानें. त्यांनीं शंकराला त्रिमूर्तींत समाविष्ट करून घेतलें, पण अंतिम स्थान दिलें. परंतु पुराणांत संकलित केलेल्या लोककथांमध्यें शंकरालाच प्रामुख्य देण्यांत आलेलें आहे; सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व लय या तिन्ही अवस्थाचा कारक मानलें आहे. येथें व घारापुरीस त्रिमूर्ति कोरलेली आहे. हीं तिन्ही मुखें शंकराचींच, असें कांहीं संशोधकांचें मत आहे. तें कसेंही असो. बहुजनसमाजाच्या आर्यीकरणाच्या संकल्पित योजनेचा हा भाग अत्यंत यशस्वी झाला. मुख्यत्वेंकरून शंकराच्या आर्यीकरणामुळें बौद्धांचें परिवर्तनक्षेत्र नष्ट झालें. या प्रकाराची बौद्धांना किती चीड आली याचें गमक त्यांच्या तंत्रग्रंथांत मिळतें. या ग्रंथांत मूर्तिनिर्मितीच्या बाबतीत सांगितलें आहे कीं वज्रहुंकार आपल्या पायांखालीं भैरवाला तुडवीत आहे आणि त्रैलोक्यविजय आपल्या डाव्या पायाखालीं महेश्वर व उजव्या पायाखालीं

गौरी यांना तुडवीत आहे, असें दाखवावें. बौद्धांनीं अशा ध्यानाच्या मूर्ति केल्याही असतील, वस्तुस्थिति मात्र याच्या अगदीं उलट झाली. बौद्ध धर्मीय राजे नष्ट झाले, बौद्ध धर्माविषयीं सहानुभूति व सहिष्णुता बाळगणारे राजवंश नष्ट झाले आणि बहुजनसमाजाचें मतपरिवर्तन झाल्यामुळें बौद्ध धर्म आपल्या मातृभूमीला पारखा झाला!

वेरूळच्या लेण्यांतील शैव ध्यानांबद्दल अनेक प्रवाद ऐकूं येतात. कोणी सांगतात, महाराष्ट्रांतील मध्ययुगीन शाक्त पंथाचें उपासनाकेंद्र येथें होतें. मेडोज टेलर तर सांगतो कीं येथील चित्रपटांत आपल्या व्यवसायांतील सर्व रहस्यांचा उलगडा केलेला आहे असें त्याला एका ठगानें सांगितलें होतें! वेरूळ येथें आहेत तेवढीं शिवाचीं ध्यानें इतरत्र व एकत्रित अशीं कोठेंही पाहावयास मिळणार नाहींत. आगम ग्रंथांत शिव व शक्ति यांच्या अनेक ध्यानांचें तपशीलवार वर्णन दिलेलें असतें; त्यांचा येथील मूर्तींशीं कितीसा समन्वय होतो, हें तज्ज्ञांनींच पाहिलें पाहिजे.

## कैलास :

वेरूळच्याच नव्हे आणि सह्याद्रींतीलच नव्हे, संपूर्ण हिंदुस्थानांतील लेण्यांमध्यें, आणि शिल्पकृत्यांमध्येंही, कैलास या लेण्याचें स्थान अत्युच्च व स्वतंत्र आहे; म्हणून त्याचा उल्लेख स्वतंत्र शीर्षकाखालीं व अखेरीस केलेला आहे.

वेरूळच्या क्र. १६ या लेण्याचें नांव कैलास. याला रंगमहाल असेंही स्थानिक वैकल्पिक अभिधान आहे; कारण सांगतात कीं हें लेणें एका काळीं रंगविलेलें होतें.

कैलासची मांडणी हुबेहुब बाधीव मंदिरासारखी आहे. आघाडीला गोपुराच्या धर्तीचा प्रवेशद्वारापुरता व नियोजित मंदिरापुरता एकसंधी चौथरा मध्यें ठेवून त्याभोंवतालचें पटांगण काळ्याकाभिन्न खडकांतून खोदून काढलेलें आहे. या पटांगणाची लांबी २७६′ व रुंदी १५४′ असून पिछाडीच्या तोडलेल्या कड्याची उंची १०७′ आहे; आणि तयार मध्यवर्ती मंदिराची लांबी १६४′, रुंदी १०९′ व पटांगणाच्या

पृष्ठभागापासून विमानाच्या कळसापर्यंतची उंची ९६′ आहे. मंदिराचा चौथरा मोकळा करण्यासाठीं पाथरवटांना कमींत कमी तीस लक्ष घनफूट खडक खोदून काढावा लागलेला आहे. मध्यवर्ती मंदिर सुमारें वीस फूट उंचीच्या चौथऱ्यावर अधिष्ठित आहे. प्रवेशद्वारानजीक स्वतंत्र दुमजली चौकोनी नन्दिमण्डप ( २६′ × २६′ ) असून तो सभामण्डपाला सेतूनें जोडलेला आहे. सभामण्डपांत जाण्यासाठीं जिने आहेत. ते या सेतूच्या दोहों बाजूंना आहेत. मंदिराच्या सभामण्डपांत (५७′ × ५५′) चार चार खांबांचे चार चौकडे आहेत. गाभारा चौकोनी (१५′ × १५′) असून त्याभोंवतीं प्रदाक्षिणापथ आहे. मंदिराच्या पिछाडीस प्रदाक्षिणेलगत पांच उपमंदिरें आहेत. मुख्य व उपमंदिरांवर सालंकृत स्वतंत्र कळस आहेत. नन्दिमण्डपाशेजारीं पटांगणांत प्रचण्ड हत्ती व उत्तुंग ध्वजस्तंभ ( ४९′ ) आहेत. मंदिराभोंवतीं सुमारें तीस फूट रुंदीचें पटांगण असून त्याभोंवतालच्या तोडलेल्या कड्यांत तीन्ही बाजूंस मूर्तींच्या कपाटासाठीं ओवऱ्या खोदलेल्या आहेत.

कैलासमंदिर उंच जोत्यावर उभारलेलें असल्यामुळें सभामण्डपाची पातळी नन्दिमण्डपाच्या वरच्या मजल्याशीं समांतर आहे. या जोत्यावर सुमारें पांच फूट उंचीच्या हत्ती, सिंह व वाघ यांच्या प्रतिमांच्या रांगा खोदलेल्या आहेत. हिंदुस्थानांतील शिल्पकृत्यात हा चौथरा अद्वितीय आहे. तुलनाच करावयाची तर हळेबीडच्या होयसळेश्वरमन्दिराच्या चबुतऱ्याशीं करावी लागेल. तेथेंही अशाच श्वापदांच्या रांगा कोरलेल्या आहेत ; पण त्या आकारानें अगदीं लहान आहेत. येथील प्रतिमा प्रचण्ड आहेत. त्यांनींच मंदिराचा भार तोलून धरलेला आहे असा आभास होतो. त्यांपैकीं कांहीं हिंस्र श्वापदें एकमेकांवर हल्ले करीत आहेत. सेतूखालीं एका बाजूस कालभैरव व सप्त-मातृका यांच्या आणि दुसऱ्या बाजूस महायोगी शिव अशा मूर्ति आहेत. मन्दिराच्या सभामण्डपांत चढण्यासाठीं सेतूच्या उजव्या-डाव्या बाजूंना जिने आहेत. त्यांच्या बाहेरच्या भिंतींवर रामायण व महाभारत यांमधील अनेक प्रसंग कोरलेले आहेत. सभामण्डपाच्या प्रवेशद्वारानजीक द्वारपालांच्या भव्य मूर्ति आहेत. तिन्ही बाजूंना दरवाजे असल्यामुळें आंत भरपूर उजेड येतो. सभामण्डपाची

जमीन घोटून गुळगुळीत केलेली आहे. सभामण्डपाच्या छतावर सुमारें आठ फूट व्यासाच्या वर्तुळांत शिवताण्डवाचें दृश्य कोरलेलें आहे. सभामण्डपांतील खांबांवर सुंदर व बारीक नक्षीकाम केलेलें आहे. या चौकड्याच्या आंतल्या अंगाच्या खांबांवरील खोदकाम एकाच धर्तीचें आहे. गाभाऱ्याच्या प्रवेशद्वारावर गंगा व यमुना यांच्या मूर्ति आहेत. गंगा ही शुचितेची द्योतक आणि यमुना भक्तीची. या द्वारपालिकांच्या मूर्तीवरून अंदाज करण्यांत आलेला आहे कीं गाभाऱ्यांतील मूर्ति देवी भवानीची असावी. आतां गाभाऱ्यांत आहे तें शिवलिंग अलीकडचें आहे. प्रदक्षिणापथालगत असलेल्या उपमन्दिरांत आतां मूर्ति नाहींत. शिवपंचायतनांत शिव, विष्णु, सूर्य, गणपति व देवी यांपैकीं एका दैवताला प्रमुख कल्पून मध्यवर्ती स्थान देण्यांत येतें आणि इतरांचीं मंदिरें भोंवतीं असतात. पण येथें मध्यवर्ती गाभाऱ्याभोंवतीं पांच मंदिरें असल्यामुळें ही योजना लागू पडत नाहीं. ज्या पांच शिवरूपांना पंचब्रह्म अशी संज्ञा आहे त्या तत्पुरुष, अघोर, सद्योजात, वामदेव व ईश यांच्या मूर्ति या मंदिरांत प्रस्थापित केलेल्या असणें संभवनीय आहे. कैलासच्या भिंतींच्या बाहेरील अंगांवर अनेक नक्षीदार खांब ठेवलेले असून त्यांच्या दरम्यानच्या कपाटांत अनेक मूर्ति खोदलेल्या आहेत. यांपैकीं गंधर्वांङ्गणाच्या मूर्ति अतिशय मोहक आहेत. पंखांशिवाय मनुष्याला उडतां येत असतें तर तें दृश्य कसें दिसलें असतें, याची आपल्याला कल्पनाही करणें अवघड वाटतें. येथें हें दृश्य प्रत्यक्ष पाहावयास मिळतें. एका उडत्या गंधर्वानें आपल्या हातावर सरस्वतीची मूर्ति धारण केलेली असून तिच्या दोहों बाजूंस नक्षीदार मोर कोरलेले आहेत. मुख्य मंदिर व उपमंदिरें यांवर नक्षीदार कळस आहेत. कैलासाच्या उत्तुंग शिखरावर अनेक श्वापदांच्या प्रतिमा खोदलेल्या आहेत ; त्यांपैकीं सिंह व हत्ती विशेष प्रेक्षणीय आहेत.

कैलासमन्दिराभोंवतीं विस्तीर्ण प्रांगण आहे. भोंवतालच्या कड्यांत उत्तर, पूर्व व दक्षिण या भागांना ओवऱ्या ठेवलेल्या असून त्यांत अनेक मूर्ति खोदलेल्या आहेत. त्याचें वर्णन तर राहोच, पूर्ण यादीही येथें देतां येणार नाहीं. उत्तरेकडील ओवरींत ( लांबी १२०′ ) बारा खण

असून त्यांत शिवचरित्रांतील मुख्य प्रसंग दाखविलेले आहेत. पूर्वेकडील ओवरींत (लांबी १८९′) एकोणीस खण असून त्यांत शंकराची तांत्रिक ध्यानें कोरलेलीं आहेत; तीं अशीं : (१) कालभैरव, (२) कपालभैरव, (३) नवयोगिनी भैरव, (४) सिद्धियोगिनी भैरव, (५) बटुक भैरव आणि (६) भूपाल भैरव. क्र. १७ या कपाटांत त्रिपुरासुराशीं युद्ध करावयाला निघालेल्या सदाशिवाची मूर्ति आहे. दक्षिणेकडील ओवरींत (लांबी ११८′) बारा खण असून त्यांत मुख्यत्वेंकरून वैष्णवमूर्ति खोदलेल्या आहेत : (२) शंखचक्रगदाधारी विष्णु, (३) कालियामर्दन, (४) वराह अवतार, (६) वामन अवतार, (७) गोवर्धनधारी, (८) शेषशायी आणि (९) नृसिंह अवतार.

कैलासमंदिराच्या भोंवतालच्या कड्यांत ओवऱ्यांप्रमाणेंच दुय्यम लेणींही खोदलेलीं आहेत. दक्षिणेकडील जिन्याजवळ नवरात्र नांवाचें सप्तमातृकांचें लेणें आहे. या मूर्तींचें वैशिष्ट्य हें कीं त्या पाठभिंतीपासून कोरून अलग केलेल्या आहेत. अंगणाच्या उत्तर भिंतींत उत्तरकालीन लंकेश्वर (१२३′ × ६०′) लेणें आहे. या लेण्यांतील मूर्ति फार काळजीपूर्वक व कौशल्यानें कोरलेल्या आहे. मूर्तिभंजकांनीं त्यांचा विध्वंस केला नसता तर काळानेंही त्यांना धक्का लावला नसता. काळ हाही केव्हां केव्हां मनुष्यरूपानें अवतरतोच! महिषासुरमर्दिनी, अर्धनारीश्वर, शिवताण्डव, रावणकैलासोत्थापन वगैरे लोकप्रिय मूर्ति या मंदिरांत खोदलेल्या आहेत. या लेण्याच्या गाभाऱ्यावर गंगा व यमुना या द्वारपालिका आहेत. गाभाऱ्याच्या पाठभिंतीवर त्रिमूर्ति कोरलेली आहे. लंकेश्वरानजीक आणखी एक तीन खणी लेणें आहे. त्यात कूर्मवाहन गंगा, मकरवाहन यमुना व कमलासना सरस्वती यांच्या मूर्ति आहेत.

एवंगुणविशिष्ट अशा या मंदिराच्या निर्मितीचें श्रेय कोणाचें? खुद्द कैलासांत शिलालेख नाहीं. डॉ. रामकृष्णपंत भांडारकरांनीं हें श्रेय शुभतुंग कृष्णराज राष्ट्रकूटाला दिलें आहे. राष्ट्रकूट वंशांतील कृष्णाचें स्थान समजावें म्हणून त्याच्या वंशावळीचा कारणापुरता उतारा येथें देतों :—




दंतिदुर्गानें राष्ट्रकूट वंशाला सार्वभौमत्व मिळवून देऊन धन्य केलें. बडोदें येथें सांपडलेल्या राष्ट्रकूट ताम्रपटांतील पुढील मजकूर डॉ. भांडारकरांनीं ( ‘ दक्खनचा प्राचीन इतिहास ’, मराठी भाषांतर : श्री.बापट, १८८७. पृ.१३२ ) दिलेला आहे : “ एलापुर येथील पर्वतावर कृष्णराज यानें एक आश्चर्यजनक आकाराचें देवालय बांधविलें. वायुरूप यानांतून फिरत असतांना देवानीं तें पाहिले ; तेव्हां विस्मय वाटून ते थक्क झाले... ते आपल्याशींच म्हणत कीं हें शिवालय स्वयंभू असावें ; कारण कलेनें बांधलेल्या कामांत इतकें सौंदर्य दिसण्यांत येत नाहीं. ज्या कारागिरानें तें देवालय बांधलें तोही स्वतः विस्मयानें थक्क झाला... तो म्हणाला हें परम अद्‌भुत आहे, हें माझ्यानें कसें बांधवलें हेंच माझें मला कळत नाहीं. त्या देवालयांत शंभूची स्थापना केली होती ... कृष्णराज ह्यानें सुवर्ण, माणकें व इतर मौल्यवान् रत्नें ह्यांच्या अलंकारांनीं स्वहस्तें त्या शंभूला आणखी भूषित केलें. ” अकालवर्ष कृष्ण ( ३ ) राष्ट्रकूट ( इ. ९३९ ते ९६८ ) याच्या ताम्रपटांतही कैलासचें कर्तृत्व शुभतुंग कृष्णराजालाच दिलेलें आहे. या ताम्रपटांत म्हटलेलें आहे कीं कृष्णराजानें अशीं देवालयें बांधलीं कीं

त्यामुळें पृथ्वी अनेक कैलासांनीं सुशोभित केल्याप्रमाणें शोभायमान दिसते.

इतिहासावर आलोंच आहे, तेव्हां ऐतिहासिक असें आणखी थोडें सांगावयाचें राहिलें आहे, तें येथेंच सांगून टाकतों :

मुसलमानांची सावली दक्षिणेवर पडली आणि वेरूळच्या दुर्दैवाला सुरुवात झाली. देवलदेवी पाहिली बळी गेली. तिच्या शोधांत असलेली पठाणांची एक टोळी फावल्या वेळीं वेरूळचा बुतखाना बघावयास गेली आणि यदृच्छेनें ही त्यांच्या हातीं लागली. पुढें औरंगजेबाची स्वारी आली. औरंगाबादेस त्याची छावणी पडली. वेरूळच्या लेण्यांकडे त्याची दृष्टि गेली. क्र. २२ या लेण्यांतील शाळुंकेचा वर्ण निळसर असल्यामुळें त्याला नीलकंठ असें नांव देण्यांत आलेलें आहे. शाळुंका घोंटीव असल्यामुळें तींत अंधुक प्रतिबिंब दिसते. गंभीर वातावरणामुळें कल्पनाशक्तीला चालना मिळते. स्थानिक वाटाडे सांगतात कीं या शाळुंकेंत निरखून पाहिलें असतां पुढील जन्म दिसतो. औरंगजेबाला ही गोष्ट कोणीं तरी सांगितली. त्यानें शाळुंकेवर नजर लावली, तेव्हां त्याला डुकराची छबी दिसली. म्हणून संताप येऊन त्यानें या लेण्याची नासधूस केली. कैलास लेण्याच्या सभामण्डपाच्या छताला गिलावा करून त्यावर सुंदर चित्रें रंगवलेलीं होतीं. हा सर्व भाग आतां काळा पडलेला आहे. याचें कारण असें सांगतात कीं औरंगजेबाच्या आज्ञेनें येथील मूर्ति छिन्नविच्छिन्न करण्यांत आल्या आणि अखेरीस मण्डपांत गवत भरून तें पेटवून देण्यांत आलें. जगन्नाथ सभा या जैन लेण्याबद्दल तर आख्यायिका आहे कीं औरंगबानें दारू ठासून हें लेणें उडवून देण्याचा प्रयत्न केला. अव्वल मुसलमानी अमदानींतल्या क्रूर सैनिकाच्या कर्तृत्वाबद्दल श्री. बर्गेस् सांगतात कीं निर्दय पण खरोखर शूर अशा मूर्तिभंजकांपासून हे देव स्वतःचें संरक्षण करूं शकत नाहींत किंवा त्यांचे नपुंसक पूजक आपल्या देवांचें अगर स्वतःचें. वेरूळ येथील मूर्तींच्या विध्वंसाचा इतिहास जसा इतका जुना आहे ; तसाच ताजाही आहे. वेरूळ वर्णनांत हेच सांगतात कीं त्यांनीं हें वर्णन लिहिलें त्याच्या पूर्वीच्या दहा वर्षांत येथील आणखी किती तरी मूर्तींची

मस्तकें उडविण्यांत आलेलीं आहेत. कैलासाच्या जोत्यावर कोरलेल्या हत्तींच्या प्रतिमा विशेष प्रेक्षणीय आहेत. छायाचित्र घेण्यासाठीं एक तरी हत्ती सबंध सोंडेसकट पहावयास मिळावा म्हणून श्री. पंतप्रतिनिधींनीं खटपट केली, पण त्यांना एकही धड मिळाला नाहीं ; आणि हीं विध्वंसनाचीं अक्षम्य अपकृत्यें कोणीं केलीं ? श्री. पंतप्रतिनिधि सांगतात, "अरसिक माणसांनीं" ('वेरूळ' पृ. ६८) ; आणि आराधी आविर्भाव करून आपण म्हणावयाचें,' विशिष्ट जमातींतल्या कुमंत्रित माथेफिरूंनीं!'

हिंदुस्थानांत अनेक पर्वत आहेत ; त्यांत हिमालय सर्वांत प्रचण्ड व उत्तुंग. हिमालयाला अनेक शिखरें आहेत, त्यांत कैलासचा चौथरा सर्वांत प्रचण्ड आणि पवित्रही; कारण हिंदू लोक कैलासलाच मेरू पर्वत समजतात ; शिवाय सिंधु व ब्रह्मपुत्रा या महानद्यांचा उगम कैलासापासूनच होतो. हिमालयाच्या कैलास शिखराचें दर्शन घेऊन आलेले सांगतात कीं जसा त्याचा तसाच याचा आकार आहे. हिंदुस्थानांत अनेक लेणीं आहेत. त्यात सह्याद्रींतील लेणीं विस्तीर्ण व उत्तम. सह्याद्रींतील लेण्यांमध्यें वेरूळचीं ब्राह्मणी लेणीं उत्कृष्ट, आणि त्या सर्वांत कैलास अद्वितीय व सर्वोत्कृष्ट. हिंदुस्थानांतल्याच नव्हे, जगांतल्या उत्कृष्ट शिल्पकृत्यात गणना व्हावी एवढी कैलासाची योग्यता आहे ; विस्ताराच्याच नव्हे, कौशल्याच्या दृष्टीनेंही. संपूर्ण कशाला, एका विख्यात स्थापत्यशास्त्रज्ञाचा अभिप्राय आहे कीं कैलासचें गजसिंहयुक्त जोतें हिंदुस्थानांतील शिल्पकृत्यांत अद्वितीय आहे. १८२४ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'दि वंडर्स ऑफ् एल्लोरा' या प्रबन्धांत कॅ. सीली सांगतात कीं ज्ञात जगांतील सर्व प्राचीन वास्तूंत हें लेणें अग्रगण्य आहे. जगांतील सात प्राचीन आश्चर्यें नमूद करणाऱ्यांची नजर भूमध्य समुद्राभोंवतींच घुटमळली. त्यांनीं नोंदलेल्या आश्चर्यांपैकीं बरींचशीं आतां कालाच्या उदरांत गडप झालेलीं आहेत. त्यांचीं वर्णनें वाचलीं म्हणजे त्यांची गणना आश्चर्यांच्या अधिकृत यादींत करण्यांत यावी याचेंच आश्चर्य वाटूं लागतें ! अतिशयोक्ति हा मनुष्यस्वभावाचा धर्म आहे, किंवा स्वभाविक व्यंग आहे म्हणा, हवें तर ; पण कैलासचें वर्णन

करतांना अतिशयोक्ति अशक्य आहे, येथें अतिशयोक्ति ही स्वभावोक्ति ठरते असेंच प्रत्ययास येतें.

कैलासच्या मांडणीवरून स्पष्ट दिसतें आणि शेजारच्या टेंकडीवर क्षणभर उभें राहून सिंहावलोकन केलें असतां खात्री पटते कीं हें महत्कार्य निश्चित पूर्व-योजनेनुसार पार पाडण्यांत आलेलें आहे. नान्दि-मण्डप व उपमंदिरें, सोपान व शिखरें, कोठें कशीं व केवढीं उभारावयाचीं हें नियोजकांनीं अगोदर निश्चित केलें असलें पाहिजे. पटांगणांत गज व ध्वजस्तंभ कोठें मांडावयाचे हें सुद्धां आगाऊ ठरविण्यांत आलें असलें पाहिजे. बांधीव इमारतींत बेमालूम फेरबदल करतां येतात. लेण्यांच्या खोदकामांत प्रसंगानुरोधानें फेरफार करतां येत नाहींत. त्यांची



वेरूळ – स्तंभ

सर्वांगपरिपूर्ण आंखणी आगाऊच करावी लागते. म्हणूनच खडकात मूर किंवा भुंगा लागला कीं लेणें तेथल्या तेथें अपुरें सोडून द्यावें लागतें. स्थापत्यशास्त्रज्ञांचा अंदाज आहे कीं या एका लेण्याचें काम पुरें व्हावयास कमींत कमी शंभर वर्षें लागलीं असलीं पाहिजेत. महाराष्ट्रांतील कारागिरांच्या चार-पांच पिढ्यांनीं आपल्या कौशल्याचें व श्रमसातत्याचें हें चिरंतन स्मारक येथें करून ठेवलेलें आहे; आणि त्याच्या पुरस्कर्त्यांनीं आपल्या निष्ठेचें व औदार्याचें. केवळ दगडावर दगड रचून उभारलेल्या प्रचण्ड पिरॅमिडांचें आपण किती कौतुक करतों! छाती दडपून गेल्यासारख्या शब्दांत हेरोडोटस् सांगतो कीं एक एक पिरॅमिड उभारण्यास कमींत कमी वीस वर्षें लागलेलीं आहेत. फक्त वीस वर्षें, केवळ ठोकळ्यांवर ठोकळे रचण्यासाठीं! आणि हे अवाढव्य भरीव त्रिकोण कशासाठीं? राजाराण्यांचीं प्रेतें सुरक्षित ठेवण्यासाठीं! ताजमहालाला बारा वर्षें लागलीं आणि जुम्मा मशिदीला चवदा. सौंदर्य सोडा, कारण त्याबद्दल दुमत होणें संभवनीय आहे. केवळ दीर्घकालीन योजना म्हणून त्यांचें केवढें कौतुक करण्यांत येतें. मग कैलासाची शतसंवत्सरांची योजना आंखणाऱ्या शिल्पेश्वरांचें केवढें कौतुक करावें! ज्यांनीं योजना आंखली ते तिची परिपूर्ति पहावयास हयात राहिले नाहींत; त्यांचे नातू पणतूही; त्यांची तशी अपेक्षाही नव्हती; आणि महत्कृत्याच्या प्रारंभींच्या आश्रयदात्यांचीही. विशेष कौतुकाची गोष्ट ही कीं या धर्मकृत्याला जबाबदार असणारांनीं आपल्या नांवाची निशाणीही येथें ठेवलेली नाहीं. बौद्ध लेण्यांतील एकेका खांबाचा किंवा टांक्याचा खर्च करणारांनीं त्यावर आपल्या जातकुळींचें नांवनिशीवार मोर्तब करून ठेवलेलें आहे. हें पाहिलें म्हणजे कैलासच्या निर्मात्यांबद्दलचा आदर वृद्धिंगत होतो. आपलें कौशल्य व ऐश्वर्य देवकार्याला लागलें, एवढेंच त्यांचें समाधान!

कैलास! कैलास हें महाराष्ट्राच्या मध्ययुगीन धर्मभावनेचें दृश्य स्वरूप आहे: सुंदर, सहिष्णु व समर्थ. कैलास हें महाराष्ट्राच्या मध्ययुगीन धर्मभावनेचें महाकाव्य आहे: मधुर, गंभीर व सालंकृत. कैलास हा महाराष्ट्राच्या मध्ययुगीन शिल्पकौशल्याचा उत्कर्ष-बिंदु आहे: अचल, उत्तुंग व सतेज. कैलास हें महाराष्ट्राच्या वैभवाचें स्मारक; कणखर

अंतरात्म्यावर झालेल्या संस्काराचें द्योतक; श्रमसातत्याचें प्रतीक; संकल्पाची अपूर्वता व विशालता आणि सिद्धीची अतुल्यता व चारुता यांचें मूर्तस्वरूप. कैलासांत पहिला पदक्षेप केला कीं मन उचंबळून येतें, मान नत होते, नाम मुखीं येतें; वाटतें कीं जणुं आज जीवन सफल झालें, जणुं यदृच्छेनें विश्वरूपदर्शन झालें! आणि हेंच वेरूळच्या निर्मात्यांचें सार्थक!

## अजंठ्याचीं लेणीं :

अजंटा लेण्यांच्या निर्मितीबद्दलची एक दंतकथा चिनी प्रवासी युआन च्वंग यानें आपल्या प्रवास-वर्णनांत नमूद करून ठेवलेली आहे. ती अशी : महाराष्ट्रांत आचार या नांवाचा एक अर्हत होता. त्याची माता मरण पावली. तिला याच देशांत पुनर्जन्म घ्यावा लागला आहे हें त्याला अंतर्ज्ञानानें समजलें. तेव्हां तो तिचा शोध करीत हिंडूं लागला. एका खेड्यांत भिक्षा मागत हिंडत असतांना एका घरांतून एक बालिका त्याला अन्न वाढावयास आली. हीच आपली माता, असें त्यानें ओळखलें. अर्हताला पाहतांच तिला पान्हा फुटला. कोंवळ्या वयांत हा प्रकार झालेला पाहून तिच्या मैत्रिणींना आश्चर्य वाटलें. हें मोठें दुश्चिन्ह आहे अशी त्यांची समजूत झाली आणि साऱ्या जणी दुःखित झाल्या. तिच्या पूर्वजन्मींचा वृत्तांत सांगून अर्हतानें त्यांचें समाधान केलें. त्या बालिकेला धर्मदीक्षा देऊन तिच्यासह तो अजंठ्याला आला. कृतज्ञतेनें प्रेरित झालेल्या अर्हतानें येथें सोईस्कर जागा पाहून संघाराम खोदविले व उभारविले आणि त्यांच्या भिंतींवर बुद्धाच्या जीवनांतील अनेक प्रसंगांचीं चित्रें रंगवून व कोरवून घेतलीं.

बोलून चालून ही दंतकथा आहे. वाचकांनीं ती खरी मानावी या इराद्यानें ती येथें सांगितलेली नाहीं. सांगावयाचें कारण एवढेंच कीं या दंतकथेंतील या लेण्यांची निर्मिति करविणारा अर्हत महाराष्ट्रीय होता. युआन च्वंग हिंदुस्थानांत आला तेव्हां बौद्ध धर्म जिवंत होता. तेव्हां या लेण्यांबद्दल प्रचलित असलेल्या आख्यायिका सत्याला अधिक जवळ असणें संभवनीय आहे. जें जें चांगलें असेल त्याचा संबंध अशोकाशीं

व उत्तर हिंदुस्थानाशीं जोडावयाचा, कमींत कमी त्याचें श्रेय कांहीं तरी खटाटोप करून महाराष्ट्राच्या वांट्याला येऊं द्यावयाचें नाहीं, अशी प्रथा अलीकडे बोकाळूं लागली आहे. पुराव्याचें यत्किंचितही पाठबळ नसतांना अजंठ्याचे कारागीर द्राविड होते असा प्रवाद रूढ करण्यांत आला आहे. अगदीं ताजें उदाहरण देऊन सांगतों. अजंठ्याचीं लेणीं अशोकाच्या प्रेरणेनें व मदतीनें बौद्ध भिक्षूंनीं खोदलीं असें विधान श्री. शिशिरकुमार मित्र यांनीं अलीकडे केलें आहे. त्यांचा 'व्हिजन ऑफ इंडिया' हा ग्रंथ सर्वसाधारण वाचकांसाठीं लिहिलेला असल्यामुळें त्यांतील विधानांना शास्त्र-शुद्धतेची कसोटी लावतां येणार नाहीं, शिवाय येथील सर्वांत प्राचीन लेणें अशोकाशीं जवळजवळ समकालीन असल्यामुळें केलें आहे तें विधान अनुमानासिद्ध आहे, असें त्याचें समर्थन करतां येण्यासारखें आहे. लोकप्रिय लिखाणां-तील भोंगळ विधानांनींच वाचकांची अधिक फसगत होते, बहुजनाच्या मनांत अशींच मतें मूळ धरून राहतात, कारण सामान्य वाचक सशास्त्र ग्रंथांकडे कधींच जात नाहीं. वस्तुस्थिति तशी नाहीं, तशी दंतकथाही नाहीं, आहे ती महाराष्ट्राच्या कर्तृत्वाला पोषक आहे, हें दाखविण्या-साठींच वरील उतारा घेतलेला आहे.

कांहीं संशोधक सांगतात कीं अजंटा या शब्दाचा अर्थ 'अज्ञात' असा आहे. हा अर्थ बरोबर असेल, असला तरी तो अन्वर्थक नाहीं, हें मात्र खरें. कारण हिंदुस्थानांतील स्थानमात्रांमध्यें, उदरंभरणापलीकडे पाहणाऱ्या लोकांमध्यें, अंजटाच सर्वांहून अधिक ज्ञात आहे, कारण अजंटा हें एक विख्यात बौद्ध धर्मक्षेत्र आहे. सुशिक्षित एतद्देशीयांना व परकीयांना; कारण अजंटा हें हिंदुस्थानी कलेचें अग्रस्थान आहे. भारतीय संस्कृतीच्या पुनरुद्धाराचें युग सुरू झालें आहे म्हणून आपण अजंठ्याचा दृढ परिचय करून घेतला पाहिजे; कारण अजंटा हा महाराष्ट्राच्या वर्तिकाकौशल्याचा आविष्कार आहे, सह्याद्रीच्या लेण्यांतील रत्नखचित अलंकार आहे.

अजंठ्याचीं लेणीं सह्याद्रीच्या इन्ध्याद्रि श्रेणींतल्या अजंटा शाखेंत आहेत. याच श्रेणीच्या जालना शाखेंत वेरूळचीं लेणीं आहेत. या शाखा-

सातमाळ श्रेणीच्या आहेत असें कांहीं शास्त्रज्ञांचें मत आहे. गोदावरी व तापी या महाराष्ट्राच्या दोन महानद्यांच्या खोऱ्यांच्या मध्यभागीं इन्ध्याद्रि व सातमाळ श्रेणींचीं पठारें आहेत. त्यांचें भौगोलिक महत्त्व हें कीं त्यांमुळें खानदेश व वऱ्हाडचीं मैदानें पठारापासून अलग होतात. अजंट्यानजिक घाटनंद्याजवळ उगम पावणारी पूर्ववाहिनी पूर्णा नान्देड जवळ गोदावरीला मिळते आणि खुद्द अजंट्याजवळ उगम पावणारी उत्तरवाहिनी वाघरा नदी तापीला मिळते. अजंट्याच्या घाटाला मध्य-युगात 'दक्षिण दरवाजा' असें नांव होतें. मराठेशाहींतही हा घाट प्रसिद्ध होता. 'हिंदुस्थान (= उत्तर हिंदुस्थान) मुलुख नटबाट (= लुच्चा) ।। पाहिला अजिंट्याचा घाट ।। झाडी असे जंगल दाट ।।' हें पंचकल्याणी लावणींतलें कडवें प्रत्येकाच्या परिचयाचें आहे. असो. उल्हास नदीच्या खोऱ्यांतून अपरान्तांत उतरणाऱ्या घाटाला 'कोंकण दरवाजा' असें नांव होतें. सह्याद्रीच्या या दोन महाद्वारांनजीक जवळ-जवळ समकालीन अशीं लेणीं खि.पू. दुसऱ्या व पहिल्या शतकांत अजंटा व कोंडाणें येथें खोदण्यांत आलेलीं आहेत. यावरून वाटतें कीं धर्म-प्रसाराच्या नियोजित संकल्पानुसार हीं कामें झालेलीं असलीं पाहिजेत. केवळ योगायोगाचा हवाला देऊन त्यांची सांगता लावतां येणार नाहीं.

बौद्ध धर्माचा ऱ्हास सुरू झाल्यानंतर अजंट्याचीं लेणीं ओसाड पडलीं. बदलत्या काळाबरोबर भोंवतालच्या जंगली .जमातींचा कल फिरला आणि भिक्षूंना तेथें राहणें किंवा यात्रेकरूंना तेथें जाणें अशक्य झालें. पावसाबरोबर वाहून येणाऱ्या मातीनें कांहीं लेणीं भरून गेलीं; सभोंवार जंगल वाढलें; अहिंसक भिक्षूंची जागा हिंस्र श्वापदांनीं घेतली. सह्याद्रींतील वृक्ष प्रचण्ड किंवा दाटीनें वाढणारे नसल्यामुळें किंवा वादळाच्या हेलकाव्यांनें ते डोलूं लागले म्हणजे कडयांत कोरलेली एखादी मूर्ति अजंट्याच्या शिल्पाविषयीं अजाण असलेल्या कोणाला दिसलीच तर हा भूतचेष्टेचा प्रकार असावा अशा कल्पनेनें लोक त्यांच्या आसपास फिरकेनासे झाले. अशा परिस्थितींत १८१९ सालीं वाघाच्या शिकारीला निघालेला मद्रास–आरमीमधील एक ब्रिटिश अधिकारी या

घळींत दाखल झाला. त्यालाही कांहीं मूर्ति दिसल्या. तो दचकला नाहीं, चमकला मात्र. त्यानें शेजारच्या खेड्यांतून माणसें जमविलीं आणि झाडेंझुडपें तोडविलीं. अनेक शतकांच्या अज्ञातवासानंतर अजंट्याचीं लेणीं पुन्हां प्रकाशांत आलीं. १८२९ सालीं सर जेम्स अलेक्झँडर यांनीं या लेण्यांचें वर्णन रॉयल एशियाटिक सोसायटीच्या कार्यपत्रिकेंत प्रसिद्ध केलें आणि साक्षर जगाला त्यांची पहिली ओळख करून दिली. १८४३ सालीं श्री. फर्ग्यूसन यांनीं त्यांचा अधिकृत वृत्तांत सदर संस्थेला सादर केला. या संशोधनामुळें सुसंस्कृत जगात मोठी खळबळ उडाली. स्वतःला सुशिक्षित म्हणवून घेणारे आमचे नोकरी पेशाचे विद्वान् आपल्या वारशावर अपशब्दांचा वर्षाव करीत होते, त्या वेळीं ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरांनीं विलायतेंतील विद्वानांच्या प्रेरणेनें हिंदुस्थानच्या संस्कृतीचें संरक्षण व संवर्धन करण्याच्या दृष्टीनें अजंटा येथील चित्रांच्या प्रतिकृति तयार करण्यासाठीं मेजर जिल यांची नेमणूक केली. १८४४ पासून १८६३ पर्यंत त्यांनीं येथील अनेक चित्रपटांच्या प्रतिकृति तयार केल्या व त्या लंडनला रवाना केल्या. १८६६ सालीं क्रिस्टल पॅलेसमध्यें भरलेल्या प्रदर्शनांत हीं चित्रें मांडलीं होतीं. या मण्डपाला एकाएकीं आग लागली आणि तींत हीं चित्रें जळून गेलीं! फक्त पांच बचावलीं; तीं आतां साउथ केन्सिंग्टन् म्यूझियममध्यें आहेत. नंतर हें काम श्री. जॉर्ज ग्रिफिथ्स् यांचेकडे सोंपविण्यांत आलें. मुंबईच्या स्कूल ऑफ आर्टमधील विद्यार्थ्यांच्या मदतीनें १८७५ पासून १८८५ पर्यंत त्यांनीं सवाशें प्रतिकृति तयार केल्या व त्या विलायतेला पाठविल्या. योगायोग असा कीं साउथ केन्सिंग्टन् म्यूझियमला आग लागून यांपैकीं ८७ चित्रें नष्ट झालीं! येथील चित्रांवर अतिशय पातळ कागदाचे कोंपरे मेणानें डकवून हुबेहूब रंगीत प्रतिकृति विख्यात जपानी कलाकार प्रो. सवमूर यांनीं अगदीं अलीकडे तयार केल्या होत्या. जपानच्या धरणीकंपांत त्याही नष्ट झाल्या! येथील चित्रांवरून तयार केलेलीं हातचित्रें भस्मसात् करावयाचीं असा जणुं शापच आहे! खुद्द येथील चित्रांचा इतिहास असाच दुर्दैवी आहे. डॉ. बर्ड या संशोधकानें क्र. १७ या

लेण्यांतील अनेक चित्रांचे पापुद्रे सोडवून मुंबईस नेले. कॅप्टन् विल्यम्स् यानें क्र. १६ या लेण्यांतील सुमारें एक चौरस फुटाचें एक चित्र गिलाव्यासह तोडून काढलें आणि तें विलायतेंत नेऊन पंधरा हजार रुपयांस विकलें. प्रतिकृति तयार करण्यासाठीं निवडलेलीं मूळ चित्रें स्पष्ट दिसावींत म्हणून जिल व ग्रिफिथ्स् यांनीं त्यांवर रोगण चढविलें होतें, त्यामुळेंच तीं खराब झालीं. या चित्रांचें संरक्षण व्हावें या हेतूनें विख्यात शास्त्रज्ञांच्या सल्ल्यानुसार त्यांवर फांसडलेल्या रोगणामुळें अनेक चित्रांच्या खपल्या उडालेल्या आहेत. निसर्गाचा प्रकोप, हिंस्त्र श्वापदांचा निवास, हिंदु साधूंच्या धुन्या व जंगली जमातींचीं अपकृत्यें यांचा धुमाकूळ या लेण्यांत सुमारें हजार वर्षे चालला होता; त्यांनीं केला नाहीं एवढा येथील चित्रांचा विध्वंस आधुनिक पाश्चिमात्य संशोधकानीं करून ठेवला आहे; आणि विशेष खेदाची गोष्ट ही कीं हें सारें त्यांनीं संस्कृति-संरक्षणाच्या व संवर्धनाच्या नांवानें केलेलें आहे! आणि आमच्याच लोकांच्या दुर्वर्तनाबद्दल तर बोलावयासच नको. ज्यांचें नांव अन्नवांटणीच्या दाखल्याव्यतिरिक्त इतरत्र कोठेंही लिहिलें जाण्याची शक्यता नाहीं अशा स्वजनशत्रूंनीं येथें आपल्या अक्षम्य अधमतेच्या निशाण्या जागोजाग करून ठेवलेल्या आहेत!

अजंटा येथें एकूण एकूणतीस लेणीं आहेत. मांडणीच्या क्रमानुसार त्यांना अधिकृत अनुक्रमांक देण्यांत आलेले आहेत. या लेण्यांपैकीं क्र. ९, १०, १९ व २६ हे चैत्य आहेत, बाकीचे विहार. चैत्यांपैकीं क्र. ९ व १० हे हीनयान आणि क्र. १९ व २६ हे महायान. विहारां-पैकीं सहा हीनयान, बाकीचे महायान. क्र. ८, ९, १०, १२ व १३ हीं लेणीं खि. पूर्व. दुसऱ्या शतकांतलीं, बाकीचीं खिस्तोत्तर सहाव्या व सातव्या शतकांतलीं. क्र. ३, १४, २३, २४, २७, २८ व २९ हीं लेणीं अपूर्ण आहेत. त्यांचें खोदकाम चालू असतांना तें एकाएकीं बंद पडलें असावें, असें त्यांच्या अंतर्भागाचें निरीक्षण केलें असतां सहज दिसून येतें. अजंट्याचीं लेणीं एका अर्ध-वर्तुलाकार वाकणांत हारीनें खोदलेलीं आहेत. या मांडणीमुळें क्र. १ ते ५ हीं लेणीं पूर्वाभिमुख आहेत, क्र. ७ ते २० हीं उत्तराभिमुख

आणि क्र. २१ ते २९ हीं पश्चिमाभिमुख आहेत. सुमारें पाऊण मैल लांबीचा कडा तोडून त्यांत हीं खोदलेलीं आहेत. पहिलें व शेवटलें लेणें यांत शरोड्डाणाचें अंतर सुमारें सवाबाराशें फूट आहे.

अजंट्याचीं लेणीं अनेक दृष्टींनीं अद्वितीय आहेत.

अजंट्याचीं लेणीं अत्यंत निसर्गरम्य अशा ठिकाणीं खोदण्यांत आलेलीं आहेत. या लेण्यांची भरभराट होती त्या काळांत येथें नैसर्गिक सौंदर्य व समृद्धि आजच्याहून अधिक होती असें अनुमान करावयास जागा आहे. अजंट्याच्या पठारावर लेणापूर नांवाचें खेडें आहे. लेणीं खोदलीं जात होतीं तेव्हां त्यांवर काम करणाऱ्या कामगारांच्या व कारागिरांच्या वस्तीसाठीं हें खेडें वसविलेलें असावें. कार्ल्याच्या लेण्यांजवळ डोंगराच्या पायथ्याशीं विहारगांव आहे, तसें. लेणापूर नजीक उगम पावणाऱ्या वाघरा नदीच्या कांठीं एका चंद्र-कलाकृति वांकणांत हीं लेणीं खोदलेलीं आहेत. जणुं हीं लेणीं धारण करण्याकरितांच येथील कड्यानें स्तूपाच्या बाह्यरेषेचा आकार धारण केलेला आहे ! नदीचा झुळझुळता प्रवाह, वांकणाच्या मध्यभागीं खोल डोह, प्रवाहाशेजारीं सुमारें अडीचशें फूट उंचीचा खडा कडा, प्रवाहाच्या सपाटीपासून सुमारें पन्नास ते शंभर फूट उंचीवर कड्याच्या कुशींत कोरलेलीं लेणीं, भोंवतालीं उंच डोंगर व गर्द राईच्या दऱ्या आणि अखेरीस सातकुण्ड नांवाचा सातमजली धबधबा ! एवढें नैसर्गिक सौंदर्य दुसऱ्या कोणत्याही लेण्यांच्या वांट्याला आलेलें नाहीं. बेडसें व कोंडाणें येथील लेणीं पवना व उल्हास नद्यांच्या खोऱ्यात, गर्द झाडींत आहेत; पण तीं त्यांच्या प्रवाहांपासून बरींच दूर आहेत. भाजें व वेरूळ येथील लेण्यांजवळ धबधबे आहेत; पण तेथें नद्या नाहींत. कोंडाण्याच्या लेण्यांच्या आसपास पुष्कळ धबधबे आहेत. पैकीं एक तर खुद्द लेण्यांवरूनच कोसळता असल्यामुळें त्यानेंच यांचा विध्वंस केलेला आहे. उंच कड्याचा पायथ्याशीं लेणीं खोदूं नयेत, त्याचप्रमाणें लेण्यांचें ठिकाण धबधब्याच्या माऱ्यापासून अलिप्त असावें, हे धडे आपल्या प्राचीन शिल्पकारांना कोंडाण्यानेंच शिकविले असावेत. अजंट्याचा धबधबा लेण्यांना धोका देण्याइतका खेटून नाहीं

किंवा त्याचा आनंद उपभोगण्यासाठीं वाट सोडून जावें लागावें, इतका अलग नाहीं. अजंठ्याचे डोंगर आतां उघडे बोडके दिसतात. पण पूर्वी त्यांभोंवतीं व त्यांवर गर्द जंगल रान होतें, हें निश्चित. रम्यस्थानाची निवड व कलाकार मांडणी हीं अजंठ्याचीं लक्षणें अद्वितीय आहेत. वर्तुलाकृति व स्थलानिश्चिति करण्यांत या शिल्पकृत्याला जबाबदार असणाऱ्या कलाकारांनीं रसिकतेची कमाल केलेली आहे, यांत संशय नाहीं.

अजंठ्याच्या लेण्यांची वाट चढतांना वाटसरू डोंगराच्या एका विशिष्ट उंचवट्यावर आला कीं अचानकपणें सर्वच्या सर्व लेणीं एकाएकीं दृष्टिपथांत आल्यामुळें तो जणुं मंत्रमुग्ध होऊन जागच्या जागीं थबकतो. कोठें सुबक स्तंभांच्या रांगा दिसतात, तर कोठें चैत्यांचीं आकर्षक गवाक्षें; कोठें आकाशांतून उड्डाण करतां करतां एकाएकीं प्रस्तररूप प्राप्त झालेले यक्ष किन्नर दिसतात, तर कोठें मानवी जीवनाला आश्वासन व आशीर्वाद देणाऱ्या बुद्धाच्या आजानुबाहु प्रचण्ड मूर्ति. स्तब्धतेच्या या क्षणांत त्याला जाणीव होते कीं जगाच्या बहुसंख्य लोकांच्या धर्मश्रद्धेचें मूर्त स्वरूप आपल्यापुढें उभें आहे. सकाळच्या धुक्यांत किंवा दुपारच्या झळींत घळींतलें प्रत्यक्ष दृश्य विरळ होतें आणि वाटूं लागतें कीं एकेका विहारांतून पीत वस्त्रें परिधान केलेले बौद्ध भिक्षु रांगेनें बाहेर पडत आहेत आणि "बुद्धं शरणं गच्छामि, धर्मं शरणं गच्छामि, संघं शरणं गच्छामि" या प्रतिज्ञांचा गंभीर स्वरांत घोष करीत संघप्रार्थनेसाठीं चैत्यांकडे चालले आहेत. सह्याद्रींत अनेक लेणीं आहेत, लेण्यांचे संच आहेत, पण भाविकालाही असा साक्षात्कार इतरत्र क्वचितच होतो, इतका तो या अकल्पित दृश्यामुळें मंत्रमुग्ध होऊन जातो.

कान्हेरी, जुन्नर व वेरूळ येथें अजंठ्याहून अधिक लेणीं आहेत. कान्हेरी येथील बहुसंख्य लेणीं दारिद्री आहेत. वेरूळ येथें ब्राह्मणी लेणीं आहेत, म्हणूनच तेथील लेण्यांची संख्या वाढलेली आहे; तेथें खुद्द बौद्ध अशीं लेणीं थोडींच आहेत. जुन्नरचीं लेणीं वेगवेगळ्या डोंगरांवर पांगलेलीं आहेत: शिवाय पाहिल्या कालखण्डांत निश्चितपणें मांडतां

येतील अशीं नांव घेण्याजोगीं लेणीं तेथें नाहींत ; आणि येथील लेण्यां-वर ब्राह्मणी व जैन संस्कार झालेले आहेत. अजंट्याचीं सर्व लेणीं बौद्ध आहेत, शुद्ध बौद्ध आहेत. त्यांवर इतर धर्मांचे संस्कार झालेले नाहींत. हीं सर्व लेणीं एका गटांत हारीनें कोरलेलीं आहेत; काल व कला या दोन्ही दृष्टींनीं त्यांचा दर्जा अग्र व श्रेष्ठ आहे. हीनयान व महायान या दोन्ही कालखण्डांतील धर्मश्रद्धा, सामाजिक जिवन व कलाकौशल्य यांचीं उत्कृष्ट व सर्वांगीण प्रतीकें येथेंच दृष्टोत्पत्तीस येतात.

वेरूळचीं लेणीं त्यांवर कोरलेल्या मूर्तींसाठीं विख्यात आहेत आणि अजंट्याचीं त्यांवर रंगविलेल्या चित्रांसाठीं. वेरूळच्या ब्राह्मणी कारागिरांनीं मूर्तिशिल्पाला विशेष अनुकूल अशी लेण्यांची स्वतंत्र घाटणी निर्माण केली आणि अजंट्याच्या निर्मात्यांनीं चित्रपटांना. या लेण्यांच्या भिंतींवर चित्रें रंगवावयाचीं, अशी योजना आरंभींच निश्चित करण्यांत आलेली असली पाहिजे, नाहीं तर महायान कालांत खोदण्यांत आलेल्या लेण्यामध्यें एवढ्या सलग व शिल्पकृत्यांविना भिंती राहत्या ना. अजंट्यांत शिल्पकृत्यें नाहींतच असें मात्र नाहीं; येथेंही मूर्ति उच्च दर्जाच्या व पुष्कळ आहेत; पण येथें रंगीत चित्रें इतकीं आहेत कीं त्यांमुळें या मूर्तींकडे मन जातच नाहीं.

ज्या विषयाकडे असें दुर्लक्ष होतें तोच प्रथम हातीं घेतों.

अजंटा येथें चार चैत्य आहेत; पैकीं क्र. ९ व १० हे हीनयान आणि क्र. १९ व २६ हे महायान. क्र. १० (४१'×९६'×३६') हा चैत्य सर्वांत विस्तीर्ण व प्राचीन, खि. पू. दुसऱ्या शतकांतला; आणि क्र. ९ हा खि. पू. पहिल्या शतकांतला. त्यांच्या छतांना लांकडी फांसळ्या बसविलेल्या होत्या. त्यांच्या अंतर्भागांतील स्तंभ अष्टकोनी, अनलंकृत आहेत आणि स्तूप अगदीं साधे आहेत. क्र. ९ या चैत्यां-तील स्तूपावर वेदिकाकृति कोरलेल्या आहेत आणि त्याच्या अग्रभागीं कार्ल्यासारखें लांकडी छत्र बसविलेलें होतें. क्र. १० या चैत्याच्या आघा-डीला भाजासारखी लांकडी जवनिका बसविलेली होती. क्र. ९ च्या चैत्याच्या आगाशीच्या दोहों बाजूंना, काटकोनांत, प्रचण्ड बुद्ध मूर्ति कोरलेल्या आहेत आणि हे दोन्हीही चैत्य वेळोवेळीं रंगविलेले आहेत;

अर्थातच हे अलंकार उत्तरकालीन आहेत. क्र. १९ व २६ हे महायान चैत्य नक्षी व मूर्ति यांनीं शृंगारलेले आहेत. क्र. १९ या चैत्यासमोर नक्षीदार वर्तुळाकार खांबांचा अद्वितीय अर्धमंडप ( Porch ) आहे. प्रवेशद्वाराच्या दोहों बाजूंना बुद्धाचें भिक्षाध्यान कोरलेलें आहे. उजव्या अंगास नागराजाची मूर्ति आहे. गुडघ्याएवढ्या उंच आसनावर नागराज बसलेला आहे. त्यानें अनेक अलंकार धारण केलेले आहेत, त्याच्या मस्तकावर मुकुट व त्यावर सात नागफण्यांचें छत्र आहे. त्याच्या शेजारीं राणी अर्ध्या आसनावर बसलेली आहे; तिच्या हातीं कमल आहे, तिनें विविध अलंकार धारण केले आहेत, तिच्या मस्तकावर मोत्यांचा वाटोळा मुकुट आहे व त्यावर एका नाग-फणीचें छत्र आहे; दुसऱ्या बाजूला हातीं चवरी घेतलेली दासी उभी आहे. त्यांच्या मुद्रांवर प्रसन्न भक्तिभाव प्रकटलेला आहे ; वाटतें कीं हें जोडपें मंदिरांत चाललेली प्रार्थना एकाग्रतेनें ऐकत आहे ! श्री. हॅवेल यांनीं या गटाला बौद्ध शिल्पकृत्यांत अग्रस्थान दिलेलें आहे. या चैत्याच्या गवाक्षाच्या बाह्य रेषेची आकृति पूर्वी दिलेली आहे. गवा-क्षाच्या दोहों बाजूंस खड्या कुबेराच्या मूर्ति आहेत. या चैत्याच्या अंतर्भागांतील स्तंभ वर्तुलाकृति असून त्यांवर फिरकया खोबणी खोद-लेल्या आहेत. श्री. बर्गेस् सांगतात कीं त्यांच्या पाहणी व आठवणी-प्रमाणें असे खांब फक्त अजंटा येथेंच, क्र. १ व १९ या लेण्यांतच ( Rock Cut Temples of Ajanta, Burgess, 1868, p. 13 ) कोरलेले आहेत. येथील स्तूपाचा आकार बारा कोनी समांतरभुज स्वस्तिकाकार असून त्याच्या आघाडीवर खडा बुद्ध कोर-लेला आहे. या लेण्यांत असंख्य बुद्ध मूर्ति कोरलेल्या आहेत. क्र. २६ हा चैत्य (६८′×३६′×३१′) सहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास अश्मकांच्या भव्विदेव नामक मंत्र्यानें खोदविलेला असल्या-बद्दलचा येथें लेख आहे. अजंट्यापासून सुमारें अकरा मैलांवर असलेल्या घटोत्कच लेण्यांतही एका अश्मक राजाचा लेख आहे. अश्मक वंशांत २५ राजे होऊन गेले असें पुराणें सांगतात. याहून या वंशाबद्दल अधिक माहिती मिळालेली नाहीं. अजंट्याभोंवतालच्या प्रदेशाला अश्मक

हें नांव होतें आणि त्यांची राजवट सहाव्या शतकाच्या सुमारास चालू होती, असें या लेखांवरून दिसतें. क्र. २६ या चैत्यांतील स्तूप वर्तुलाकार असून त्याच्या आघाडीवर सिंहासनस्थ बुद्धाची, नगाऱ्यावर बोधिसत्त्वांच्या व अण्डावर उडत्या गंधर्वांच्या अशा मूर्ति कोरलेल्या आहेत. या लेण्यांत जेथें जागा सांपडेल तेथें बुद्धाच्या व बोधिसत्त्वाच्या इतक्या मूर्ति कोरलेल्या आहेत कीं त्या पाहतां पाहतां प्रेक्षकाला वीट यावा. अवलोकितेश्वराचा संकट-मोचन-प्रार्थना-पट, बुद्ध-निर्वाण आणि मार-संग्राम हे या लेण्यांतील तीन गट प्रेक्षणीय आहेत. येथील बुद्ध-निर्वाणमूर्ति सुमारें सवातेवीस फूट लांबीची आहे. शेषशायी भगवानाची मूर्ति याच धर्तीची असते. बुद्धनिर्वाणमूर्ति उत्तरकालीन असल्यामुळें कोणीं कोणाचें अनुकरण केलेलें आहे हें समजण्यास मार्ग नाहीं. बुद्ध-निर्वाणाच्या मूर्ति ठिकठिकाणीं आहेत. बौद्ध तीर्थांची महायात्रा करणारा युआन-च्वंग सांगतो कीं बामियान येथील बुद्ध-निर्वाणाची मूर्ति एक हजार फूट लांबीची आहे. त्याच्या प्रवासवर्णनाचे संपादक डॉ. बील सांगतात कीं ही अतिशयोक्ति आहे; मोलमेन येथील बुद्धनिर्वाणमूर्ति एकशें-वीस फूट लांबीची असल्याचें त्यांनीं नमूद केलें आहे. मार-संग्राम हा विषय ही बौद्ध शिल्पकारांना फार प्रिय आहे. मारविजयाची कथा अशी: घोर तपश्चर्येनंतर सिद्धार्थ बोधिवृक्षाखालीं ध्यानस्थ बसला. त्याला बुद्धपद प्राप्त होण्याचा समय आला. तेव्हां कामलोकाचा अधिपति मार यानें सिद्धार्थाच्या तपश्चर्येंत विघ्न आणावयाचें ठरविलें. मारानें नगारा वाजवून आपलें सैन्य जमविलें. त्याच्या सैनिकांनीं व्याघ्र, सिंह वगैरे हिंस्र श्वापदांचीं रूपें धारण केलीं आणि ते डरकाळ्या फोडीत शाक्यमुनीच्या भोंवतीं हिंडूं लागले. त्यांचीं रौद्र रूपें पाहून सिद्धार्थाच्या सहचरांनीं पलायन केलें. मारानें पांचशें मुखें व हजार हात धारण केले, हातांत शस्त्रें घेतलीं आणि आपल्या गिरिमेखल नांवाच्या हत्तीवर आरूढ होऊन तो शाक्यमुनीच्या अंगावर चालून गेला, पण तो बोधि-वृक्षाच्याहि जवळ येऊं शकला नाहीं. तेव्हां त्यानें झंझावात निर्माण केला; वृक्ष उन्मळले, कडे कोसळले, पण बोधिवृक्षाचें पानही हाललें नाहीं किंवा शाक्यमुनीच्या वस्त्राचा पदरही हेलकावला नाहीं. नंतर

मारानें आकाशांत लाख ढग जमविले, शेंकडों विजा चमकविल्या, पावसाचे नारळाएवढे थेंब पडूं लागले, पण शाक्यमुनीच्या वस्त्राची दशाही ओली झाली नाहीं. मग त्यानें सिद्धार्थाच्या शरीरावर पेटते पर्वत फेंकले, त्यांचीं फुलें झालीं; चक्र फेकलें, तें त्याच्या मस्तकावरलें छत्र झालें. मार म्हणाला, मी धर्मकृत्यें केलीं आहेत, याला माझे सैनिक साक्ष आहेत. यावर शाक्यमुनि म्हणाला, धर्मकृत्यांबाबतचे माझे साक्षींदार निःपक्षपाती आहेत ; त्यानें हात उचलला, तों धरित्री दुभंगली, प्रचंड गडगडाट झाला, गिरिमेखल गडबडला, मार कोसळला. नंतर त्याच्या मुली पुढें सरसावल्या. त्यांनीं बुद्धाला मोहित करण्यासाठीं शृंगाराची शिकस्त केली, पण बुद्धानें त्यांच्याकडे पाहिलेंही नाहीं. तेव्हां त्या लज्जित होऊन पळाल्या. याप्रमाणें माराचा पराभव केल्यानंतर बुद्धाला पूर्ण ज्ञान प्राप्त झालें. अजंठ्याच्या या शिल्पांतील मारकन्यांचें नृत्य प्रेक्षणीय आहे आणि एक स्त्री तबलातरंगासारखें वाद्य वाजवीत आहे, तें लक्षपूर्वक पाहण्याजोगें आहे.

## अजंठ्याची चित्रकला :

हिंदुस्थानला चित्रकला फार पुरातन कालापासून अवगत आहे. वेदोपनिषदांत चित्रकलेचे उल्लेख आहेत आणि कालिदास व भवभूति यांच्या अभिजात नाट्यवाङ्मयांत. मैत्र्युपनिषदांत भित्तिचित्रांचा उल्लेख आहे आणि गाथासप्तशतींतही. वात्स्यायनानें कामसूत्रांत चित्रकलेच्या सहा अंगांचा उल्लेख केलेला आहे. चित्रलक्षण या ग्रंथांत चित्रकलेचें तंत्र तपशिलासह दिलेलें आहे. शिल्परत्न या ग्रंथांत भित्तिचित्रांचें व रंगसिद्धीचें तंत्र सांगितलेलें आहे. ब्रम्हवैवर्त पुराणांत विश्वकर्म्याचा वृत्तांत दिलेला आहे. देवांगना घृताची व विश्वकर्मा यांनीं एकमेकाना शाप दिल्यामुळें दोघानाही मनुष्यलोकीं जन्म घेऊन संसार करावा लागला. त्यांना नऊ मुलें झालीं. आणि प्रत्येक मुलापासून एक एक स्वतंत्र जात निर्माण झाली. चित्रकार, सोनार, सुतार व कुंभार या त्यांपैकीं मुख्य. समाजांत चित्रकारांना मोठ्या सन्मानानें वागविण्यांत येत असे ; चित्रकला हा एक योगच मानण्यांत येत असल्यामुळें त्याच्या अंगीं विनय इतका बाणलेला असे कीं आपण निर्माण केलेल्या कलाकृतीं-

वर तो नांवनिशाणी कधींही करीत नसे. चित्रकलेचे आनुवंशिक संस्कार अनादि कालापासून झालेल्या निष्णात कलाकारांनीं अजंट्याचे विख्यात चित्रपट निर्माण केलेले आहेत.

हे चित्रपट अजंटा येथील लेण्यांपैकीं क्र. १, २, ९, १०, १६, १७, १९ व २१ या लेण्यांच्या भिंतींवर, खांबांवर व छतांवर रंगविलेलें आहेत. बाकीच्या लेण्यांच्या भिंतींवरही चित्रें रंगविलेलीं असावींत असें अनुमान करण्यास जागा आहे. क्र. १, २, १६ व १७ या लेण्यांतील चित्रें बऱ्याच सुस्थितींत आहेत आणि तींच विशेष विख्यात आहेत. बुद्धाच्या जीवनांतील व पूर्वजन्मांतील आणि जातकलोककथांतील प्रसंग हे या चित्रपटांचे मुख्य विषय आहेत. माती, शेण, ताग व तूस यांच्या वस्त्रगाळ मिश्रणाचा पातळ गुळगुळीत गिलावा लेण्याच्या तासींव भिंतीं-वर चढवावयाचा आणि त्यावर शिंपल्यांपासून तयार केलेल्या चुन्याचा, अंड्याच्या टरपलाएवढ्या जाडीचा, चकचकीत थर चढवावयाचा आणि तो ओलसर आहे तोंवर त्यावर रसचित्रें काढावयाचीं, अशी या चित्रकारांची पद्धत होती. हीं चित्रें रंगविण्यासाठीं चित्रकारांनीं फक्त सहा रंगांचा उपयोग केलेला आहे; पांढरा, काळा, पिंवळा, हिरवा, तांबडा व निळा. यांपैकीं काळा रंग काजळापासून तयार करण्यांत येत असे आणि बाकीचे रंग दगड-मातीपासून. निळा रंग क्वचितच वापरण्यांत आलेला आहे. हे रंग इतके उत्कृष्ट आहेत कीं दीड हजार वर्षें लोटलीं तरी त्यांची तकाकी अजून ताजीतवानी आहे. सूक्ष्म वर्तिकेनें गेरूच्या रंगांत चित्रांची बारीक बाह्यरेषा प्रथम काढावयाची आणि नंतर त्यांत रंग भरावयाचे, अशी या चित्रकाराची पद्धत होती. या सर्व लेण्यांत, विशेषतः त्यांच्या अंतर्भागांत इतका अंधार आहे कीं त्यांवर रंगविलेलीं चित्रें नीट दिसावींत म्हणून कृत्रिम प्रकाशसाधनांचें साह्य घ्यावें लागतें. चित्रकारांनीं तीं कशीं रंगविलीं असतील याची आतां नीटशी कल्पनाही करतां येत नाहीं. बाह्यरेषा, शरीर-सौष्ठव, यथार्थ-दर्शन, भावदर्शन, रंगसंगति आणि संधान ( Composition ) हीं अंगें चित्राचा गुण अजमावतांना विचारांत घ्यावीं लागतात. अजंट्याच्या चित्रांची बाह्यरेषा अखंड व निश्चित अशी असते, मग चित्र स्थिर

वस्तूचें असो किंवा चल मूर्तीचें. त्यांचा हात चांचरत नाहीं, वर्तिका थरकत नाहीं ; एवढी सफाई अलीकडच्या नामवंत चित्रकारांच्या अंगीं क्वचितच आढळते. अजंठ्याच्या चित्रकारांना शारीरशास्त्राचें व चित्रकलेच्या पारंपरिक संकेतांचें सूक्ष्म ज्ञान होतें ; त्यांची निरीक्षणशक्ति तीक्ष्ण होती. यामुळें त्यांनीं रंगविलेले देखावे निसर्गाशीं व जीवनाशीं प्रामाणिक आहेत ; मग चित्राचा विषय व्यक्तीच्या अंगविक्षेपांतील सौष्ठव हा असो किंवा श्वापदांच्या उसळींतील आवेश. हीं चित्रें रंगविलीं गेलीं त्या काळीं चित्रकलेवर संकेतांचें बंधन नसतें तर चित्रकारांना स्वतंत्र बुद्धीनें यथार्थदर्शन अधिक यशस्वीपणें करतां आलें असतें. अलीकडचे चित्रकार दूरदूरच्या वस्तु आकारानें लहान लहान दाखवून अंतराचा भास निर्माण करतात ; अजंठ्याचे चित्रकार दूरच्या आकृति उंचावर काढतात. भावदर्शनांत तर त्यांचा हातखंडा, विशेषतः विशिष्ट भावना सूक्ष्म अंगविक्षेपानें व्यक्त करण्यांत. येथील कांहीं चित्रांत इतक्या व्यक्तींनीं भाग घेतलेला आहे कीं त्यांची संख्या मोजली तर केवढी तरी भरते ; पण खुद्द चित्रांत गर्दी झालेली दिसत नाहीं. हें संधान सांभाळणें किती अवघड आहे याची चित्रकाराशिवाय इतरांना नीटशी कल्पना करता येणार नाहीं. येथील चित्रांत कोणताही रंग भडकून नजरेंत सलत नाहीं. येथें हजारों व्यक्तींचीं चित्रें रंगविलेलीं आहेत, पण त्यांत साम्य आढळत नाहीं ; आकृतींत, आसनांत किंवा वर्णांत. जीवसृष्टींत व्यक्तिमात्राच्या ठेवणींत असतो तसाच फरक येथील चित्रपटांतील व्यक्तींव्यक्तींमध्यें दिसून येतो. मध्ययुगीन यूरपियन धार्मिक चित्रपटांतील व्यक्ति बोजड लांकडी बाहुल्यांसारख्या निर्जीव दिसतात ; कारण या व्यक्ति चित्रकारांना परक्या होत्या. अजंठ्याच्या चित्रपटांतील व्यक्ति स्वकीय, चित्रकारांना परिचित, भोंवतालच्या जगांत अप्रत्यक्ष वावरणाऱ्या अशा असल्यामुळें त्या निसर्गिक, नव्हे, सजीव आहेत असा भास होतो. वाटतें कीं या असंख्य व्यक्तींपैकीं कोणाशीं तरी स्नेह जोडावा, तिला हात धरून बाहेर आणावें आणि तिच्याशीं शिळोप्याच्या गप्पा छाटीत बसावें ! चित्रकलेंतील अनेक दोषांपासून अलिप्त अशा या कलाकृति निर्माण करणाऱ्या कलाकारांचें करावें तेवढें कौतुक कमीच होणार आहे.

अजंठ्याच्या चित्रपटांत बुद्धाच्या पूर्वजन्मांतील व जातककथांतील प्रसंगांचें चित्रीकरण केलेलें आहे असें वर सांगितलें. त्याचें उदाहरण देऊन स्पष्टीकरण करतों. छदन्त जातकाची गोष्ट प्रसिद्ध आहे; सारांश सांगतों: हिमालयावर आठ हजार हत्तींचा एक कळप होता. त्याच्या राजाला दोन राण्या होत्या. नगराज हा पूर्वजन्मींचा बोधिसत्त्व. दोघीही त्याच्या आवडत्या. त्यानें एका वृक्षाला टक्कर दिली. एकीच्या अंगावर फुलें पडलीं, दुसरीच्या अंगावर काड मुंग्या. योगायोगामुळें त्यानें पक्षपात केला असें वाटावें असा प्रसंग घडला. अपमानित राणीनें अन्नपाणी वर्ज्य केलें व देह ठेवला. तिनें प्रार्थना केली होती कीं पुढील जन्मीं आपण काशीच्या ब्रह्मदत्त राजाची राणी व्हावें, म्हणजे आपण राजाला प्रसन्न करून घेऊं, शिकारी पाठवून विषारी बाणानें या गजराजाला मारवूं आणि त्याचे सहा रंगी सुळे काढवून आणवूं. तिच्या इच्छेप्रमाणें सर्व गोष्टी घडल्या. शिकाऱ्यांनीं सात वर्षें खटपट करून गजराजाला विद्ध केलें. पण त्याचे सुळे निघेनात. तेव्हां परोपकारासाठीं व पुण्यप्राप्तीसाठीं उत्सुक असलेल्या गजराजानें आपल्याच सोंडेनें ते उपटून त्यांच्या हवालीं केले! शिकाऱ्यांनीं हे सुळे राजगृहीं आणले. ते पाहतांच राणीला मूर्च्छा आली, तिला आपल्या पापाची जाणीव झाली, तिची हृदयक्रिया बंद पडली आणि तिनें देह ठेवला. ही कथा क्र. १ व १७ या लेण्यात चित्रित केलेली आहे. हत्ती व हत्तिणी यांच्या लीला, अपमानप्रसंग, शिकार, दन्तप्राप्ति, राणीची मूर्च्छा व सांत्वन, असे अनेक प्रसंग हारीनें चित्रित करून हा चित्रपट पुरा केलेला आहे. या पटांतील व्यक्तींची ओळख सहजासहजीं पटावी इतकें त्यांचें चित्रीकरण यथार्थ झालेलें आहे. बुद्धाच्या जीवनांतील प्रसंगांचीं एकदोन उदाहरणें सांगतों. सिद्धार्थाला वैराग्य प्राप्त होऊं नये म्हणून संसारांत रमवून ठेवण्यांत आलें असतां जरा, आजार, मृत्यु वगैरे अवस्थांचें त्याला दर्शन झालें; मारविजय; देवदत्तानें पिसाळलेल्या हत्तीकडून बुद्धाला मारविण्याचा केलेला प्रयत्न; वगैरे. पाली वाङ्मयांतील जातककथा प्रसिद्ध झाल्या आणि बुद्धाच्या जीवनांतील अनेक प्रसंगांचा तपशील एकत्रित करून संगतवार वृत्तांत

संशोधकांनीं सिद्ध केला तोंवर अजंट्यातील चित्रपटांच्या विषयांची ओळख तज्ञांनाही पटलेली नव्हती. आतां बहुतेक सर्व चित्रपटांची संगति लागलेली आहे. तरी विवाद्य अशीं कांहीं चित्रें आहेतच. उदाहरणार्थ, क्र. १७ या लेण्यांत रंगविलेला एक प्रसंग घ्या. तेथें बुद्धाच्या भिक्षाटणांतील एक प्रसंग रंगविलेला आहे. बुद्धाची प्रतिमा सुमारें तेरा फूट उंचोची आहे, त्याचे हातीं भिक्षापात्र आहे, समोर माता व पुत्र यांच्या छोट्या प्रतिमा आहेत, पुत्र बुद्धाला भिक्षा वाढीत आहे. हा मुलगा अशोक, त्यानें बुद्धाला मृत्तिका दिली व बुद्धानें त्याला चक्रवर्तित्व दिलें, हा प्रसंग येथें चित्रित केलेला आहे, असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. श्री. मुकुल दे यांचें अनुमान असें आहे कीं पूर्ण ज्ञानप्राप्तीनंतर बुद्ध भिक्षेसाठीं स्वगृहीं आला, त्याची पत्नी यशोधरा व पुत्र राहुल हीं अज्ञात भिक्षूला भिक्षा वाढण्यासाठीं बाहेर आलीं आणि त्याला पाहतांच तिला त्याची ओळख पटली, हा प्रसंग येथें चित्रित केलेला आहे. प्रसंग कोणताही असो, या चित्रांतील भावदर्शन इतकें नाजुक व सहज आहे कीं अजंट्याच्याच नव्हे, जगातील उत्कृष्ट चित्रांत गणना करावी एवढी त्याची योग्यता आहे.

अजंट्याच्या चित्रपटांत व्यक्ति, पशु, पक्षी इत्यादिकांच्या असंख्य प्रतिमा रंगविलेल्या आहेत, इतक्या कीं एकेका लेण्याचें बारकाईनें निरीक्षण करण्यास पंधरा पंधरा दिवसही पुरणार नाहींत. संख्या एवढीच या चित्राची प्रशस्ति नाहीं. गुणांच्याही मानानें यांचा दर्जा उच्च आहे. कोठेंही न्यून राहणार नाहीं अशा आकृति व विसंगति वाटणार नाहीं अशी पार्श्वभूमि व रंगसंगति, अशी खबरदारी घेऊन हीं चित्रें रंगविलेलीं आहेत. या चित्रकारांची सूक्ष्म निरीक्षणशक्ति व कुंचल्यानें कल्पनेला मूर्त स्वरूप देण्याचें कौशल्य यांची मुक्त प्रशंसा जागतिक कीर्तीच्या कलाकारांनीं केलेली आहे. श्री. ग्रिफिथ्स् सांगतात : समकालीन चित्राशीं तुलना केली असतां हींच चित्रें सरस ठरतील, एवढेंच नव्हे, तर तीं जगांतील उत्कृष्ट चित्रांच्या तोडीचीं ठरतील. श्री. लारेन्स् बिन्योन सांगतात : आशियामधील प्राचीन कलेचा उद्भव अजंट्याच्या चित्रपटांतूनच

झालेला आहे. क्र. १ या लेण्यात बैलांच्या टकरीचें दृश्य आहे. प्रचंड वशिण्डांच्या पुष्ट चवताळलेल्या बैलांची टक्कर ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेली असेल व त्यांचे त्या वेळचे अंगविक्षेप ध्यानांत ठेवण्याइतकी निरीक्षण व धारणा शक्ति ज्याचे अगीं असेल त्यांना या चित्रांतील स्वारस्य सहज समजून येईल. क्र. १७ या लेण्यांत गजजातक रंगविलेलें आहे. हत्ती, हत्तीण व त्यांचा छावा यांमधील वात्सल्य-प्रसंग येथें मोठ्या बहारीनें रंगविलेला आहे. प्रेमांत आलेले हत्ती परस्परांच्या गंडस्थळांवर देठांसह कमळें ठेवतात, एकमेकाना सोंडेनें कुरवाळतात, असें आपण वाचतों, तें येथें प्रत्यक्षांत पहावयास मिळतें. पोषाक व आविर्भाव यांवरून व्यक्तीचा पेशा व प्रसंगाचें वैशिष्ट्य व्यक्त करण्याची येथील चित्रकारांची हातोटी अवर्णनीय आहे. नागराजाचें द्रविड राजाशीं संभाषण हा क्र. १ या लेण्यांतील एका चित्राचा विषय आहे. या चित्राचा निर्माता राजगृहांत वावरलेला असला पाहिजे. राजाच्या भोंवतीं त्याचे आश्रित असावयाचेच. राजाच्या शेजारीं राणी गंभीरपणें उभी आहे, तरी प्रसंगाचा फायदा घेऊन राजाची उपपत्नी लगट करून मोठ्या नखऱ्यांत त्याच्या मांडीवर दण्ड ठेवून संभाषणांत भाग घेत आहे; भोंवतालीं तत्पर सेविका उभ्या आहेत, एकीच्या हातीं मिष्टान्नांचें ताट आहे, टापशी घातलेला विदूषक किंवा आश्रित बुभुक्षित भिक्षुक या ताटांतील कांहीं पदार्थ उचलून घेत आहे आणि हें पाहणाऱ्या दासी केवळ अंगुलिविक्षेपानें त्याची चेष्टा व निषेध करीत आहेत. चित्रकाराची मार्मिक निरीक्षणशक्ति व सूक्ष्म विनोदबुद्धि हीं दोन्ही या चित्रांत प्रेक्षकाच्या प्रत्ययास येतात. येथील चित्रकारांनीं अभावितपणें समकालीन व परिचित समाजदर्शनाचा चित्रपट भावी पिढ्यांसाठीं येथें निर्माण करून ठेवलेला आहे. इतिहास व समाज शास्त्रज्ञांना त्यांवरून किती तरी निष्कर्ष काढण्यासारखे आहेत.

एवढें मात्र खरें कीं अजंठ्याच्या चित्रपटांतील पुरुषांचे अंगीं पौरुषाचा पूर्ण अभाव दिसतो. कोणाच्याही मुखावर पराक्रमाचा लवलेशही दिसत नाहीं, मग तो सिंहासनावर अधिष्ठित झालेला राजा असो किंवा मृगयेला निघालेला शिकारी असो. उघडउघड परदेशी दिसणारांनींच दाढीमिशा

ठेवलेल्या आहेत, फारच थोड्या एतद्देशीयांच्या ओंठांवर मिशा दिसतात आणि जेथें त्या आहेत तेथें त्यांचीं अग्रें हनुवटीकडे वळलेलीं आहेत! गाथासप्तशतींत ज्यांना जायाभीरुक म्हटलेलें आहे अशीं हीं माणसें दिसतात. क्र. १ या लेण्यांत वज्रपाणि बुद्धाचें चित्र आहे. श्री. पंत प्रतिनिधि सांगतात कीं त्याची मान शंखासारखी, दंड हत्तीच्या सोंडेसारखे आणि कमर सिंहासारखी आहे. ते सांगतात कीं हें चित्रण शास्त्रशुद्ध संकेतांनुसार केलेलें आहे. आपण समजतों कीं पुरुषाची छाती सिंहासारखी असावी आणि स्त्रियांची कटि; पण बुद्धाचें सारेंच अलौकिक! क्र. १ या लेण्यांत अश्वारूढ राजाच्या मिरवणुकीचें दृश्य आहे. राजाच्या पाठीला पोंक आलेलें आहे. वाटतें कीं नाटकांत नेहमीं स्त्रियांच्या भूमिका करणाऱ्या किंपुरुषाला घोड्यावर बसविलेलें आहे! श्री. पंतप्रतिनिधींनीं साहित्यांतील नवरसांची येथील चित्रपटांतील कांहीं प्रसंगांशीं सांगता जुळविलेली आहे. त्यांनीं वीररसाचा म्हणून वर्णिलेला प्रसंग पहा: हें चित्र क्र. २ या लेण्यांत आहे. अजातशत्रूनें बुद्धाचा तपोभंग करण्यासाठीं आपल्या पदरची एक नर्तिका पाठविली. तिला बुद्ध बधला नाहीं. त्याचा तपोभंग होण्याऐवजीं तिचा तेजोभंग झाला. तो तिच्या करवीं जिंकला जाण्याऐवजीं तीच जिंकली गेली. पराजित होऊन ती परतली. कामगिरी फसलेली पाहून राजा क्रुद्ध झाला. त्यानें तिला देहान्ताची सजा सुनावली. नर्तिका राजाच्या पायांशीं मस्तक टेंकून बसली आहे. ती क्षमेची याचना करीत आहे आणि फर्मावलेली शिक्षा अमलांत आणण्यासाठीं राजानें स्वतःच तरवार उपसलेली आहे—असा या चित्राचा विषय आहे. हा वीररस कीं वीररसाचें विडम्बन? काळानें या चित्रांतील राजाचें मस्तक उडविलेलें असल्यामुळें त्याच्या मुखावरील आविर्भावाबद्दल अनुमान करण्यास साधन नाहीं. अजंठ्याच्या चित्रपटांत युद्ध-प्रसंग कोठेंही नाहीं, शौर्य कोठेंही व्यक्त झालेलें नाहीं; हत्यारांचा उपयोग शिकारीचे वेळीं किंवा मिरवणुकीचे अग्रभागीं अलंकार म्हणून! उपसलेली तलवार फक्त वरील प्रसंगांत. अजंठ्याच्या चित्रपटांतील सारेच पुरुष कसे शांत व सस्मित, सहनशील व निरुपद्रवी दिसतात. बुद्ध, बोधिसत्त्व

व सात्त्विक कथानायक एवढेच नव्हेत तर त्यांच्या भोंवतालच्या सर्व व्यक्तीही. सारे कसे सुखांत व चैनींत कालक्रमणा करीत आहेत. आत्मार्पणासाठीं योग्य संधि कशी मिळेल, एवढाच त्यांना काळजीचा विषय. आणि हें आत्मार्पण कसें? भुकेल्या ससाण्यापासून कबूतराला वांचविण्यासाठीं शिबि राजा स्वतःचें मांस तोलून देत आहे; आत्मार्पणाला उत्सुक असलेला शंखपाल जातकांतील नागराज मुंग्यांना भक्ष्य मिळावें म्हणून स्वतःचा जिवंत देह त्यांच्या वारुळावर टाकून देत आहे; रूरु-जातकांतील शिकारीला निघालेला राजा मृगाला पाहतांच धनुष्य-बाण टाकून देतो! गोष्टी ऐकावयाला ठीक आहेत, प्रसंगविशेषीं डोळयांतून पाणी काढावयाला सोईस्कर आहेत. पण आपण जनतेपुढें जे आदर्श ठेवीत आहोंत त्यांचा राष्ट्रीय जीवनावर काय परिणाम होईल याचा विचारही तत्कालीन धर्मप्रवर्तकांच्या ध्यानांत आलेला दिसत नाहीं; बौद्धांच्या व जैनांच्याही. जैनांच्या अहिंसा-प्रचाराचें एक उदाहरण देतों: श्री जिनसेनस्वामी व श्री गुणभद्रस्वामी यांनीं रचलेल्या महापुराणांत (महापुराणामृत. लेखक — श्री. रावजी नेमचंद शहा, सोलापूर, १९१५, पर्व ३६ वें: भुजबलिजलमल्लदृष्टियुद्धविजयदीक्षाकेवलोत्पत्तिवर्णन) भरत चक्रवर्ती व बाहुबली यांच्या युद्धाचें वर्णन केलेलें आहे. हे बलाढ्य योद्धे रणभूमीवर समोरासमोर उभे राहिले. तेवढ्यांत मुख्य प्रधान व सेनापति आपसांत विचार करूं लागले कीं हे दोघेहि ह्या शरीरांच्या त्यागानंतर मुक्त होणारे असल्यामुळें त्यांच्या परस्पर-युद्धांत सेवकाचा मात्र संहार होईल. याप्रमाणें विचार करून दोन्ही पक्षातील प्रधान व मांडलिक भरत व बाहुबली यांजकडे गेले व प्रार्थना करते झाले कीं महाराज, अनंत जीवांचा संहार करणारें हें युद्ध केलें असतां मोठा अधर्म होऊन आपली अपकीर्ति होईल. या युद्धानें जर तुम्हां दोघांच्या शौर्याचीच परीक्षा करावयाची असेल तर तुम्ही दोघांनींच युद्ध करावें, त्यांत ज्याला जय प्राप्त होईल तोच विजयी समजावा. याप्रमाणें सर्वांनीं प्रार्थना केल्यावर ते दोघे वैयक्तिक युद्ध करावयास कबूल झाले. नंतर गंभीर अशा आनंद भेरीनें दोन्ही सैन्यांस युद्ध थांबविण्याची सूचना करण्यांत आली, सैनिक व सेनापति आणि प्रधान व मांडलिक यांना युद्ध पाहण्या-

साठीं रणभूमीभोंवतीं बसविण्यांत आलें. नंतर भरत व भुजबली यांचें युद्ध सुरू झालें. वाचकांना वाटेल कीं आतां या कसलेल्या वीरांचा सामना शस्त्रास्त्रांच्या खणखणाटांत सुरू होणार आणि आपल्याला चुरशीचा सामना पहावयास मिळणार. असे अधीर होऊं नका. तसा कांहीं विपरीत प्रकार येथें होईल अशी कल्पनासुद्धां मनांत आणूं नका; कारण हें जैन-पुराणांतलें युद्ध आहे! पहा. पहिली फेरी दृष्टियुद्धाची. पापणी न हालवितां एकसारखें पाहणें हें दृष्टियुद्ध. या युद्धांत भुजबलीनें आपली दृष्टि स्थिर, शांत व निश्चल ठेवली. उलट भरताच्या नेत्रांतून अश्रु गळले, पापण्याहि लवल्या. झालें. पहिल्या फेरींत भुजबलीचा जय झाला! नंतर हे बंधु जलयुद्धाकरितां सरोवराच्या पाण्यांत उतरून एकमेकाच्या अंगावर पाणी टाकूं लागले. भुजबली राजा उंच असल्यामुळें भरतानें त्याच्या अंगावर केलेला जलसेक त्याच्या मुखापर्यंत न पोंचतां खालीं पडला. उलट भुजबलीनें केलेल्या जलसेकानें भरत व्याकुळ झाला. झालें; या फेरींतही भरत पराभूत झाला. नंतर बाहुयुद्धांत भुजबलीनें भरताचे हात बळकट धरून त्यास आकाशात वर उचलून लीलेनें मंडलाकार फिरविलें. याप्रमाणें या तीन्ही युद्धांत भुजबलीने भरतास जिंकलें! येणेंप्रमाणें युद्धांत जय मिळविल्यानंतर भुजबलीनें काय केलें? जैनदीक्षेचा स्वीकार! प्रस्तावनेंत भाषांतरकार सांगतात कीं या पुराणाचे लेखक राष्ट्रकूटाच्या अमदानींत महाराष्ट्र व कर्नाटक या देशांत होऊन गेले. आतां अशा युद्धाचा कार्यक्रम आगाऊ जाहीर केला तर मैदानाकडे रिकामटेकड्या हंगामांत उडाणटप्पू फुकटेही फिरकणार नाहींत आणि खेडेगावांतल्या हगाम्यांत या धर्तीची लढत कोणी केली तर तींत विजयी होणाराला पंचांकडून बक्षिसादाखल लंगोटीही मिळणार नाहीं! व्यक्तिमात्राला संसारापासून परावृत्त व निर्वाणप्राप्तीकडे प्रवृत्त करण्यासाठींच अजंठ्याचे चित्रपट रंगविण्यांत आले असले पाहिजेत आणि महापुराणासारखे ग्रंथ निर्माण करण्यांत आले असले पाहिजेत हें उघड आहे आणि मानवजातीच्या उद्धारार्थ हे प्रयत्न धार्मिकांनीं चालविले होते त्या वेळीं हिंदुस्थानांत कोणत्या राजकीय घटना घडत होत्या? उत्तर

हिंदुस्थानांत हूण आक्रमक गुप्त साम्राज्याचा विध्वंस व हिंदी संस्कृतीचा उच्छेद करीत होते आणि मूर्तिभंजक मुसलमानी आक्रमकाचे लढाऊ काफिले सिंधच्या बंदरांवर धडका देत होते. अशा धामधुमीच्या काळांत हे धार्मिक हिंदुस्थानांतील जनतेला शांत व सस्मित, सहनशील व निरुपद्रवी, परोपकारी व निर्वाणप्रवण बनविण्याच्या खटाटोपांत गर्क होते!

अजंठ्याच्या लेण्यांतील चित्रपटांतील स्त्रियांच्या प्रतिमा अत्यंत मोहक आहेत; मग त्या कोणत्याही वर्गांतलि असोत किंवा कोणत्याही वर्णाच्या असोत. स्त्री हा विषयच असा आहे कीं तो रसिकांचें चित्त वेधून घेतो. अजंठ्याचे चित्रकार हे तर रसिकाग्रणी. त्यांनीं स्त्रियांचीं चित्रें पंचप्राणांच्या व्याकुलतेनें रंगविलेलीं आहेत. अप्सरेपासून नागकन्येपर्यंत आणि राजकन्येपासून चामरधारिणीपर्यंत सर्व लोकांच्या व दर्जाच्या स्त्रियांच्या प्रतिमा येथें रंगविलेल्या आहेत. यौवनानें मुसमुसलेल्या, सौंदर्यानें रसरमलेल्या, प्रीतीनें बहरलेल्या, पुष्पालंकारांनीं सजलेल्या; गौर, शामल, ताम्र व कृष्णवर्णी; पुष्टस्तनी, सूक्ष्मकटि, ललिताङ्गी, पृथुलनितंबिनी; कोणी स्वतःच्या सौंदर्याचें आरशात निरीक्षण करीत स्तब्ध उभी आहे तर कोणी आपल्या सौंदर्याचें कोणी तरी निरीक्षण करीत आहे या जाणिवेनें किंवा आपलें सौंदर्य व शृंगार न्याहाळावा अशा हेतूनें त्रिभंग मुद्रा धारण करून उभी आहे किंवा नितंबांचें स्पंदन करीत मंद गजगतीनें पदन्यास करीत आहे! होय, ह्या चित्रपटांतील स्त्रिया अचेतन आहेत हें माहीत असूनही त्याबद्दल संभ्रम वाटावा, अशा कौशल्याचें त्यांचें चित्रण केलेलें आहे. वाटतें कीं कोणी एकाएकीं पुढें येईल आणि दटावील! कोठें एखादी अप्सरा आकाशांतून तरंगत चाललेली आहे तर कोठें एकादी नागकन्या एकांतांत बसून मानवलोकाचें निरीक्षण करीत आहे. कोणी पाठमोरी—झुलत्या केसांच्या बटा सांवरीत आहे, तर कोणी सामोरी—अपाङ्गावलोकन करीत आहे. येथील चित्रकारांनीं स्त्रियांचीं किती किती ध्यानें केवळ्या जिव्हाळयानें रंगविलेलीं आहेत म्हणून सांगावें! प्रसंग कोणताही असो, त्यांत एखादी तरी स्त्री असतेच.

वाटतें कीं तिचें चित्र रंगवितां यावें म्हणूनच चित्रकारानें तिच्या भोंवतीं विशिष्ट प्रसंगाची उभारणी केलेली आहे. कोठें झोंपाळयावर बसून ती झोंके घेत असते तर कोठें वातायनांतून बाहेरलें दृश्य पहात असते. या चित्रीकरणासाठीं येथें देशोदेशींचे चित्रकार जमलेले असावेत किंवा देशोदेशीं प्रवास करून आलेल्या चित्रकारांनीं हीं चित्रें काढलेलीं असावींत, एवढी वेषभूषांची विविधता त्यांच्या स्त्रियांच्या चित्रांत दिसून येते. अलीकडचे चितारी विशिष्ट ध्यान किंवा विशिष्ट धर्तीची वेषभूषा धारण करणाऱ्या व्यक्तीला समोर ठेवून तिचें चित्र काढतात. असें चित्र कितीही कौशल्यानें काढलेलें असो, त्यात थोडीबहुत कृत्रिमता व जडता असतेच. अजंठ्याच्या चित्रकारांनीं या पद्धतीचा अवलंब केलेला नाहीं. स्त्रियाचे सहज व स्वैर असे जे आविर्भाव त्यांच्या चित्तावर ठसले होते त्यांना त्यांनीं या चित्रांत मूर्त स्वरूप दिलेलें आहे. कोठें केवळ तर्जनीच्या विक्षेपानें भावदर्शन केलेलें आहे, तर कोठें अलंकाराच्या हेलकाव्यानें व्यक्तीची गति व्यक्त केलेली आहे. हिच्या मुखाचा कल, तिच्या आकृतीचा झोंक, हिच्या नखऱ्याचा ढंग; पुष्टता व कृशता, चारुता व जडता, मार्दव व लालित्य, स्थिरता व चलता, गजगति व हंसगति, नैसर्गिक व कृत्रिम, वेषभूषा व केशभूषा; हिचें चंदनचार्चित अंग, तिचें अळित्यानें रंगलेलें पाऊल! युवतीच्या जीविताच्या अंगप्रत्यंगांचें दर्शन देऊन येथील चित्रकारांनीं स्त्रीचें व्यक्तिमत्त्वच नव्हे, अनंतत्व साकार केलेलें आहे. येथील अनेक स्त्रियांनीं धारण केलेलीं वस्त्रें तलम व तोकडीं आणि केव्हां तर केवळ सांकेतिक असल्यामुळें त्यांच्या अशा अनेक अंगांचें दर्शन होतें कीं जीं लौकिक जगांत सहसा दृष्टीस पडत नाहींत, पण विलक्षण हें कीं असें आहे तरी तीं कामुकतेची प्रेरणा करीत नाहींत, एवढ्या संयमानें या प्रतिमा रंगविलेल्या आहेत. या लेण्यांच्या प्रवर्तकांच्या तत्त्वांप्रमाणें जड देह ही उपाधि, जीवित चंचल, संसार मिथ्या आणि निर्वाण हेंच सत्य; असें असलें तरी या लेण्यांतील चित्रें रंगविणारे कलाकार जाणून होते कीं स्त्री ही मानवी जीवनाची प्रेरणा आहे व धारक शक्ति आहे.

या कलाकारांनीं व्यक्तींचीं चित्रें काढलीं आहेत हें खरें, मात्र त्यात त्यांनीं प्रकृतीची शक्ति व्यक्त केलेली आहे, हेंही तितकेंच खरें.

ही माया, डावा पाय खांबाला टेंकून त्यावर रेलून स्तब्ध उभी आहे. ही यशोधरा, कपाळावर रुळणारी बट सांवरीत आहे. ही उन्नतस्तनी कृष्णवर्णा,कृष्णवर्णा – पण पार्श्वभूमीवर रंगविलेल्या पूर्णविकसित शुभ्र कमलापेक्षां मोहक. ही अप्सरा, उजव्या कानावर कललेला मलबारी खोपा घातलेली ; तिच्या हातांत टाळ आहेत, तालाच्या अनुरोधानें ती इतक्यांत त्यांचा आघात करणार आहे. ही नवोढा, भोंवतालच्या वातावरणाशीं अद्याप समरस झालेली नाहीं; तिला बागडावयाचें आहे, जंगलांत हिंडून फुलें गोळा करावयाचीं आहेत, पण आतां ती संसाराच्या व सासरच्या बंधनांनीं जखडलेली आहे. ही राजाच्या पायांशीं डोकें टेंकलेली नर्तिका ; घनस्तनी, कृशकटि, त्रिवलीधारिणी, जघनचपला ; तिची ढब अशी ढंगदार कीं ती प्रवीण नर्तिका आहे हें अनुमान तिच्या चवड्याच्या कमानीवरूनही करतां येतें. ही पार्श्वचारिणी, एका हाताच्या अंगुलीनें बुभुक्षिताला दटावीत आहे आणि दुसऱ्या हाताच्या बोटांना फिरकी देऊन आश्चर्य व्यक्त करीत आहे. बोटांच्या ठेवणीवरून मनोभावना व्यक्त करणें हें तर अजंठ्याच्या चित्रकारांचें वैशिष्ट्य !

क्र. १ व १७ या लेण्यांत प्रेमप्रसंगांचीं व मद्यपानाचीं दृश्यें आहेत. गौरवर्ण प्रियकर व शामला प्रिया, कृष्णवर्ण प्रियकर व गौरवर्णा प्रिया, उभयतां कृष्णवर्ण, अशा परिवर्तनांनीं हीं चित्रें सिद्ध केलेलीं आहेत. शामलेच्या स्तनांवर आवरण नसल्यामुळें ती राजाची उपपत्नी असावी असें वाटतें. तिच्या वागणुकींतही या पेशाला साजेल असा संयम दिसतो. उलटपक्षीं कृष्णवर्ण राजाबरोबर सहपान करणारी गौरवर्णा राज्ञी समानाधिकाराच्या भरीं पडून उन्मत्त झालेली दिसते. दोघेंही धुंद झालेलीं असलीं तरी तो तिला आग्रह करीत आहे आणि दोघांनाही आग्रह करणारा चषकधारक चंबू वांकवून सिद्ध आहेच ! हीं चित्रें पूर्ण आहेत म्हणूनच तीं मोहक वाटतात, असें नाहीं. क्र. १७ या लेण्यात एक त्रुटित चित्र आहे. प्रियेच्या गळ्यांत प्रियकरानें हात घातलेला आहे. तिच्या मानेमागून आलेला त्याचा कोंपरापासूनचा हात एवढाच

त्याच्या शरीराचा भाग अस्तित्वांत आहे; आणि मुख-मण्डल, सव्य नेत्र, वाम स्तन व डावा हात, एवढाच तिच्या शरीराचा भाग. या चित्राचा एवढाच तुकडा राहिलेला असला तरी त्याचें सौंदर्य अवर्णनीय आहे. तिच्या मुखावर प्रेमपूर्तीची प्रसन्नता आहे. या मीनाक्षीनें आपली नजर प्रियकरावर एकाग्र केलेली आहे. एकाद्या तंतुवाद्यावर द्रुत तालांत गत छेडतांना पडद्यांवर पडण्यासाठीं बोटें तयार ठेवावींत तशीं तीं त्याच्या हातावर अलगत बसलेलीं आहेत. चित्र अपूर्ण असल्यामुळेंच त्यांत अधिक स्वारस्य वाटतें कीं काय कोण जाणे. वर वर्णिलेल्या प्रेमप्रसंगांपेक्षां मला हेंच दृश्य अधिक आवडतें; उत्सुकता वाटते तिच्या प्रियकराच्या दर्शनाबद्दल; वाटतें कीं त्या धन्य पुरुषाचें दर्शन व्हावें, जो तिच्या प्रेमाचा विषय आहे! असूया ही वाटते.

क्र. १ या लेण्यांत दरबारी नृत्याचें दृश्य आहे. येथील नृत्य दरबारांत चाललेलें आहे. राजाराणी सिंहासनावर बसून नृत्य पहात आहेत आणि नर्तिकेच्या कौशल्याचें कौतुक करीत आहेत. औरंगाबादच्या लेण्यांतील नृत्यशिल्पाचें वर्णन करतांना अजंट्याच्या या नृत्यचित्राचा उल्लेख केलेलाच आहे. औरंगाबादच्या शिल्पांत हें अवडंबर नाहीं. दोन्ही नर्तिकांची कमर पातळ व नजर तरळ आहे. दोन्ही जागीं नर्तिकांना साथ करणाऱ्या स्त्रियाच आहेत. औरंगाबादच्या नर्तिकेचें नृत्य भारत नाट्य-धर्तीचें आहे आणि येथील नर्तिकेचें स्थानिक धर्तीचें आहे, हा मुख्य फरक. तेथील नर्तिकेची प्रतिमा पाषाणाची व येथील नर्तिकेचा देह रंगाच्या पापुद्र्याचा; पण ही जड वाटते व ती तरल भासते! येथील नृत्यपटाचें वैगुण्य हें कीं नृत्य दरबारांत चाललेलें आहे हें आजूबाजूला पाहून अजमावावें लागतें. कारण नर्तिका व तिच्या साथी प्रेक्षकाला सन्मुख आहेत, आपण दरबारांत नृत्य करीत आहोंत याची त्यांना जाणीवही दिसत नाहीं.

क्र. १७ या लेण्यांतील राजकन्येच्या प्रसाधनाचें दृश्य पहा. तिच्या डाव्या हातांत वाटोळा आरसा आहे व उजव्या हाताच्या बोटानें कपाळावर कुंकुमतिलक लावण्याच्या ती तयारींत आहे. त्या क्षणीं ती स्वतःच्या सौंदर्यनिरीक्षणांत तल्लीन झालेली आहे. तिच्या शेजारीं प्रसाधनसाधनांचें

तबक धारण करणारी दासी एका बाजूला उभी आहे व दुसरीकडे सकच्छ चामरधारिणी. या तीन स्त्रिया शेजारीं उभ्या आहेत; प्रत्येकीची उभें राहण्याची ऐट वेगळी आहे; प्रत्येकीची आकर्षकता भिन्न आहे. राजकन्येचा वर्ण काळसर आहे आणि चामरधारिणीचा शामल. अजंठ्या-च्या सर्व स्त्रियांत ही श्यामला मला फार आवडते. दासी असल्यामुळें प्राप्य कोटींत गणना करतां येण्यासारखी आहे म्हणून नव्हे किंवा सकच्छवस्त्रधारिणी आहे म्हणूनच नव्हे, तिच्या नजरेंत जें जहर आहे व आसनांत लालित्य आहे तें मला तरी इतरत्र आढळलें नाहीं, म्हणून. याच लेण्यांत विजय राजाच्या अभिषेकाचें दृश्य आहे. येथेंही सकच्छवस्त्र-धारिणींची त्रयी आहे. त्यांच्या धाटणीवरून मला वाटतें, या चारी प्रतिमा एकाच चित्रकाराच्या हातच्या असाव्यात.

## सह्याद्रींतील लेण्यांची ऐतिहासिक पार्श्वभूमि :

बुद्धनिर्वाणानंतर अजातशत्रूच्या अमदानींत बौद्ध धर्मगुरूंची पहिली महासभा राजगृह येथें वेभार पर्वतावरील सत्तपण्णि गुहेंत भरली होती. ही नैसर्गिक गुहा या समारंभासाठीं विस्तृत व अलंकृत करण्यांत आली होती. कृत्रिम गिरिगृहें खोदण्याची कल्पना बौद्ध धर्मप्रचारकांना या वेळीं सुचलेली असणें संभवनीय आहे. नैसर्गिक गुहांचा उपयोग बौद्धांनीं निवासासाठीं कधींही केलेला नाहीं.

बौद्ध व जैन धर्मांची स्थापना मगध देशांत झाली. त्या वेळीं या भागांत वैदिक धर्माची पकड ढिली होती. बौद्ध व जैन या धर्मांचे प्रस्थापक या देशाचे रहिवासी होते; क्षत्रिय राजकुलोत्पन्न होते; म्हणून प्रथम या भागांतल्या मध्यम वर्गीय क्षत्रियांनीं या धर्मांचा स्वीकार केला; नंतर वैश्यांनीं. वैदिक धर्माची उभारणी यज्ञसंस्थेवर व वर्णव्यवस्थेवर झालेली होती. अनार्यांचीं धार्मिक प्रतीकें आर्यांना मान्य नव्हतीं. बुद्धाला आर्य-संस्था अमान्य होत्या. बहुजनसमाजांत प्रचलित असलेल्या अनेक धार्मिक रूढींचा समावेश त्यानें आपल्या धर्मसंघटनेंत करून घेतला होता. यामुळें या नव्या धर्मांची दीक्षा घेण्यांत आपण निषिद्ध किंवा विशेष असें कांहीं करीत आहोंत असें कोणाला वाटलें नाहीं.

ब्राह्मण हे पुरोहित व क्षत्रिय हे राज्यकर्ते. वैदिक धर्माचें सामर्थ्य त्यांच्या सहकार्यावर अवलंबून होतें. नन्दांनीं क्षत्रिय राजघराण्याचा उच्छेद केल्यामुळें वैदिक धर्म निराधार झाला. वैदिक संस्कृतीची बहुजन समाजांशीं रुजवात झाली नाहीं. कारण या संस्कृतीच्या पुरस्कर्त्यांच्या मानानें तत्कालीन बहुजनसमाज फार मागासलेला होता. या परिस्थिती-मुळें बौद्ध व जैन धर्मांच्या प्रसाराला अनुकूल किंवा प्रतिकारशून्य असें क्षेत्र उत्तर हिंदुस्थानांत निर्माण झालें.

अशोकानें बौद्ध धर्माचा स्वीकार केला म्हणूनच या धर्माला महत्त्व प्राप्त झालें. या पूर्वी हा धर्म एक स्थानिक क्षुद्र पंथ मात्र होता. धार्मिक परिवर्तनासाठीं अशोकाची मनोभूमि सिद्ध झाली त्या वेळीं त्याच्या भोंवतीं बौद्धांऐवजीं जैनांचें कोंडाळें असतें तर त्यानें याऐवजीं त्या धर्माचा स्वीकार केला असता. अशोकाच्या आश्रयामुळें व सक्रिय उत्तेजना-मुळेंच बौद्धधर्माचा फैलाव झाला.

बौद्ध धर्म मानवी समानतेवर आधारलेला होता आणि ब्राह्मणी धर्म वर्णव्यवस्थेवर. ब्राह्मणी समाजव्यवस्था सुसंस्कृत नियंत्रित राजसत्तेला पोषक होती आणि बौद्ध धर्माचीं तत्त्वें राष्ट्रीयत्वाला बाधक व अनि-यंत्रित सत्तासंवर्धनाला अनुकूल होतीं. अशोकाचें साम्राज्य हा त्यांचा प्राथमिक राजकीय परिणाम.

अशोकाची धर्मप्रसाराची योजना स्तूपनिर्मितीवर आधारलेली होती. त्याच्या काळात भिक्षूंच्या वस्तीसाठीं एक-दोन क्षुद्र विहार खोदण्यांत आले, एवढेंच. ज्यांना आपण बौद्ध लेणीं म्हणतों तशीं त्याच्या कार-कीर्दीत निर्माण झालीं नाहींत.

अशोकाच्या पूर्वी बौद्ध धर्म हा विशिष्ट धार्मिक हेतूंनीं प्रेरित झालेल्या निर्वाणेच्छूंचा संघ होता. अशोकाच्या प्रचारामुळें बौद्ध धर्म हा सर्वसामान्य नागरिकांचा सर्वसाधारण धर्म झाला.

अशोकानें धर्मप्रसाराच्या योजनावर शक्तिसर्वस्व एकत्रित केल्या-मुळें खजिना रिता झाला आणि राज्यव्यवस्था ढिली पडली. अशा परिस्थितींत कोणतेंही राज्य किंवा साम्राज्य टिकूं शकत नाहीं. पूर्वा-

श्रमींच्या कर्तबगारीच्या इभ्रतीवर त्याच्या हयातीपुरतें मौर्य साम्राज्य जीव धरून राहिलें इतकेंच.

अशोकाचें साम्राज्य पेन्नार नदीपर्यंत पसरलें होतें, असा प्रवाद आहे. येथें महाराष्ट्रापुरतेंच बोलावयाचें आहे. अशोकाचें एक त्रुटित शिलाशासन सोपाऱ्यास मिळालें आहे. एवढा अपवाद सोडला तर नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत अशोकाच्या अंगीं निश्चितपणें लावतां येईल असा एकहि अवशेष अद्याप उपलब्ध झालेला नाहीं. अशोकानें ८४,००० स्तूप उभारले. यांपैकीं महाराष्ट्राच्या वांट्यास फक्त पांच आले होते. यावरून वाटतें कीं या भागांत अशोकाची सत्ता नव्हती, असलीच तर तर केवळ नाममात्र होती.

अशोकाच्या साम्राज्याचें धारण करण्याची शक्ति त्याच्या वंशजांत नव्हती; म्हणून त्याच्यानंतर साम्राज्याची फाळणी झाली. अशोकाच्या राजकीय धोरणामुळें स्थानिक राज्यकर्त्यांची सत्ता नष्टप्राय झाली होती; त्याच्या धार्मिक धोरणामुळें वैदिक धर्माचे पुरस्कर्ते असंतुष्ट झाले होते. या सुप्त शक्तींवरील दाब एकाएकीं निघाल्यामुळें सर्वत्र अंदाधुंदी माजली. बौद्ध धर्मसंस्था मात्र संपन्न व प्रबल झाल्या होत्या. त्यांना राजाश्रयाची चटक लागली होती. स्वतःचें महत्त्व टिकविण्यासाठीं त्यांनीं राजकीय डावपेंच खेळण्यास सुरुवात केली.

अलेक्झँडरच्या स्वारीमुळें मध्य आशियांतील पुरातन राजसत्ता कोलमडून पडल्या. यामुळें अडदांड डोंगरी जमातींना कोणी शास्ता राहिला नाहीं; दुबळ्या मैदानी प्रजेला कोणी त्राता राहिला नाहीं. यामुळें या प्रदेशांत जातीय उठावणीचे झंझावात घुमूं लागले. बेसावध प्रजेवर व पर्यायानें आपल्या सत्तेवर परकीय टोळीवाल्यांची झडप पडूं नये म्हणून चीनच्या सत्ताधाऱ्यांनीं ख्रि. पू. तिसऱ्या शतकाचे मध्याचे सुमारास सरहद्दीवर चौदाशें मैल लांबीची तटबंदी उभारली. यामुळें टोळीवाल्यांचा मोर्चा हिंदुस्थानकडे झुकला. आम्ही त्यांना प्रतिबंध केला नाहीं, करूं शकलों नाहीं; कारण अहिंसेच्या व धर्मप्रसाराच्या धुंदीमुळें आमची राष्ट्रीयत्वाची भावना नष्ट झाली होती.

धर्मप्रसारासाठीं बौद्धांनीं परिवर्तनाचा अवलंब केला. बौद्ध धर्म

मानवी समानतेवर आधारलेला असल्यामुळें परिवर्तनाला पोषक होता. ब्राह्मणी समाज-व्यवस्था चातुर्वर्ण्यावर आधारलेली असल्यामुळें तींत परकीयांना स्थान नव्हतें. बौद्धांनीं परिवर्तित परकीयांना हिंदी समाजात हक्काचें समान स्थान दिलें आणि त्यांच्या आश्रयानें आपल्या धर्मसंस्थांचे हात बळकट केले.

राजा स्वकीय आहे कीं परकीय आहे याची बौद्धांना पर्वा नव्हती. त्यानें बौद्ध धर्माचा स्वीकार करावा व धर्मप्रसाराला साहाय्य करावें आणि याच्या मोबदल्यांत आपण त्याच्या सत्तास्थापनेला मदत व अधिराज्याला मान्यता मिळवून द्यावी, असा त्यांचा जणूं अलिखित करार झाला होता. धार्मिक प्रोत्साहनामुळें सुमारें तीनशें वर्षेपर्यंत परकीयांनीं हिंदुस्थानांत धुमाकूळ घातला. ते हिंदुस्थानात स्थायिक होण्याला उत्सुक होते आणि हे आश्रयासाठीं हपापले होते.

साम्राज्याची सत्ता सैल झाली कीं नालायक वंशज पदच्युत होऊन स्थानिक राज्यें निर्माण होतात; त्यांच्या स्पर्धेतून पुन्हां साम्राज्य निर्माण होतें. अशोकाच्या साम्राज्याच्या ध्वंसावशेषांतून अशीं राज्यें निर्माण झालीं आणि त्यांच्या स्पर्धेतून सातवाहन साम्राज्य. खि. पू तिसऱ्या शतकाच्या अंत्यपदापासुन दुसऱ्या शतकाच्या अखेरीपर्यंतचा सुमारें चारशें वर्षांचा कालखण्ड सातवाहनांचा. खि. पू. दुसऱ्या शतकांत ग्रीकांशीं, खि. पू. पहिल्या शतकांत शकांशीं, खिस्तोत्तर पहिल्या शतकांत क्षहरातांशीं व दुसऱ्या शतकांत सौराष्ट्राच्या क्षत्रपांशीं सातवाहनांना युद्धें करावीं लागलीं. ग्रीकांना बौद्धांचा पाठिंबा होता व त्यांच्या आक्रमणाला जैन कलिंग सम्राट् खारवेल याची साथ होती. शकांना जैनांचा पाठिंबा होता आणि क्षहरातांना बौद्धांचा. ग्रीकांबरोबरच्या युद्धांत शुंग हे सातवाहनांचे सहकारी होते आणि शकयुद्धांत मालव. खि. पू. १५० च्या सुमारास सुरू झालेलें हें धर्मयुद्ध शककर्ता गोतमीपुत्र शालिवाहन यानें क्षहरातांचें निर्मूलन केलें तेव्हां थांबलें. क्षत्रपांचें आक्रमण राजकीय स्वरूपांचें होतें, तें श्री यज्ञ सातकर्णीनें परतविलें. सह्याद्रींतील लेण्यांतील शिलालेख या महाकृत्यांना व विजयांना साक्ष आहेत.

पुष्यमित्र शुंग व पहिला सातकर्णी यांनीं ग्रीकांचा पराभव केला. हा विजय त्यांनीं अश्वमेध यज्ञ करून साजरा केला. नाणें घाटांतील शिलालेख हा याचा पुरावा. ऐन बौद्धयुगांतील या घटनेचें महत्त्व आपल्या इतिहासकारांच्याही नीटसें लक्षांत आलेलें नाहीं. पण्डित जयचंद्र विद्यालंकार यांनीं या कालखण्डाला अश्वमेधपुनरुद्धारयुग असें नांव दिलें आहे. यज्ञसंस्था हें वैदिक संस्कृतीचें प्रतीक. या संस्थेच्या धिक्कारासाठीं व निर्मूलनासाठीं तर बौद्धांनीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली होती. त्यांच्या विकृत प्रचाराला व राष्ट्रघातकी राजकारणाला या उभयतांनीं खणखणीत उत्तर दिलें. दुसऱ्या सातकर्णीनें शकांचा पराभव केला. या घटनेला सांची तोरणावरील लेखाची साक्ष आहे आणि गौतमीपुत्र सातकर्णीनें क्षहरातांचें निर्मूलन केलें याला नाशिकच्या पाण्डव लेण्यांतील गौतमी बलश्रीच्या लेखाचा पुरावा आहे.

अशोकाच्या स्तूपनिर्मितीच्या योजनेमुळें बुद्धाचे अवशेष भूमिगत झाले. ज्यांना अवशेष मिळाले नाहींत त्यानींच लेणीं खोदलीं.

लेणीं हें सह्याद्रीचें वैशिष्ट्य. या शिल्पकृत्याला हें स्थान निसर्गतः विशेष अनुकूल आहे. सह्याद्रींतील लेण्यांचे वैशिष्ट्य हें कीं येथील बहुसंख्य लेणीं बहुजनसमाजानें परस्पर सहकार्यानें निर्माण केलेलीं आहेत. राजाश्रयावर विसंबून राहण्याचा महाराष्ट्राचा धर्मच नाहीं !

सह्याद्रींतील सर्व हीनयान लेणीं सातवाहनांच्या अमदानींतलीं आहेत. आद्य सातवाहन वैदिक धर्माभिमानी होते, हें त्यांच्या नाणें-घाटांतील शिलालेखावरून स्पष्ट दिसतें. वैदिक धर्माभिमान्यांवर असहिष्णुतेचा आरोप करण्यांत येतो. सातवाहन वैदिक धर्माभिमानी होते आणि सहिष्णु होते; इतकेंच नव्हे, प्रजेपैकीं पुष्कळ लोक बौद्ध असल्यामुळें त्यांनींही अनेक चैत्य व विहार खोदविले. नाशिकच्या पाण्डव लेण्यांतील गोतमीपुत्र विहार बौद्ध भिक्षूंसाठीं सातवाहनांनीं निर्माण केला आणि बौद्ध धर्मसंस्थांना अनेक देणग्या दिल्या यावरून हें विधान सिद्ध होतें. बांधीव स्तूपांमध्यें भूमिगत केलेलें धन हस्तगत करून घेण्यासाठीं शुंगांनीं अनेक स्तूप उध्वस्त केले अशी दंतकथा आहे. सातवाहनांबद्दल असा प्रवादही नाहीं.

वैदिक ऋषि गिरिकन्दरांत एकांतवासांत राहून तपश्चर्या करीत आणि कंदमूलांवर निर्वाह करीत. अशाच तपश्चर्येसाठीं सह्याद्रींत लेणीं खोदण्यात आलेलीं आहेत, असा समज प्रचलित आहे, तो बरोबर नाहीं. ते ऋषि आणि हे भिक्षु; यांत सर्व कांहीं आलें. त्यांचे अध्यापनाचे आश्रमही साधारणतः लोकवस्तीपासून दूर असत. उलटपक्षीं बहुतेक सर्व बौद्ध लेणीं हमरस्त्यालगत खोदलेलीं आहेत, संपन्न बंदरें व बाजारपेठा आणि राजधान्या यांच्या आसमंतात् मांडलेलीं आहेत. येथेंही अध्ययन व अध्यापन चालत असे हें निर्विवाद. पण मुख्यत्वेंकरून हीं लेणीं प्रचाराचीं, परिवर्तनाचीं व उत्सवांचीं केंद्रें होतीं.

दुसऱ्या शतकाच्या अखेरीच्या सुमारास अभीरांनीं सातवाहनांचा किंवा त्यांच्या प्रतिनिधींचा मोड करून महाराष्ट्राचें राज्य कमविलें. क्षत्रपांच्या सैन्यांत अभीरांचा मोठा भरणा होता. क्षत्रपांचा सेनापति अभीर होता. मुलूखगिरीसाठीं अभीर तापीच्या खोऱ्यांतून देशावर आले असावे आणि त्यांचा सातवाहनांबरोबरचा संग्राम नाशिकच्या परिसरांत झाला असावा. पांडवलेण्यांतील ईश्वरदत्ताच्या लेखाचा याला पुरावा आहे; शिवाय अजूनही अभीराच्या वस्तीचें केंद्र नाशिक-खानदेश भागांतच आहे. या आक्रमणापूर्वीही अभीर पोटापाण्याच्या निमित्तानें महाराष्ट्रांत विशेषतः कापूस पिकतो त्या प्रदेशांत घुसूं लागले होते आणि येथें गुंडगिरी करूं लागले होते, असें गाथासप्तशतींतील एका उल्लेखावरून दिसते.

खि पू. १६५ च्या सुमारास मध्य आशियात हूण व कुषाण या लढाऊ जमातींचा संघर्ष सुरू झाला. या युद्धात पराभूत झालेले कुषाण प्रथम पश्चिमेकडे वळले व नंतर हिंदुस्थानाकडे झुकले. कनिष्क ( १२० ते १६० ई. ) हा या वंशांतला महापुरुष. त्याच्या राज्याचा विस्तार पाटलीपुत्रापर्यंत होता. पुरुषपुर ऊर्फ पेशावर ही त्याची राजधानी. आयुष्याच्या उत्तर कालांत त्यानें बौद्ध धर्माचा स्वीकार केला. काश्मीरांत कनिष्कपुर येथें त्यानें बौद्ध संघांत माजलेले वाद मिटविण्यासाठीं धर्मगुरूंची महासभा भरविली. या सभेला आलेल्या प्रतिनिधींमध्यें हीनयान पंथाच्या सदस्यांचा मोठा भरणा होता, पण उत्तर हिंदुस्थानांत

या काळांत महायान पंथच विशेष जोरात होता. तिसऱ्या शतकाच्या प्रथम पादांत कुषाण साम्राज्य नष्ट झालें.

बॅक्ट्रियन्स, ग्रीक्स, शक, क्षहरात, कुषाण वगैरे आक्रमक जमातींच्या पुढाऱ्यांचें बौद्धांनीं परिवर्तन केलें आणि या जमातींनीं बौद्ध धर्माचें. महायान पंथ हें या संकराचें मूर्त स्वरूप.

महायान बौद्धांनीं ब्राह्मणी देवदेवतांचा स्वीकार केला; नांवें बदलून आणि मूलस्वरूपांतही; त्यांच्या पौराणिक कथांसह. त्यांनीं बुद्धाचीं अनेक ध्यानें कल्पिलीं, बोधिसत्त्वाचे अनेक अवतार कल्पिले, त्यांना मूर्त स्वरूपें दिलीं, ब्राह्मणी प्रदक्षिणापद्धतीचा स्वीकार केला. बुद्ध, धर्म व संघ या बौद्ध धर्माच्या वैशिष्ट्यांना मंजुश्री, अवलोकितेश्वर, पद्मपाणि व वज्रपाणि या नांवाखालीं मूर्त स्वरूपें प्राप्त झालीं आणि पुढें तर ब्रह्मा, विष्णु व महेश यांशीं त्यांचें सारूप्य कल्पिण्यांत आलें. बौद्ध एकीकडे ब्राम्हणी दैवतांचा स्वीकार व अनुकरण करीत होते तर दुसरीकडे त्यांच्याबद्दल धुमसणाऱ्या वैराला व तिरस्काराला मूर्त स्वरूप देत होते.

हीनयान बौद्ध साधारणतः स्वतःच्या आचारविचारांच्या शुचिते-विषयीं दक्ष असत; महायानकालांत ही दक्षता मागें पडली आणि दुसऱ्याच्या उद्धाराविषयींच्या कळकळीला अधिक महत्त्व मिळालें. निर्वाण म्हणजे षड्रिपूंवर विजय, ही मूळ कल्पना मागें पडून निर्वाणप्राप्ति म्हणजे स्वर्गसुखाची प्राप्ति आणि श्रद्धा हेंच निर्वाणप्राप्तीचें साधन या कल्पना रूढ झाल्या. मानवी जीवनातील सर्वसाधारण संकटां-पासून संरक्षण मिळविण्यासाठीं प्रार्थना करण्यांत येऊं लागली.

चवथ्या शतकाच्या प्रथमपादांत मगध देशांत गुप्तांचें राज्य स्थापन झालें. सम्राट् समुद्रगुप्तानें दक्षिणदिग्विजयानंतर अश्वमेध केला. चंद्रगुप्त विक्रमादित्यानें सौराष्ट्रांतील क्षत्रपांचें निर्मूलन केलें. पांचव्या शतकाच्या तृतीय पादांत मध्य आशियांतील हूणानीं हिंदुस्थानवर निकराचे हल्ले चढविले आणि गुप्त साम्राज्य धुळीला मिळविलें. गुप्तकालाचीं सवाशें वर्षें हें हिंदुस्थानचें सुवर्णयुग. या कालांत ब्राह्मणी धर्माची पुनर्घटना व संस्कृतीचें पुनरुज्जीवन झालें. गुप्तांनीं उत्तर हिंदुस्थानांत ब्राह्मणी देवदेवतांचीं अनेक उत्कृष्ट मंदिरें उभारलीं. मुसलमानांनीं तीं सर्व

उध्वस्त केलीं आहेत, तरी त्यांच्या अवशेषांवरून त्यांच्या भव्य सौंदर्याची कल्पना करतां येते.

सातवाहनानंतर महाराष्ट्रांत अभीर व त्रैकूटक यांनीं राज्यें केलीं. स्थल व काल या दोन्ही दृष्टींनीं त्यांच्या राज्यांचा विस्तार फार मर्यादित होता; अंतर्गत आणि युरोप व आशिया खण्डांतील राजकीय अस्वास्थ्या-मुळें पश्चिम किनाऱ्यावरील व्यापार मंदावला होता; शिवाय हीनयान पंथ आतां मागें पडूं लागला होता; यामुळें या घराण्यांच्या अमदानींत लेण्यांची निर्मिति झाली नाहीं. देशांत शांतता व सुबत्ता नांदत असतात, राज्यकर्ते समर्थ व संपन्न असतात आणि धर्मनिष्ठा दृढ असते अशाच काळांत मोठमोठीं शिल्पकृत्यें संभवतात.

यानंतर महाराष्ट्रांत अश्मक व वाकाटक या घराण्यांचीं राज्यें झालीं. अश्मकांबद्दल फारशी माहिती मिळत नाहीं. अजंठ्यास अश्मकांच्या अमात्याचें एक लेणें आहे. वाकाटकांचा इतिहास अलीकडेच उपलब्ध होऊं लागला आहे. वाकाटक हे विष्णुवृद्ध गोत्री ब्राह्मण. वऱ्हाड-मध्य-प्रांत हा त्यांच्या राज्याचा मूलप्रदेश. विन्ध्यशक्ति वाकाटकानें २५५ सालीं स्वतंत्र राज्य स्थापन केलें. चंद्रगुप्त विक्रमादित्याची कन्या प्रभा-वती गुप्ता ही दुसऱ्या रुद्रसेन वाकाटकाची राणी. या संबंधामुळें वाका-टकांचे सामर्थ्य वृद्धिंगत झालें. या वंशांतला अखेरचा राजा हरिषेण (४७५ ते ५१० ई.) याच्या कारकीर्दींत अजंटा येथील क्र. १९ हा चैत्य आणि क्र. १६ व १७ हे विहार खोदण्यांत आले आहेत. हीं लेणीं महायान पंथीय असून त्यांवरील शिल्पांत गुप्त-वाकाटक कालांतील कलेचा परमोच्च बिंदु साधलेला आहे.

राज्यकर्त्यांच्या प्रोत्साहनानें निर्माण होणारीं महान् शिल्पकृत्यें त्यांच्या मूलस्थानाच्या किंवा राजधानीच्या आसपास मांडलेलीं असतात. सातवाहनांचीं लेणीं आन्ध्र नदीचें खोरें व नाशिक यांच्या परिसरांत आहेत. त्याचप्रमाणें वाकाटकांच्या अमदानींतलीं लेणीं इन्ध्याद्रि श्रेणीच्या आसमंतात् आहेत. विन्ध्यशक्ति हा वाकाटकांचा मूलपुरुष. त्या काळीं इन्ध्याद्रीलाच विन्ध्याद्रि असें नांव होतें, असें मला वाटतें.

गाथासप्तशतींतील विन्ध्य पर्वताबद्दलच्या उल्लेखांवरून हाच निष्कर्ष निघतो. वाकाटकांच्या अमदानींत महाराष्ट्राची राजधानी विदर्भांत गेली आणि विदर्भाला नजीक म्हणून या कालांतील शिल्पकार्य इन्ध्याद्रींत केंद्रित झालें.

सहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास सत्याश्रय पुलकेशिन् चालुक्यानें बदामी येथें राज्य स्थापन केलें. त्याचा दिग्विजयी पुत्र पूर्ण-पराक्रम कीर्तिवर्मन् यानें मौर्य व कदंब यांचा पराभव करून अनुक्रमें उत्तर व दक्षिण कोंकण काबीज केलें. त्याचा शके ५००=ई. ५७८ चा कीर्तिलेख बदामीच्या क्र. ४ या लेण्यांत कोरलेला आहे. बदामी येथें चार लेणीं आहेत; तीन ब्राह्मणी व एक जैन; ब्राह्मणी लेणीं सहाव्या शतकाच्या द्वितीयार्धांतलीं व जैन लेणें सातव्या शतकाच्या द्वितीय पादांतलें. कीर्तिवर्म्याचा भाऊ रणविक्रांत मंगलेश यानें कलचुरींचा पराभव करून सह्याद्रि पठाराचा उत्तर भाग काबीज केला. त्याच्या पश्चात् कीर्तिवर्म्याचा पुत्र सत्याश्रय श्रीपृथ्वीवल्लभ पुलकेशिन् हा राज्यपदारूढ झाला. उत्तर हिंदुस्थान पादाक्रांत केल्यानंतर दक्षिणदिग्विजयासाठीं हर्षानें नर्मदा ओलांडली. तेव्हां पुलकेशी त्याला आडवा आला आणि त्याचा पराभव करून (६३७ ई.) त्याला नर्मदापार पिटाळून लावलें. याच्याच कारकीर्दींत युआनच्वंग या चिनी प्रवाशानें हिंदुस्थानांतील बौद्ध तीर्थक्षेत्रांची यात्रा केली. पुलकेशीची कीर्ति परदेशींहि पोहोंचली होती. इराणचा राजा दुसरा खोश्रोझ् यानें ६२५ चे सुमारास पुलकेशीकडे दरबारी इतमामासह शिष्टमंडळ पाठविलें होतें. या वकिलांनीं पुलकेशीची गांठ घेतली. तो प्रसंग अजंट्याच्या क्र. १ या लेण्यांत चित्रित केलेला आहे. या इतिहासावरून स्पष्ट दिसतें कीं ब्राह्मणी लेणीं खोदण्याची प्रथा चालुक्यांच्या कारकीर्दींत, सहाव्या शतकाच्या अंतिम पादांत सुरू झाली; आणि सातव्या शतकाच्या प्रथमार्धांत अजंटा येथें बौद्ध लेणीं खोदण्याचें व अलंकृत करण्याचें कार्य चालू होतें.

भव्य व सुंदर मंदिरें हें चालुक्यांच्या संस्कृतीचें वैशिष्ट्य. प्रस्तुत विषयाशीं संबद्ध अशा एकाच मंदिराचा येथें उल्लेख करतों. दुसरा विक्रमादित्य ( ७३३ ते ७४६ ई. ) याची राज्ञी लोकमहादेवी हिनें बदामीनजीक

पट्टदकल येथें विरूपाक्ष नांवाचें शिवमंदिर बांधविलें. वेरूळचें कैलास लेणे या बांधीव मंदिराच्या धर्तीवर खोदलेलें आहे.

सातवाहनांच्या पाण्डव लेण्यांतील शिलालेखांत पल्लवांच्या पराभवाचा उल्लेख आहे. सातवाहनांशीं नात्याचा संबंध आल्यामुळें पुढें पल्लव प्रबल झाले. पल्लवांचे चालुक्यांशीं अनेक संघर्ष झाले. पहिला नरसिंहवर्मन् पल्लव याच्या कारकीर्दीत (६३० ते ६७० ई.) मद्रासच्या दक्षिणेस महाबलीपुरम् येथें अखंड खडकांतून मंदिरें खोदण्यांत आलीं. त्यांना रथ म्हणतात. दक्षिणेंतील मान्दिरें व गोपुरें यांचा घाट या रथाच्या नमुन्यावरूनच उत्क्रांत झालेला आहे. वेरूळ येथील कैलासच्या निर्मात्यांनीं याच नमुन्याचें अनुकरण केलेलें आहे.

हर्षवर्धन हा अखेरचा बौद्ध सम्राट. ६४१ सालीं त्यानें काश्मीरवर स्वारी करून तेथून बुद्धाचा दांत समारंभपूर्वक स्वदेशीं आणला. ६४३ सालीं त्यानें कनोज येथे सर्वधर्मपारिषद भरविली. ६४७ सालीं त्याचा खून झाला. अशोकानंतरच्या इतिहासाची पुनरावृत्ति झाली. उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र अंदाधुंदी माजली.

यापूर्वींच हिंदुस्थानवर मुसलमानांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या होत्या. ६३७ सालीं अरबी आरमारानें सिंधेंतील देऊळ बंदर काबीज केलें आणि तेथें पहिली मुसलमानी वसाहत स्थापन केली. ६६४ मध्यें अबदुर् रहमानच्या सेनापतीनें मुलतान काबीज केलें. ७११ सालीं मुहम्मद बिन कासीमनें दाहीरचा पराभव करून सिंध प्रदेश काबीज केला. याबाबत आचार्य भगवतीप्रसाद पान्थरी सांगतात, “ वहाँके स्वार्थी व्यापारिओं और ब्राह्मणद्वेषी बौद्धोंनेभी खुली आम मुसलमानोंकी सहायता की थी... सिंधकी एकभी लडाई ऐसी न मिलेगी जिसमें बौद्धोंने देशद्रोह करके आक्रमणकारियोंका साथ न दिया हो. ” (सरस्वती, भाग ४७, संख्या ३, पृ. २११.) अशा प्रकारचें वर्तन अनेक प्रसंगीं घडत गेल्यामुळें व त्याचे परिणाम जनतेला भोगावे लागल्यामुळें बौद्धांविषयींचा आदर नष्ट झाला व बौद्ध धर्माला उतरती कळा येऊं लागली.

दक्षिणेंत चालुक्य व पल्लव या घराण्यांनीं ब्राह्मणी देवदेवतांचीं अनेक मंदिरें उभारलीं. यामुळें जनतेच्या धर्मश्रद्धेचें परिवर्तन झालें. ब्राह्मणी धर्म सांवरला, बौद्ध धर्म मागासला व शंकराचार्यांच्या आसेतुहिमाचल, तुफानी पण विद्वत्तापूर्ण प्रचारामुळें नष्ट झाला.

राष्ट्रकूट हे चालुक्यांचे सामन्त. चालुक्य सिंहासनासाठीं मंगलेश व पुलकेशि यांची सशस्त्र स्पर्धा सुरू झाली. या संधीचा फायदा घेऊन पहिला गोविंदराज राष्ट्रकूट हा जवळजवळ स्वतंत्रपणें राज्य करूं लागला. गोविंदराजाचा नातू इंद्रराज याचा चालुक्य कुलांतील राजकन्येशीं विवाह झाल्यामुळें राष्ट्रकूटांच्या सत्तासंवर्धनाला चालुक्यांनीं विरोध केला नाहीं. पहिला कृष्णराज शुभतुंग हा इंद्रराजाचा धाकटा भाऊ. कृष्णराजानें ७५३ व ७७५ या सालांच्या दरम्यानच्या कालावधींत राज्य केलें. वेरूळचें कैलास मंदिर यानेंच खोदविलें.

पूर्व चालुक्यांच्या कारकीर्दींत जैन धर्म महाराष्ट्रांत प्रविष्ट झाला व राष्ट्रकूटांच्या अमदानींत सरकारी अधिकाऱ्यांच्या व संपन्न व्यापाऱ्यांच्या आश्रयामुळें विशेष अभिवृद्धि पावला. जैन लेणीं या काळांतच निर्माण झालेलीं आहेत.

मंदिरें उभारण्याची प्रथा महाराष्ट्रांत पूर्व चालुक्यांनीं सुरू केली. हल्लीं अस्तित्वांत आहेत तीं मंदिरें उत्तरकालीन चालुक्यांनीं किंवा देवगिरीच्या यादवांनीं उभारलेलीं आहेत. चालुक्य, राष्ट्रकूट व यादव यांचीं राज्यें मुख्यत्वेंकरून मैदानी होतीं. मंदिरें कोठेंही उभारतां येतात. त्यांसाठीं लेण्यांइतका पैसा खर्च होत नाहीं व तेवढा काळही लागत नाहीं. म्हणून उत्तर चालुक्यांच्या काळांत लेणीं खोदण्याची प्रथा नष्ट झाली आणि धर्मकेंद्रें सह्याद्रींतून ढळून मैदानांत आलीं.

| क्रमांक | स्थान | लेण्यांची संख्या | सर्वांत मोठ्या लेण्याचीं मापें: रुंदी, खोली, उंची | काळ | शिल्पवैशिष्ट्य |
|---|---|---|---|---|---|
| १ | अजंटा | ३० | १००′×४१′×३६′ | ख्रि. पू. २ रें ते सातवें शतक. | हीनयान व महायान. सचित्र. |
| २ | अंकाई-टंकाई | १० | ३१′×४८′ | १० वें ते ११ वें शतक. | त्रिमूर्ति ; इंद्र, इंद्राणी. |
| ३ | आम्बिवली | १ | ४२′×३९′×१०′ | | बौद्ध लेण्यांत विठोबा रखुमाईची स्थापना. |
| ४ | औरंगाबाद | १२ | | ७ वें शतकअखेर. | बहुसंख्य मूर्ति स्त्रियांच्या. |
| ५ | कऱ्हाड | ६३ | | | ब्राह्मणी लेण्यांत राम, लक्ष्मण, सीता. बौद्ध लेणीं साधीं व प्राचीन. |
| ६ | करसंबळें | ६ | | | |
| ७ | करंज | २ | २५′×२४′×१०′ | २ रें व ३ रें शतक. | |
| ८ | कान्हेरी | ११२ | ८६½′×४०′×३८′ | ख्रि. पू. पहिल्या शतकापासून नवव्या शतकापर्यंत. | अकरा मुखी अवलोकितेश्वर, हिंदुस्थानांत अद्वितीय. |
| ९ | कार्ले | ७ | १२४′×४५½′×४५′ | १ लें शतक. | सिंहस्तंभ. सातकर्णी स्तंभशीर्षांवर मूर्ति, मूळच्या लांकडी कड्या व छत्र. जवनिकेवर उत्तरकालीन बौद्ध मूर्ति. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १० | कुडा | २६ | | खि. पू. १ लें आणि ५ वें व ६ वें शतक. | ध्यानी बुद्ध. स्तूपावरील छत्र छताला जोडलेलें. अवलोकितेश्वर. सचित्र. |
| ११ | कुंडल | ४२ | | | |
| १२ | कोंडाणें | ४ | ६६'×२६ ३/४'×२८ १/२' | खि. पू. २ रें शतक. | महाराष्ट्रांतील सर्वांत प्राचीन लेणें व मूर्ति. |
| १३ | कोंडिवटें | १९ | | ४ थें व ६ वें शतक. | अवलोकितेश्वर. सुदाम लेण्याच्या धर्तीचें खोदकाम. |
| १४ | गोमाशी | ३ | | | |
| १५ | घटोत्कच | ३ | | | शाक्यमुनि, धर्मचक्र. उत्कृष्ट नक्षीचे सोळा कोनी खांब |
| १६ | घारापुरी | ६ | १३०'×१३०'×१५' | ३ रें तें १० वें शतक. | त्रिमूर्ति. तांडव. भैरव. शिवपार्वतीविवाह. गंगावतरण. अर्धनारीश्वर. कैलास. द्वारपाल. गंधर्व. अप्सरा. |
| १७ | चिपळूण | ३ | | | |
| १८ | चौल | ४ | | | बौद्ध लेण्यांत देवीची स्थापना. |
| १९ | जुन्नर | १४० | ५७'×५१'×११' | खि. पू. १ ते ३ रें शतक. | बौद्ध लेण्यांत जैन व ब्राह्मणी देवदेवतांची स्थापना. |
| २० | जोगेश्वरी | | ३२०'×२०००' | ७ वें किंवा ८ वें शतक. | कैलास. तांडव. शिवपार्वती-विवाह. द्वारपाल. दगड पावसामुळें कुजलेला. |
| २१ | ढोके (नगर) | ४ | ४०'×५०' | | कालभैरव, गजलक्ष्मी, मातृका. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २२ | नाडसूर | १९ | | | चांधीव स्तूप गजलक्ष्मी ; पुरुष–हातीं वाडगा, स्त्री–हातीं झारी, उभयतां मत्स्यावर उभीं. |
| २३ | नाणेघाट | ६ | २८½'×२८½'×८' | ख्रि. पू. २ रें शतक. | सातवाहन–प्रतिमा. सह्याद्रींतील सर्वांत प्राचीन लेणें. |
| २४ | नाशिक | २७+३ | | ख्रि. पू. २ रें ते ५ वें शतक. जैन मध्ययुगीन. | बौद्ध लेण्यांत भैरव मूर्तीची स्थापना. |
| २५ | नेणवली | ४ | | | |
| २६ | पाटण ( खानदेश ) | ३ | २५½'×७½'×८½' | | |
| २७ | पितळखोरें | ८ | ५०'×३४½'×३१' | ख्रि. पू. २ रें शतक. | असीरियन धर्तीचे स्तंभ, ईजिप्शियन स्फिन्क्स, हबशी धर्तीच्या कुरळया केसांच्या स्त्रिया व पुरुष. रंगीत. |
| २८ | पुणें | १ | | | पाताळेश्वर. अद्वितीय वर्तुलाकार सोळा खांबी नन्दिमान्दिर. |
| २९ | पुलु सोनाळें | ११ | ३८'×२३' | ७ वें शतक. | महिषासुरमर्दिनी ; योगध्यानविवर. |
| ३० | पोइनसर | ९ | | ६ वें शतक. | पद्मासन व ध्यानी बुद्ध, अवलोकितेश्वर, विश्वकर्मा धर्तीची कमान. |
| ३१ | बदामी | ४ | | ६ वें व ७ वें शतक. | कीर्तिवर्मा चालुक्याचा शके ५०० चा शिलालेख. |
| ३२ | बेडसें | ४ | ४५½'×२१'×२८' | ख्रि. पू. १ लें शतक. | पर्सिपोलिटन धर्तीचे स्तंभ. अद्वितीय विहार. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३३ | भाजें | १८ | ५९′ × २९′ × २७′ | खि. पू. २ रें शतक. | अद्वितीय सूर्यगुंफा व स्तूपसमूह. |
| ३४ | मामचंद्र महादेव | ४ | | | बुद्ध मूर्ति. छतांत छत्र. सालंकृत द्वार. |
| ३५ | मामेर | १३ | | | |
| ३६ | मंडपेश्वर | ३ | ५१′ × २१′ | ८ वें शतक. | महायोगी शिव, शिवतांडव, गरुडवाहन विष्णु, त्रिशीर्ष ब्रह्मदेव, गणपति. रोमन कॅथलिक चर्चमध्यें परिवर्तन. |
| ३७ | महाड | २८ | | | |
| ३८ | मागठाण | २८ | | | |
| ३९ | लोणाड ( ठाणें ) | ४ | ६०′ × ९′ × ९′ | ६ वें, ७ वें शतक. | अजंटा चित्रांच्या धर्तीचें शिल्प. राजा-भोंवतीं सेवक व सेविका. |
| ४० | लोहारी ( वांई ) | १३ | | | |
| ४१ | वेरूळ | ३४ | | ४ थें ते ९ वें शतक. | बौद्ध लेणीं पांचव्या शतकांतील, ब्राह्मणी सहाव्या, सातव्या व आठव्या शतकांतील आणि जैन नवव्या व दहाव्या शतकांतील. बौद्ध लेण्यांत महिषासुरमर्दिनीची स्थापना. |
| ४२ | शिरवळ | ७ | | | |
| ४३ | शेलारवाडी-गारोडी | ९ | २३′ × ९$\frac{3}{4}$′ × ८$\frac{3}{4}$′ | १ लें शतक. | स्तूपावरील छत्र छताला जोडलेलें. बौद्ध लेण्यांत लिंगस्थापना. |
| ४४ | हरिश्चंद्रगड | | २३$\frac{1}{2}$″ × ७$\frac{1}{2}$′ × ९′ | | |

## अपरान्त :

### प्रास्ताविक :

सह्याद्रीच्या पश्चिमेकडील प्रदेशाला प्राचीन काळीं अपरांत अशी संज्ञा होती. अपर म्हणजे पश्चिम; अपरांत म्हणजे देशाच्या पश्चिमेकडील अखेरचा प्रदेश. महाभारताच्या भीष्मपर्वांत अपरांताचा उल्लेख आलेला आहे. अपरांतांत अपरिमित पर्जन्य पडतो असें कौटिल्यानें अर्थशास्त्रांत सांगितलेलें आहे. अपरांताचा जुन्यांत जुना ऐतिहासिक उल्लेख अशोकाच्या शिलाशासनांत आढळतो. श्री. स्मिथ हे या संज्ञेचा अर्थ 'पश्चिम सरहद्द' असा देतात; श्री. सेनार्ट 'पश्चिमेकडील देश' आणि श्री. देवदत्त भांडारकर 'पश्चिम किनारा'. हिंदुस्थानच्या वेगवेगळ्या भागांत अशोकानें धर्मप्रचारक पाठविले होते. महाराष्ट्रांत महाधर्मरक्षित, अपरांतांत योन धर्मरक्षित व वनवासी प्रांतांत रक्षित थेर. ही परंपराकथा महावंशांत नमूद केलेली आहे. या तिघांच्या नांवांत संशयास्पद साम्य आहे. कोंकणांत त्या काळीं व्यापाराच्या निमित्तानें अनेक यवन स्थायिक झाले होते आणि त्यांची ये-जा मोठ्या प्रमाणावर चालू होती; म्हणून धर्मप्रचारासाठीं या भागाकरितां परिवर्तित यवनाची योजना करण्यांत आलेली असावी. मोगलिपुत्र तिस्स यानें अपरांतांत स्वतंत्रपणें धर्मप्रसाराचें कार्य केलें असें थूपवंशांत सांगितलेलें आहे. सामन्तपासादिकेंत सांगितलें आहे कीं अपरांतांत सदतीस हजार लोकांना बौद्ध धर्माची दीक्षा देण्यांत आली. अपरांत व भरुकच्छ (भडोच) येथील लोकांचा उल्लेख मिलिंदपन्हो या बौद्ध ग्रंथांत करण्यांत आलेला आहे. या उल्लेखांत सूचित केलेल्या विभागणीवरून वाटतें कीं अव्वल बौद्ध काळांत वनवासी व भडोच या भागांचा समावेश अपरांतांत करण्यांत येत नव्हता. यापुढेंही वनवासीच्या दक्षिणेकडील किनाऱ्यालगतच्या प्रदेशांत बौद्ध धर्माचा शिरकाव झालेला दिसत नाहीं. वसाहती विस्तृत झाल्या व संघटण वाढलें तसतशा अपरांताच्या मर्यादा विस्तृत झाल्या. कच्छ, काठेवाड, सौराष्ट्र, अबू, माही खोरें, भडोच व नाशिक यांचा समावेश पौराणिक अपरातात करण्यांत येत होता असें श्री. राय

चौधरी सांगतात. कालिदासाच्या अपरांतांत केरलचा समावेश केलेला आहे. रघूचा अपरान्तविजय त्रिकूट येथें पूर्ण झाला. जुन्नर, नाशिक व सोपारा यांबरोबर त्रिकूटाची ओळख पटविण्याचे प्रयत्न निरनिराळ्या संशोधकांनीं केलेले आहेत.

## कोंकण :

कोंकण हें अपरान्ताचें प्राकृत अभिधान. बृहत्संहिता, पद्मपुराण वगैरे ग्रंथांत कोंकणाचे उल्लेख आलेले आहेत. ब्रह्म, मत्स्य व वायु या पुराणांत असे उल्लेख आढळत नाहींत. यावरून वाटतें कीं ही संज्ञा देशी, स्थानिक असावी आणि उत्तरकालांत तिचें संस्कृतीकरण झालेलें असावें. पहिल्या शतकांत स्ट्राबोनें कोंकणाचा उल्लेख 'कोनियकोई' या नांवानें केलेला आहे. प्राचीन ग्रंथात कोंकण असें नांव न येतां कुंकण व कुंकुण असें येतें. अकराव्या शतकांतल्या खारेपाटणच्या ताम्रपटांत कोंकण व कुंकण हीं दोन्ही रूपें आलेलीं आहेत. सातव्या शतकांत रचण्यांत आलेल्या प्रपंचहृदयांत सात कोंकणें नमूद केलेलीं आहेत. कूपक, केरळ, मूषक, आलुक, पशु, कोंकण आणि परकोंकण. सह्याद्रिखण्डांतही सात कोंकणें दिलेलीं आहेत :

> **केरलाश्च तुलंगाश्च तथा सौराष्ट्र वासिनः ॥ ४७ ॥**
> **कोंकणाः करहाटाश्च करनाटाश्च बर्बराः ।**
> **इत्येते सप्त देशा वै कोंकणाः परिकीर्तिताः ॥ ४८ ॥**

(उत्तरार्ध. अध्याय ६)

डॉ. ईरावती कर्वे यांनीं या वचनाचा एक पाठभेद दिलेला आहे :

> **केरलाश्च तुलिंगाश्च तथा गौराष्ट्रवासिनः ।**
> **कोंकणाश्च कुडालाश्च वरालाटाश्च बर्बराः ॥**

डॉ. गुडेर्ट यांनीं मलयालम् कोशांत पुढील वचन उद्धृत केलेलें आहे :

> **कराटम् च विराटम् च माराटम् कोंकणम् तथा ।**
> **हव्यगम् तुळुवम् चैव केरलम् चेति सप्तकम् ॥**

'इषुपातरामक्षेत्रवर्णन' या अप्रकाशित हस्तलिखितांतील पुढील भाग

श्री. आचवल यानीं 'विश्वव्यापी वैदिक संस्कृति' च्या प्रस्तावनेंत दिलेला आहे. या उताऱ्यांतील उल्लेखांवरून हा ग्रंथ अर्वाचीन असावा असें स्पष्ट दिसतें :

**दक्षिणं बालखण्डं च तथा च करहाटकम् ।**
**ततोद्ग्वरहाटं च आर्यावर्तं तु मध्यमम् ॥**
**उत्तरं नागरं खण्डं दमनं तु ततः परं ।**
**सौम्यमुत्तरमेरुं च सप्तखण्डान्यनुक्रमात् ॥**

श्री. आचवल यांनीं या भागांची ओळख पटविलेली आहे ती अशी : बालखण्ड = बल्लाळखण्ड, भटकलभोंवतालचा प्रदेश; करहाटक = नांदिवड्यानजिक करहाटेश्वराचें स्थान आहे, त्याभोंवतींचा भाग; वरहाट = करहाटकाच्या दक्षिणेकडील प्रदेश; आर्यावर्त = शास्त्री व सावित्री या नद्यांच्या दरम्यानचा प्रदेश; नागरखण्ड = नगरहवेली; दमण = दमणगंगेचें खोरें ; सौम्यमुत्तरमेरू = सोमनाथ काठेवाड.

या याद्यांमध्यें दिशांचा अनुक्रम सांभाळलेला नाहीं. या याद्या शास्त्रोक्त असल्या तरी शास्त्रशुद्ध नाहींत. शिवाय त्यांतील संज्ञा इतक्या भ्रष्ट स्वरूपांत आपल्यापुढें आलेल्या आहेत कीं आतां त्यांची ओळख पटविणें अशक्यप्राय झालेलें आहे.

समुद्रकांठच्या प्रदेशांतील हीं सात खण्डें काठेवाडांतील सोमनाथ-पासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेलीं आहेत आणि सात कोंकणें लाट-पासून केरलपर्यंत. केरल म्हणजे मलबार. गोकर्णापासून कन्याकुमारी-पर्यंत केरलचा विस्तार असल्याचें परंपरेचें कथन आहे. कोइमतूर जिल्ह्याच्या सत्यमंगलम् तालुक्याभोंवतालच्या प्रदेशाला तुलुव देश अशी संज्ञा होती. तलु – तुलुव ही द्राविडी भाषा बोलणारे लोक कोचीन, त्रावणकोर संस्थानांत बहुसंख्य आहेत. हव्य, हाविग, हैग म्हणजे म्हैसूर-लगतचा कोंकणी प्रदेश. या भागांत हव्यग, हविक ब्राह्मणांची मोठी वस्ती आहे. कानडा व शिमोगा हे जिल्हे आणि कूर्ग प्रदेश या भागांत मोडतात. सह्याद्रिखण्डांतील करनाटाची ओळख याच भागाशीं पटविली पाहिजे. क्वचित् या भागाला गोराष्ट्र असेंहि म्हणण्यांत आलेलें आहे

गोपराष्ट्र व गोराष्ट्र या नांवांनीं गोमान्तकाचा भाग ओळखला जात असे. कांहीं याद्यांमध्यें कुडाळ प्रांताला स्वतंत्र स्थान दिलेलें आढळतें. यावरून या वचनाचा संबंध स्थानिक लेखकांशीं जोडतां येतो. प्रपंच-हृदयांत नमूद केलेलें परकोंकण = पलीकडचें कोंकण, म्हणजे अष्टागर, शूर्पारक व लाट. राष्ट्रकूट व शिलाहार यांच्या राजवटींत लाट प्रदेशाला वरालाट आणि अष्टागर व शूर्पारक मिळून होणाऱ्या प्रदेशाला कपर्दिका-द्वीप अशा संज्ञा होत्या. कपर्दिकाद्वीपाची शिलाहारांची राजधानी ठाणें येथें होती. उत्तरकालीन यादवांच्या काळांत या भागाला महिकावती हें नांव होतें आणि या भागाची राजधानी महिकावती, माहीम येथें होती. मध्ययुगांत कोंकणचे तीन विभाग कल्पिण्यांत आले होते. तापीच्या मुखापासून वसईपर्यंत बर्बर, तेथून बाणकोटपर्यंत विराट व येथून देवगडापर्यंत किरात. मला वाटतें, विराट व किरात या प्रदेशांच्या राजधान्या सह्याद्रीच्या पठारावर अनुक्रमें वांई व कऱ्हाड येथें होत्या. वांई ही विराटाची नगरी, अशी स्थानिक दंतकथा आहेच. सावित्री-पासून शास्त्रीपर्यंतच्या प्रदेशाला गुहागर-माहात्म्यांत आर्यावर्त ही संज्ञा दिलेली असून कोठें या भागाला महासप्तम असेंही म्हटलें आहे. या संज्ञा स्थानिक अभिनिवेशानें दिलेल्या आहेत, हें उघड आहे. वर दिलेल्या सर्व याद्यामध्यें कोंकण ही संज्ञा याच भागाला दिलेली आहे. या वर्गीकरणांची वार्ताही नसलेल्या दक्षिण कोंकणच्या रहिवाशांचा आग्रह असतो कीं कोंकण, कोंकण म्हणतात तें हेंच व एवढेंच; आणि तें खरेंही आहे, असें वरील याद्यांतील स्वतंत्र व स्पष्ट उल्लेखां-वरून दिसतें. उलटपक्षीं कोंकणी भाषा बोलणाऱ्या सारस्वतादिकांचा आग्रह असतो कीं खरें कोंकण म्हणजे कुडाळ, गोवें व वनवासी-भोंवतालचा प्रदेश; म्हणजे प्राचीन कदम्बांच्या राज्याचा प्रदेश. स्वतःला उघडपणें कोंकणी म्हणवून घेणारे लोक मात्र या दोन्ही प्रदेशांत रहात नाहींत. त्यांचें वसतिस्थान आहे डांगणांत. नवसारीच्या शरबती तलावाजवळ सरहद्दीचा खांब आहे. कोंकणाची उत्तर मर्यादा येथवर असल्याची ही निशाणी आहे, असें स्थानिक दंतकथा सांगते. डांगणांतले कोंकणे लोक इतके मागासलेले व दरिद्री आहेत कीं भोंवतालच्या

सुरत, खानदेश, नाशिक व नगर जिल्ह्यांत कोंकणी ही उपहासाची व तिरस्काराची संज्ञा होऊन बसलेली आहे. आणि पुणें व सातारा जिल्ह्यातही – पण येथें वेगळ्याच कारणांमुळें व निराळ्या प्रेरणेमुळें.

कोंकण या शब्दाची व्युत्पत्ति व अर्थ नीट लागत नाहींत. श्री. राजारामशास्त्री भागवत एकदां सांगतात (म. सं. चा. उ : पृ. ३) कीं कोंकण हा शब्द गोकर्ण याचा अपभ्रंश असावा. खुद्द गोकर्ण म्हणजे काय, याचा मात्र त्यांनीं खुलासा केलेला नाहीं किंवा एकावरून दुसरा कसा सिद्ध झाला हेंही त्यांनीं दाखविलेलें नाहीं. गोकर्णक्षेत्र हा कोंकणचा मध्यबिंदु आहे, कोंकणांतील क्षेत्रांमधील सर्वांत प्रसिद्ध असें स्थान आहे आणि येथूनच परशु फेंकून परशुरामानें कोंकण निर्माण केलें, अशी कथा आहे ; एवढाच या अनुमानाला आधार आहे. इतरत्र ते सांगतात ( वि. ज्ञा. वि. : वर्ष २२ पृ. २९ ) कीं चेर देशाच्या कांग किंवा कोङ्ग या प्राचीन नांवावरून कोंकण ही संज्ञा निर्माण झालेली असावी. स्वतंत्र भारताच्या घटनेंत कूर्ग प्रदेशाला कोङ्ग हेंच नांव देण्यांत आलेलें आहे. या भागाला पूर्वी कोंगनाड असें नांव होतें. या भागांत कोंग या वन्य जमातीची वस्ती होती. श्री. घाणेकर ( प्राचीन द्राविड : पृ. ९९ ) सांगतात कीं कदम्बांनीं हा प्रदेश जिंकल्यानंतर कोंग लोक किनाऱ्यालगतच्या प्रदेशांत पसरले आणि त्यांच्यामुळें या भागाला कोंकण हें नांव प्राप्त झालें. ह्या व्युत्पत्ति स्वीकारार्ह वाटत नाहींत ; कारण एका क्षुद्र वन्य जमातीच्या नांवावरून एवढ्या मोठ्या प्रदेशाला हें नांव मिळालेलें असणें असंभाव्य वाटतें. डॉ. कृष्णस्वामी अय्यंगार यांचा तर्क आहे कीं कोंकण हा शब्द कोळ्ळ ( लूट ) आणि कानम् ( जंगल ) या तामील शब्दांवरून सिद्ध झालेला असून त्यांचा अर्थ ' पाहिजेल त्यानें लुटावयाचा जंगली देश ' असा आहे. महामहोपाध्याय काणे यांचें अनुमान आहे कीं हा शब्द कोह् = डोंगर या पर्शियन शब्दावरून निघालेला असावा. पांचव्या शतकापूर्वी इकडे पर्शियन भाषेचा संपर्क नसल्यामुळें ही व्युत्पत्ति श्री. चिंतामणराव वैद्यांना मान्य नाहीं ; मात्र कोंकु- डोंगराळ जमीन, या शब्दावरून अन् प्रत्यय लागून कोंकण हा शब्द निघालेला असावा, हें कांहीं विद्वानांचें मत त्यांना संमत

आहे. (भा. इ. सं. मं. : त्रैमासिक, वर्ष १४ अं. २ ). कोह् हा शब्द आपल्याला सकृद्दर्शनीं वाटतो तितका परका नाहीं ; 'को' या मूल स्वरूपांत तो अनेक भाषांत आढळतो. उदाहरणार्थ : कोह्, कोय, कोयि या तेलगु शब्दांचा अर्थ डोंगरी इसम. कोट = उंच तट ; कोण = डोंगर-माथा ; कोयना = डोंगरावरून निघालेली नदी, वगैरे. महाराष्ट्र शब्द-कोशांत कोंग + कण ( कानडी. कुंगु = मावळणें किंवा कोंकु = वांक ) = मावळ दिशा, अशी व्युत्पत्ति दिलेली आहे. महाराष्ट्रावर एका काळीं कानडीचें प्रभुत्व होतें असें प्रतिपादन करणारांना रुचेल आणि अपरान्त या संस्कृत संज्ञेच्या अर्थाशीं व भौगोलिक वस्तुस्थितीशीं जुळेल अशी ही व्युत्पत्ति आहे. शिवाय दगडापेक्षां वीट मऊ, या न्यायानें द्राविडीपेक्षां कानडी बरी ! मराठी व्युत्पत्तिकोशांत " कोण कोण ( कोण = डोंगरमाथा ) ; कुंकुणा = परशरामाच्या मातोश्रीचें नांव, अशा आणखी दोन व्युत्पत्ति दिलेल्या आहेत. एक कोंकणाचें प्रादेशिक वैशिष्ट्य दाखविते आणि दुसरी कोंकणाची अधिदेवता. रेणुकेला कामली ( वायुपुराणः अ. ९१ : ८९-९१ ) व कुंकुणा हीं उपनांवें होतीं. विशेषतः डांगमधील लोक या कोंकणदेवीची आराधना करतात. नाशिकचे माझे मित्र श्री. नारायण देवदत्त टिळक कळवितात कीं हरसुळापासून सुमारें दोन कोसांवर नळदुर्गे नांवाचें गांव असून तेथें कोंकणदेवीचें जागृत स्थान आहे. दुसरी-कडे कोठें पहावयासही मिळणार नाहींत अशा जमदग्नि, परशुराम व रेणुका यांच्या असंस्कृत मूर्ति कोंकणदेव या नांवानें या भागांत पूजण्यांत येतात, जादूटोण्यासाठीं वापरण्यांत येतात. परशुराम व रेणुका यांच्या नांवानें पवित्र असलेलीं अनेक तीर्थें सबंध पश्चिम किनाऱ्यावर आढळतात. यामुळें हीच व्युत्पत्ति मला विशेष स्वीकारार्ह वाटते. परशुरामाचें कुल भृगु. भृगुकच्छ हें भृगूंचें मुख्य स्थान. माहिष्मती हें परशुरामाचें संग्रामक्षेत्र. भडोचपासून कन्याकुमारीपर्यंतच्या प्रदेशाला परशुरामक्षेत्र म्हणतात. परशुरामाच्या कर्तृत्वाशीं विशेष संबद्ध अशीं मुख्य ठाणीं चार : वज्रेश्वरी, शूर्पारक, चिपळूण व गोवें. कोंकणदेवीला जे माता मानतात ते कोंकणे आणि हे ज्या भागांत राहतात त्या प्रदेशाचें

नांव कोंकण. पण कुङ्कण या संज्ञेचा अर्थ राहिलाच. रेणुकेची उत्पत्ति पद्मापासून झाली असें भारतांत सांगितलेलें आहे. पद्म म्हणजे आरक्त कमल आणि कुङ्कण या देशी शब्दाचा अर्थही आरक्त कमल. हा अर्थ कदाचित् व्युत्पत्ति शास्त्राला पटणार नाहीं, पण कल्पनेला रुचेल ; अगदींच निरर्थक नाहीं, कारण अर्थ जुळतो. या भागातील जंगली रहिवाशांना, ज्यांनीं परशुरामाच्या नेतृत्वाखालीं उन्मत्त क्षत्रियांचा निःपात केला, त्यांना ही इक्ष्वाकु कुलोत्पन्न राजकन्या लालबुंद कमलासारखी दिसली असेल ! शिवाय रक्तकमलें विशेषेंकरून कोणत्या प्रदेशांत फुलत असलीं तर तीं कोंकणातच !

सह्याद्रीच्या कुशींत सात कोंकणें आहेत तशींच महाराष्ट्राचींही सात कोंकणें आहेत : लाट, डांग, शूर्पारक, अष्टागर, कोंकण, गोमन्तक व वनवासी. हिंदुस्थानची पुनर्घटना होईल तेव्हा यांपैकीं लाट प्रदेशाचा बराचसा भाग गुजरातच्या वांटयाला जाईल आणि वनवासीचा कर्नाटकाच्या.

## लाट :

नर्मदेपासून दमणगंगेपर्यंतच्या प्रदेशाला लाट अशी संज्ञा होती. या मर्यादा नेहमींच काटेकोरपणें पाळल्या जात नसत. खुद्द टॉलेमीनें माही खोऱ्याचा समावेश लाट प्रदेशांत केलेला आहे. वात्स्यायनानें काम-सूत्रांत देशोदेशींचीं संभोगलक्षणें सांगतांना लाट प्रदेशाचा उल्लेख केलेला आहे. मध्ययुगांत या भागाला कोंकण हेंच नांव होतें असें राष्ट्रकूट अकालवर्ष कृष्णराजाच्या ताम्रपटांतील उल्लेखावरून स्पष्ट दिसून येतें. उत्तर गुजरातेंतील लोक या भागांतील रहिवाशांना हल्लींही कोंकणी असेंच म्हणतात. या भागाला लाट हें नांव का पडलें याचा मात्र खुलासा होत नाहीं. या भागांत अशोकानें एखादी लाट तर उभारलेली नसेल ? खंबायतजवळ स्तंभतीर्थ नांवाचें शिवक्षेत्र आहे. त्यावरून तर हें नांव पडलें नसेल ? कीं सुमेरियन भाषेंतील लाट –लार = मनोहर या शब्दाशीं या संज्ञेचा संबंध जोडावा ?

सौराष्ट्रांतील तापी खोरें आणि अपरान्तांतील लाट प्रदेश हें

ऐतिहासिक व भौगोलिक दृष्ट्या महाराष्ट्राचें दौर्बल्य आहे. स्वतःचें राजकीय स्वातंत्र्य टिकविण्यासाठीं लाट प्रांत ताब्यांत ठेवणें महाराष्ट्राला भाग होतें. अपरान्तांत परदेशीयांचें प्रस्थ पूर्वीपासून आहे. त्यावर नियंत्रण ठेवणें महाराष्ट्राला भाग होतें. या बाबतींत कुचराई झाली तेव्हां तेव्हां महाराष्ट्राचें अस्तित्व धोक्यांत आलेलें आहे.

अशोकाच्या अमदानींत सौराष्ट्रांत यवनराज तुशास्फ याची सत्ता होती. याच्या नांवावरून व पदवीवरून दिसतें कीं तो परदेशी, इराणी होता व सत्ताधारी होता. अशोकानें त्याच्या सत्तेला मान्यता दिली असेल किंवा त्यानें अशोकाच्या आधिराज्याला. अशोकानें अपरान्तासाठीं धर्म-प्रसारार्थ यवन थेराची नेमणूक केली होती. ख्रि. पू. दुसऱ्या शतकांत सौराष्ट्रांत ग्रीकांचें राज्य होतें. त्यांचीं नाणीं अद्याप तेथें आढळतात. ग्रीक आक्रमकांचा नेता मीनँडर यानें बौद्ध धर्माचा स्वीकार केला होता. हा स्वीकार त्यानें राजकीय हेतूनें केलेला असणें संभवनीय आहे. तें कसेंही असो, त्यामुळें धर्मभोळ्या एतद्देशीयांचा संभाव्य विरोध दुबळा झाला, एवढें तरी निश्चित. ग्रीकांची एक टोळी अंतर्वेदींतून पाटलिपुत्राकडे घुसली आणि दुसरी राजस्तानांतून सौराष्ट्राकडे. घोडदळांच्या चपळ हालचाली करून या प्रचण्ड चिमट्यांतले हिंदुस्थानचें बडें मैदान त्यांनीं काबीज केलें. पतंजलीच्या प्रेरणेनुसार शुंग-सातवाहनांनीं विरोधी आघाडी उभारून त्यांच्या साहसी योजना हाणून पाडल्या. याच सुमारास जैन सम्राट् कलिंगाधिपति खारवेल यानेंही उठावणी करून उत्तरेस मगधावर व पश्चिमेस सातवाहनांवर हल्ले चढविले. सातकर्णीनें त्याचाही मोड केला. मीनँडर व खारवेल यांच्या स्वाऱ्या धर्म-राज्य-स्थापनेसाठीं सहकार्याच्या योजनेनुसार झालेल्या असणें संभवनीय आहे. मीनँडरचें मुख्य ठाणें भडोच येथें होतें. पुढें ख्रि. पू. पहिल्या शतकांत आपल्या बहिणीची सुटका करण्याच्या निमित्तानें कालकाचार्यानें शकांना सिंधेतून आमंत्रून आणलें. सौराष्ट्रांतील स्थानिक राज्यकर्त्यांच्या मदतीनें शकांनीं गर्दभिल्लांचा पाडाव केला आणि उज्जयिनी काबीज केली. सरस्वतीची सुटका झाली आणि कालकाचार्यांची प्रतिज्ञा पुरी झाली. पण शक परत जाईनात; ते येथेंच स्थायिक झाले, मातले व अत्याचार

करूं लागले. तेव्हा खुद्द कालकाचार्याला धार्मिक निमित्त काढून महाराष्ट्रांत यावें लागलें आणि सातवाहनांचा आश्रय घ्यावा लागला. शकांच्या जुलमानें त्रस्त झालेल्या मालवांनीं उठावणी केली. दुसऱ्या सातकर्णीच्या मदतीनें त्यांनीं शकांचा पराभव केला. सौराष्ट्रांत स्थायिक झालेले शक तेथून मात्र ढळले नाहींत. धर्मक्षेत्रांच्या यात्रांच्या व व्यापाराच्या निमित्तानें शक क्षत्रप महाराष्ट्रांत हळूहळू शिरले, स्थायिक झाले आणि नंतर त्यांच्या टोळया लाट प्रदेशांतून नाशिककडे आणि शूर्पारकांतून व अष्टागरांतून जुन्नरकडे व कार्ल्याकडे लोटल्या असाव्यात. नाशिकच्या लेण्यांतील उषवदाताच्या लेखावरून शकांचें उत्तर महाराष्ट्र आणि लाट व शूर्पारक या प्रदेशांवरील प्रभुत्व सिद्ध होतें. नहपानाचें मुख्य ठाणें भडोच येथेंच होतें. अखेरीस गोतमीपुत्र सातकर्णीनें शक क्षत्रपांचा उच्छेद केला. गोतमीपुत्र सातकर्णी हाच शककर्ता शालिवाहन असें माझें म्हणणें आहे.

उत्तर हिंदुस्थानांतून वारंवार येणाऱ्या परचक्रांची कटकट कायमची मिटविण्यासाठीं गोतमीपुत्रानें सौराष्ट्र व अवन्तीवर कबजा केला. गोतमीपुत्र सातकर्णी आणि वासिष्ठीपुत्र पुळुमावि यांच्या कारकीर्दींत भडोच सातवाहनांच्या ताब्यांत होतें. भडोचवरील सातवाहनांचें आधिपत्य सूचित करणारी एक दंतकथा आहे : शालिवाहन राजाला संस्कृत भाषा अवगत नव्हती आणि त्याची राणी संस्कृतज्ञ होती ; असंस्कृत म्हणून अडाणी राजाची जलक्रीडेचे वेळीं फजीती झाली ; राणी हंसली व तिच्या सख्याही, कारण त्याही संस्कृतज्ञ होत्या ; शर्ववर्म्यानें राजाला कातन्त्र व्याकरण शिकवून व्युत्पन्न केलें ; याचें बक्षीस म्हणून राजानें त्याला भडोचची सुभेदारी दिली, अशी ही कथा आहे. सातवाहनांचे शिलालेख प्राकृतांत आहेत आणि हाल सातवाहनानें संपादिलेली गाथासप्तशतीही. सातवाहन हे प्राकृताचे पुरस्कर्ते होते आणि त्यांच्या अंतःपुरांत प्राकृत भाषेचा वापर होत असे, असें मध्ययुगीन पण्डितांनीं, थोड्या कौतुकानें व थोड्या उपहासबुद्धीनें, नमूद करून ठेवलेलें आहे. प्राकृत ही बहुजनसमाजाची भाषा ; म्हणून सम्राटांनीं

प्राकृताचा पुरस्कार केला, याबद्दल कौतुक. या बंधनापासून मुक्त असलेल्या अंतर्गृहांतील प्रौढ वातावरणांतही त्यांनीं प्राकृताचा वापर करावा, याबद्दल उपहास सूचित केलेला आहे! वर नमूद केलेल्या दंतकथेंतील अडाणी शालिवाहन कोणता हें निश्चित सांगतां येणार नाहीं, अनुमान मात्र करतां येईल आणि तेंही त्रुटित. सौराष्ट्रांतील क्षत्रपांचे शिलालेख संस्कृतांत लिहिलेले आहेत. त्यावरून ते संस्कृत भाषेचे पुरस्कर्ते होते असें दिसतें. यापैकीं कोणा रुद्रनामक क्षत्रपाची कन्या वासिष्ठीपुत्र श्री सातकर्णीची राणी होती. तिच्या अमात्याचा संस्कृत लेख कान्हेरीच्या लेण्यांत आहे. मला वाटतें, या लेखांतील राणी व वरील दंतकथेंतील राणी या एकच असाव्यात. लेखांतील क्षत्रपाचें रुद्र...हें नांव त्रुटित असल्यामुळें त्याची आणि इतर तपशिलाचे अभावीं वासिष्ठीपुत्राची ओळख निश्चितपणें पटविता येत नाहीं. असो. महाक्षत्रप रुद्रदामन् याच्या गिरनार लेखांत त्याच्या अपरांतविजयाचा उल्लेख आढळतो. आपला नजीकचा नातेवाईक दक्षिणापथपति सातकर्णी याचा आपण दोनदां पराभव केला असें त्यानें या लेखांत विधान केलेलें आहे. यावरून अनुमान करण्यांत आलें (श्री. बखले : Satavahanas & Contemporary Kshatrapas) आहे कीं कान्हेरी लेखांतील रुद्र तो हाच असावा आणि जयदामन् क्षत्रपाच्या अमदानींत यज्ञश्री सातकर्णीनें सौराष्ट्र जिंकलें त्या वेळीं उभय घराण्यांत शांतता नांदावी म्हणून हा विवाह साजरा करण्यात आलेला असावा. या वेळीं सातवाहनांनीं सौराष्ट्रही काबीज केलें होतें. पुढें अपरांतही त्यांच्या ताब्यांतून गेला आणि यामुळें लवकरच त्यांची महाराष्ट्रांतील सत्ताही नष्ट झाली.

पहिला विक्रमादित्य चालुक्य (६४० ते ६८०) यानें आपला कनिष्ठ बंधु जयसिंह धराश्रय याला लाट प्रांत तोडून दिला होता. त्याची राजधानी नवसारी येथें होती. नवसारीनजीक धारगढी या नांवाची वस्ती अद्याप आहेही. याच सुमारास हिंदुस्थानवर मुसलमानाचें परचक्र आलें. या आक्रमणाचें वातचक्र प्रथम सिंधमध्यें घुसलें. ६३७ सालीं अरबांनीं भडोच व ठाणें याभोंवतालच्या

प्रदेशांत लुटालूट केली होती. काठेवाड व गुजरातमधून लाट प्रांतांत पाऊल रोंवण्याच्या प्रयत्नांत असलेल्या अरबांचा पराभव (७३८) करून अवनिजनाश्रय पुलकेशी चालुक्यानें हें आक्रमण परत फिरविलें. खड्गावलोक दंतिदुर्ग राष्ट्रकूट यानें कीर्तिवर्मा चालुक्याचा पराभव (७४५) करून महाराजाधिराज परमेश्वर परमभट्टारक पृथ्वीवल्लभ हें बिरुद धारण केलें आणि उज्जयिनी काबीज करून तेथें हिरण्यगर्भ-महादानाचा समारंभ केला. या वेळीं गुर्जर राजाकडे द्वाररक्षकाचें काम दिलेलें होतें. नंतर दंतिदुर्गानें गुजरातचें आधिपत्य कर्कराज राष्ट्रकूटाकडे दिलें. लाटेश्वर कर्कराजाची राजधानी नवसारी येथें होती. नवसारी या नांवावरून व तेथील पारशांच्या वसाहतीवरून ही वस्ती आधुनिक असावी असा भास होतो, पण वस्तुस्थिति तशी नाहीं. टॉलेमीनें नवसारीचा उल्लेख नौसरीप असा केलेला आहे. मुसलमानांच्या छळाला कंटाळलेल्या पारशांची पहिली वसाहत ६४० सालीं संजाण येथें झाली. त्या वेळीं त्यांचा आश्रयदाता ‘जादव राणा’ या नांवाचा स्थानिक महाराष्ट्रीय अधिकारी होता, असा उल्लेख आढळतो.

सातवाहन-कालापासूनचा या प्रांताचा इतिहास पाहिला असतां दिसून येतें कीं महाराष्ट्रीय सम्राटांनीं व सामन्तांनीं हा भाग आपल्या ताब्यांत ठेवण्यासाठीं आटोकाट प्रयत्न केलेले आहेत; कारण गुजरातच्या मैदानांतून किनाऱ्याकिनाऱ्यानें सरळ गोमांतकापर्यंत चाल करून महाराष्ट्राशीं लगट करणें आक्रमकांना सुलभ होतें. लष्करी संरक्षणासाठीं व्यूह रचनेच्या दृष्टीनें स्वदेशाशीं सलग असलेल्या लाट प्रदेशाच्या मैदानांत विरोधाची पक्की फळी उभारणें महाराष्ट्रीयांना भाग होतें. यासाठींच त्यांनीं हा भाग आपल्या ताब्यांत ठेवण्यासाठीं एवढा आटापिटा केला. मुलूख जिंकण्याच्या किंवा साम्राज्यसंवर्धनाच्या स्वार्थी हेतूनें प्रेरित होऊन नव्हे, तर स्वराज्य आणि स्वातंत्र्य यांच्या संरक्षणासाठीं. खुद्द गुजरातेंत आक्रमकांना विरोध होण्याचा फारसा संभव नव्हता. कारण गुजरातची जनता प्रतिकारक्षम नव्हती व नाहीं. गुजरातचा इतिहास म्हणजे गुजरातला परक्या असणाऱ्या राज्यकर्त्यांचा इतिहास. राजकीय पेंचप्रसंग सोडविण्यासाठीं परक्यांना आवाहन, ही गुजरातची राजकीय परंपरा. कालका-

चार्यानें शकांना आणलें, त्याचा उच्छेद सातवाहनांनीं केला आणि सौराष्ट्रांतील क्षत्रपांचा उच्छेद गुप्तांनीं केला. इतक्या प्राचीन काळापर्यंत जाण्याची जरूर नाहीं. पहा : वलभीच्या तिसऱ्या शिलादित्याच्या कारकीर्दींत त्याची प्रजा असंतुष्ट झाली. लगेच प्रजेच्या पुढाऱ्यांनीं सिंधेंत स्थायिक होऊं पाहणाऱ्या अरबांना वलभीवर स्वारी करण्याची सुपारी दिली. या फितुरांचा पुढारी रंक नांवाचा वलभीचा एक नागरिक होता. त्याच्या प्रोत्साहनानें अम्रू बिन जमाल या अरब सरदारानें गुजरातवर स्वारी केली. एका काळरात्रीच्या अंधारांत त्यानें वलभीवर हल्ला चढविला. माहितगारांच्या मदतीनें त्यानें शहर काबीज केलें व फितुरांच्या न्स्थावणीवरून राजाला ठार केलें. नंतर त्यानें शहराला आग लावली आणि फितुरांत सामील असलेल्या हरामांसह सर्व नागरिकांची कत्तल केली ! कर्णदेव वाघेला यानें मंत्र्याच्या पद्मिनी पत्नीशीं व्यभिचार केला. लगेच मंत्रीमहाशय दिल्लीला गेले व सुलतानाला घेऊन आले ; स्वराज्य बुडालें व राणीची रखेली झाली ; तेव्हां कोठें मंत्रीजींचा जीव राजी झाला !

अशा हकीकती किती सांगाव्या ?

विषय ताजा आहे, तोंवर विषयांतराचा आरोप स्वीकारून आणखी एक हकीकत सांगतों. यासाठीं सह्याद्रीच्या कक्षेबाहेर पाऊल टाकावें लागणार आहे. समर्थन एवढेंच, कीं येथेंही पहिलें पाऊल सह्याद्रीच्याच एका गडावरून टाकलेलें आहे. ही घटना कादंबरीसारखी अद्भुत आहे; पण ती एक सत्य कथा आहे आणि ती महाराष्ट्राला भूषणावह आहे. महाराष्ट्रांत स्वराज्याची पुनर्घटना झाल्यानंतर मुसलमानी सत्ता उखडून काढण्यासाठीं मराठयांच्या टोळया सर्वत्र संचार करूं लागल्या होत्या, त्या काळांतली ही हकीगत आहे. इतिहासाच्या अधिकृत ग्रंथांत ही घटना सांगण्यांत येत नाहीं आणि यापुढें केव्हांही सांगण्यात येणार नाहीं असा हा वृत्तांत आहे.

पादरा येथील दाला देसाई नांवाच्या एका अल्पदार शेतकऱ्याची तरुण रूपवती कन्या बडोद्यांत बाजारहाट करीत होती. बडोद्याचा मंत्री इमाम मेहदी याच्या कुटण्यांनीं तिला हेरली. त्यांच्याकडून तिच्या

सौंदर्याची प्रशंसा ऐकून खुष झालेल्या इमामसाहेबांनीं तिला आणण्या-साठीं पालखी पाठविली. असे प्रकार नेहमींचेच होते. या प्रकाराची कुणकुण लागतांच मोठ्या चतुराईनें राजदूतांच्या हातावर तुरी देऊन ती आडवाटेनें आपल्या बापाच्या गांवाकडे पळाली. यामुळें राजदूतांना पालखी रिकामीच परत न्यावी लागली. हा प्रकार त्यांना नवा होता. वीरसदचा वाघजी पटेल हा तिचा सासरा. याच सुमारास वसईचा दाजी पटेल याची कन्या अंबाजीच्या देवळांत दर्शनासाठीं गेली असतां तेथून तिला सुजात-खानाच्या दूतांनीं पळविली, वाड्यांत नेली व खानसाहेबांनीं तिला भ्रष्ट केली. बडोद्याचा सुरेश्वर देसाई हा या तिघा पाटलांचा स्नेही व हित-चिंतक. या चौघांनीं पिलाजी गायकवाडाची भेट घेण्याचें ठरविलें. या वेळीं त्याचें ठाणें सोनगडावर होतें. येथें झडणाऱ्या मराठ्यांच्या नौबतीचे पडसाद गुजरातेंत घुमूं लागले होते. सोनगडाजवळ उन्हाई देवीचें ठाणें आहे. या देवीच्या दर्शनाचें निमित्त करून हे पाटील सोनगडास आले. त्या वेळीं गुजरातेंत मुसलमानांचा दरारा एवढा होता कीं नबाबी मुलखाबाहेर जाऊं इच्छिणारास सबब सांगावी लागत असे. पाटलांनीं पिलाजीची भेट घेऊन त्याला सर्व हकीगत सांगितली आणि त्याच्या मदतीची याचना केली. पिलाजीनें लगेच चढाईची योजना आंखली. बाबा पीराच्या रस्त्यानें नर्मदा ओलांडून पिलाजी गुजरातेंत घुसला. त्यानें तेथील नबाबांची सत्ता नष्ट केली व गुजरातला निर्भय केलें.

पिलाजीच्या वंशजांनीं प्रजेला सुखी केलें, सुसंस्कृत केलें; पण गायकवाडांनीं गुजरातेंत स्थायिक होण्याचें व तेथें लोकप्रिय होण्याचें राजकीय अपकृत्य केल्यामुळें महाराष्ट्राच्या मर्दुमकीचें व कर्तृत्वाचें हें प्रतीक नवनिर्मित महागुजरातच्या कुशींत सलूं लागलें आणि असें भासविण्यांत येऊं लागलें कीं सातवाहनांपासून गायकवाडांपर्यंत मराठ्यांनीं हा प्रदेश लाटला, म्हणूनच त्याला लाट हें अभिधान देण्यांत आलेलें आहे!

## डांग :

लाटच्या दक्षिण सीमेलगतच्या सपाट मुलखांतून सरळ शूर्पारकाकडे येण्यापूर्वी आपणांस पूर्व सीमेलगतच्या डांगच्या डोंगरी जंगलाकडे वळलें पाहिजे. डांग संस्थानें आतां मुंबई राज्यांत विलीन झालेलीं असलीं तरी आपण त्यांची माहिती करून घेतली पाहिजे. सोबतचा नकाशा व तक्ता यांवरून या भागाची स्थूलमानानें कल्पना करतां येईल.

या कोष्टकांतील तपशील खानदेश गॅझेटीअर (१८८०) व Memorandum on Indian States यावरून घेतलेला आहे. कर्नल रायडर यांनीं १९१९ सालीं तयार केलेल्या सरकारी नकाशांत (No 46 H) जागोजाग वादग्रस्त प्रदेश अशा नोंदी केलेल्या आहेत. या संस्थानांच्या हद्दी मोजणीमुळें किंवा तबदिलीमुळें कमी-अधिक झालेल्या असल्यामुळें वेगवेगळ्या संदर्भग्रथात तपशिलांत तफावत पडते. सोबत दिलेला नकाशा 'सर्व्हे ऑफ इंडिया' च्या वेगवेगळ्या नकाशांवरून तयार केलेला आहे. या नकाशांत संस्थानांचीं नांवें, प्रमुख गांवें, रस्ते व नद्या नमूद केलेल्या आहेत. संस्थानांच्या मर्यादा मुद्दामच दिलेल्या नाहींत. कारण त्या अनिश्चित आहेत; शिवाय त्यांच्या समावेशामुळें तपशील वाढून घोंटाळा झाला असता आणि आतां या तपशिलाचा तादृश उपयोगही नाहीं.

ब्रिटिश अमदानीच्या पहिल्या कालखण्डांत डांगचे राजे आपापल्या संस्थानापुरते स्वतंत्र होते. त्यांचें नेतृत्व धारवीच्या राजाकडे होतें आणि राज्यकारभारावर देखरेख खानदेशच्या कलेक्टराची होती. १८३०

---

❀ हा लेख लिहितांना श्री. थत्ते याचे 'साधना' साप्ताहिकांत प्रसिद्ध झालेले 'डांग'वरील सहा लेख आणि श्री. सोवनी यांचा 'नवभारत' मासिकांत प्रसिद्ध झालेला 'डांगचा प्रश्न' हा लेख, यांतील माहितीचा भरपूर उपयोग केलेला आहे. या प्रश्नाचा निकाल महाराष्ट्राला अनुकूल लागल्यामुळें या लेखाच्या मूळच्या हस्तलिखितांतील विस्ताराचा जागोजाग संक्षेप केलेला आहे.

## डांग संस्थानें

| क्र. | संस्थानचें नांव | क्षेत्रफळ : | लोकसंख्या : | | वार्षिक उत्पन्न : | | संस्थानिकांची | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | चौ. मैल | १८८० | १९३१ | १८८० | १९३१ | जात | पदवी | राजधानी |
| १ | अमाळें | १२० | ४७०० | ६२३५ | ३००० | ९००० | भिल्ल | राजा | मोडल |
| २ | अवाचार | ८ | २८० | ६२६ | १७० | ६०० | ,, | नाईक | अवाचार |
| ३ | किर्ली | २१ | ८१५ | १२५८ | ४९० | १००० | ,, | ,, | किर्ली |
| ४ | केतक कडूपाडा | ... | १०० | ... | १६० | ... | ,, | ,, | कडूपाड |
| ५ | घारवी ( गाडवी ) | १७१ | ३२५० | ७७६७ | ५००० | १३००० | ,, | राजा | कोतंब, गडवी |
| ६ | चिंचली ( गडद ) | २७ | ८०० | १३०५ | ७२० | १००० | ,, | नाईक | कडमळें |
| ७ | झाडी घरखाडी | ८ | २१० | ५०७ | ५० | २०० | ,, | ,, | गरखाडी |
| ८ | दरभोती | ७६ | ३००० | ४३४३ | ३७०० | ८००० | ,, | राजा | उगा, उगँ |
| ९ | दुर्वे ( भिलवारी ) | २ | ११५ | २७ | ८५ | १०० | कोंकणी | नाईक | खटारीदरी |
| १० | पळसविहीर | २ | ३०० | २३९ | २४० | ३०० | भिल्ल | ,, | कुकडनदी |
| ११ | पिंपरी | ७३ | ४०४५ | ३३९३ | ३१२० | ८००० | ,, | ,, | पिंप्री |
| १२ | पिंपळादेवी | ३ | १०० | १२५ | ११० | ३०० | ,, | प्रधान | पिंपळदेवी |
| १३ | वढाण | ५ | ११० | १४७ | २४० | ४०० | ,, | नाईक | शेवजी |
| १४ | वासुर्णे | १३२ | ४५११ | ७३२९ | २३०० | ८००० | ,, | राजा | वरधुंड |
| १५ | शिवबारें | ५ | २५० | ४९९ | ४३० | ९०० | ,, | नाईक | शिवबारें |
| | | ६५३ | २२५१४ | ३३८०० | १९८१५ | ५०८०० | | | |

साली डांगच्या राजांनीं ईस्ट इंडिया कंपनीबरोबर तह केला. त्याचा मसुदा मराठी भाषेंत आहे. पेशवे व गायकवाड यांच्या दरम्यान झालेल्या व्यवस्थेच्या अन्वयें डांगच्या वसुलावर गायकवाडांचा हक्क होता. १८४२ सालीं ईस्ट इंडिया कंपनीनें मुंबईच्या रॉयल इंडियन नेव्हल डॉकयार्डकरितां लागणाऱ्या सागवानी लांकडाच्या पुरवठ्या-साठीं येथील भिल्ल राजांबरोबर सोळा वर्षें मुदतीचा करार करून हा भाग मक्त्यानें घेतला. याबद्दल भिल्ल राजांना दरसाल रु. ११२३० देण्यांत येऊं लागले. हा करार मराठी भाषेंत, मोडी लिपींत लिहिलेला आहे. या करारानंतर मुल्हेरच्या देशमुखांचे आणि गायकवाडांचे प्रचलित हक्क सरकारनें अमान्य केले. १८६१ सालीं ब्रिटिश सरकारनें भिल्ल राजाबरोबर कायमचा करार केला. डागमधील साग प्रथम गणदेवीस व तेथून जलमार्गानें मुंबईस नेण्यांत येत असे. ईस्ट इंडिया कंपनीच्या करारापासून डांगच्या जंगलाशीं गुजराती ठेकेदारांचा संबंध सुरू झाला. या व्यवहारावर नजर ठेवणें खानदेशपेक्षां सुरतेहून अधिक सोईस्कर होतें आणि ठेकेदारांची तशी मागणी होती, म्हणून येथील जंगलखातें १८६८ च्या सुमारास मुंबईच्या उत्तर विभागाकडे सोंपविण्यांत आलें आणि एव्हांपासून येथील राजव्यवहारांत गुजरातीचा शिरकाव झाला. १८९२ सालीं डांगच्या राजांचे स्वतंत्र अधिकार काढून घेण्यात आले आणि त्यांना वार्षिक तनखा देण्यांत येऊं लागला. १८९७ सालापासून डांगच्या जंगल अधिकाऱ्यालाच दुय्यम पोलिटिकल एजंटाचा हुद्दा देण्यांत आला. १९२७ सालीं या संस्थानांचा कारभार 'बडोदें व गुजरात स्टेट एजन्सी'-कडे सोंपाविण्यांत आला. १-४-३३ पासून हीं संस्थानें मध्यवर्ती सरकारच्या ताब्यांत देण्यांत आलीं. बडोद्याचा रेसिडेंट हा या एजन्सीचा मुख्याधिकारी होता. १९-१-१९४८ च्या गव्हर्नर जनरलच्या नोटिफिकेशनच्या अन्वयें हीं संस्थानें मुंबई राज्यांत सामील करण्यांत आलीं; मुंबई सरकारनें त्यांचा स्वतंत्र जिल्हा बनविला आणि मराठी व गुजराती या दोन्ही भाषा राज्यकारभाराच्या भाषा ठरविल्या. याबाबत चळवळ झाल्यामुळें चौकशी करून

२५-५-१९४९ रोजीं डांगची अधिकृत भाषा मराठी असल्याचें मुंबई सरकारनें जाहीर केलें; पण निवडणुकीसाठीं हा भाग सुरत जिल्ह्याला जोडण्यांत आला. या योजनेला महाराष्ट्रानें कसून विरोध केला. यामुळें लवाद–मंडळ नेमण्यांत आलें आणि लवादानें दिलेल्या निर्णयानुसार (ता. ८-६-१९५१) 'निवडणुकीपुरता' हा भाग नाशिक जिल्ह्याला जोडण्यांत आला आहे. पहिल्या फेरींत विजयी झाल्यामुळें महाराष्ट्रानें हुरळून जातां कामा नये. बांसदा, धरमपूर, नवसारी वगैरे भागांत सामील झालेल्या कोंकणाबद्दलची चळवळ सुरू केली पाहिजे.

डांग (=डांगण, दाग, दांगण) म्हणजे (महाराष्ट्र-शब्दकोश) खिंडींत किंवा अरुंद दरींत असलेला झाडीचा प्रदेश; डोंगराळ प्रदेश, टेंकडीचें शिखर; (गु.) काठी, केळीचें सबंध पान; डांगी=जंगलचा रहिवासी, बंडखोर; डांगे = जकात-अधिकारी. डुंगर या देशी (डुंगरो शैल :, हेमचंद्र, देशीनाममाला : ४.११) शब्दापासून डांग हा शब्द सिद्ध झालेला आहे. गुजरातीमध्यें काठी व सोट या अर्थानें हा शब्द वापरला जातो; यावरून असें दिसतें कीं डांगच्या सोटांशींच तेवढा गुजरातचा संबंध आहे; या संबंधांत संघर्ष निर्माण होणार नाहीं अशी खबरदारी घेणें हेंच अखेरीस गुजरातच्या हिताचें ठरणार आहे. डांगच्या रहिवाशांची बंडखोरी महाराष्ट्राला विशेष परिचित आहे. डांग या शब्दाचा जकातीशीं जडलेला संबंध पाहतां वाटतें कीं मध्ययुगांत वसुली अधिकाऱ्यांचीं ठाणीं डोंगरांच्या व जंगलांच्या सीमांवर असावींत. डांग हा शब्द डोंगर व जंगल या अर्थानें फक्त मराठींत अस्तित्वांत आहे असा समज आहे; तो बरोबर नाहीं. हिंदी श्रीधर-भाषा-कोशांत डांगचा अर्थ लाठी, पहाड की उंची चोटी, डगर, डाली, असा दिलेला आहे. लखनौच्या वायव्येस सुमारें शंभर मैलांवर डांग नांवाचें जंगली व डोंगराळ छोटें संस्थान आहे. माळव्याच्या पूर्व भागांतील जंगली प्रदेशाच्या भ्रष्ट रजपूत रहिवाशांना डांगी या नांवानें ओळखण्यांत येते. घाटमाथ्यालगत पुणें जिल्ह्यांत जशीं मावळें तशीं हरिश्चंद्रगडाच्या उत्तरेकडील भागांत डांगणें : नाशिक जिल्ह्या-लगतच्या भागाला डांग म्हणतात आणि नगर जिल्ह्यानजीकच्या भागाला

डांगण. मावळांना आहे तसा या भागाला घाटमाथ्याचा आधार नाहीं. डांग भाग डोंगराळ, जंगली असून त्याचा ढाळ पश्चिमेकडे आहे. हरिश्चंद्र-गडाच्या उत्तरेकडील सह्याद्रीची ठेवणच वेगळी आहे. हा भाग उत्तुंग व विचित्र शिखरांनीं युक्त आहे. कोठें हीं शिखरें सरळ सुळक्यांसारखीं आहेत; गैरमाहितगाराला वाटावें कीं या कृत्रिम दीपमालाच आहेत आणि कोठें त्यांवर यात्रेच्या प्रसंगीं दीपज्योति पेटवितातही. समुद्रकांठच्या भागांत तर हीं शिखरे दीपगृहांसारखीं दिसतात. पठारावर कोठें त्यांचा आकार रांगेत बांधलेल्या हेमाडपंती मंदिरांसारखा दिसतो तर कोठें चालुक्यकालीन मंदिरांच्या कळसांसारखा; पुण्याहून सोलापुरास जातांना उजवीकडील यवतेश्वराचे कळस दिसतात, तसा. मला कधीं कधीं वाटतें कीं समुद्रावरून प्रवास करणारांच्या सोयीसाठीं किंवा कैलासावर कडी करण्याच्या इराद्यानें कोणीं हीं शिखरें अशीं तोडून काढलेलीं असावींत! अंजनेरीनजीक तर पोटाशीं पिलें घेऊन बसलेल्या माकडांचा घोळका शिखरावर बसल्यासारखा दिसतो. डांगणांतील दऱ्या खोल, चिंचोळ्या व नागमोडी आहेत. या भागांतील डोंगर दाट जंगलांनीं आच्छादलेले आहेत. हें जंगल कारवारच्या खालोखाल मानण्यांत येतें. साग, शिसव, खैर, पळस, मोह वगैरे वृक्ष या जंगलांत विपुल आहेत. या जंगलांतील सुमारें ऐशीं टक्के झाडें सागवानाचीं आहेत. महाराष्ट्रांत इतरत्र क्वचितच आढळतील इतक्या उंचीच्या व घेराच्या ह्या वृक्षांची या भागांत दाटीनें वाढ झालेली आहे. या भागांतून दरसाल सुमारें एक कोट रुपयांचें सागवान आणि बांबूचे सुमारें तीस लाख नग निर्यात होतात. हें जंगल इतकें गर्द आहे कीं तेथें वस्ती करणें अशक्य आहे. पूर्णा व अम्बिका या डांगच्या मुख्य नद्या. पूर्णा नदी बाभुळणा घाटाच्या मुखाजवळ उगम पावते आणि कांचन व चीप घाटांच्या तोंडांनजीक अम्बिका. गिरा व काप्री या दोन नद्या डांगच्या उत्तर व दक्षिण भागांतून वाहतात. मुळूख खडकाळ व जमिनीला ढाळ यांमुळें या नद्या उन्हाळ्याच्या आरंभींच कोरड्या पडतात. डोहांत पाणी असतें पण मासे मारण्यासाठीं लोक त्यांत विषें टाकतात. यामुळें लोकांचे पाण्याचे

फार हाल होतात. वाघाई व धारवी येथील विहिरी देशावरील लोकांना कल्पनाही करवणार नाहीं इतक्या खोल आहेत. धारवीच्या विहिरी आंतून लांकडाच्या ओंडक्यानीं बांधून काढलेल्या असतात. जंगलांतली मजुरी व शेती हीं या लोकांचीं उपजीविकेचीं साधनें. जमीन खडकाळ असल्यामुळें नागली, वरईसारखीं वरकस पिकें मात्र होतात. बऱ्या जमिनींत भातही पिकतें. साडेसहाशें चौरस मैलांच्या या प्रदेशांत अवघी आठ ते दहा हजार एकर जमीन शेतीखालीं आहे. लागवडीखालीं आणतां येण्यासारखी अशी आणखी फार तर एवढीच जमीन पडीक आहे. पाटबंधारे कोठेंही नाहींत. इतकेंच नव्हे तर विहिरींच्या पाण्यावर शेती करण्याचीही यांना माहिती नाहीं. यामुळें सुबत्तेच्या दिवसांतही येथें होणारें धान्य लोकांना पुरत नाहीं आणि त्यांना कंदमुळांवर व मोहाच्या वाळविलेल्या फळांवर दिवस काढावे लागतात. हे लोक उपास काढतील पण भीक मागणार नाहींत किंवा रोजगारासाठीं डांग सोडणार नाहींत. दाट जंगल, खराब पाणी, गरम व कोंदट हवा यांमुळें येथें रोगराई नेहमीं चालू असते. हिंवतापाचें ठाणें तर कायमचें असतें. या उपेक्षित प्रदेशांत फक्त तीन दवाखाने आहेत. या अनेक कारणांमुळें या लोकांची जीवनशक्ति इतकी दुर्बल झालेली आहे कीं क्षुद्र आजारापुढेंही ते टिकाव धरूं शकत नाहींत. याचें प्रत्यंतर शिरगणतीच्या आंकड्यांवरून दिसतें :

**शिरगणतीचीं सालें आणि डांगची लोकसंख्या :**

| साल : | १८९१ | १९०१ | १९११ | १९२१ | १९३१ | १९४१ |
|---|---|---|---|---|---|---|
| संख्या : | ३३,००० | १९,००० | २९,००० | २४,००० | ३४,००० | ४०,००० |

गेल्या शतकाच्या अखेरीस आलेली प्लेगची आणि अठरा सालची तापसरीची सांथ यांचा परिणाम लोकसंख्येवर झालेला स्पष्ट दिसतो. दुसऱ्या महायुद्धामुळें महागाई वाढली खरी पण मजुरीच्या दरांतही वाढ झाल्यामुळें लोकसंख्येवर दुष्परिणाम झाला नाहीं. डांगची लोकसंख्या ३१४ खेड्यांत विभागलेली आहे. हीं खेडीं अगदीं लहान

आहेत. आहवा व वाघाई हीं डांगचीं मुख्य शहरें. त्यांची वस्ती फक्त पंधराशें आहे. आहवा हें राजधानीचें ठिकाण आणि वाघाई हें व्यापार-केंद्र. हीं दोन्ही शहरें पक्क्या सडकेनें जोडलेलीं आहेत. बी. बी. सी. आय्. रेल्वेवरील चिखिमोरा स्टेशनपासून वाघाईपर्यंत गायकवाड स्टेट रेल्वेचा फांटा आहे. डांगचा साग वाघाई येथूनच निर्यात होतो. वेळूचे वांसे मुख्यत्वेंकरून नाशिककडे रवाना होतात आणि कात तयार करण्यासाठीं खैर नवापूरकडे. डांगमधील वाहतुकीचे रस्ते अगदीं खराब आहेत. पावसाळ्यांत तर सारे रस्ते बंदच असतात. सोबतच्या नकाशांत ह्यांपैकीं मुख्य रस्ते दाखविलेले आहेत. आतां या-पैकीं कांहीं रस्त्यांवरून मुख्यत्वेंकरून जंगली मालाच्या निर्यातीसाठीं मोटारींची वाहतूक सुरू झालेली आहे.

डांगचा इतिहास म्हणजे या भोंवतालच्या भागांतील भिल्ल, कोळी व कोंकणी या आदिवासी जमातींच्या लोकांच्या बंडखोरीचा इतिहास. हल्लीं अस्तित्वांत आहेत त्या राजाचा इतिहास असा कांहींही उपलब्ध नाहीं. रामचंद्राच्या पदस्पर्शानें हा भाग पावन झालेला आहे किंवा नाहीं, कोण जाणे. एवढें मात्र खरें कीं या भागांतील राजसत्ता नष्ट होईपर्यंत किंवा येथें व्यापाऱ्याचें पाऊल पडेपर्यंत येथें रामराज्य होतें ! जशी प्रजा तसा राजा ; दोघेही लंगोटी लावून नांगर हांकणारे, गळ टाकून मासे मारणारे, तिरकमठ्यानें शिकार करणारे ; फक्त दरबाराच्या वेळीं राजाच्या अंगावर अंगरखा व तुमान असावयाची ! एका काळीं हे भिल्ल व कोंकणी राजे देवगिरीचे माण्डलिक होते. महाराष्ट्राच्या सरहद्दीवर अल्लाउद्दीनाशीं लढणाऱ्या कोंकणच्या राण्या याच प्रदेशांतील राज्यकर्त्या असल्या पाहिजेत. मुसलमानी अमदानींत अगदीं निरुपाय होई तेव्हां ज्याचा त्या वेळीं जोर असेल त्याला ते खण्डणी देत असत ; कधीं बहमनींना, तर कधीं गुजरातच्या अगर दिल्लीच्या सुलतानांना. मराठेशाहींत भिल्लांनीं भोंवतालच्या भागांत प्रळय मांडला होता. भिल्लांच्या उपद्रवापासून प्रजेचें रक्षण करण्यासाठीं होणारा खर्च भिल्लांपासून नव्हे, खानदेशां-तील प्रजेपासूनच भिल्लपट्टीच्या नांवाखालीं १७७६ सालापासून वसूल

करण्यांत येत असे; इतकी या भागांत मराठी सत्ता दुर्बल होती. १७९० सालीं तर भिल्लांनीं बंड उभारून कण्हेरा किल्ला काबीज केला होता; अखेरीस त्यांच्या अटींवर मराठ्यांना त्यांच्याशीं जमवून घेणें भाग पडलें. भिल्लांइतकेच कोळी शूर व बंडखोर, दरोडेखोर व बेभरंवशाचे. अफझलखानाच्या पोवाड्यांत कोळ्यांचा नाईक खंडोजी याच्या कर्तबगारीचा उल्लेख आलेला आहे. कधीं ते मराठ्यांच्या बाजूनें लढत तर कधीं त्यांच्याशीं. महाराष्ट्रांतील खेड्यांपाड्यांतही कोळ्यांचा विस्तार असल्यामुळें प्रजेला त्याच्यापासून विशेष उपसर्ग पोंचला. १७५८ सालीं मराठ्यांनीं जव्हार संस्थान काबीज करून त्याचा कारभार आपल्या हातीं घेतला होता. याची प्रतिक्रिया म्हणून पानिपतच्या पराभवानंतर मराठेशाही दुर्बल झालेली पाहून त्यांनीं जागोजाग उठावणी केली. १७६२ सालीं कवनाई सुभ्यांत डांगच्या कोळ्यांनीं दंगे केले; १७६३ सालीं राजमाची व १७६५ सालीं जीवधन या किल्ल्यांत त्यांनीं बंडें उभारलीं. केव्हां तडजोड तर केव्हां कत्तल करून मराठ्यांनीं त्यांना वठणीवर आणावयाची खटपट केली. जव्हार व डांगमधील बंडखोरांवर जरब ठेवण्यासाठीं मराठ्यांनीं डांगच्या दक्षिणेस सुरगणा (संस्थानचें क्षेत्रफळ ३६० चौ. मै.) येथें पवार देशमुखांची नेमणूक केली आणि उत्तर बाजूच्या बंदोबस्ताची कामगिरी गायकवाडांवर सोंपवली. सोनगड, मुल्हेर, साल्हेर व हातगड हे किल्ले या बंडखोरांच्या बंदोबस्तासाठीं जय्यत तयार ठेवलेले होते. एवढ्या तजाविजा केल्या तरी मराठ्यांना राजकीय दृष्ट्या या भागाचें मराठीकरण करतां आलें नाहीं.

भिलवाडा डांगच्या उत्तरेस अरवली पर्वतापर्यंत पसरलेला आहे. अरवली, विंध्य व सातपुडा पर्वतांतील जंगलें हीं भिल्लांचीं मुख्य वसतिस्थानें. मुंबई प्रांतांत भिल्लांची बहुसंख्य वसती गुजरातेंतील भडोच, पंचमहाल व बडोदें जिल्ह्यांत आणि महाराष्ट्रांत पश्चिम खानदेश व नाशिक या जिल्ह्यांत आहे. कोळवण डांगच्या दक्षिणेस महादेव डोंगरापर्यंत पसरलेलें आहे. यांची मुख्य वसती ठाणें, नाशिक, कुलाबा व पुणें या जिल्ह्यांत आहे. या दोन्ही जमातींमध्यें मराठी व

गुजराती आणि डोंगरी व मैदानी असे मुख्य व नैसर्गिक पोटभेद आहेत. गुजराती जमातींचा रजपुतांशीं व मराठी जमातींचा मराठ्यांशीं संकर झालेला आहे. कातकरी, ठाकूर, दुबळा व वारली या कोळयांच्याच पोटजाती आहेत असें काहीं वंशशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. डांगचे बहुसंख्य रहिवासी कोंकणी जमातीचे आहेत. विंध्य पर्वताच्या उत्तरेकडील भागांतील भिल्लांच्या भाषेवर राजस्थानी हिंदीची छाप आहे आणि गुजरात व महाराष्ट्र यांलगतच्या प्रदेशांतील रहिवाशांवर त्या त्या भाषांची. काठेवाडांतील एका खेड्यांतले कोळी लोक मोम्मई नावाच्या देवीची पूजा करतात आणि मुंबईस मुंबादेवी नांवाची देवी आहे, यावरून मुंबईचे मूळचे कोळी रहिवासी येथें गुजरातेंतून आले असले पाहिजेत असा अंदाज मुंबई शहराच्या गॅझेटीयरच्या कर्त्यानें केलेला आहे. (Imperial Gazetteer of Bombay City. Vol. II. p. 2 ). मुंबईवरील गुजरातचा हक्क शाबीत करण्यासाठीं श्री. मुनशी यांनीं हें विधान उद्‌धृत केलेलें असून ( Linguistic Provinces & The Future of Bombay. p. 26 ) त्याचा पुरावा म्हणून सदर ग्रंथासाठीं त्यांनीं तयार करविलेल्या क्र. १ या नकाशात प्रत्येक जिल्ह्यांतील कोळी लोकांची संख्या दिलेली आहे. हे आंकडे १८८५ च्या खानेसुमारीवरून घेतलेले असावेत, असें वाटावें, असा लेखकाचा इरादा आहे, असें त्यावरील टीपेवरून दिसतें. पण ही निवळ चलाखी आहे. गुजरात रीसर्च सोसायटीनें १९४७ सालीं प्रसिद्ध केलेल्या Statistical Abstract of Maha-Gujarat या ग्रंथांत गुजरातेंतील आदिवासी जमातींचा ( Tribal Population ) तपशील एका कोष्टकांत दिलेला आहे. त्यांत कोळी जमातीला शीर्षकही दिलेलें नाहीं. यावरून ही चलाखी स्पष्ट दिसते. या नकाशांतील भिलवाडा भागांत त्यांनीं डांगचाच नव्हे, नाशिक शहराचाही समावेश केलेला आहे. महाराष्ट्रांतील कोळी व गुजरातेंतील कोळी या जमातींचें मूळ एकच आहे कीं नाहीं, कोण जाणे; हल्लीं मात्र त्यांमध्यें साम्यापेक्षां वैधर्म्यच अधिक दिसतें.

डांगमध्यें भिल्ल, कोंकणा, कोळी, वारली, कातोडी इत्यादि आदिवासी लोकांची वस्ती आहे. मुख्य वस्ती भिल्ल व कोंकणा यांची.

त्यांची संख्या जवळजवळ समसमान आहे. हे लोक ठेंगू व कुरूप आहेत. रजपुतांच्या संकरामुळें भिल्ल लोक स्वतःला राजवंशी समजतात; म्हणूनच ते नांगराला हात लावीत नाहींत; शिकार करून आणि शेती करणाऱ्या कोंकण्याना धाकदपटशा देऊन व लुबाडून ते आपला चरितार्थ चालवितात. डांगमधील भिल्ल, कोंकणा, वारली इत्यादि जातींचे जे लग्नसंबंध होतात ते खुद्द महाराष्ट्रांतील त्या त्या जातींशींच होतात. लग्नासाठीं मराठ्याप्रमाणेंच ते देवकें मानतात. देवक हें महाराष्ट्रीयांचें वैशिष्ट्य आहे; आणि त्यांचीं नांवें-आडनांवें मराठ्यासारखींच आहेत. डांगचे लोक दरिद्री, अशिक्षित व मागासलेले आहेत. सबंध डांग जिल्ह्यांत फक्त सतरा प्राथमिक शाळा आहेत. मत्स्य, मद्य व मैथुन या तीन मकरांत त्यांचें सुखसर्वस्व सांठविलेलें आहे. मोहाचीं झाडें मुबलक असल्यामुळें त्यांना मद्य-निर्मिति सहज करतां येते. बायका व मुलेंही यथेच्छ मद्यपान करतात. जन्मापापासून मृत्यूपर्यंतच्या सर्व संस्कारांचे वेळीं, सणावारीं व आनंदोत्सव–प्रसंगीं हे लोक बेसुमार मद्यपान करतात. या लोकांत लैङ्गिक अराजकच आहे म्हटलें तरी चालेल. विवाह-संबंध इतका ठिसूळ कीं जिला काडीमोड हवी असेल तिनें मनाला येईल तेव्हां लुगडें-चोळी घेऊन खुशाल दुसऱ्याकडे राहावयास जावें आणि मग नव्याजुन्या नवऱ्यांनीं लग्नखर्चाची भरपाई करून व्यवहार पुरा करावा! बहुतेक प्रत्येक पुरुष हयातींत दोनतीन बायका करतो व प्रत्येक बायको दोनतीन नवरे करते. काडीमोड एवढी सुलभ असल्यामुळें येथें बहुपत्नीकत्वाची चाल नाहीं. या लोकांमध्यें सामुदायिक संमिश्र नृत्याची प्रथा आहे. अशीं नृत्यें साधारणतः सणावारीं व उत्सवप्रसंगीं होतात. या वेळीं नृत्य-गीतांना कडक मद्यांची जोड असते. विशेषतः शिमग्याच्या सणांत. पांच दिवस हा सण अत्यंत उत्साहानें साजरा करण्यांत येतो. ढोलाच्या तालांत व तुणतुण्याच्या सुरांत अहोरात्र नृत्यगीतें वस्तीवस्तींतून चाललेलीं असतात. या नृत्योत्सवाच्या माजाची नागरी लोकांना कल्पनाही करतां येणार नाहीं. उद्यांची काळजी मद्याच्या द्रोणांत डुबवून चालू क्षणाचा आनंद लुटणाऱ्या या भोळया व अजाण आदिवासींचा

एकतान व बेभान आनंद मनांत क्षणभर विषाद उत्पन्न करतो; आणि असूया ही!

आणि अशा प्रसंगीं आदिवासी गातात तीं सारीं गाणीं मराठी असतात. बहुजनसमाजाच्या संस्कृतीचा अंदाज त्यांच्या लोकगीतांवरून करण्यांत येतो. हें गमक मान्य केलें तर डांगची भाषा मराठी आहे हें निश्चित ठरतें. डांगमधील सर्व जनतेची भाषा मराठी हीच आहे. डांगी बोलींत गुजराती छटा अधूनमधून दिसते. कारण सुमारें शंभर वर्षांपासून व्यापाराच्या निमित्तानें डांगचा संबंध गुजरातीशीं जडलेला आहे; आणि सुमारें पन्नास वर्षांपासून राज्यकारभाराच्या निमित्तानें. डांगच्या सर्व लोकांना मराठी बोली समजते. व्यापारी केंद्राभोंवतालच्या भागांतील कामगारांना धेडगुजरी गुजरातीही समजते; कारण गुजराती सरकारी अधिकारी व दूरदृष्टीचे व्यापारी यांनीं भविष्यांतील राजकारणाचा आगाऊ अंदाज बांधून डांग जिल्ह्यात गुजरातीचा प्रसार करण्याची खूप खटपट आजवर केलेली आहे; आणि व्यापारी पेशाच्या किंवा व्यापाऱ्यांच्या आश्रयावर पोसलेल्या तथाकथित देशभक्तांनींही. जेथें गुजराती वसतो तेथें तो गुजरात वसवतो, असें म्हणतात. त्याचें प्रत्यंतर येथें मिळतें. विशेष खेदाची गोष्ट ही कीं या शांतताप्रधान शिरकावामुळें व अविश्रांत प्रचारामुळें प्रामाणिक महाराष्ट्रीयांचाही बुद्धिभेद झालेला आहे. जें कुजबुजण्यांत येतें तें खरें असेल तर म्हणावें लागेल कीं डांग गुजरातेंत सामील व्हावा अशी राष्ट्रीय ऊर्ध्वपतींची सुप्त इच्छा व गुप्त आशा होती; म्हणूनच डांगची आजवर अशा रीतीनें ओढाताण झाली!

घाटमाथ्यालगत पुणें जिल्ह्यांत जशीं मावळें तशीं हरिश्चंद्रगडाच्या उत्तरेकडील भागांत डांगणें. डांगणांतलें डोंगर उघडेबोडके आणि डांगमधले वृक्षराजींनीं समृद्ध. हा प्रदेश निसर्गतः मावळांसारखा, पण एवढा सुपीक नाहीं, एवढा सुधारलेला नाहीं; किंबहुना एवढा माणसाळलेला नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. या भागांत घाटमाथा नसल्यामुळें येथील डोंगरांना पूर्व व पश्चिम या दोहीं बाजूंस ढाळ आहे. मावळ भागांतलीं खेडीं लहान आणि वस्ती तुटक

व तुरळक असली तरी या भागालगत लहानमोठीं गांवें पुष्कळ आहेत; यामुळे मावळी लोकांचा नागरी जीवनाशीं पुष्कळ संबंध येतो. डांगणांलगत पूर्वेस किंवा पश्चिमेस मोठीं गांवें नाहींतच; शिवाय निबिड अरण्यांचा हा प्रदेश वसाहतीला तितका अनुकूल नसल्यामुळें इकडे लढाऊ किंवा पांढरपेशे मराठे स्थायिक झाले नाहींत. यामुळे या लोकांवर नागरी संस्कृतीचे संस्कार झालेले नाहींत. असें असूनही या भागांतले लोक मराठी भाषा बोलतात. डांगणांचा प्रदेश जवळजवळ अभेद्य असल्यामुळें या भागांत महत्त्वाचे किल्ले असे नाहींतच. डांगमध्यें रूपगड हा एकच नांव घेण्याजोगा किल्ला आहे. डांगणाभोंवतीं मात्र बरेच मजबूत किल्ले आहेत. हे किल्ले डांगच्या धारणेसाठीं उभारलेले नसून डांगणांतील लोकांपासून संरक्षण मिळविण्याचे दृष्टीनें उभारलेले आहेत आणि परकीय आक्रमकांचा लोंढा आलाच तर शक्य तोंवर किल्ले लढवावे आणि नंतर डांगचा आश्रय घेता यावा, या दृष्टीनें उभारलेले आहेत. मराठी इतिहासाशीं या भागांतील लोकांचा संबंध आला तो त्यांच्या बंडखोरीमुळें. शिवाजीमहाराज डांगणांतून सुरतेवर गेले व परतले, एवढीच या प्रदेशाची पुण्याई. श्री. सरदेसाई (शककर्ता शिवाजी, पृ. ९०) सांगतात: बहिरजी नाइकानें बातमी काढून आणल्यानंतर उत्तरेच्या बाजूस कांहीं निकडीचें काम काढून शिवाजी मोठ्या झपाट्यानें नाशकास गेला आणि तेथेंच मुक्काम आहे असें भासवून एकाएकीं गणदेवीस दाखल झाला व दुसऱ्याच दिवशीं सुरतेसमोर थडकला. यावरून शिवाजीनें ही स्वारी कोणत्या मार्गानें केलेली असेल याबद्दल अनुमान करतां येतें. शंकर हा सह्याद्रीचा स्वामी व आदिवासींचा देवदेव. त्याचाही प्रवेश या भागांत झालेला दिसत नाहीं. कळसूबाईच्या भोंवतीं अनार्य व आद्य देवतांचें प्राबल्य आहे; महालक्ष्मी, वज्रेश्वरी, एकवीरा व सप्तशृंगी. पैकीं फक्त सप्तशृंगीचें आर्यीकरण झालेलें आहे. चोहींकडे वावरणाऱ्या कोळ्याच्या या देवता. खुद्द डांगमधील लोक डोंगरदेव, वाघाई अशा वन्य देवतांची व कोंकणदेवाची पूजा करतात. जमदग्नि, परशुराम व

रेणुका यांशीं कोंकणदेवांचा संबंध असेल अशी पुसट आठवणही या लोकांना राहिलेली नाहीं. यावरून दिसतें कीं या भागाचें पूर्ण सांस्कृतिक आर्यीकरण किंवा राजकीय मराठीकरण असें झालें नाहीं. याची जबाबदारी सुसंस्कृत म्हणवून घेणाऱ्या महाराष्ट्रीयांवरच आहे, हें उघड आहे.

याचा परिणाम डांगसाठीं झालेली ओढाताण. खुद्द डांगच्या रहिवाशांना कल्पनाही नसेल कीं आपल्या मुलखासाठीं महाराष्ट्र व गुजरात या देशांत चळवळी झाल्या असतील आणि त्यांनीं उठविलेल्या वावटळी दिल्लीपर्यंत पोंचल्या असतील. या अनवस्थेचें कारण आपण फक्त आपल्या हक्कांसाठीं झगडत आहोंत, कर्तव्यांची प्रेरणा अद्याप व्हावयाची आहे.

## शूर्पारक व अष्टागर :

दमणगंगेपासून मुंबईपर्यंतच्या प्रदेशाला शूर्पारक आणि शूर्पारकाच्या दक्षिणेकडील कुण्डलिकेपर्यंतच्या प्रदेशाला अष्टागर अशीं नांवें होतीं. शूर्पारक हें नांव प्राचीन आहे आणि अष्टागर हें अर्वाचीन. शूर्पारक म्हणजे हल्लींचें सोपारा. हें या प्रदेशाचें नांव होतें व त्यांतील मुख्य ठाण्याचेंही. भोंवतालच्या खाड्या उथळ झाल्यामुळें व जहाजांचा आकार वाढल्यामुळें आतां सोपाऱ्याला विशेष महत्त्व राहिलेलें नाहीं; यामुळें त्याचा समावेश वसईत करण्यांत आलेला आहे. यज्ञकुण्डांतून निघालेल्या सुपाच्या साह्यानें परशुरामानें ही भूमि निर्माण केली, म्हणून या प्रदेशाला शूर्पारक -- सोपारा, हें नांव मिळालें, असें दंतकथा सांगते. या प्रदेशाचा आकार सुपासारखा आहे, म्हणून त्याला हें नांव मिळालेलें आहे, अशीही स्थानिक दंतकथा आहे. जेथें नारळी-पोफळीचीं झाडें दाट उगवतात अगर मीठ पिकवतात अशा स्थळास आगर म्हणतात. समुद्राच्या भरतीच्या कक्षेत असलेल्या सखल, सपाट, कोरड्या व खाऱ्या जमिनींत मीठ पिकतें आणि गोड्या पाण्याचा मुबलक पुरवठा असेल तेथें नारळी-सुपारीचीं आगरें असतात. अलीबाग, नागांव, थळ, चौल, सासवनें, साखर, अक्षी व किहीम हीं आठ प्रसिद्ध

आगरें या भागांत लगोलग असल्यामुळें त्याला अष्टागर ही सांघिक संज्ञा देण्यांत आलेली आहे. वसई, आगाशी वगैरे आगरें शूर्पारकांतही आहेत. शूर्पारक हा भाग ठाणें जिल्ह्यांत मोडतो आणि अष्टागर कुलाबा जिल्ह्यांत. अपरान्तांतील इतर प्रांतांहून हा प्रदेश निसर्गतः भिन्न आहे. दमणगंगा व कुण्डलिका यांच्या किनाऱ्यालगतच्या भागांत ही भिन्नता स्पष्टपणें दिसून येते. नैसर्गिक साम्य व मुंबईचें सान्निध्य यांमुळें शूर्पारक-अष्टागर या प्रदेशाला वैशिष्ट्य प्राप्त झालेलें असल्यामुळें त्यांचा समावेश एका शीर्षकाखालीं केलेला आहे.

शूर्पारकाप्रमाणेंच अष्टागराचा प्रदेश सपाट, सजल व सुपीक आहे. इतका कीं दक्षिण कोंकणांतील लोक या भागाचा समावेश कोंकणांत करावयास तयार नसतात. ते सांगतात कीं इकडल्या आंब्यांच्या अंगीं माधुरी नाहीं व सर्पांच्या दांतीं विष नाहीं; पाणी आहे तें जमिनींत, माणसांच्या अंगीं मात्र मुळींच नाहीं. या आक्षेपांत स्थानिक अहंकार भरपूर आहे आणि स्पर्धेमुळें व पृथकत्वामुळें निर्माण झालेली क्षुद्रताही. तें कसेंही असो. या भागांतील मेहनती व तत्पर रहिवासी नैसर्गिक परिस्थितीचा पुरेपूर फायदा घेत आहेत हें मात्र खरें. मुंबईची हजर व संपन्न बाजारपेठ शेजारीं असल्यामुळें आणि वाहतुकीचीं मुबलक साधनें उपलब्ध झाल्यामुळें या प्रदेशाची समृद्धि दिवसानुदिवस वृद्धिंगत होत आहे.

अष्टागराचें सौंदर्य व समृद्धि हीं जितकीं नैसर्गिक तितकींच तीं मनुष्यनिर्मितही आहेत. सपाट किनाऱ्यावर शांतपणें विलीन होणाऱ्या सागराच्या लाटांचा मंद निनाद अविरतपणें चाललेला एका बाजूनें ऐकूं येत असतो, तर दुसरीकडून बागाबागांतून दिवसभर चाललेल्या रहाट-गाडग्यांची कुरकूर कानीं येत असते. कधीं समुद्रावरून वहात आलेल्या दमट वाऱ्याचा खारट दर्प नाकांत भरतो, तर कधीं फळांफुलांच्या बागांवरून आलेल्या झुळकीबरोबर येणारी सुगंधाची लकेर मन प्रसन्न करते. कोठें शरीराच्या निगेपेक्षां वेषभूषेची जोपासना विशेष कसोशीनें करणारी, पण असंस्कृत जगांत वावरतांना जरा बिचकल्यासारखी भासणारी व अंग चोरून चालणारी नाजूक पुष्पगंधा नागरिका कधीं

काळीं चमकताना दिसते ; तर आपल्या तंग आवरणामुळें जणुं सचैल व सकच्छ जन्मल्या आहेत असा आभास उत्पन्न करणाऱ्या बांधेसूद आंगलटीच्या निर्भय मत्स्यगंधा सागरिका हमेशा कोठेंही अंग घुसळीत वावरतांना दिसतात ! किनाऱ्यावरल्या वाळवंटांत कुशीवर कलंडलेले मोठमोठे पडाव पाहिले कीं तालीमखान्यांतल्या मातींत लोळणाऱ्या मस्त पण सुस्त पहिलवानाची आठवण होते ; पण तेच पडाव शीड उभारून समुद्राच्या हलत्या पृष्ठभागावरून डुलत डोलत सरकूं लागले कीं पदरांत मुद्दाम वारा भरून घेऊन पुळणीवरून नखऱ्यांत चवड्यावर हंसगतीनें तरंगत चालणाऱ्या सायंतारकांची आठवण होते ! नागरिकांना व पांढरपेशा स्त्रियांनाच नव्हे, सामान्य व ग्रामीण स्त्रियांनाही स्वच्छतेची किती आवड व फुलांची केवढी हौस ! मोगरीच्या डिकशा, सुरंगीचे किंवा बकुळीचे नाजूक गजरे, अगर अबोलीच्या वा गुलछबूच्या बांधीव भरदार वेण्या माळलेल्या अटकर व सडपातळ हलिक स्त्रिया एकट्यादुकट्या किंवा गटानें सकाळींच स्नान उरकून ताजेतवानें माळव घेऊन बाजाराला निघाल्या कीं त्या जणूं स्वतःची टवटवीत प्रसन्नता भोंवतालीं दरवळवीत जातात ! अपरान्तांतील स्त्रियांच्या पुष्पासक्तीची प्रशंसा प्राचीन पाश्चिमात्य प्रवाशांनींही केलेली आहे.

अष्टागरांतील आगरी जमिनीसाठीं व कोळी मत्स्यांसाठीं सागराशीं सारखे झगडत असतात आणि भंडारी जणूं आभाळाला टेकलेल्या वृक्षांशीं मद्यासाठीं. अपरान्त हा अपरिमित पर्जन्याचा व निकस जमिनीचा प्रदेश. देशावरल्या शेतकऱ्यानें आपल्या ठाय ढाळाच्या शेताला ताल घातली तर त्याला केवढी धन्यता वाटते ! येथे तर उतारावरल्या मुरुमावर दूरवरून वाहून आणलेल्या कोऱ्या मातीचे थरावर थर पसरून शेतजमिनी अक्षरशः कणांकणांनीं निर्माण कराव्या लागतात. कोंकणांतल्यापेक्षां देशावरले शेतकरी शरीरानें धिप्पाड खरे, पण जातीनें जड ; त्यांना पाऊस-वारा यांचा मारा बिलकुल सहन होत नाहीं. अपरान्तांत पावसाळयांत निसर्गाच्या सर्व शक्तींना जणूं चेव येतो. खवळलेला दर्या अशा आवेशानें भूमीवर झेंप घेतो कीं वाटावें तो जणूं अगस्तीचा

माग काढीत आहे! पश्चिमेकडून क्षणाक्षणाला वृद्धिगत होणाऱ्या समुद्राच्या लाटा किनाऱ्यावर धडाडत आहेत, पूर्वेकडील पर्वतांवरून प्रपात कोसळत आहेत व जलप्रवाह लोटत आहेत; ऊर्ध्व दिशेनेंच नव्हे, जणूं सर्व दिशांनीं पावसाच्या सरीवर सरी कोसळत आहेत आणि सोंसाट्याच्या वादळी वाऱ्यानें थैमान मांडलें आहे; हा कोलाहल केवळ नैमित्तिक आहे, नव्हे, जीवनाला आवश्यक व उपकारक आहे, उद्योगाला घडीचाही उशीर खपणार नाहीं, हें जाणून कोंकणचा कामसू शेतकरी ढोंपराएवढ्या चिकण मातीच्या चिखलांत व शेतांत मुद्दाम सांचाविलेल्या थंडगार पाण्यांत हंगामभर राबून तांदळासारखीं नाजूक पिकें निर्माण करतो. खाऱ्या जमिनींत शेती करणाऱ्या आगरी लोकांना याहून अधिक मेहनत करावी लागते व दक्षता ठेवावी लागते. अविरत पावसामुळें ओलावलेला शेताचा बांध भरतीच्या लाटांनीं फोडला तर स्वतःचें व चालू हंगामाच्या पिकाचेंच नव्हे, सर्वांचें सर्वस्व समुद्रार्पण व्हावयाचा धोका असल्यामुळें मुसळधार पर्जन्यांतही त्यांना व्यक्तिशः स्वतःच्या व सहकार्यानें सर्वांच्या बांधांची राखण रात्रंदिवस करावीच लागते. खरोखर, देशावरल्या शेतकऱ्यांनीं येथील सुपीक जमिनींवर एवढी मेहनत घेतली तर बावनकशी सोन्याच्या राशी पिकतील. निसर्गाशीं झगडतांना कुडकुडणाऱ्या शरीरात कृत्रिम ऊब आणण्यासाठींच ते अधून मधून घरगुती दारूचे घुटके घेत असत. मैदानी व नागरी 'कोरडी' नीति आतां त्यांच्यावर लादण्यांत आलेली आहे. त्यांच्या यातनांची कल्पना आपल्याला कशी होणार? जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे!

सोपाऱ्याची वस्ती फार प्राचीन आहे. सागरापासून परशुरामानें हा प्रदेश प्रथम मिळविला, पापनाशिनी वैतरणी परशुरामानें पाताळांतून भूतलावर आणली, सोपाऱ्यानजीकच्या चतुरंगण पर्वतावर परशुरामाचें स्थान होतें, अर्नाळा किल्ल्यावरील रेणुकादेवीची स्थापना खुद्द परशुरामाच्या हातची आहे, अशा स्थानिक दंतकथा आहेत. महाभारत व रामायण यांत सोपाऱ्याचे उल्लेख आलेले आहेत. गोकर्णाहून प्रभासला

असतांना अर्जुनानें येथें मुक्काम केला होता. येथून जवळच असलेल्या एका मैदानावरील जमदग्नीच्या वेदीचें त्यानें दर्शन घेतलें. येथील वैवस्वत, आदित्य, कुबेर, इंद्र, विष्णु, सावित्री, वरुण, रुद्र, सरस्वती वगैरे देवतांच्या मंदिरांचीं दर्शनें घेऊन अर्जुन समुद्रमार्गें काठेवाडकडे रवाना झाला, अशी कथा महाभारतांत आलेली आहे. बौद्ध वाङ्मयांतही सोपाऱ्याचे अनेक उल्लेख आढळतात. शूर्पारक जातक या नांवाचें एक जातक आहे. जातककथांत सोपाऱ्याचा उल्लेख सुपरगपट्टण या नांवानें केलेला असून भोंवतालच्या भागाला 'सुपलक्षित समुद्रप्रदेश' म्हटलेलें आहे. पूर्ण हा येथील एका संपन्न व्यापाऱ्याचा दासीपुत्र. काशीच्या व्यापाऱ्यांच्या संगतींत समुद्रपर्यटण करीत असतांना बुद्धाचीं पवित्र वचनें त्याच्या कानीं आलीं. लगेच व्यापारावरून त्याचें मन उडालें. तो काशीला गेला. तेथें बुद्धानें त्याचें स्वागत केलें व त्याला दीक्षा दिली. कोंकणांत परत आल्यावर तो धर्मप्रसाराचें कार्य करूं लागला. एकदां एक शिकारी हरणावर बाण टाकीत असतांना त्याच्या दृष्टीस पडला. बौद्ध भिक्षूचें दर्शन अपशकुनी अशी समजूत असल्यामुळें चिडलेल्या शिकाऱ्यानें त्याच्यावरच धनुष्य रोखलें. त्यानें छातीवरलें वस्त्र दूर केलें व म्हणाला, माझ्यावर खुशाल बाण सोड, कारण मी कोंकणांत आत्मयज्ञ करण्यासाठीं आलों आहें. याच्या मनांत भीतीचा लेशही नाहीं हें पाहून शिकारी लज्जित झाला आणि धनुष्यबाण आवरून तेथून निघून गेला. या प्रसंगामुळें पूर्ण प्रसिद्धि पावला व बुद्धधर्माचा प्रसार झपाट्यानें होऊं लागला. बोधिसत्त्वपद प्राप्त करून घेतलेल्या पूर्णाच्या सन्मानार्थ सोपाऱ्याच्या व्यापाऱ्यांनीं एक प्रचण्ड व उत्तुंग मंदिर उभारलें. त्याची प्रतिष्ठापना खुद्द बुद्धानें आकाशमार्गें येऊन केली. या दौऱ्याचे वेळीं बुद्धानें पांचशें ब्राह्मणांना व पांचशें विधवांना दीक्षा दिली. या शिष्यिणींना त्यानें आपलीं नखें व केंस दिले व त्यांवर त्यांनीं स्तूप उभारला. सोपाऱ्याभोंवतालीं वारंवार लुटालूट करणाऱ्या कृष्ण व गौतम या नागराजांना बुद्धानें धर्मदीक्षा दिली. ब्राह्मणांनीं व बौद्धांनीं या स्थानाभोंवतीं एवढ्या दंतकथा निर्माण केल्या, मग जैन कसे स्वस्थ राहतील ? जैन सम्राट् श्रीपाल याच्या कथेंत सांगितलें

आहे कीं त्याचा विवाह सोपारक नगरीचा राजा महासेन याची कन्या तिलकसुंदरी हिज्बरोबर झाला. जिनप्रभसूरि हा विख्यात जैन धर्मगुरु चौदाव्या शतकांत होऊन गेला. जैनांच्या अतिश्रेष्ठ अशा ऐशीं तीर्थक्षेत्रांत त्यानें सोपाऱ्याची गणना केलेली आहे. सोपाऱ्यास रामकुण्डानजीक जैन मन्दिराचे अवशेष आढळलेही आहेत. सोपाऱ्याच्या पूर्वेस तुंगार पर्वत आहे व दक्षिणेस निर्मळ क्षेत्र. विमल नांवाचा असुर ब्राह्मणांना वारंवार त्रस्त करीत असे. परशुरामानें त्याचा पराभव केला, तेव्हां तो तुंग पर्वतावर राहूं लागला. त्यानें शंकराची आराधना केली आणि ब्राह्मणांना त्रास देणार नाहीं या अटीवर त्यानें शंकरापासून त्रैलोक्यविजयी अमरपद व दिव्यलिंग प्राप्त करून घेतलें. या लिंगाची स्थापना त्यानें तुंग पर्वतावर केली. शंकराला दिलेल्या वचनाचा भंग करून तो ब्राह्मणांना त्रास देऊं लागला, त्यांच्या यज्ञकुण्डांचा विध्वंस करूं लागला. ऋषींनीं शंकराकडे तक्रार नेली. असुरांचा बंदोबस्त करण्याची कामगिरी शंकरानें परशुरामावर सोंपविली. वैतरणेच्या काठीं लोमहर्षण ऋषीची कन्या धर्मकृत्य करीत असतां विमल असुर तिचें हरण करण्याच्या तयारींत होता, तोंच परशुराम तेथें दाखल झाला. विमलाशीं त्याचा घोर संग्राम झाला. परशुरामानें त्याचे हातपाय मोडले, पण शंकराच्या वरदानामुळें ते जागचे जागीं लगोलग शाबूत झाले. असें अनेक वेळां झालें. शेवटीं परशुरामानें दिव्य परशूनें त्याचा वध केला. हें होऊं शकलें, कारण ज्या अस्त्रांच्या बाबतींत विमलानें शंकराचा वर मिळविला होता त्यांत परशूचा समावेश नव्हता ! मरतां मरतां त्यानें परशुरामाकडे दयेची याचना केली. तेव्हां तो पडला तेथें परशुरामानें लिंग स्थापन केलें. त्याचे मूळचें नांव विमलेश्वर. आतां हें स्थान निर्मळ या नांवानें ओळखलें जातें. येथें शंकराचार्यांची समाधि आहे. महाभारत, पुराणें व परशुरामकथा यांवरून दिसतें कीं अपरान्तांत आर्यांची पहिली वसाहत भृगुकच्छ भोंवतालच्या भागांत झाली आणि तेथें ब्राह्मण व क्षत्रिय यांचे संघर्ष झाले; त्याच सुमारास आर्यांची दुसरी वसाहत शूर्पारक भागांत झाली आणि येथें शस्त्रधारी ब्राह्मणांचे अनार्यांबरोबर अनेक संग्राम झाले. जातककथावरून दिसतें कीं येथें बौद्धांचें

प्रमुख परिवर्तन केंद्र होतें. पौराणिक वृत्तांत व दंतकथा मानावयाच्या नाहींत असें ठरविलें तरी या अखेरच्या निष्कर्षाला बाध येत नाहीं. कारण खुद्द सोपारा येथें अशोकाचें शिलाशासन मिळालेलें आहे व अनेक बांधीव स्तूप आढळलेले आहेत. शिलाशासनाच्या अस्तित्वावरून निष्कर्ष काढण्यांत आला आहे कीं येथें मौर्यांचें अपरान्तांतील मुख्य ठाणें होतें. येथील स्तूपांपैकीं 'बुरूड राजाचा किल्ला' या नांवानें ओळखला जाणारा स्तूप पण्डित भगवानलाल इंद्रजी यांनीं उघडला; त्यांत बुद्धाच्या भिक्षापात्राचे अवशेष, सुवर्णपुष्पें, मूर्ति वगैरे प्राचीन निशाण्या मिळाल्या. यावरून येथें बौद्धांचें प्रचारकेंद्र असल्याचें सिद्ध होतें. अपरांतांत प्राचीन काळापासून यवन स्थायिक झाले होते, त्यांचें परिवर्तन सुलभ व्हावें म्हणूनच या कामासाठीं अशोकानें दीक्षित यवनाची योजना केलेली असणें संभवनीय आहे. शिलालेखांत आढळणाऱ्या सुप्पारक या नांवावरून अनुमान करतां येतें कीं या प्रदेशाच्या निर्मितीची कथा त्या काळींही प्रचलित असावी; शिवाय पूर्णकथेंतच रामकुण्डाचा उल्लेख आहे. कान्हेरीपासून घारापुरीपर्यंत हारीनें अनेक लेणीं खोदलेलीं आहेत. सोपाऱ्याच्या व्यापाऱ्यांचे दानलेख कार्लें, नाशिक वगैरे लेण्यांत खोदलेले आहेत. ह्या सर्व साधनांवरून या स्थानाचें सांस्कृतिक व धार्मिक माहात्म्य आणि ऐहिक वैभव हीं सिद्ध होतात.

शूर्पारकांत जसें सोपारा तसें अष्टागरांत चौल. चौलचें प्राचीन नांव चंपावती. चंपा नांवाच्या राजाचें येथें राज्य होतें, त्यावरून या गांवास हें नांव पडलें, अशी दंतकथा आहे. कोणी सांगतात कीं या भागांत चांफ्याचीं झाडें विपुल असल्यामुळें त्यावरून हें नांव पडलेलें आहे. येथें च्यवन ऋषींचा आश्रम होता. त्यावरून चेऊल हें नांव सिद्ध झालेलें आहे असेंही सांगण्यांत येतें. चौल शेजारींच रेवदंडा बंदर आहे. हीं विख्यात गांवें इतकीं निकट आहेत कीं रेवदंड्याला 'खालचें चौल' म्हणतात. रेवदंड्याभोंवतालच्या प्रदेशाला रेवतीक्षेत्र अशी संज्ञा आहे. रेवती ही बळरामाची पत्नी. कृष्णानें हा प्रदेश तिला आंदण दिला होता अशी कथा आहे. बखरकार सांगतात कीं दुसऱ्या शतकांत चौल येथें सोळा लाख

घरें, तीनशेंसाठ देवळें व तेवढींच तळीं होतीं. यांपैकीं ४४ देवळांचीं नांवें पुराणांत दिलेलीं आहेत. यांपैकीं पांच देवळें आज अस्तित्वांत आहेत. यांपैकीं रामेश्वरमंदिर विशेष प्रसिद्ध आहे. खुद्द शंकरानें तीनच स्थानीं लिंगस्थापना केलेली आहे ; कन्याकुमारीनजीक रामेश्वर येथें, गोकर्ण महाबळेश्वरास आणि चंपावतीच्या रामेश्वरमंदिरांत. या मंदिरासमोर पर्जन्य, वायु व अग्नि या वैदिक देवतांचीं कुण्डें आहेत. हीं कुण्डें मातीनें भरलेलीं असतात. विशिष्ट नैसर्गिक आपत्तींतून संरक्षण मिळविण्यासाठीं तीं विधिपूर्वक उघडण्यांत येतात. अग्नि व वायु प्रलय मांडतील तेव्हां तीं तीं कुण्डें उघडावींत असा संकेत आहे ; हीं कुण्डें उघडल्याचा दाखला मिळत नाहीं. १७३१, १८५७, १८७७ व १८९९ सालीं अवर्षणें पडलीं होतीं, तेव्हां पर्जन्यकुण्ड उघडण्यांत आलें होतें आणि त्यामुळें या प्रदेशांत पुरेसा पाऊस पडला असें सांगतात. कुण्ड उघडणें म्हणजे त्यांतील माती काढून तेथें होम-हवन करणें. कुण्ड उघडतांना पहिली कुदळ घालतो तो बळी जातो अशी समजूत व दाखले असल्यामुळें क्षुद्र संकटांत समर्थी त्यांच्या शक्तीला आवाहन करण्यांत येत नाहीं. सोपाऱ्याप्रमाणें चौलच्या आसपास अनेक बौद्ध लेणीं आहेत आणि येथें एका मध्ययुगीन जैन मंदिराचेही अवशेष आढळले आहेत.

आतां या दोन्ही स्थानांना निकृष्टावस्था प्राप्त झालेली आहे. आधुनिक मुंबईच्या तोडीचा दर्जा या स्थानांना प्राचीन काळीं प्राप्त झाला होता, याचें कारण कोणतें ? आणि नंतर या शहरांचें वैभव नष्ट झालें याचीं कारणें कोणतीं ?

भरभराटीचें कारण व्यापार आणि निकृष्टावस्थेचें कारण फिरंग्यांच्या स्वाऱ्या.

प्राचीन काळीं उत्तर हिंदुस्थानच्या पश्चिमेकडील परदेशांत होणारा व्यापार गांधारांतील घाटांतून मध्य आशियामार्फत खुष्कीच्या मार्गांनीं चालत असे. अशोकाचें साम्राज्य कोलमडल्यामुळें आणि मध्य आशियांतील टोळ्यांच्या उग्र हालचालींमुळें हे मार्ग बंद झाले. एकाएकीं दडपण आलें किंवा निघालें म्हणजे तोंवर तुंबलेलीं वैमनस्यें उसळी घेतात. अशोकाच्या

आयुष्याच्या उत्तरार्धांतच त्याचा दरारा ओसरूं लागला होता. अशोकाच्या मृत्यूनंतर मौर्य साम्राज्याची फाळणी झाली आणि चंद्रगुप्तानें निर्माण केलेली नियंत्रणशक्ति नष्ट झाली. अलेक्झँडरच्या स्वारीचे वेळीं हिंदुस्थानच्या सरहद्दीवर व मध्य आशियांत स्थायिक झालेले ग्रीक प्रबळ झाले आणि शक व कुषण जातींचे संघर्ष सुरू झाले. मला वाटतें या काळांत तिकडे दीर्घकालीन अवर्षण पडलें असावें आणि त्याची पीडा कश्यपसमुद्रापर्यंतच्या प्रदेशाला भोंवली असावी; तसें नसतें तर या लढवय्या जमातींचें संचारक्षेत्र एकाएकीं इतकें विस्तीर्ण व त्यांचें वैमनस्य इतकें तीव्र होतें ना. व्यापार नेहमीं सुरक्षित व सोईस्कर मार्गांच्या आणि संपन्न बाजार-पेठांच्या शोधांत असतो. खुष्कीचे मार्ग बंद झाल्यामुळें स्थगित झालेला व्यापार पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांकडे लोटूं लागला; कारण हिंदुस्थानांत त्या काळांत निर्माण व निर्यात होणाऱ्या मालाची बाजार-पेठ भूमध्य समुद्राभोंवतालच्या संपन्न देशांत होती. हिंदुस्थानांतील सत्तेचीं केंद्रें उत्तरेंत होतीं, तोंवर भडोचची भरभराट होती. भारतीय सामर्थ्याचें केंद्र सातवाहनांनीं दक्षिणापथांत प्रस्थापित केल्यानंतर त्यांच्या राज्याला सोइस्कर अशीं सोपारा, कल्याण व चौल हीं बंदरें भरभराटलीं. सोपाऱ्याच्या उत्तरेस वैतरणा व दक्षिणेस उल्हास या नद्यांचीं मुखें आहेत. चौलच्या उत्तरेस अंबा व दक्षिणेस कुण्डलिका या नद्यांचीं मुखें आहेत. सोपाऱ्यापासून कल्याण मुरबाडवरून नाणें घाटांतुन जुन्नर व नाशिकपर्यंत आणि चौलपासून कोंकणदरवाजानें काल्यांवरून तगर व पैठणपर्यंत व्यापारी रहदारी सुरू झाली. वैजयन्तीचा व्यापारही याच बंदरांमार्फत होत असला पाहिजे. कान्हेरी, नाशिक, व कार्लें येथील लेणीं व या लेण्यांतील लेख या प्रदेशाच्या समृद्धीला व या भागांतून होणाऱ्या व्यापाराला साक्षी आहेत. व्यापाराच्या ओघा-बरोबर वाहत येणारी संपत्ति या बंदरांत एवढी सांचूं लागली कीं हा भाग सुवर्णभूमि या संज्ञेनें ओळखण्यांत येऊं लागला. बायबलांत उल्लेखिलेल्या ओफीर, सोफीर या सुवर्णसंपन्न शहराची ओळख सोपाऱ्याशीं अलीकडेच पटविण्यांत आलेली आहे. आमच्या प्राचीन राज्यकर्त्यांनीं,

त्यांच्या सल्लागार मंत्र्यांनीं व व्यापार-नियंत्रकांनीं या स्थानांची निवड किती दूरदृष्टीनें केली होती हें मुंबईच्या अर्वाचीन भरभराटीवरून आपणांस आतां सहज पटतें. सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी आपण उभारलेल्या या बंदरांतून सुमारें दीड हजार वर्षेंपर्यंत व्यापार अव्याहत-पणें चालला होता. पुढें महाराष्ट्रांत तुर्काण झालें; या राज्यक्रांतीचा परिणाम महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनावरही झाला. महाराष्ट्राचा व्यापार मीठमिरचीपुरता मर्यादित झाला आणि पठारावरील समृद्धीवर अवलंबून असलेलीं कोंकणांतील बंदरें गतवैभव झालीं. जी धुगधुगी राहिली होती ती मुसलमानांनीं व पोर्तुगीजांनीं लुटालूट व जाळपोळ करून मुरगळून होरपळून टाकली. याच सुमारास महाराष्ट्रांत अनेक दुष्काळ लागोपाठ पडले; त्यांमुळें या भागांतील वस्तीही पांगली. या सर्व कारणांमुळें हीं बंदरें एवढीं उध्वस्त झालीं कीं तेथील बंदरांचे आणि प्राचीन व मध्ययुगीन इमारतींचे अवशेषही आतां आढळत नाहींत. शूर्पारक व चौल येथील लोकसंख्या, संपन्नता व व्यापार यांबद्दलचे पाश्चिमात्य प्रवाशांनीं केलेले अंदाज पहा; मग एखाद्या अर्थशास्त्रज्ञाला विचारा कीं ज्या बंदरांत एवढी लोकसंख्या असेल व एवढा व्यापार चालत असेल, अनेक शतकें चालत असेल, तेथें अवशिष्ट संपत्ति किती रहात असेल! एखाद्या स्थापत्यशास्त्रज्ञाला विचारा कीं कान्हेरी, घारापुरी वगैरे आसमंतांतील ठिकाणीं असलेलीं शिल्पकृत्यें निर्माण करण्यासाठीं किती पिढ्यांना आपल्या शक्ति केंद्रित कराव्या लागल्या असतील व त्यांसाठीं किती संपत्ति ओतावी लागली असेल! एखाद्या शासनतज्ज्ञाला विचारा कीं या भागांत आहेत या शिल्पकृत्याच्या पाठीशीं असलेली राजकीय संघटना किती उच्च दर्जाची असेल! या भागांतील लेण्यांतील व मंदिरांतील वास्तु व लेखांतील स्थलनामें पहा आणि भूगोल व समाजशास्त्रज्ञांना विचारा कीं ही संस्कृति कोणाची? आणि खात्री करून घ्या कीं ही समृद्धि व संस्कृति, सामर्थ्य व संघटना महाराष्ट्राची, महाराष्ट्राचीच आणि यांची अर्वाचीनाशीं तुलना करून पहा, म्हणजे प्रत्ययास येईल कीं महाराष्ट्रांतील प्राचीन व मध्ययुगीन

राज्यें स्वतंत्र व समर्थ होतीं तोंवर आणि तोंवरच या भागांत समृद्धि नांदत होती आणि ती महाराष्ट्राच्या कक्षेबाहेरच्या देशांवर अवलंबून नव्हती.

## सागर-संस्कृतीशीं संघर्ष :

हिंदुस्थानच्या राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक इतिहासावर पश्चिम समुद्रकिनाऱ्यानें महत्त्वाचे परिणाम घडवून आणलेले आहेत; आणि महाराष्ट्रावरही; प्राचीन काळीं, मध्ययुगांत आणि अर्वाचीन काळींही.

हिंदुस्थानचा पश्चिम किनारा हिंदुस्थानला जगापासून तोडतो व जोडतोही. या किनाऱ्यावर जागोजाग पश्चिमेचीं महाद्वारें आहेत आणि त्यांना सह्याद्रीचा अडसर आहे.

हिंदुस्थानचा पश्चिम किनारा कराचीपासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेला आहे. यापैकीं फक्त महाराष्ट्रालगतच्या किनाऱ्याकडे आपणांस दृष्टिक्षेप करावयाचा आहे आणि विषयाच्या सूत्रापुरता इतरत्र.

पश्चिम किनाऱ्याच्या प्रभावाचें मोल मापण्यासाठीं आपणांस प्रथम आजूबाजूंस पाहिलें पाहिजे.

ॲटलांटिक, पॅसिफिक व हिंदी हे जगांतील मुख्य महासागर. पाश्चिमात्य राष्ट्रांनीं आपआपल्या विकासाच्या योजनांच्या अनुरोधानें ॲटलांटिक व पॅसिफिक महासागर, त्यांभोंवतालचे किनारे व लगतचे प्रदेश यांची सूक्ष्म पाहणी विविध शास्त्रांतील तज्ज्ञांमार्फत करविलेली आहे; विशेषतः गेल्या व चालू शतकांत. या योजनांना व्यावहारिक स्वरूप देण्यांत येऊं लागलें तेव्हांपासून ब्रिटिश साम्राज्याच्या प्रभावामुळें आंतरराष्ट्रीय स्पर्धाक्षेत्रांपासून अलिप्त असलेल्या व असल्यामुळें, हिंदी महासागराचा सर्वांगीण अभ्यास अजून झालेला नाहीं. चालू शतकाच्या आरंभीं लॉर्ड कर्झन यांनीं सुएज-सिंगापूर योजना आंखली; तेव्हापासून ब्रिटिश शास्त्रज्ञांचें लक्ष या महासागराकडे वळलें. असें असलें तरी एवढें मात्र खरें कीं सुधारलेल्या जगाचें लक्ष प्रथम कोणत्या महासागराकडे व किनाऱ्याकडे वळलें असेल, तर तें हिंदी महासागराकडे व पश्चिम किनाऱ्याकडे.

याचें मूलकारण हिंदी महासागराची नैसर्गिक स्थिति आणि हिंदुस्थानची समृद्धि.

ॲटलांटिक, पॅसिफिक व हिंदी या तीन महासागरांत जगावरील जलप्रदेश विभागलेला आहे ; त्याचप्रमाणें जगावरील भूप्रदेश दोन महाद्वीपांत विभागलेला आहे. युराफ्रेशिया व अमेरिका. भौगोलिक दृष्ट्या ऑस्ट्रेलियाचा समावेश युराफ्रेशियांतच करावयाचा ; पण हें खण्ड तुटक व सुधारलेल्या आधुनिक पाश्चिमात्यांनीं व्यापलेलें, म्हणूनच त्याला स्वतंत्र स्थान देण्यांत येतें. आफ्रिका खण्ड फार प्रचण्ड व त्यांतील आदिवासी फार मागासलेले ; म्हणून त्यांना वगळून आपल्या महाद्वीपाला युरेशिया ही संज्ञा देण्यांत आलेली आहे. शिवाय वंश व मूलसंस्कृति या दृष्टींनींही ही संज्ञा योग्य आहे आणि प्रस्तुत विषयाची व्याप्ति एवढीच आहे.

आफ्रिकेच्या दक्षिणेस असलेल्या 'शुभाशा' भूशिरापासून ऑस्ट्रेलियाच्या टास्मानिया बेटापर्यंत हिंदी महासागराचा विस्तार आहे. या प्रचंड व्यासावर आधारलेला अर्धवर्तुलासारखा या महासागराचा आकार आहे. हा महासागर एवढा प्रचंड असला तरी व्यावहारिक दृष्ट्या तो विस्तीर्ण भूप्रदेशांनीं वेष्टित आहे. ॲटलांटिक व पॅसिफिक यां-सारखा या ध्रुवापासून त्या ध्रुवापर्यंत पसरलेला नाहीं. हिंदी महासागराच्या किनाऱ्यावरले प्रदेश आकारानें द्वीपकल्पांसारखे आहेत. खुद्द आफ्रिका खंडाचा आकार असाच आहे. हे प्रदेश कोठें समुद्रांत घुसलेले आहेत तर कोठें या प्रदेशांत समुद्र घुसलेला आहे. सिंधुसागर व गंगासागर हे या महासागराचे मुख्य उपसागर. सिंधूच्या मुखा-पर्यंतचा सिंधुसागराचा उत्तर किनारा खडकाळ व नापीक आहे. सिंधची सुबत्ता ही सिंधूची कृपा. सिंधुसागराचा सह्याद्रीलगतचा कुण्डलिकेपासून शरावतीपर्यंतचा किनाऱ्यालगतचा प्रदेश खडकाळ आहे व अगदींच नापीक नसला तरी सुपीकही नाहीं. या किनाऱ्या-वरचा मलबार व त्रावणकोर हा भाग सुपीक असून त्याची नैसर्गिक ठेवण मद्रास इलाख्याच्या पूर्व किनाऱ्यावरील प्रदेशासारखी आहे. नर्मदा व तापी या दक्षिण पठारावरील मुख्य पश्चिमवाहिनी नद्या. येथून दक्षिणेकडे कन्याकुमारीपर्यंतच्या प्रदेशांत अनेक पश्चिमवाहिनी नद्या

आहेत. त्या क्षुद्र आहेत. फक्त पावसाळ्यांत पाणलोटासारख्या वाहणाऱ्या आहेत. या नद्यांच्या द्रुत प्रवाहामुळें पश्चिम किनारा जागोजाग तुटलेला आहे. या नद्यांनीं या किनाऱ्यावर अनेक छोटींमोठीं बदरें निर्माण केलेलीं आहेत. त्याचप्रमाणें पावसाळ्यांत वाहून आणलेल्या चिखलानें अनेक प्राचीन प्रसिद्ध बंदरांचे उतार उथळ व नौकानयनाला निरुपयोगी केलेले आहेत. सिंधुसागर व गंगासागर या दोन्ही उपसागरांवर मोसमी वातप्रवाहांचा अमल आहे. या वाऱ्यांबरोबर समुद्राच्या अंतर्भागांतही प्रवाह निर्माण होतात आणि नौकानयनाला त्यांचें साहाय्य घेतां येतें. गंगासागरांत घुमतात तशीं वातचक्रें मात्र सिंधुसागरांत सहसा आढळत नाहींत. इराणी व अरबी किंवा ताम्रसमुद्र हीं सिंधु-सागराचीं मुख्य आखातें. हुरमुझ बंदराजवळ इराणच्या आखाताचें दक्षिण मुख बाटलीच्या गळ्यासारखें आंवळलेलें आहे. मेसापोटेमियाच्या मैदानांतून वाहणाऱ्या युफ्राटिस व तैग्रिस या नद्या या आखाताला बसरा शहराजवळ मिळतात. तांबड्या समुद्राचें तोंड एडननजीक असेंच आंवळलेलें आहे. हिंदी महासागरांत नांव घेण्यासारखीं मोठीं व हिंदुस्थानच्या दृष्टीनें महत्त्वाचीं अशीं फारशीं बेटें नाहींत. आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील बेटांशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. इतरत्र जीं आहेत तीं मुख्यत्वेंकरून पॅसिफिकच्या सीमेवर, सुमात्रा, जावा वगैरे. अतिपूर्वेकडील या बेटामध्यें हिंदी संस्कृतीचा प्रवेश व विकास झालेला आहे. हिंदुस्थानच्या दक्षिणेस पाचूच्या लोलकासारखें लंका बेट आहे. लंकेची समृद्धि आपल्या इतिहास पुराणांत प्रसिद्ध आहे. हें द्वीप हिंदुस्थानापासून तुटक आहे व राज्यघटनेच्या दृष्टीनें अलग आहे; तरीही हा हिंदुस्थानचाच अविभाज्य विभाग आहे, ब्रह्मदेशाइतका. प्रांतीय स्पर्धेमुळें आपण या भागांना पारखे झालों आहों. अरबी आखाताच्या मुखाशीं सोकोत्रा बेट ( सुखधारा ) आहे. काठेवाडच्या दक्षिणेस दीव आणि पश्चिम किनाऱ्यालगत मुंबई, जंजिरा, गोवें व अंजिदिव ( आद्यद्वीप, अंजनीद्वीप? ) हीं बेटें आहेत. या बेटांमुळें हिंदुस्थानचा सागर-संस्कृतीशीं संघर्ष झाला.

भौगोलिक दृष्ट्या संस्कृतींचे दोन वर्ग पडतात : सरिता-संस्कृति व

सागर-संस्कृति. पैकीं सरिता-संस्कृति विशेष प्राचीन. सरिता-संस्कृती-पेक्षां सागर-संस्कृतींत मानवी कर्तृत्वाचा भाग अधिक. या संज्ञा दर्शवितात तेवढ्या शुद्ध स्वरूपांत त्या आपल्याला क्वचितच पहावयास मिळतात. कोठें त्या परस्परांशीं संमिश्र होतात तर कोठें वन्य संस्कृतींशीं. पर्वतांनीं परिवेष्टित अशा अगम्य वा अलग प्रदेशांत संस्कृतीचा उद्भव किंवा विकास सहसा होत नाहीं.

चारितार्थासाठीं चल-कृषि किंवा गोपालन करीत भटकणाऱ्या टोळया निसर्गतः समृद्ध प्रदेशांत स्थिर होतात. समृद्धीच्या निर्मिती-साठीं व उपभोगासाठीं समाज स्थायिक होतात. शेती ही नियोजित उत्पादनाची प्राथमिक अवस्था. अवशिष्ट उत्पादनामुळें संपत्तीचा संचय होतो व विनिमय सुरू होतो. वाहतुकीचीं व व्यापाराचीं साधनें निर्माण होतात; राजकीय, आर्थिक, सामाजिक, धार्मिक संकेत व संस्था उत्क्रांत होतात. या संस्थांचा संघटित समुच्चय म्हणजे संस्कृति. भिन्न प्रकृतींच्या सहवासामुळें संस्कार व भिन्न हितसंबंधांच्या स्पर्धेमुळें संघर्ष निर्माण होतात. संस्कारांची घानिष्ठता, संघर्षांची तीव्रता आणि जनतेची ग्रहणक्षमता व प्रतिकारक्षमता यांवर संस्कृतीचें संवर्धन अवलंबून असतें. उत्थापन व आक्रमण आणि नियंत्रण व संरक्षण या क्रिया प्रतिक्रियांच्या प्रभावामुळें संस्कृति निर्माण व उत्क्रांत होत असते.

संस्कृतीचा उत्कर्ष व विस्तार सरितेच्या धारणाशक्तीवर अवलंबून असतो; भोंवतालच्या सुपीक भूप्रदेशाच्या विस्तारावर, संस्कृतीच्या प्रवर्तकांच्या कर्तृत्वावर आणि अनुयायांच्या प्रतिकारशक्तीवर. नाईल नदीच्या चिंचोळया पण सुपीक खोऱ्यांत इजिप्शियन संस्कृति निर्माण झाली; युफ्राटिस व तैग्रिस या नद्यांच्या विस्तीर्ण व समृद्ध खोऱ्यांत सुमेरियन, असीरियन, बाबिलोनियन, खाल्डियन वगैरे संस्कृति निर्माण झाल्या. प्रादेशिक समृद्धीच्या अनुरोधानें या सरिता-संस्कृति निर्माण झाल्या आणि व्यापारामुळें उत्कर्ष पावल्या; प्रवर्तकांचें कर्तृत्व ओसरल्यामुळें भ्रष्ट झाल्या आणि सागर-संस्कृतींच्या संघर्षामुळें नष्ट झाल्या. मध्य समुद्राभोंवतालच्या नापीक व खडकाळ प्रदेशांत आद्य सागर

संस्कृति निर्माण झाल्या. जणूं सृष्टीच्या अवकृपेमुळेंच मानवी कर्तृत्वाचा विकास झाला. चारितार्थाला अन्य साधन नसल्यामुळें आणि संपन्न देशांच्या व्यापारी वाहतुकीशीं संबंध आल्यामुळें या देशांत साहसी दर्यावर्दी वृत्ति निर्माण झाली. या संस्कृतींचें संचारक्षेत्र मर्यादित असल्यामुळें त्या परस्परविरोधी झाल्या. सरिता-संस्कृतींपेक्षां सागर-संस्कृति अधिक आक्रमणशील व प्रतिकारक्षम. भूमध्य समुद्रा-भोंवतालच्या राष्ट्रांपेक्षां अधिक विस्तृत संचारक्षेत्र उपलब्ध असलेल्या सागर-संस्कृति युद्ध व नौकानयन या विभागांतील शास्त्रीय सुधारणांमुळें व शोधामुळें एकाएकीं सांवरल्या व सरसावल्या. पृथ्वी समुद्रवलयांकित असल्यामुळें व्यापारी व लढाऊ जहाजांचें संचारक्षेत्र स्थलचरांहून अधिक विस्तृत व अनिर्बंध. समुद्रालगतच्या देशांच्या किनाऱ्यांचें खडें संरक्षण जवळजवळ अशक्य. यामुळें संरक्षणाहून आक्रमण सुलभ. अवाढव्य सैन्याहून संघटित आरमार अधिक सुरक्षित, सुटसुटीत व कार्यक्षम. आरमाराच्या आधारानें जंजिरे अजिंक्य होतात आणि जरबेनें मोठा व्यापार चालवितां येतो वा हुकमतींत ठेवतां येतो, अपरंपार संपत्ति संपादन करतां येते व दूरदूरचे प्रदेश हस्तगत करतां येतात. हीं सागर-संस्कृतीच्या राजकारणाचीं व अर्थकारणाचीं मूलतत्त्वें त्रिखण्डमण्डलानें वेष्टित अशा भूमध्य समुद्रांत प्रथम सप्रयोग सिद्ध झालीं. पाश्चिमात्यांनीं या सिद्धान्तांचे यशस्वी प्रयोग हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर केले आणि सागर-संस्कृतीच्या संवर्धनाकडे दुर्लक्ष केल्यामुळें या झटापटींत आपण नामोहरम झालों.

ऋग्वेदकालीन आर्यांना नौकायनाची माहिती होती हें निश्चित. वरुण हा आर्यांचा समुद्राधिपति; त्याला नौकानयनाच्या वाटा माहीत होत्या (ऋ. १.२५.७); साहसी लोक समुद्रपर्यटणाला निघत असत (ऋ. १.४८.३); तुग्राचा पुत्र भुज्यू याला समुद्राच्या कामगिरीवर पाठाविण्यांत आलें होतें, तरी तो डरला नाहीं (ऋ. १·११७·१५). समुद्रावरील प्रवास नौकेंतून करण्यांत येत असे (ऋ. १·९७·८); असे अनेक उल्लेख वेदांत आढळतात आणि नौकानयनासंबंधींच्या संज्ञाही. यजुर्वेदांत वाणिज्याचा उल्लेख आढळतो. तरीही या काळांतील नौका-

प्रवास अपवादात्मक व असुरक्षित होता आणि व्यापार मूलभूत गरजां-पुरताच होता, असें अनुमान या उल्लेखांवरूनच निघतें. मनुस्मृतींतही नौकानयनाचे उल्लेख आढळतात. त्याच्या काळांत समुद्रप्रवास सर्वस्वी वायूच्या अधीन होता (मनु. अध्याय ८.४०६). मौर्य—पूर्वकालांत हिंदुस्थानांत निर्माण होणारा कच्चा व पक्का माल मुख्यत्वेंकरून गांधार व अभिसार प्रांतांतून खुष्कीच्या मार्गानें मध्य आशियांतून मेसापोटे-मिया, मिसर व भूमध्य समुद्राभोंवतालच्या देशांकडे रवाना होत असे; कश्यप समुद्राच्या किनाऱ्यावरून आणि युफ्राटिस व तैग्रिस या नद्यांच्या खोऱ्यांतून. म्हणूनच सिंधु संस्कृति व सुमेरियन संस्कृति यांमध्यें साम्यरूप आढळतें. खि. पू. सातव्या शतकाचे सुमारास जल-मार्गानें सुरळीत व्यापारी वाहतूक सुरू झाली. हीं जहाजें हिंदु नावाडी हांकारीत, विशेषतः पश्चिम किनाऱ्यावरले. हीं जहाजें किनाऱ्या-किनाऱ्यानें हांकारण्यांत येत; कारण या वेळच्या नावाड्यांना उघडा समुद्र अज्ञात होता. या काळांत भूमध्य समुद्रांतील व्यापारी वाहतूक फिनिशियन लोकांच्या हातीं होती; आणि मध्य आशियांतील आखाती वाहतूक इराणी व मिसरी लोकांच्या हातीं. या व्यापारामुळें हे देश संपन्न झाले होते. खि. पू. चवथ्या शतकाच्या अंतिम पादांत अलेक्झँडरनें मध्य आशियांतून पंजाबवर स्वारी केली. त्यानें फिनिशियन लोकांचें समुद्रराज्ञी म्हणून विख्यात असलेलें टायर शहर जमीनदोस्त केलें आणि नाईल नदीच्या मुखाशीं अलेक्झँड्रिया शहर वसविलें. ग्रीक सत्ता इराणांत स्थिर व्हावी म्हणून त्यानें स्वतः एका इराणी राजकन्येशीं लग्न केलें आणि आपल्या सैन्यांतील हजारों सैनिकांचीं लग्नें इराणी मुलींशीं लावून दिलीं. जित व जेते यांना समरस करण्याच्या या पद्धतीचा उपयोग पुढें हिंदुस्थानांत मुसलमानांनीं व पोर्तुगीजांनीं केला. हे प्रयोग यशस्वी झाले नाहींत, इतकेंच नव्हे तर त्यांमुळें कटुता मात्र निर्माण झाली. हिंदुस्थानांतून परत जातांना अलेक्झँडरनें सिंधु नद व सिंधुसागरचा उत्तर किनारा यांची पाहणी करविली. त्याच्या या हालचालींवरून दिसतें कीं त्यानें ही स्वारी

केवळ जगज्जेता हें अभिधान मिळविण्यासाठीं केलेली नसून हिंदुस्थानच्या व्यापारावर ग्रीसचें प्रभुत्व प्रस्थापित करण्यासाठीं केलेली होती. अलेक्झँडरच्या योजनांचा फायदा ग्रीसला सुमारें दोनशें वर्षेपर्यंत मिळत राहिला आणि खि. पू. १४६ च्या सुमारास ग्रीस देश रोमच्या ताब्यांत गेल्यानंतर रोमन लोकांना.

अशोकाच्या अमदानींत मध्य आशियांतील खुष्कीचे व्यापारी मार्ग भरभराटींत होते आणि पश्चिम किनाऱ्यावरील भडोच, सोपारा वगैरे बंदरेंही. अशोकानंतरच्या काळात मात्र हिंदुस्थानच्या व्यापाराचा ओघ पश्चिम किनाऱ्याकडे वळला आणि एकदां जो वळला तो कायमचाच.

या स्थित्यंतराच्या मुळाशीं अनेक कारणें होतीं. मध्य आशियांतील राजकीय अस्थैर्य व उत्तर हिंदुस्थानांतील राजकीय दौर्बल्य. हिंदुस्थानांतील चक्रवर्तिपदाची महाराष्ट्रांत प्रतिष्ठान येथें प्रस्थापना झाली आणि व्यापारी भरभराटीसाठीं सातवाहनांनीं केलेल्या योजना आणि त्यांच्या अमदानींत झालेली नौकानयनशास्त्रांतील प्रगति. सातवाहनाच्या प्रयत्नांमुळें व पुरस्कारामुळें पश्चिम किनाऱ्यावरील सोपारा, चौल व कल्याण हीं बंदरें विशेष भरभराटलीं. या बंदरांकडे लोटणाऱ्या वाहतुकीच्या सोयीसाठींच त्यांनीं जुन्नरनजीक नाणेघाट खोदविला. समुद्रावरील प्रभुत्वाविषयीं सातवाहन राजे किती जागरूक व उत्सुक होते याविषयीं येथें दोनच प्रमाणें सांगतों. नाशिकच्या गोतमीपुत्रविहारांतील शिलालेखांत गौतमी बालश्रीनें गोतमीपुत्राला ‘ त्रिसमुद्रपीततोयवाहन ’ म्हटलेलें आहे ; आणि आपल्या समुद्रावरील सत्तेचें प्रतीक म्हणून सातवाहनांनीं नौकाचिन्हांकित नाणीं पाडलेलीं आहेत. सातवाहनकालांत भडोच व कल्याण या बंदरांवरील प्रभुत्वासाठीं झालेल्या संघर्षाचा उल्लेख पूर्वी येऊन गेलेलाच आहे. पश्चिम किनाऱ्यावरील व्यापार कबजांत ठेवण्यासाठीं पाश्चिमात्यांनीं किती प्रयत्न केले आणि हा व्यापार किती किफायतशीर होता याची कल्पना येण्यासाठीं कांहीं प्रत्यंतरें देतों. मिसरच्या टॉलेमी घराण्यांतील पहिला राजा टॉलेमी यानें अलेक्झँड्रिया बंदरांत ये-जा करणाऱ्या नावाड्यांच्या सोयीसाठीं एक प्रचंड दीपगृह उभारलें. त्याचा मुलगा टॉलेमी

फिलाडेल्फस (खि. पू. २८५ ते २४७) यानें हिंदुस्थानचा व्यापार तांबड्या समुद्रांतून परस्पर नाइल नदीकडे वळविण्यासाठीं सुएझच्या सामुद्रधुनीवर शंभर हात रुंद व तीस हात खोल असा कालवा खोदण्यास सुरुवात केली; त्याची योजना तडीस गेली नाहीं हा भाग निराळा. खि. पू. दुसऱ्या शतकाच्या मध्यापासून खिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या अखेरीपर्यंत दक्षिण हिंदुस्थानचा रोमबरोबरचा व्यापार फार भरभराटींत होता. या काळांत हिंदुस्थानांत आयात झालेल्या रोमन सुवर्णमुद्रा जागोजाग मिळालेल्या आहेत. त्याचप्रमाणें अलीकडे महाराष्ट्रांत जागोजाग झालेल्या उत्खननांत रोमन संबंध दर्शविणाऱ्या अनेक वस्तु उपलब्ध झाल्या आहेत. हिंदुस्थानांत विणलेलें तलम रेशमी व सुती कापड रोममध्यें भारंभार सोन्याच्या मोलानें विकण्यांत येत असे! सुवर्णनिर्यातीमुळें राष्ट्र भिकेला लागेल आणि चैनी वृत्तीमुळें राष्ट्रीयत्वाची भावना नष्ट होईल, अशा धोक्याच्या सूचना अनुभवी अर्थशास्त्रज्ञांनीं व दूरदर्शी देशभक्तांनीं रोमन जनतेला वारंवार दिल्या होत्या; पण सत्ता व संपत्ति यांच्या मदानें धुंद झालेल्या उन्मत्तांना कोण आवरणार?

हिंदुस्थानचा परदेशी व्यापार पश्चिम किनाऱ्यावर केंद्रित झाला. कारण हिंदुस्थानांत निर्माण होणाऱ्या व पुरून उरणाऱ्या जीवनावश्यक व चैनीच्या वस्तूंना मागणी करणारे देश पश्चिमेकडे होते, मुख्यत्वेंकरून समुद्रापलीकडे होते. याहून महत्त्वाचें कारण, हिप्पालस या नाखव्यानें (४७ ई.) लावलेला मोसमी वाऱ्यांचा शोध. अरबी समुद्रांत हे मोसमी वारे हंगामांच्या अनुरोधानें परस्पर विरुद्ध दिशांना वहात असतात. पावसाळ्यांत नैर्ऋत्य वारे सुरू झाले म्हणजे लाल समुद्रांतील बंदरांतून कोंकणाकडे निघावयाचें आणि हिंवाळ्यांत ईशान्य वारे सुरू झाले कीं परत फिरावयाचें. या शोधामुळें नावाड्यांना उघड्या समुद्रातून गलबतें हांकरतां येऊं लागलीं; निश्चित वेळीं सुरक्षित प्रवास करतां येऊं लागला. पहिल्या व दुसऱ्या शतकांत प्लिनी व टॉलेमी यांनीं दक्षिण हिंदुस्थानांतील व किनाऱ्यावरील व्यापारी ठाण्यांचा व बंदरांचा तपशील दिलेला आहे. त्यावरून या काळीं हे

भाग लमाणी तांड्यांनीं व गलबतानीं कसे गजबजलेले होते याची कल्पना करतां येते. मोसमी वाऱ्यांच्या प्रवाहांची ओढ दक्षिणेकडे असल्यामुळें एव्हांपासून मलबार किनाऱ्याकडची वर्दळ विशेष वाढली; शिवाय तो मुलूख इकडल्यापेक्षां समृद्ध आहेही.

सातवाहनांच्या अमदानींतही पश्चिम किनाऱ्यावर लुटारूंचा धुमाकूळ चालू होता. प्राचीन पाश्चिमात्य प्रवाशांनीं या भागाला 'चांचांचा किनारा' असेंच नांव दिलेलें आहे. सातवाहनांची सत्ता नष्ट झाल्यानंतरच्या अराजकांत चांचांचा उपद्रव वृद्धिंगत झाला असला पाहिजे. सातवाहनांनंतरच्या महाराष्ट्राच्या राज्यकर्त्यांनीं पश्चिम किनाऱ्याचें अवधान सांभाळलेलें दिसत नाहीं. चालुक्यांनीं मौर्यांवर घारापुरीच्या आरमारी युद्धांत जय मिळविला असा उल्लेख आढळतो; पण त्यावरून असा मात्र निष्कर्ष काढतां येत नाहीं कीं पश्चिम किनाऱ्यावर चालुक्यांचें खडें आरमार होतें किंवा दर्यावर्दी वाहतुकीवर त्यांची नजर होती. सातवाहनोत्तर कालांत राज्यकर्त्यांच्या दौर्बल्यामुळें किंवा दुर्लक्षामुळें पश्चिम किनाऱ्याला परित्यक्त भूमीचा दर्जा प्राप्त झाला. कोणींही यावें, लुटालूट करून परत जावें किंवा वसाहती करून स्थायिक व्हावें असा प्रकार सुरू झाला. कदम्ब व शिलाहार हे दक्षिण व उत्तर कोंकणांचे अधिपति. त्यांच्या पदरीं आरमारें असलींच पाहिजेत; पण त्यांचा उपयोग यांनीं क्षणिक स्वसंरक्षणापलीकडे केलेला दिसत नाहीं. शिरके, मोरे वगैरे किनाऱ्यालगतच्या प्रदेशांतल्या स्वतंत्र व सामन्त सत्ताधाऱ्यांच्या पदरीं लहानमोठीं आरमारें होतीं. त्यांचा उपयोग त्यांनीं चांचेगिरीपलीकडे केलेला दिसत नाहीं. चालुक्य, राष्ट्रकूट व यादव या मुख्यत्वेंकरून मैदानी सत्ता होत्या. स्वराज्याला लागून असलेल्या समुद्राकडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं. यामुळें मध्ययुगाच्या आरंभींच पश्चिम किनाऱ्यावरील व्यापार व वाहतूक हीं अरबांच्या हातीं गेलीं. बहामनी व दक्षिणी शाह्यांनींही समुद्राकडे लक्ष दिलें नाहीं. गुजरात-सुलतानांनीं अधिक लक्ष दिलें एवढेंच. मुसलमान यात्रेकरूंना मक्केची यात्रा सुरक्षितपणें करतां यावी, एवढ्यापुरतेंच त्यांचें समुद्राकडे लक्ष होतें. सबंध कोंकणांतली मोठी मशीद

दाभोळची. तिचाही संबंध मक्केच्या यात्रेशीं जडलेला आहे. दाक्षिणी इस्लामी राज्यकर्त्यांची ही मागणी अरब नाखवे पुरवीत होते. तेही मुसलमान असल्यामुळें यात्रेकरूंना उपसर्ग होण्याचा संभव नव्हता आणि एवढ्यावर हे राज्यकर्ते संतुष्ट होते. या दीर्घकालीन व्यवधानामुळें व अंदाधुंदीमुळें सुसंघटित सागर-संस्कृतीशीं संघर्षाचे प्रसंग आले तेव्हां तेव्हां आपल्याला अपजय आलेला आहे.

सागर-संस्कृतीचा पुरस्कार करणाऱ्या परकीयाचीं पश्चिम किनाऱ्यावरील आक्रमणें यशस्वी झालीं याचीं आणखीही कारणें आहेत. हीं आक्रमणें बहुशः अशाच काळांत झालेलीं आहेत कीं जेव्हां हिंदुस्थानातील अंतर्गत राजकीय परिस्थिति घालमेलीची होती. सातकर्णी व खारवेल यांच्या स्पर्धेचा व संघर्षांचा फायदा यवनांनीं घेतला आणि भडोचला ठाणें मांडलें. बहामनी घराणें दुर्बल झालें व लयाला गेलें आणि आदिलशाही अद्याप स्थिर झालेली नव्हती त्या सुमारास पोर्तुगीजांनीं गोवें कबजांत घेतलें. अहमदनगरची निजामशाही मृत्युपंथास लागली, त्या सुमारास जंजिरा शिद्दयांच्या हातीं गेला. शिवाय पश्चिम किनाऱ्यावरील आक्रमणें अशाच ठिकाणीं झालेलीं आहेत कीं जेथें किनारा फाटलेला असल्यामुळें खाड्यांमध्यें जहाजांना निसर्गनिर्मित आश्रयस्थानें होतीं. दमण, वसई, रेवदंडा व गोवें हीं कोंकणांतील पोर्तुगीजांचीं ठाणीं; मुंबई, सुरत वगैरे इंग्रजांचीं ठाणीं आणि शिद्दीची राजधानी जंजिरा; हीं स्थानें खाड्यांच्या मुखांशीं फाटलेल्या किनाऱ्यालगत आहेत. सह्याद्रींत उगम पावणाऱ्या पश्चिमवाहिनी नद्यांना प्रत्येक पावसाळ्यांत येणाऱ्या पुरांच्या माऱ्यामुळें पश्चिम किनारा जागोजाग फाटलेला आहे. यामुळें आक्रमकांना आश्रयस्थानें मिळालीं; एवढेंच नव्हे, अंतर्गत मुलखावरही कबजा करणें त्यांना शक्य झालें. दक्षिण कोंकणांत सह्याद्रीच्या अनेक शाखा आहेत. ह्या डोंगराळ प्रदेशांत पूर्वी दाट जंगल होतें आणि वस्ती तुरळक होती. केंद्रसत्ता संघर्षांत गुंतलेल्या असल्यामुळें इकडला राज्यकारभार ढिला होता. या अडचणींचा फायदा आक्रमकांना मिळाला आणि त्यांचें उच्चाटण करण्यापुरतें स्वास्थ्य मध्यवर्ती सत्तेला केव्हांही मिळालें नाहीं.

महंमद पैगंबरानें (५७०–६३२) ओसाड अरबस्तानांत इस्लामची स्थापना केल्यामुळें मध्य आशियांत नवचैतन्याचा संचार झाला. खलीफ उमरनें (६३४–६४४) खिस्ती धर्मक्षेत्र जेरुसलेम व इजिप्तची राजधानी अलेक्झँड्रिया हीं शहरें जिंकलीं आणि इराणची बादशाही बुडविली. खलीफ उस्मान (६४४–६५५) यानें प्रचण्ड आरमार उभारून ग्रीक व रोमन लोकांच्या हातीं असलेलीं भूमध्यसमुद्रांतलीं ठाणीं काबीज केलीं. मुसलमानी धर्म स्वीकारून राज्यकर्त्यांशीं समरस व्हावें अगर अपमानकारक अटींवर जिवंत राहण्याच्या तात्पुरत्या सवलतीसाठीं विधर्मीयांनीं जिझिया कर द्यावा, अशी कडक शिस्त खिलाफतींत अमलांत आली. या धर्मछळामुळें त्रासलेले अग्निपूजक पारशी इराण सोडून हिंदुस्थानांत आले व पश्चिम किनाऱ्यावर स्थाईक झाले. खलीफ अबदुल मलिक याच्या एका सरदारानें जिब्राल्टरचा डोंगर काबीज करून त्यावर किल्ला (६८४) बांधला; येथून चढाई करून मुसलमानांनीं स्पेन देश काबीज (७११) केला. यापुढें आठशें वर्षें स्पेन देश मुसलमानांच्या ताब्यांत राहिला. खलीफ उमरच्या कारकीर्दींत अरबांची एक टोळी समुद्रमार्गें पश्चिम किनाऱ्यावर उतरली आणि ठाण्याभोंवतालीं लुटालूट करून (६३७) परत गेली. महंमद बिन कासीम यानें खुष्कीच्या मार्गानें सिंधवर स्वारी (७११) केली आणि हिंदुस्थानांत पहिलें मुस्लिम राज्य स्थापन केलें. हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर व सिंधूच्या कांठावर देवल नांवाचें बंदर होतें. येथील देवालयांतील ब्राह्मणांनीं मुसलमानी धर्म स्वीकारण्याचें नाकारल्यामुळें त्यांची कत्तल करण्यांत आली. सिंध प्रांतांत मुसलमानांनीं धर्माच्या बाबतींत अतोनात जुलूम केल्यामुळें खवळलेल्या रजपुतांनीं उठावणी करून या राज्याची वासलात लावली. कासीमच्या फौजेबरोबर आलेले व्यापारी पेशाचे अरब मात्र सिंधेंत स्थायिक झाले. नवव्या शतकांत पश्चिम किनाऱ्यावरील मलबार देशांत चेरमण पेरुमाळ नांवाचा राजा होता. दंतकथा सांगते कीं अरब नावाड्यांबरोबर आलेल्या कांहीं साधूंनीं या राजाचें मन मुसलमानी धर्माकडे वळविलें. गुप्त रीतीनें एक जहाज सिद्ध करवून त्यांतून हा राजा मक्केस रवाना झाला. तेथें त्यानें मुसलमानी धर्म स्वीकारला. तो

अरबस्तानांतच मरण पावला. मृत्यूपूर्वी त्यानें मलबारांत मुसलमानी धर्माचा प्रसार करण्याविषयीं आपल्या स्नेह्यांना आग्रहाची विनंति केली आणि मशिदीसाठीं जागा व उत्पन्नें तोडून देण्याविषयीं आपल्या वारसांना विनंती करणारीं पत्रें त्यांच्या हवालीं केलीं. हीं पत्रें घेऊन अरब लोक मलबारांत आले. धर्मच्युत असला तरी तो पूर्वज असल्या-मुळें त्याच्या आज्ञा वारसांनीं मान्य केल्या आणि मुसलमानांना मशिदी बांधून दिल्या. दंतकथा खरी असो, खोटी असो, एव्हांपासून पश्चिम किनाऱ्यावर मुसलमान स्थायिक झालेले आढळतात, हें मात्र खरें; आणि या वेळीं महाराष्ट्राच्या किनाऱ्यावर स्थायिक होण्याचें साहस त्यांना झालें नाहीं, हेंही तितकेंच खरें. पुढें या मुसलमानांनीं तेथील हिंदु स्त्रियांशीं लग्नें केलीं. मलबारांतील मापले हे या घटांचे उद्धट वंशज.

अरब लोक धर्मप्रसारासाठीं आवेशानें सिद्ध झाले होते; व्यापार-वृद्धीसाठींही ते तितकेच उत्सुक होते. स्ट्रॅबो सांगतो कीं प्रत्येक अरब हा व्यापारी तरी असतो किंवा दलाल. इस्लामचा उद्भव अरब-स्तानांत झाला; कुराण अरबी भाषेंतच सांगण्यांत आलें. म्हणून अरबी हीच इस्लामची भाषा असें मानण्यांत येत असे. अरबी भाषा बोलतो तो अरब हें इस्लामच्या मध्ययुगीन इतिहासांतील गमक आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे. इस्लामचा राजकीय किंवा सांस्कृतिक राष्ट्रीयत्व अवगत नाहीं व मान्यही नाहीं. अनेक अरब कुटुंबांनीं आपलें सर्वस्व व्यापारांत गुंतविलेलें होतें. महंमद पैगंबराची पत्नी खदीजा हिचा मोठा व्यापार होता. व्यापारांतील सहकार्यामुळेंच त्या उभयतांचा परिचय झाला. पहिला उमाय्यद खलीफ मोआवीया याची आई हिंद, हिचा सीरियांत मोठा व्यापार होता. व्यापारासाठीं पैसा पुरविणाऱ्या पेढ्यांचें मक्का हें केंद्र होतें. प्रत्येक मुसलमानानें मक्केची यात्रा केलीच पाहिजे आणि यात्रेकरूंना कोणत्याही प्रकारचा उपसर्ग होतां कामा नये, अशा पैगंबराच्या आज्ञा असल्यामुळें यात्रांच्या निमित्तानें मक्केचा व मक्केच्या मार्गावरील मुक्कामाच्या शहरांचा व्यापार वाढला. हिंदुस्थानबरोबरच्या व्यापारासाठीं अरबांनीं इराणी आखातांत बसरा व घेरा आणि तांबड्या समुद्रांत एडन हीं बंदरें निर्माण केलीं.

व्यापारवृद्धीमुळें उद्योगधंद्यांनाही उत्तेजन मिळालें. कोर्डोवा, ग्रानाडा, टोलेडो, दमास्कस, इस्पाहान वगैरे शहरें तेथील उद्योगधंद्यामुळें व कारागिरीमुळें प्रसिद्धि पावलीं. हिंदुस्थानचा खुष्कीचा व्यापार गझनी, हिरात, बल्ख वगैरे शहरांवरून चालूं लागला आणि दर्यावर्दी व्यापार अरबस्तानशेजारच्या दोन आखातांतून. अरब हेच आंतरराष्ट्रीय व्यापाराचे संस्थापक, असें सर्वसाधारण विधान करावयास हरकत नाहीं.

मध्य आशियांतील व भूमध्य समुद्राभोंवतालच्या दक्षिणेकडील प्रदेशांतील राजकीय सत्ता मुसलमानांच्या हातीं गेल्यामुळें हिंदुस्थानांतील व युरोपातील व्यापाऱ्यांना आपले व्यवहार त्यांच्याच मार्फत करविणें भाग झालें. भूमध्य समुद्राच्या उत्तर किनाऱ्याचा व्यापार तेवढा इटालियन प्रजासत्ताक शहरांच्या हातीं राहिला. व्यापाराच्या नाड्या मुसलमानांच्या हातीं गेल्यामुळें असंतुष्ट झालेल्या श्रीमान् वैश्यांच्या प्रेरणेनें युरोपांतील धर्मगुरु व क्षत्रिय यांनीं मुसलमानांच्या ताब्यांत गेलेलीं क्षेत्रें मुक्त करण्यासाठीं धर्मयुद्धांची संघटना निर्माण केली. खलीफ हकीम यानें जेरुसलेमचें मंदिर उध्वस्त केल्यामुळें (१०१०) ही चळवळ सुरू झाली. हीं धर्मयुद्धें १०९५ पासून १२७२ पर्यंत अधून मधून चाललीं होतीं. या युद्धांत शेंकडों नामवंत वीर व हजारों लाखो युरपियन्स मारले गेले तरी जेरुसलेम ख्रिस्त्यांच्या हातीं लागलें नाहीं. या युद्धांना प्रेरणा देणाऱ्या वैश्यांनीं तत्कालीन परिस्थितीचा पुरा फायदा घेतला. या युद्धांमुळें त्याचा व्यापार व संपत्ति वृद्धिंगत झाली आणि त्यांनीं इटलींतील व्यापारी व संपन्न शहरांत प्रजासत्ताकें स्थापन केलीं युरोपांतील व्यापार हातीं आल्यानंतर त्यांनीं धर्मयुद्धांचा पुरस्कार सोडून दिला. आटोमन सुलतान दुसरा मुहम्मद यानें १४५३ सालीं ख्रिस्त्यांचें दुसरें धर्मक्षेत्र व पवित्र रोमन साम्राज्याची राजधानी कॉन्स्टांटिनोपल काबीज केलें, तेव्हां त्याचें उच्चाटण करण्यासाठीं युरोपांत चळवळही झाली नाहीं !

## फिरंगाण :

मुसलमानांच्या कोंडींत गुरफटलेला व्यापार नव्या वाटांच्या शोधाला लागला. व्यापारी, दर्यावर्दी किंवा लढवय्ये म्हणून विख्यात असलेल्या

ग्रीक, रोमन वगैरे जुन्या जमातींनीं या उद्योगांत भाग घेतला नाहीं; नव्या दमाच्या स्पेन व पोर्तुगाल या देशांनीं या बाबतींत पुढाकार घेतला. या देशांची नैसर्गिक स्थिति ह्या उद्योगाला अनुकूल होती. हिंदुस्थानच्या खुष्कीच्या व्यापाराला आड आलेल्या मुस्लिम स्थलसत्तेला बगल देऊन परस्पर समुद्रांतून हिंदुस्थानचा मार्ग काढण्याच्या खटपटीला युरोपियन जलसत्ता लागल्या. स्पेन व पोर्तुगाल या देशांतील रहिवासी जे देश शोधून काढतील त्यांवर त्यांची सत्ता राहील, अशा सनदा त्या देशींच्या राजांना पोपनें बहाल केल्या. या देशांच्या राजांच्या इराद्यांची वर्दी लागतांच अनेक महत्त्वाकांक्षी दर्यावर्दी त्यांच्या दरबारीं जमले. स्पेनच्या राजाच्या मदतीनें कोलंबसनें आपलीं गलबतें पश्चिमेकडे उघड्या समुद्रांतून हांकारलीं. त्याला आढळलेलें अमेरिका खण्ड निसर्गतः समृद्ध होतें. स्पॅनिश लोकांनीं तेथील संचित संपत्ति लुटली व वसाहती स्थापन केल्या. पोर्तुगालच्या राजानें वास्को द गामा याच्या नेतृत्वाखालीं आपलीं गलबतें आफ्रिकेच्या किनाऱ्यानें दाक्षिणेकडे रवाना केलीं. आफ्रिकेच्या मिलिंद बंदरांत त्याला एक मलबारी मुसलमान खलाशी भेटला. त्याचें नांव दावणे व धंदा दलालीचा. सिंधुसागरांतील जलप्रवाहांची व त्यांवरून वाहणाऱ्या वातप्रवाहांची याला चांगली माहिती होती. त्याच्या मदतीनें वास्को द गामा ता. ११-५-१४९८ रोजीं कालीकोट बंदरांत दाखल झाला. दर्यावर्दी साहस या दृष्टीनें या सफरीला महत्त्व नाहीं. मात्र या सफरीमुळें हिंदुस्थानच्या आणि प्रारंभीं विशेषतः पश्चिम किनाऱ्याच्या इतिहासावर महत्त्वाचे परिणाम झाले. संपन्न व समर्थ गणल्या गेलेल्या या किनाऱ्यावर पुढें मूठभर पोर्तुगीजांनीं जो धुमाकूळ घातला त्यामुळेंच इंग्रजांना हिंदुस्थानांत पाऊल टाकण्याला प्रोत्साहन मिळालें.

या वेळीं कालिकत येथें झामोरीन ऊर्फ सामुद्री याचें राज्य होतें. त्याच्यापाशीं चांगलें आरमार होतें. बंदरांतला व्यापार अरबांच्या हातीं होता. मूळचा स्पॅनिश, पण बाटून मुसलमान झालेला येथील परीझ नांवाचा एक दलाल गामानें दावणे याच्या मध्यस्थीनें गांठला.

गामाच्या हातीं जणुं परीस आला. या दोघांच्या मदतीनें गामानें झामोरीनकडून व्यापाराची परवानगी मिळविली. पोर्तुगीजांच्या उद्योगाचें मर्म अरबांनीं पूर्णपणें ओळखलें होतें. गामाला अशी परवानगी मिळूं नये म्हणून कालिकतला स्थायिक झालेल्या अरबांनीं राजाचें मन वळविण्यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली; पण त्यांच्या सावधगिरीच्या सूचना राजाला पटल्या नाहींत. गामाला या खटपटींची वर्दी होतीच. कालिकतच्या आजूबाजूच्या बंदरांची व राज्यांची पाहणी करून गामा पोर्तुगालला परत गेला. हिंदुस्थानचा व्यापार किफायतशीर आहे आणि तो ताब्यांत घेण्यासाठीं अरबांशीं व परस्परांशीं वैरभाव बाळगणाऱ्या स्थानिक राज्यकर्त्यांशीं निकराचीं युद्धें केलीं पाहिजेत अशी त्याची खात्री झाली होती. त्यानें आपल्या निरीक्षणाचे निष्कर्ष राजाला सादर केले. मध्यंतरीं काब्रालच्या नेतृत्वाखालीं आलेल्या पोर्तुगीज काफिल्याची झामोरीननें धूळधाण उडवली होती. यामुळें गामाच्या शिफारशींचा स्वीकार करून पोर्तुगाल-च्या राजानें युद्धसामुग्रीनें सज्ज अशा गलबतांचे काफिल्यांमागून काफिले हिंदुस्थानकडे रवाना केले. १५०२ सालीं गामा पुन्हां हिंदुस्थानकडे निघाला तेव्हां त्याच्याबरोबर वीस लढाऊ गलबतें व आठशें निवडक लढवय्ये होते. तो कालिकतजवळ आला तेव्हां कॉरोमांडल किनाऱ्या-वरून तांदूळ घेऊन निघालेल्या जहाजांचा एक काफिला त्याला दिसला. गामानें हीं जहाजें पकडलीं, त्यावरील सामान हस्तगत केलें, त्यांवरील आठशें नावाड्यांचे हात, कान व नाकें कापून टाकलीं, सोट्यांनीं त्या सर्वांचे दांत पाडले, पाय बांधून एका जहाजावर त्यांचा खच केला आणि शिडें उभारून तें जहाज बंदराकडे पाठविलें. गामानें कालिकतवर तोफांचा भडिमार केल्यामुळें शेंकडों लोक प्राणांस मुकले. आपण शरण आहोंत हें कळविण्यासाठीं झामोरीननें एक ब्राह्मण वकील पाठविला. गामानें बिचाऱ्या वकिलाची-ही तशीच दशा केली. गामानें त्याचे कान कापवले आणि त्यांच्या बुंध्यांवर कुत्र्याचे कान शिवविले; आणि वरील नावाड्यांचे तोडलेले अवयव त्याच्या हवालीं करून त्याला दुसऱ्या एका गलबतांतून बंदरा-

कडे रवाना केलें. त्याच्याबरोबर गामानें राजाला निरोप पाठविला कीं नरमांस ताजें आहे तोंवर त्याची भाजी करून खा! सुधारलेल्या राष्ट्रांच्याच नव्हे, अधम चाचांच्या इतिहासांतही या क्रौर्याला तोड आढळणार नाहीं. या प्रकारामुळें चवताळलेल्या झामोरीननें पोर्तुगीजांवर हल्ला करण्यासाठीं आपलें आरमार सज्ज केलें. या आरमाराचें आधिपत्य कासीम नांवाच्या अरबाकडे होतें. या आरमारांतील गलबतें हलकीं व चपळ होतीं. लाल समुद्रांतील व्यापारावर गबर झालेल्या खोजा अंबर नांवाच्या अरबाच्या अवजड लढाऊ गलबतांचा काफिला त्याच्या मदतीला गेला होता. १५०३ सालीं कोचीननजीक कासीमनें गामावर हल्ला चढविला. पोर्तुगीजांच्या तोफांच्या माऱ्यामुळें अंबरचीं गलबतें बुडालीं. तरीही कासीमनें युद्ध चालू ठेवलें. शेवटीं त्याच्या तावडींतून सुटण्यासाठीं गामाला पळ काढावा लागला. कासीमचा या युद्धांत जय झाला खरा, पण गामाचा पाठलाग करण्याचा त्याला धीर झाला नाहीं. यामुळे या जयाचें फळ झामोरीनच्या पदरात पडलें नाहीं.

पोर्तुगीज मलबारचा पिच्छा सोडीत नाहींत हें पाहून झामोरीननें इजिप्तच्या सुलतानाकडे मदतीची मागणी केली. हिंदुस्थानच्या व्यापारावर आलेली पोर्तुगीजांची धाड पाहून अरबांचें धाबें दणाणलें होतें. त्यांनींही तिकडे परस्पर वशिला लावलाच होता. सुलतानानें एक प्रचंड आरमार आधुनिक शस्त्रास्त्रांनीं सज्ज केलें व आपला दर्यासारंग मीर हुसेन याच्या नेतृत्वाखालीं दीव बेटाकडे रवाना केलें. त्याच्याबरोबर पंधराशें कसलेले लढवय्ये होते. दीवचा सुभेदार मलिक अयाझ यानें त्याला जरूर ती सामुग्री पुरविली. झामोरीनच्या आरमाराची एक तुकडी दाखल झाल्यानंतर मीर हुसेन पोर्तुगीजांच्या मागावर निघाला. हें आरमार चौलच्या बंदरांत आलें तेव्हां हिंदुस्थानचा पोर्तुगीज व्हाइसरॉय आल्मीडा याचा मुलगा लॉरेन्सो यानें त्यावर हल्ला चढविला. हा त्या वेळीं फक्त वीस वर्षांचा होता. दोन दिवस निकराचें युद्ध झालें. पोर्तुगीजांनीं इजिप्तच्या गलबतांवर उतरण्याचा प्रयत्न केला. पण तो साधला नाहीं. नंतर त्यांनीं निसटण्याचा प्रयत्न केला, तोही सिद्धीस गेला नाहीं. आल्मीडाच्या गलबतांना वेढा पडला.

तोफेच्या गोळयानें त्याचा एक पाय तुटला, तरी खुर्चीवर बसून तो हुकूम सोडीत राहिला. इतक्यांत आणखी एक गोळा येऊन त्याचा अंत झाला. पोर्तुगीजांचा पूर्ण पराभव झाला. तरीही व्हाइसरायानें धीर सोडला नाहीं. मिळतील तेवढी गलबतें गोळा करून फ्रान्सेस्को आल्मीडा दीवच्या दिशेनें निघालेल्या मुसलमानी आरमारावर चालून गेला. त्याच्या बरोबर अठरा गलबतें व बाराशें सैनिक होते. ता. ३-२-१५०९ रोजीं या आरमारांचा सामना झाला. या वेळीं मीर हुसेनपाशीं फक्त दहा गलबतें राहिलीं होतीं. त्याची युद्धसामुग्री संपुष्टांत आली होती. शिवाय गुजरातचा सुभेदार मलिक अयाझ हा आतां पोर्तुगीजांना फितूर झाला होता. तो मूळचा स्पॅनिश, बाटून मुसलमान झाला होता. त्याला पोर्तुगीज नको होते, अरबही नको होते. म्हणून त्यानें आतां मीर हुसेनला मदत दिली नाहीं. यामुळें या युद्धांत इजिप्शियन आरमाराचा पराभव झाला आणि गुजरातच्या विश्वासघातामुळें चिडलेला मीर हुसेन उरलीं सुरलीं जहाजें घेऊन इजिप्तकडे निघून गेला.

पोर्तुगीज साम्राज्याची स्थापना अलबुकर्कच्या अमदानींत झाली, हिंदुस्थानांत व हिंदी महासागरांत. आधुनिक साम्राज्यसंस्थापकांमध्यें अग्रस्थान त्यालाच दिलें पाहिजे. हिंदी महासागराभोंवतालच्या वेगवेगळया देशांत ज्या ज्या पाश्चिमात्यांनीं राज्यें संपादन केलीं त्यांनीं अलबुकर्कच्याच धोरणाचा पुरस्कार केला. त्याच्या पूर्वीं हिंदुस्थानांत आलेले पोर्तुगीज गैरमाहितगार होते, व्यापारी होते किंवा लुटारू. अलबुकर्कला हिंदी महासागराची व पूर्वेकडील परिस्थितीची पूर्ण माहिती होती. साम्राज्यस्थापनेचें निश्चित धोरण आंखून त्यानें गलबतांत पाय ठेवला होता. त्याची मनोवृत्ति समुद्री होती. व्यापारांतील पोर्तुगीजांचे प्रतिस्पर्धी जे मुसलमान त्यांचा तो कट्टा द्वेष्टा होता. हिंदी महासागराच्या अंतर्भागात प्रविष्ट होतांच तांबड्या समुद्राच्या मुखाशीं असलेलें सोकोत्रा बेट काबीज करून त्यानें अरबांना पहिला शह दिला. येथील मुसलमानी किल्ला काबीज करून त्यानें त्याची तटबंदी मजबूत केली. नंतर त्यानें इराणी आखाताच्या मुखाशीं असलेल्या हुरमुज बंदरावर मोर्चा वळविला. थोड्या गोळागोळीनंतर तेथील मुसलमान राजा शरण आला.

समुद्रकांठचा किल्ला पोर्तुगीजांनीं ताब्यांत घेतला. या राज्याचीं संरक्षण व परराष्ट्र हीं खातीं पोर्तुगीजांच्या हातीं असावींत व अंतर्गत कारभारांत राजाला स्वातंत्र्य असावें, या अटींवर अलबुकर्कशीं ता. २४–१०–१५०६ रोजीं येथील राजानें तह केला. याच दिवशीं आशियांतील युरोपियन साम्राज्याची मुहूर्तमेढ रोंवली गेली असें म्हणावयास हरकत नाहीं.

झामोरीनला गिरफदार करून आणावयाची प्रतिज्ञा करून पोर्तुगालहून निघालेला मार्शल कुटीनो हा अलबुकर्कला बरोबर घेऊन १५१० च्या जानेवारींत कालिकतच्या किनाऱ्यावर उतरला. समुद्रावर व किनाऱ्यावर हातघाईच्या लढाया झाल्या. झामोरीननें आक्रमकांचा पूर्ण पराभव केला. या लढाईंत कुटीनो मारला गेला व पोर्तुगीजांचा झेंडा झामोरीनच्या हातीं लागला. अलबुकर्कला गंभीर स्वरूपाच्या जखमा झाल्या आणि त्याला बेशुद्धावस्थेंत उचलून गलबतावर नेण्यांत आलें. पोर्तुगीजांबरोबर आपल्याला निर्वाणीची लढाई करावी लागणार हें ओळखून झामोरीननें आपल्या आरमाराची पुनर्घटना केली होती. पहिल्या निकराच्या युद्धांत खोजा अंबरच्या अवजड जहाजांना जलसमाधि मिळालेली पाहून त्यानें भावी युद्धासाठीं हलकीं व चपळ जहाजें बांधविलीं होतीं. झामोरीनच्या कुलानें पांचशें वर्षांपासून 'समुद्राधिपति' ही पदवी धारण केलेली होती. ह्या अभिधानाच्या अभिमानानें प्रेरित झालेल्या झामोरीननें, त्याच्या पुत्रांनीं व दर्या-सारंगांनीं जिवावर उदार होऊन पोर्तुगीजांशीं अनेक युद्धें केलीं. हीं जलयुद्धें मलबार व कारोमांडल किनाऱ्यावर १५९५ सालापर्यंत चाललीं होतीं. ह्या मलबारी जलयुद्धांचें स्वरूप शिवाजीच्या गनिमी लढाईसारखें होतें. त्यांनीं अनेक वेळां पोर्तुगीजांच्या ठाण्यांवर हल्ले केले व त्यांचीं जहाजें पकडलीं, बुडाविलीं किंवा जाळलीं. वस्तुस्थिति अशी आहे, तरी पोर्तुगीज अखेरीस यशस्वी झाले आणि ते युरपियन, म्हणूनच आपल्याला इतिहासाच्या क्रमिक पुस्तकांतून शिकविण्यांत येतें कीं झामोरीन हा आधुनिक हिंदी संस्थानिकांसारखा कर्तृत्वशून्य होता !

मलबार किनाऱ्यावरील कालिकत, कोचीन व क्विलोन येथील पोर्तु-गीजांच्या व्यापारी वखारी भरभराटींत होत्या; तरीही त्यांना या

भागांत पाय पसरण्यास वाव नव्हता. कारण या भागांतले हिंदु राजे प्रबळ व जागरूक होते आणि त्यांचे पदरीं लहानमोठीं आरमारें होतीं; शिवाय झामोरीन दुखावलेल्या नागासारखा पोर्तुगीजांच्या मागावर होता. म्हणून अलबुकर्क स्थायिक होण्यासाठीं इतत्र सोईस्कर स्थळाच्या शोधांत होता. पश्चिम किनाऱ्यावर चांचेगिरी करणाऱ्या तिमय्या नांवाच्या एका पुंडाच्या सल्ल्यावरून अलबुर्ककनें गोव्यांचें ठाणें राजधानीसाठीं मुक्रर केलें.

प्राचीन काळीं व मध्ययुगांत गोवें येथें कदंबांची राजधानी होती. वनवासी ( वैजयन्ती ) ही प्राचीन कदम्बांची मूळची राजधानी; गोवा, वनवासी व हनगल या मध्ययुगीन कदम्बकुलाच्या राजधान्या. पन्हाळा, कऱ्हाड व ठाणें येथें राज्य करणाऱ्या शिलाहारांनीं उत्तर कोंकण व घाटमाथा हा प्रदेश सांभाळला होता, याचप्रमाणें कदम्बांनीं महाराष्ट्राच्या दक्षिण सरहद्दीचा प्रदेश. चालुक्य व पाण्डय या घराण्यांशीं यांचे नात्याचे संबंध होते. श्रीसप्तकोटीश्वर हा यांचा कुलदेव. देवगिरीच्या पाडावानंतर मुसलमानांचा गोमांतकांत प्रवेश झाला. बहामनी प्रधान महंमद गवान यानें १६६९ च्या सुमारास गोव्यावर हल्ला केला, समुद्रांतून व जमिनीवरून. त्यानें गोवें काबीज केल्याची बातमी आली तेव्हां शहाला एवढा आनंद झाला कीं त्यानें राजधानींत सात दिवसपर्यंत नौबत झडविण्याचा हुकूम सोडला. येथें राजधानी करावयाचा युसफ आदिलशाहाचा बेत होता. यासाठीं त्याच्या हुकमावरून येथें मोठमोठे वाडे उभारण्यांत आले होते; पण त्याचा मुलूख देशावर व सल्लागार मैदानी मनोवृत्तीचे, म्हणून हा बेत सिद्धीस गेला नाहीं. पश्चिम किनाऱ्यावर राजधानी होण्याला मुंबई-इतकी नैसर्गिक अनुकूलता फक्त गोव्यालाच आहे. गोवें पश्चिम किनाऱ्याच्या मध्यभागीं आहे. गलबतांना आसऱ्यासाठीं प्रचण्ड व लांबवर पसरलेल्या खाड्या, भोंवतालीं सुपीक प्रदेश असूनही सह्याद्रीचें संरक्षण. या वेळीं गोवें बंदर भरभराटींत होतें. विजयनगर व विजापूर येथलि दरबारांना लागणाऱ्या मौल्यवान् वस्तूंची आयात या बंदरांत मोठ्या प्रमाणावर होत असे. पोर्तुगीजांचे शत्रु जे अरब त्यांच्या हातीं

हा व्यापार होता. बहामनी व आदिलशाही घराण्यांच्या धार्मिक धोरणा-मुळें देशावरील हिंदु प्रजा त्रस्त झालेली होती. गोमांतकांतील हिंदु असंतुष्ट होते आणि विजापूरच्या राजवटीस त्यांचा पाठिंबा नव्हता. शिवाय या वेळीं गोव्याचा स्थानिक सुभेदार स्वतंत्र होण्याच्या खटापटींत होता आणि युसफ आदिलशाहा स्थानिक घालमेलींत गुरफटलेला होता. या परिस्थीचा आढावा घेऊन अलबुकर्कनें गोव्यावर हल्ला चढविला.

क्षत्रिय स्वत्वाविषयीं जागरूक असतात आणि वैश्य वित्ताविषयीं. क्षत्रिय युद्धाविषयीं उत्सुक असतात आणि वैश्य स्वास्थ्याविषयीं. क्षत्रिय दुर्बल झाले किंवा वैश्य प्रबल झाले म्हणजे राजकारणाला समेटाचें धोरण लागतें. राज्यव्यवस्था ढिली असते व प्रजेच्या प्रगतीविषयीं बेफिकीर असते तेव्हा प्रजाही राज्यकर्त्यांविषयीं उदासीन असते. मध्य-युगाच्या अखेरीस हिंदु समाजाची राजकीय व धार्मिक संघटना विस्कळित झाली. ब्राह्मण अग्रहारांवर संतुष्ट व क्षत्रिय वतनांवर; आणि त्यांच्या पोकळ प्रशस्तीवर राज्यकर्ते. समाजधारणेविषयीं हे तीनही वर्ग उदासीन झाल्यामुळें बहुजनसमाजांतही हीच वृत्ति रुजली. जनतेचा जोम ओसरला, पीळ उलगडला, अवसान राहिलें नाहीं. शेतांत नांगर चालवावा, कोणी मालक असल्यास त्याला खण्ड द्यावा, कोणी दटावील त्याला सारा द्यावा, प्रजोत्पादन करीत कालक्रमणा करावी; आपण कोणाच्या वाटेस जाऊं नये, कोणी शिरजोर आपल्या वाटेस गेला तर ती वाट त्याला देऊन आपण दुसरी वाट धरावी अशी वृत्ति सर्वत्र फैलावली. ब्राह्मणांचें कर्तृत्व पोकळ कर्मकाण्डांत, राज्यकर्त्यांचें कर्तृत्व पोकळ बिरुदांत; आणि राष्ट्राचें वैभव व सामर्थ्य फक्त प्रचण्ड मंदिरांच्या उभारणींत व्यक्त होऊं लागलें आणि या मंदिरांतील घंटा बडविण्यांत प्रजेचें. वैयक्तिक वतनें चालू असलीं व देवळांत नौबत झडत असली म्हणजे झालें; देशांत डंका कोणाचाही गर्जत असो. या वृत्तीमुळेंच हिंदुस्थानांत परक्यांना राज्यें स्थापन करतां आलीं आणि स्थापन झालेलीं राज्यें चिरस्थायी झालीं; आक्रमकांच्या चिकाटीमुळें, प्रजेच्या औदासीन्यामुळें व राज्यकर्त्यांच्या ढिलाईमुळें.

सोळाव्या शतकाच्या सुरुवातीस गोव्यांत अशीच परिस्थिति होती.

देशावरल्या मैदानी सम्राटांनीं घाटमाथ्यावरलीं व कोंकणांतलीं सामन्त घराणीं बुडविलीं, पण यांचे प्रतिनिधि त्यांची जागा घेऊं शकले नाहींत. मैदानी साम्राज्यें अस्तित्वांत राहिलीं तोंवर त्यांची सत्ता नाममात्र केंद्रित होती आणि राज्यकारभार विस्कळित होता. यामुळें सर्वत्र अंदाधुंदी माजली. कोंकणच्या समुद्रकांठांवर चांचे मातले, अंतर्भागांत स्थानिक बंडखोर शिरजोर झाले आणि प्रजा राज्यकर्त्यांविषयीं उदासीन झाली. प्रजेला समर्थ हिंदु राज्यकर्ते हवे होते ; पण त्या वेळीं सत्तेसाठीं गाजणाऱ्या विजयनगरच्याही मनगटांत गोवें सांभाळण्याची शक्ति नाहीं असें प्रत्ययास आल्यानें प्रजा हताश झाली होती. मुसलमानी अमदानी प्रजेला नकोशी झाली होती; पण त्यांच्या तावडींतून आपल्याला सोडवील अशी शक्ति मनोरथांच्याही दृष्टिपथांत नव्हती. बहामनी साम्राज्याचे नुकतेच तुकडे पडले होते, पण तेही खेकड्याच्या पायांच्या आंकड्यांप्रमाणें कोंकणकिनाऱ्याच्या तुटक्या भागांत रुतून बसलेले होते. अत्याचारी मुसलमान अधिकाऱ्यांच्या लहरीप्रमाणें जुलूम-जबरदस्ती चालू होती. या मुसलमानांच्या जाचांतून हिंदूंना सोडविण्यासाठीं तिमय्यानें अलबुकर्कला गोव्यावर स्वारी करावयास प्रोत्साहन दिलें असें कांहीं इतिहासकारांचें म्हणणें आहे. हें खरें असो वा नसो, या सत्तांतरामुळें कोंकणपट्टींतले बिचारे हिंदु फुफाट्यांतून निघून आगींत पडले, हें मात्र खरें !

१५१० सालीं फेब्रुवारीच्या पंचविसाव्या तारखेस अलबुकर्कचीं गलबतें अग्वादच्या खाडींत दाखल झालीं आणि सत्ताविसाव्या तारखेस त्यानें गोवें शहर काबीज केलें. पोर्तुगीजांचीं लढाऊ गलबतें पाहून गोव्याचे नागरिक भयभीत झाले. मालमत्तेचा नाश होईल व स्वास्थ्याचा बिघाड होईल या भीतीनें येथील वैश्यांनीं अलबुकर्ककडे गुप्तपणें निरोप पाठविला कीं तुम्हांपासून आमच्या व्यापारास व खाजगी मालमत्तेस निर्भयता असेल तर हें शहर तुम्ही निर्धास्त आपल्या ताब्यांत घ्यावें. त्यांना तसें वचन देऊन अलबुकर्कनें भांडें न वाजवितां गोवें कबजांत घेतलें. ही बातमी समजतांच युसफ अदिलशहानें गोव्यावर स्वारी केली, जमिनीवरून व समुद्रांतून, आणि गोवें काबीज केलें; पण तें सहा

महिन्यांहून अधिक दिवस आदिलशाहीचे अधीन राहिलें नाहीं. तिमय्याचा दर्यासारंग महादूराव याच्या मदतीनें अल्बुकर्कनें पुन्हां गोव्यावर चढाई केली आणि शहरावर तोफांचा भडिमार करून व संरक्षक मुसलमानांची कत्तल करून गोवें शहर काबीज केलें. याच सुमारास वयोवृद्ध व राजकारणधुरंधर युसफ आदिलशहा मृत्यु पावला. त्याच्या मागून अल्पवयी इस्माइलशहा गादीवर आला. त्याच्या कारकीर्दीच्या आरंभींची कारस्थानें आणि देशी व परदेशी मुसलमानांचें वैमनस्य, यांमुळें गोव्याकडे आदिलशाहीचें दुर्लक्ष झालें. तेवढ्यात अल्बुकर्कनें या भागांत चांगला जम बसविला.

गोव्यांत आपलें राज्य चिरस्थायी व्हावें म्हणून अल्बुकर्कनें संकराची संघटित योजना आंखली. श्री. स्टीफन्स सांगतात : पोर्तुगालमधून हिंदुस्थानांत आलेले अधिकारी व सैनिक, विशेषतः गोलंदाज, येथें स्थायिक व्हावे व पोर्तुगालशीं राजनिष्ठ अशी प्रजा निर्माण करावी, हें त्याच्या योजनेचें उद्दिष्ट होतें. आपल्या शेंकडों सैनिकांचीं लग्नें त्यानें हिंदु-मुसलमान स्त्रियांशीं लावून दिलीं, विशेषतः सत्ताग्रहणाचे वेळीं झालेल्या कत्तलींत मारल्या गेलेल्या मुसलमानांच्या विधवांशीं. विवाहापूर्वी या स्त्रियाना बाप्तिस्मा देण्यांत येत असे आणि विवाहानंतर त्या मागतील त्या सवलती. मागून मागून त्या असें काय मागणार होत्या ? एकादें घर, नाहीं तर एकादी वाडी. याची घ्यावयाची, त्याला द्यावयाची. या योजनेच्या अमलबजावणींतील एक प्रकार (गोमन्तकाचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास. लेखक श्री. नाईक दणाईत व बागळे. १८७३. भाग २. पृ. ५३) सांगतो : "एक इतिहासकार असें वर्णन करतो कीं, ज्या वेळीं एकदम पुष्कळ लग्नें मोठ्या उत्साहानें झालीं त्या वेळीं रात्र चंद्रहीन होती. तेव्हां एकाएकीं सर्व दिवे विझले, तेणेंकरून नवरा-बायकोस परस्परांत ओळखण्याची पंचाईत पडली व कित्येकांच्या बायकाही बदलल्या. दुसरे दिवशीं, ही अज्ञानानें झालेली गोष्ट जेव्हां समजली, तेव्हां त्यांच्यामध्यें अशी तोड निघाली कीं, गतरात्रीं

प्रारब्धगत्या जी स्त्री, ज्या पुरुषाची शयनसखी झाली, त्या पुरुषानें देवळांतील कराराकडे लक्ष न देतां तिजवर तृप्त असावें." प्रजेनें राज्यकर्त्यांशीं समरस व्हावें, म्हणून संकराचा उपाय अल्बुकर्कला सुचावा हें साहजिक होतें. जसा वारसा तशी वृत्ति. स्वतःच्या नसांतून पोर्तुगालच्या राजघराण्याचें रक्त वाहत आहे असा अल्बुकर्कचा दावा होता; पण त्याचा हा वारसा अनौरसतेवर आधारलेला ( India and the Indian Ocean. Panikkar. p. ५० ) होता. किंबहुना यामुळेंच तो राजकारणांत पुढें आला व बहुशः सरदारांच्या वांट्याला येणारा राजप्रतिनिधीचा दर्जा त्याला प्राप्त झाला. अल्बुर्कच्या योजनेमुळें एक अकरमाशी जात निर्माण झाली. श्री. स्मिथ सांगतात, ज्या गुणसमुच्चयामुळें युरपियन जगात यशस्वी झाले त्याचा लेशही अंगीं नसलेली एक भ्रष्ट जात आपल्या योजनेमुळें निर्माण होईल अशी कल्पनाही अल्बुकर्कच्या मनांत आली नसेल. कोणत्याही परिस्थितींत पोर्तुगालशीं राजनिष्ठ राहील अशी एक बाटगी जात अल्बुकर्कनें निर्माण केली आणि ती स्वतंत्र हिंदुस्थानच्याही कुशींत सलत राहील याची कल्पना या आधुनिक राजकारणपटु विद्वानालाही आलेली दिसत नाहीं.

हिंदुस्थानांतील राजकीय परिस्थितीचा फायदा पोर्तुगीजांनीं पुरेपूर घेतला, हिंमतीनें व दूरदृष्टीनें. कोंकणचा किनारा मध्यदेशांतील वेगवेगळ्या शाह्यांचे कह्यांत आहे हें दिसून आल्यानंतर त्यांनीं एकाला गोंजारलें व दुसऱ्याला दटावलें आणि ज्या ज्या वेळीं त्यांचीं वैमनस्यें तीव्र झालीं त्या त्या वेळीं यांनीं किनाऱ्यालगतच्या प्रदेशांत हातपाय पसरले. पश्चिम किनाऱ्यावर जरब बसविण्यासाठीं त्यांनीं वेळोवेळीं कोंकणांतलीं बंदरें व शहरें लुटलीं व जाळलीं. १५०८ सालीं त्यांनीं दाभोळ लुटलें व जाळलें आणि १५३२ सालीं चिंचणी-तारापुरापासून वसईपर्यंतचीं सर्व बंदरें व गांवें. गुजरातचा सुलतान बहादूरशहा व दिल्लीचा बादशहा हुमायून याचें युद्ध जुंपलें. तेव्हां केलेल्या जुजबी मदतीच्या मोबदल्यांत त्यांनीं सुलतानाकडून वसई बेट ( १५३४ ) मिळविलें; थोडें विनवणीमुळें व बरेंचसें जरबेमुळें. त्यांनीं लगेच येथें मजबूत किल्ला उभारला. या बैठकीवरून त्यांनीं आसपासचीं ठाणीं काबीज केलीं

व भोंवतालच्या मुलखांतून कर वसूल केला. १५३५ सालीं बहादूरशहानें त्यांना दीव बेट दिलें. लगेच येथें त्यांनीं किल्ला उभारला. दीववर त्यांचा फार दिवसांपासून डोळा होता. हें बेट काबीज करण्यासाठीं त्यांनीं तोंवर दोनदां विफल प्रयत्न केलेही होते. संकटमुक्त झाल्यानंतर येथील तटबंदी पाहून सुलतानाचे डोळे फिरले. यानें त्यांना एवढीं महत्त्वाचीं ठाणीं दिलीं होतीं तरी त्यांनीं मनांत कृतज्ञतेचा अंकुरही उगवूं दिला नाहीं. सरसुभेदाराला भेटण्यासाठीं सुलतान गलबतावर आला असतां संशयास्पद हालचाली झाल्या व थोडीबहुत बोलाचाली झाली. बिचकलेला बहादूरशहा निसटण्याच्या प्रयत्नांत असतांना एका गोऱ्या शिपायानें त्याला भाल्यानें भोसकलें व मुडदा समुद्रांत ढकलून दिला. शहाच्या खुनाचा सूड घेण्यासाठीं गुजरातच्या मुसलमानांनीं एकजूट होऊन दीववर अनेक अपेशी हल्ले चढविले. एकदां तर मिसरचें आरमार निवडक फौजेसह सुलतानाच्या मदतीस आलें. सर्व बाजूंनीं वेढल्या गेलेल्या मूठभर पोर्तुगीज शिबंदीनें मोठ्या शौर्यानें आठ महिनेपर्यंत वेढ्याला तोंड दिलें; अचानकपणें किल्ल्याचे दरवाजे उघडून शत्रूवर निकराचे हल्ले चढविले. मुसलमानांच्या तोफांनीं दिवसा किल्ल्याच्या ज्या भागाची पडझड होईल त्याची दुरुस्ती रात्रीच्या रात्रीं करण्याचें काम बायका-मुलांनीं पत्करलें होतें. शेवटीं किल्ल्यांतली सामग्री संपत आली आणि जवळजवळ सर्व शिबंदी खतम होत आली व किल्ला पडण्याचा प्रसंग आला. तेवढ्यांत दैव पोर्तुगीजांच्या मदतीला आलें. वेढा घालणाऱ्या मुसलमानांना अंतस्थ परिस्थितीची वार्ताही नव्हती. मातबर पुढारी पडले व असंख्य सैनिक गारद झाले; म्हणून किल्ला काबीज करणें अशक्य आहे असें आपसांत ठरवून गुजरातचें सैन्य एकाएकीं वेढा उठवून निघून गेलें. पुढें गोव्यात या विजयाचा उत्सव साजरा करण्यांत आला तेव्हां धुळींत लोळत असलेला गुजरातचा झेंडा व लढाईंत पकडलेल्या कैद्यांचा तांडा मिरवणुकीच्या अग्रभागीं चालविलेला होता!

पोर्तुगीज हिंदुस्थानकडे झुकले व्यापारासाठीं. अरबाना नामोहरम करून व्यापारावर प्रभुत्व मिळविल्यानंतर त्यांनीं आपलें कर्तृत्व धर्म-प्रसारावर केंद्रित केलें. सामान्य माणसाच्या उद्धारासाठीं निर्माण

झालेल्या ख्रिस्ती धर्माच्या प्रसारासाठीं पोर्तुगीजांनीं अमानुष दुष्कृत्यें केलीं, मनुष्यलोकीं नरक निर्माण केला आणि मुख्यत्वेंकरून यामुळेंच त्यांचें हिंदुस्थानांतील राज्य नष्टप्राय झालें.

अलबुकर्कनें ख्रिस्ती धर्माच्या प्रसारासाठीं पुष्कळ खटपट केली ; पण कोणावर जुलूमजबरदस्ती केल्याचा दाखला नाहीं. एतद्देशीय लोक बुद्धिवान् आहेत व नव्या राजवटीला त्यांचा विरोध नाहीं हें निदर्शनास आल्यानंतर राज्य कारभारासाठीं त्यांचा उपयोग करून घेतां यावा म्हणून त्यांच्या शिक्षणासाठीं अलबुकर्कनें गोव्यांत शाळा उघडल्या. अर्थात् हिंदुस्थानांत कारकुनांचा पहिला कारखाना उघडण्याचें श्रेय त्याचें. पुरेसे कारकून निर्माण झाल्यानंतर नोकऱ्यांना चटावलेल्या एतद्देशीयांच्या धार्मिक उद्धारासाठीं धर्मशिक्षणाच्या शाळा सुरू करण्यांत आल्या. संत फ्रान्सिस झेवियर यानें १५४८ सालीं वसईस शाळा काढली आणि भोंवतालच्या भागांत धर्मोपदेशक पाठविले. हिंदुस्थानांतील राज्य विस्तृत व निर्धास्त झाल्यानंतर पोर्तुगीजांच्या धर्मप्रसाराच्या योजनांना आक्रमक व उग्र स्वरूप प्राप्त होऊं लागलें. एतद्देशीयांना जबरदस्तीनें बाटविण्याचे अधिकार धर्मगुरूंना देण्यांत आले. १५६० सालीं फ्रान्सिस्कन धर्मोपदेशकांनीं कान्हेरी व मंडपेश्वर येथील लेण्यांत वस्ती करून राहिलेल्या हिंदु साधूंची हकालपट्टी केली व कांहींना बाटविलें. घारापुरी, कान्हेरी, मंडपेश्वर वगैरे ठिकाणच्या लेण्यांतील मूर्तींची नासधूस केली ; मंडपेश्वर येथील लेण्याचें ख्रिस्ती देवळांत रूपांतर केलें आणि हिंदु धर्मसंस्थांचें उत्पन्न बाटविलेल्या मुलांच्या शिक्षणासाठीं येथेंच काढलेल्या ख्रिस्ती मठांना लावून दिलें. हिंदूंनीं ख्रिस्ती प्रार्थनेला हजर राहिलेंच पाहिजे असा हुकूम सोडण्यांत आला आणि हिंदूंना घरांतून ओढून प्रार्थनेच्या जागीं बळजबरीनें फरफटत नेऊन त्याची अमलबजावणी करण्यांत येऊं लागली. सार्वजनिक देवळांचा व त्यांतील मूर्तींचा विध्वंस सुरू झाला. यामुळें लोकांनीं मंदिरांतील पवित्र मूर्ति दडवून ठेवल्या, घरांत किंवा रानावनांत. यामुळें हिंदूंची मूर्तिपूजा हाही गुन्हा ठरविण्यांत आला. धर्मग्रंथांमुळें मूर्तिपूजेला प्रोत्साहन मिळतें म्हणून देशी भाषेंतले सर्व ग्रंथ जाळून पोळून नष्ट करण्यांत येऊं लागले. ज्याच्याजवळ मूर्ति

आढळेल त्याची स्थावर-जंगम जिंदगी जप्त करावी व त्यास गुलाम म्हणून गलबतावर काम करण्याकरिता पाठवावें, असा कायदा करण्यांत आला. या जुलमामुळें खवळलेल्या साष्टींतल्या हिंदूंनीं ख्रिस्ती देवालयांचा नाश केला आणि कांहीं पाद्यांचा जीव घेतला. तेव्हां याचा सूड घेण्याकरितां गोव्याहून फौज पाठविण्यांत आली. जन्मजातांपेक्षां परिवर्तितांची धर्मनिष्ठा कडवी. बाटग्यांच्या पलटणींनीं शेंकडों देवालयें उध्वस्त केलीं व घरेंदारें जाळलीं आणि हजारों लोकांची कत्तल केली. या भागांत जिकडे तिकडे ख्रिस्ती मंदिरें उभारण्यांत आलीं आणि टेंकड्या-टेंकड्यांवर क्रूस दिसूं लागले. मानवतेच्या उद्धारासाठीं आत्मार्पण करणाऱ्या ख्रिस्ताच्या धर्माचीं हीं प्रतीकें जनतेला मात्र ख्रिस्त्यांच्या अमानुष क्रौर्याचीं प्रतीकें वाटलीं. या अत्याचारांना कायदेशीर स्वरूप देण्यासाठीं हिंदुस्थानांतल्या पोर्तुगीज प्रदेशांत युरोपांतल्यासारखीं इन्क्विझिशन कोर्टें स्थापन करण्यांत आलीं. कोणाचीं मतें कशीं आहेत व कोणाच्या घरांत मूर्ति आहेत याचा तलास काढण्यासाठीं घरभेद्या हेरांचा सर्वत्र सुळसुळाट झाला. केवळ संशयावरून कोणालाही पकडावें व ख्रिस्ती धर्म स्वीकारण्याचें कबूल करीपर्यंत त्यास कायद्याच्या आधारानें नाना प्रकारच्या यातना कराव्यात, असे प्रकार या अदालतीच्या अमदानींत सुरू झाले. खिळयांचे खोडे घालणें, गुह्यांगांना चाप लावणें, यंत्रांनीं शिरा ताणणें, हाडें ठेंचणें, तापलेल्या तव्यावर उभें करणें, अशा अनन्वित मार्गांनीं न्यायमूर्ति म्हणवून घेणाऱ्या या नराधमांनीं निरपराध प्रजेला छळलें. एवढ्यानेंही धर्मांतराला कबुली मिळाली नाहीं किंवा अधिकाऱ्यांना हवा असेल तसा कबुलजबाब मिळाला नाहीं तर त्या दुर्दैव्याच्या अंगांत तेलाचीं डगलीं घालून तीं पेटविण्यांत येत किंवा त्याला अग्निकुण्डांत टाकण्यांत येई अगर गोणत्यांत शिवून समुद्रांत बुडविण्यांत येई. या अत्याचारांमुळें हजारों हिंदु लोक आपली मालमत्ता सोडून गोवें व साष्टी प्रांत सोडून गेले. त्यामुळें राजधानी ओस पडली व व्यापार थंडावला; हिंदूंच्या प्रतिकारामुळें नव्हे, व्यापारी भरभराटीला ओहटी लागली म्हणून, स्थानिक अधिकाऱ्यांच्या विनवणीवरून धर्ममण्डळांच्या या पापस्मरण

संस्थेच्या कार्याला आळा घालण्यांत आली. ही संस्था अगदीं अलीकडे म्हणजे १८१८ सालीं बंद करण्यांत आली आणि धार्मिक जुलमाला व पक्षपाताला प्रोत्साहन देणाऱ्या जेसुइट संस्था १८३४ सालीं.

जलयुद्धांत किंवा स्थलयुद्धांत पोर्तुगीज लोक हार जात नाहींत असा वारंवार अनुभव आल्यामुळे दक्षिण हिंदुस्थानांतील शहा व सुलतान त्यांना अजिंक्य मानूं लागले. पोर्तुगीजाच्या धर्मप्रसाराच्या योजनांमुळें हिंदूंचा उच्छेद परस्पर होत आहे हें दिसून आल्यामुळें दाक्षिणेंतील मुसलमानांनीं त्याच्याविषयीं तटस्थ वृत्ति धारण केली. स्पेन-पोर्तुगालनें आपखुषीनें मुंबई बेट इंग्रजांना दिलें. या बेटावर उपलब्ध असलेल्या धार्मिक तटस्थतेमुळें पोर्तुगीज मुलखांतून परागंदा झालेले हिंदू येथें स्थायिक झाले आणि हेच लोक मुंबईच्या भरभराटीला कारण झाले.

हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील वेगवेगळ्या देशी-परदेशी सत्तांशीं वेळोवेळीं सहकार्य करून इंग्रजांनीं पोर्तुगीजांना शह दिला.

पण खऱ्या निकराच्या युद्धांत पोर्तुगीजांचा कोणी निर्णयात्मक पराभव केला असला तर तो मराठ्यांनींच.

## सागर-सत्तांच्या आक्रमणापूर्वीं व नंतर :

महाराष्ट्राच्या पश्चिम किनाऱ्यावरील अनेक बंदरांत परकीय दर्यावर्दी प्राचीन काळापासून स्थायिक झाले होते ; कोणी व्यापारासाठीं, कोणी आसऱ्यासाठीं. मराठी लोकांच्या मध्ययुगीन मध्यवर्ती सत्ता दुर्बल झाल्यानंतर त्यांच्या आगमनाला आक्रमणाचें स्वरूप प्राप्त झालें आणि त्या नष्ट झाल्यानंतर स्वतंत्र सत्तांचें. केंद्रीय व स्थानिक मैदानी सत्तांच्या दौर्बल्यामुळें परक्या सागर-सत्तांना पश्चिम किनाऱ्यावर पाय रोवण्यास अवसर मिळाला, देशी राज्यकर्त्यांच्या अपसांतील वैमनस्यांमुळें परके पोसले आणि रहिवाशांच्या राजकीय औदासीन्यामुळें मातले. पश्चिम किनाऱ्यावरील नैसर्गिक व राजकीय परिस्थितीचा व सह्याद्रीच्या आडोशाचा परक्यांनीं पुरेपूर फायदा घेतला. गोमन्तकांत फिरंगी, जंजिऱ्यास हबशी व मुंबईस विलायती सत्ता स्थापन झाल्या. पैकीं दोन कांटे फक्त महाराष्ट्राच्या कुशींत सलत होते ; त्यांपैकीं एक निघाला, एक कुरूप करून बसला आहे.

## ( १ ) गोमन्तक :

पोर्तुगीजांनीं वसाहतीसाठीं दूरदृष्टीनें निवडलेला गोमन्तक-प्रदेश इतिहास-पुराणीं प्रसिद्ध आहे.

परशुरामाच्या निवासानें गोमन्तक पावन झालेला आहे. पंचगौडांतर्गत त्रिहोत्रपुर नगरांतील दहा ब्राह्मणांचीं सहासष्ट कुळें परशुरामानें दक्षिणेंत यज्ञासाठीं आणलीं व त्यांची गोमन्तकांत स्थापना केली असें सह्याद्रि-खण्डांत सांगितलेलें आहे. परशुरामाचा हा यज्ञ हरमल पेडणें येथें झाला आणि तेथील भस्मपर्वत ही त्या यज्ञाची निशाणी आहे, अशी स्थानिक दंतकथा आहे. यदूचे पुत्र पद्मवर्ण, सारस व हरित यांनीं दाक्षिणापथांत तीन वेगवेगळीं राज्यें स्थापन केलीं, असें हरिवंशांत सांगितलेलें आहे. पैकीं सारसाचें राज्य वनवासी भागांत होतें. पुराणांत उल्लेखिलेलें क्रौंचपुर व वनवासी हीं एकच होत असा कांहीं संशोधकांचा कयास आहे. वनवासी हें नांव रामायणांतही आढळतें. भिक्षु रक्षित यानें या भागांत बौद्धधर्माचा प्रचार केला असा महावंशांत उल्लेख आहे. नाशिकच्या पाण्डव लेण्यांतील सातवाहनांच्या शिलालेखांत वैजयन्तीचा उल्लेख आहे. वैजयन्ती ऊर्फ वनवासी येथें सातवाहनांची छावणी होती. व्यापारासाठींही हें स्थान विख्यात होतें. येथील व्यापारी संपन्न तसेच दानशूर होते. कार्लें येथील जम्बुद्वीपांत उत्कृष्ट असें लेणें वैजयन्तीच्या भूतपाल सेठीच्या खर्चानें उभारण्यांत आलेलें आहे. येथील एका रहिवाशानें नवव्या शतकांत नालंदा येथील विद्यापीठाला प्रज्ञापारमिता मूर्ति दिल्याचा उल्लेख आढळतो. सातवाहनकालांत वनवासी येथें चुटु कुलाचें राज्य होतें. ते सातवाहनांचे माण्डलिक व नातेवाईक होते. चुटु म्हणजे छोटे, कनिष्ठ. यावरून चुटु ही सातवाहन घराण्याची एक शाखा होती असें संशोधक मानतात. चुटु हे मानव्य गोत्री ब्राह्मण होते. कारवार, कोल्हापूर, चंद्रवली वगैरे ठिकाणीं त्यांचीं नाणीं उपलब्ध झालेलीं आहेत. कान्हेरी येथील शिलालेखांतही त्यांचा उल्लेख आलेला आहे. अपरान्ताचा दक्षिण किनारा व सातवाहन साम्राज्याचा दक्षिण भाग सांभाळण्याची कामगिरी त्यांच्याकडे होती. यज्ञश्री सातकर्णीनंतर

सातवाहन साम्राज्याला उतरती कळा लागल्यावर हें मांडलिक घराणें स्वतंत्र झालें. गोमन्तकापासून म्हैसूरपर्यंत या घराण्याचीं अनेक नाणीं महारथी व सातवाहन यांच्या जोडीनें मिळालेलीं आहेत आणि वनवासी येथें यांचे अनेक शिलालेख उपलब्ध झालेले आहेत. सुमारें दीडशें वर्षें राज्य केल्यानंतर या कुलाची सत्ता नष्ट झाली आणि त्यांच्या जागीं कदम्ब कुलाचीं राज्यें स्थापन झालीं, इतकीं लगोलग कीं चुटु कुलानें दिलेलें एक दान कदम्बांनीं स्थिर केलेलें आहे.

कदम्ब कुलाबद्दल अनेक दंतकथा आहेत. कदम्बाच्या झाडाखालीं झोंपविलेलें परित्यक्त बालक वनवासीच्या एका नागरिकाला आढळलें व त्यानें त्याचा संभाळ केला; कदम्बाच्या झाडाखालीं आढळलें, म्हणून त्याला कदम्ब हें नांव देण्यात आलें, अशी एक दंतकथा आहे. कोणी सांगतात कीं त्यांच्या कुलघरांत कदम्बाचें झाड होतें, म्हणून हे कदम्ब, असें लोक ओळखूं लागले. वैजयन्तीचा राजा मृत झाला, नंतर तेथें अराजक माजलें. येथील रहिवाशांनीं व प्रजेच्या पुढाऱ्यांनीं राजा निवडण्यासाठीं एक दिवस मुक्रर केला आणि राजवाड्यांतील शकुनाची हत्तीण ज्याला माळ घालील त्याला राजा मानावयाचें ठरविलें. जयन्त ऊर्फ त्रिलोचन याच्या गळ्यांत हत्तिणीनें माळ घातली. त्या वेळीं तो कदम्बाच्या झाडाखालीं झोंपलेला होता; म्हणून त्याला कदम्ब हें नांव व वनवासीचें राज्य देण्यांत आलें, असें आणखी एक दन्तकथा सांगते. मनुष्याला केवळ योगायोगामुळें ऊर्जितावस्था प्राप्त होते असें ध्वनित करणाऱ्या दंतकथा हेतुपुरस्सर त्याज्य मानल्या पाहिजेत. या कथेचा अर्थ घ्यावयाचा तो एवढाच कीं कदम्ब घराण्याला अधिकार किंवा राज्यपद लोकमतानुसार प्राप्त झालें. मयूर-शर्मा हा जयन्ताच्या नातवाचा पणतू. हाच कदम्ब घराण्याच्या वैभवाचा संस्थापक. तो वेदाध्ययनासाठीं कांचीपुरम् येथें गेला असतां अश्वमेधाचे प्रसंगीं एका पल्लव शिलेदारानें त्याचा अपमान केला. लगेच चतुर्वेदांचें अध्ययन स्थगित करून त्यानें धनुर्वेदाचें अध्ययन सुरू केलें आणि या शास्त्रात प्रवीण होतांच चार माणसें पदरीं ठेवून तो मातबर झाला. दंतकथा सागते कीं

अपरार्णवापासून ( अरबी समुद्र ) प्रेहरेपर्यंतचें ( प्रवरा–तीर ? ) राज्य त्याला पल्लवांनीं दिलें. वस्तुस्थिति अशी असावी कीं पल्लवांचा दंडनायक म्हणून तो या भागांत राज्यव्यवस्थेसाठीं आला असावा आणि समुद्र-गुप्ताच्या दक्षिणापथावरील स्वारीमुळें ( ३४७–३५० ) खुद्द पल्लव दुर्बल झालेले पाहून स्वतंत्र झाला असावा. पल्लवांच्या या उल्लेखावरून स्पष्ट होणाऱ्या आणखी एका निष्कर्षाकडे लक्ष वेधणें जरूर आहे. वनवासी हा प्रदेश महाराष्ट्र व कर्नाटक यांच्या सरहद्दीवर आहे. सातवाहन समर्थ होते तेव्हां येथें त्यांचे सामन्त होते. पल्लव समर्थ झाले तेव्हां हा भाग त्यांच्या आधीन झाला. वनवासी येथे कदम्ब स्थायिक झाले तेव्हा त्यांच्या सत्तेला विरोध करण्याइतकें सामर्थ्य अंगीं असलेली राजसत्ता महाराष्ट्रांत अस्तित्वांत नव्हती. संघर्षक्षेत्राच्या पलीकडील भागांतील बहुसंख्य रहिवाशांची राजकीय वृत्ति तटस्थ किंवा उदासीन असते, याचा फायदा मयूरशर्म्यानें घेतला.

मयूरशर्म्याचा राज्यकाल ३४५ ते ३७० असा अनुमानानें निश्चित करण्यांत आलेला आहे. त्यानें अठरा अश्वमेध केले अशी दंतकथा आहे. कदम्बांच्या शिलालेखांत मात्र या यज्ञांचा उल्लेख आढळत नाहीं. या यज्ञांसाठीं ब्रह्मकर्म करण्याकरितां त्यानें कुलगुंड्डर येथून ब्राह्मण आमंत्रून आणले व त्यांना १४४ गांवें अग्रहार म्हणून दिलीं. मयूरशर्म्यानें आपल्या पूर्वजांना सरस्वतीच्या खोऱ्यांतून यज्ञकर्मासाठीं दक्षिणेंत आणलें असें सारस्वतांचें म्हणणें आहे. परशुरामानें यज्ञकर्मासाठीं आणलेल्या ब्राह्मणांना सासष्टींतील ६६ व तीसवाडींतील ३० मिळून ९६ गांवचा अधिकार दिला, म्हणून लोक त्यांना शाण्णवी, शेणवी म्हणूं लागले, अशी दंतकथा आहे. पांचाल देशाची राजधानी अहिछत्र येथून ब्राह्मणांचीं बत्तीस कुळें यापूर्वीच दक्षिणेंत आलीं होतीं; त्यांमधून यज्ञकर्मासाठीं लायक अशा पण्डितांची निवड मयूरशर्म्यानें केली असावी; किंवा सातवाहनांप्रमाणें त्यानें चारी वेदांचे अनुयायी ठिकठिकाणांहून आणविले असावेत. कदम्ब हे जातीनें ब्राह्मण, मानव्य गोत्री होते असें त्यांच्या शिलालेखांवरून स्पष्ट दिसतें; पण राज्यपदावर ब्राह्मण होता असें मान्य करण्यानें स्वतःला सुतक येतें असें मानणारे संशोधक आहेतच; पैकीं एक सांगतो कीं

कदम्ब घराण्याचा मूळ पुरुष जातीनें बेरड होता आणि दुसरा सांगतो कीं तो धर्मानें जैन होता !

भोजानें श्रृंगारप्रकाशिकेंत सांगितलें आहे कीं चंद्रगुप्त विक्रमादित्यानें कुंतलाधिपतीकडे राजदूत पाठविला होता. हें राजदौत्य कवि-कुल-गुरु कालिदासानें केलें व त्याचें पर्यवसान वैवाहिक संबंधांत झालें, अशी एक दंतकथा आहे. हा कुन्तलाधिपति कदम्ब कुलांतील असावा असा कांहीं संशोधकांचा कयास होता. कारण कदम्बांचें राज्य कुन्तल प्रांतावर होतें. अलीकडील संशोधनानें हा दावा नाशाबीत ठरलेला आहे. चंद्रगुप्त विक्रमादित्याची कन्या प्रभावती गुप्ता हिचा विवाह रुद्रसेन वाकाटकाशीं झाला असें आतां निश्चित ठरलें आहे.

पांचव्या शतकांत कदम्ब कुलाच्या तीन शाखा राज्य करीत असलेल्या आढळतात. वनवासी, उच्छंगी व त्रिपर्वत येथें त्यांच्या राजधान्या होत्या. सहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत बदामीच्या कीर्तिवर्मा चालुक्यानें वनवासीच्या कदम्बांचा पराभव करून रेवतीद्वीपाचा प्रदेश आपल्या राज्याला जोडला. रेवतीद्वीप म्हणजे वेंगुर्ल्याच्या आसपासचा प्रदेश. अष्टागरालाही ही संज्ञा दिलेली आढळते ; पण या भागाचा या उल्लेखाशीं संबंध दिसत नाहीं. प्राचीन चालुक्य व राष्ट्रकूट या सम्राट्-घराण्यांच्या अमदानींत कदम्ब-कुलें कशीबशीं जीव धरून अज्ञातवासांत काळ कंठीत होतीं. या काळांत गोंवा, रत्नागिरी व सावंतवाडी हा भाग शिलाहारांच्या ताब्यांत होता. तैलप चालुक्यानें राष्ट्रकूटाचा पराभव ( ९७३ ) व उच्छेद करून उत्तर चालुक्य साम्राज्याची प्रस्थापना केली. यानंतर लवकरच 'वनवासी बाराहजार' प्रांतांत त्यानें आपले मांडलिक म्हणून कदम्बांची स्थापना केली. यावरून वाटतें कीं सत्तासंपादनाच्या उद्योगांत त्याला कदम्बांचें साह्य झालेलें असावें. त्यानें षष्ठदेव ऊर्फ चतुर्भुज ( ९६६–९८० ) कदम्बाला महामंडलेश्वराचा दर्जा व गोमन्तकाचें राज्य दिलें. त्याची राजधानी चंद्रपूर येथें होती.

उत्तर चालुक्यांच्या अमदानींत वनवासी, हनगल, उच्छंगी व गोंवा येथें कदम्ब कुलाच्या शाखा राज्य करीत होत्या आणि पन्हाळा,

कऱ्हाड व ठाणें येथें शिलाहारांच्या. कदम्ब व शिलाहार हीं चालुक्यांचीं सामन्त घराणीं खरीं, पण या सामन्तांवर सम्राटांचा वचक बेताबाताचा होता. कारण चालुक्यांचें साम्राज्य मैदानी होतें आणि त्यांच्या सामन्तांचीं राज्यें सह्याद्रींत व अपरान्तांत होतीं. या भागांतल्या राज्यकर्त्यांनीं व रहिवाशांनीं देशावरल्या सत्तांचें अधिराज्य कधींच मान्य केलें नाहीं. या वृत्तीला आळा घालण्यासाठीं शिवाजीनें आपलें राज्यच या विभागांत केंद्रित केलें. या सामन्तांचीं आपसांत युद्धें होत आणि ते एकमेकांचा मुलूख बळकावीत ; पण ते स्वतः सम्राट्पद धारण करीत नाहींत तोंवर मध्यवर्ती सत्ता त्यांच्या वाटेस जात नाहीं. दोघेही आपलें सामर्थ्य व दौर्बल्य जाणून होते. परचक्र आलें असतां हे सामन्त आपल्या साह्याला धांवून येतील असा सम्राटांना भरंवसा वाटत होता आणि प्रबल परचक्र आलेलें नाहीं तोंवर स्थानिक धुडगूसाकडे सम्राट लक्ष देणार अथवा देऊं शकणार नाहींत अशी सामन्तांची खात्री होती. या स्थानिक स्पर्धांमुळें राज्यकर्त्यांमध्यें सहकार्याची भावना निर्माण झाली नाहीं ; प्रजेचें अंतःकरण राज्यकर्त्यांशीं एकरूप होऊं शकलें नाहीं ; प्रजेमध्यें राजकीय औदासीन्य निर्माण झालें ; स्थानिक व जातीय वैमनस्यें मात्र फोंफावलीं ; इतकीं कीं महाराष्ट्र अजूनही ह्या अवस्थेंतून पार पडूं शकलेला नाहीं.

प्रस्तुत प्रकरणापुरते या बाबतचे कांहीं दाखले येथें देतों :

ठाण्याच्या अरिकेसरीचें ( १०१७ – १०२५ ) कोंकणच्या रट्टराजाशीं ( ९९० – १०१८ ) युद्ध जुंपलें. दोघेही शिलाहार कुलांतले व चालुक्यांचे सामन्त. हें युद्ध मिटविण्यासाठीं प्रयत्न करण्याऐवजीं जयसिंह चालुक्यानें त्यांत ठाणेकरांच्या वतीनें जातीनें भाग घेऊन कोंकण शिलाहारांची सत्ता नष्ट केली. बिचाऱ्या रट्टराजाकडे कांहींही दोष नव्हता. या यादवीमुळें खुद्द अरिकेसरी इतका दुर्बल झाला कीं षष्ठदेव ( दुसरा : १००५ – १०५० ) कदम्बानें उत्तर कोंकणावर स्वारी केली. अरिकेसरीनें ह्याचें अधिराज्य मान्य केलें तेव्हां त्याचें राज्य त्याच्याकडे ठेवून हा परत गेला. यामुळें आपल्या सम्राट्पदाला कांहीं बाध आला असें चालुक्यांनींही मानलें नाहीं ! या बाबतींत शिलाहारांनीं जरा

कुचराई करतांच जयकेशी कदम्बानें (पहिला : १०५० – १०८०) उत्तर कोंकणावर स्वारी करून बंडखोर मुम्मुणि (१०४० – १०७०) शिलाहाराचा वध केला. दुसऱ्या जयकेशि (११०४ – ११४८) कदम्बानें तर टाण्याच्या अपरार्क शिलाहाराचें राज्यच खालसा केलें. या प्रसंगीं शिलाहारांचे मंत्री सुद्धां कदम्बांना फितूर झाले होते. राज्यकारभाराबद्दल जबाबदार असणाऱ्या प्रमुख अधिकाऱ्यांची ही वृत्ति, मग प्रजेची काय अवस्था असेल याची कल्पनाही करवत नाहीं. जयकेशीला एवढी मस्ती आली होती, कारण तो सम्राट् विक्रमादित्य चालुक्याचा जांवई होता. मात्र विक्रमादित्याचा विष्णुवर्धन होयसळानें पराभव केला त्या सुमारास स्वतंत्र होण्याच्या महत्त्वाकाक्षेनें सम्राट् सासऱ्याविरुद्ध बंड पुकारण्यास सामन्त जांवईबुवांनी कमी केलें नाहीं ! अखेरीस चालुक्यांचा सेनापति आछुगी सिंद यानें गोमन्तकावर स्वारी केली व जयकेशीचा पराभव करून गोपकपट्टणाला आग लावली; तेव्हां कोठें स्वारीची झांज उतरली. एवढें झालें तरी चालुक्यांनीं त्याचें राज्य मात्र खालसा केलें नाहीं. सर्वांना साधारण अशा संकटांचे समयींही अपरान्तांतील सामन्तांनीं परस्परांशीं सहकार्य केलेलें दिसत नाहीं. अपरान्तावर मुसलमानाचें परचक्र आलें तेव्हां ठाण्याच्या अनन्तदेव (१०८०–१११०) शिलाहारानें एकट्यानें निकराचें युद्ध करून तें परत फिरविलें. समानाधिकारी सामन्त किंवा सम्राट् त्याच्या मदतीला आले नाहींत. या युद्धांत शिलाहारांचा जय झाला व त्यामुळें महाराष्ट्रावरलें तात्कालिक आक्रमण दूर झालें आणि संभाव्य आक्रमण सुमारें दोन शतकें थोपलें, हा भाग निराळा. चालुक्यांची ही रीत तर यादवांचा खाक्या वेगळाच. सिंघण यादवानें पन्हाळ्याच्या भोज (११७५–१२१५) शिलाहाराचा व महादेव यादवानें ठाण्याच्या सोमेश्वर (१२४०–१२६५) शिलाहाराचा पराभव केला आणि हीं सामन्त घराणीं कायमचीं नष्ट केलीं. कां ? तर ते स्वतःला चक्रवर्ती म्हणवून घेत होते ! यादवांनीं शिलाहारांना कायमचें नष्ट केलें, त्यांना सामन्त-पदें दिलीं नाहींत किंवा अधिकाराच्या जागाही दिल्या नाहींत. महाराष्ट्रांतील सत्तेच्या केंद्रीकरणाच्या दृष्टीनें त्यांचीं हीं कृत्यें योग्य

होतीं. पण यादवांनीं अपरान्तांत आपली सत्ता दृढमूल करण्याची किंवा पश्चिम किनाऱ्याच्या संरक्षणासाठीं विशेष कोशीस केलेली दिसत नाहीं. सह्याद्रीच्या घाटमाथ्याचें, अपरान्ताचें व पश्चिम किनाऱ्याचें राजकीय महत्त्व त्यांच्या लक्षांत आलेलें दिसत नाहीं. आर्थिक प्रतिष्ठान व धार्मिक परिवर्तन यांतच राजकीय आक्रमणांचीं बीजें असतात हें मध्य-युगांत कोणाच्याही लक्षांत आलेलें दिसत नाहीं. कारण त्यांचें साम्राज्य मुख्यत्वेंकरून मैदानी होतें व राजकीय दृष्टि सर्वस्वीं. याचा परिणाम त्यांना भोगावा लागला आणि महाराष्ट्रीयांनाही; विशेषतः अपरान्ताच्या रहिवाशांना; आणि अखण्ड हिंदुस्थानालाही.

कदम्ब कुलाच्या एका शाखेचें राज्य गोमन्तकावर अनेक शतकें होतें आणि शिलाहारांच्या ठाणें शाखेचें अष्टागरावर. चालुक्य राष्ट्रकूट व यादव या सम्राटांचे हे माण्डलिक होते. किनाऱ्यालगतच्या प्रदेशा-वर राज्य करावयाचें म्हणजे पदरीं आरमार असलेंच पाहिजे; आणि स्थानिक सागर-संस्कृतीच्या संवर्धनाचें व्यवधान संभाळलेंच पाहिजे. या अपेक्षेनें या भागाच्या इतिहासाकडे पाहिलें असतां निराशा पदरीं येते. नाहीं म्हणावयास मिळतात तेवढे उल्लेख देतों:

बदामीच्या पुलकेशी चालुक्यानें कोंकणच्या मौर्यांवर (५११) केलेल्या स्वारीचें वर्णन ऐहोळे येथील मंदिरांतील प्रशस्तिलेखांत दिलेलें आहे. त्यांतील मुद्द्याचा भाग असा:

**अपरजलधेर्लक्ष्मीं यस्मिन्पुरीमभितप्रभे।**
**मदगजघटाकारैर्नावां शतैरवमृन्दति॥**

आशय असा कीं महाप्रतापी पुलकेशीनें मदयुक्त गजांच्या पंक्ती-प्रमाणें आकार असणाऱ्या नावांच्या साहाय्यानें जणुं पश्चिम सागराची लक्ष्मी अशा मौर्यांच्या पुरी राजधानीला वेढा घातला. ही पुरी म्हणजे घारापुरी कीं दंडाराजपुरी याबद्दल मतभेद आहे; पण त्याच्याशीं आपल्याला सध्यां कांहीं कर्तव्य नाहीं. या जलयुद्धांत चालुक्यांचा जय झाला व मौर्यांचें घराणें नष्ट झालें. चालुक्यांच्या आरमाराबद्दल इतरत्र मात्र कांहींच माहिती मिळत नाहीं. केवळ या स्वारीसाठींच त्यानें कांहीं भाडोत्री फतेमाऱ्या एकत्र केलेल्या असाव्यात. शेतीच्या हंगामांत शेतकरी

व लढाईच्या मोसमांत शिलेदारी, ही पद्धत आरमारांत चालत नाहीं आणि तोफखानी आरमारांत तर मुळींच चालत नाहीं. यावरून चालुक्यांची आरमारी तयारी यथातथाच असावी असें दिसतें.

पश्चिम किनाऱ्यावर निसर्गतः सोइस्कर असें गोंव्यासारखें दुसरें बंदर नाहीं. हें दृष्टोत्पत्तीस येतांच जयकेशी ( पहिला : १०५०–१०८० ) कदम्बानें समुद्रकिनाऱ्यावर गोपकपट्टण हें शहर व बंदर स्थापन केलें व चंद्रपुराहून तेथें राजधानी नेली. या पूर्वी गोवापुरी ही नगरी पापनाशिनी म्हणून विख्यात होती; येथें द्विजेंद्रेश समुद्रस्नानार्थ येत असत आणि वेद-वेदांगपारंगत षट्कर्मनिरत तपोयोगी वस्ती करून रहात असत ( सूतसंहिता. अ. १६ ). गोपकपट्टण म्हणजे आजचें थोरलें गोंवें. जयकेशीनें प्रबळ आरमार निर्माण केलें. राजधानीचा कारभार त्यानें सदान नांवाच्या मुसलमान व्यापाऱ्याकडे सोंपविला होता. याच्या सुव्यवस्थेमुळें गोंव्याची एवढी भरभराट झाली कीं त्याची तुलना इंद्रपुरीशीं करण्यांत येऊं लागली. सदानला व्यापाराचीही चांगली माहिती असावी असें दिसतें. गोपकपट्टण बंदरांत येणाऱ्या-जाणाऱ्या जहाजांवर त्यानें कर बसविला होता. जयकेशी हा पश्चिम किनाऱ्यावरील पहिल्या स्वदेशी आरमाराचा निर्माता. त्याच्या स्मरणार्थ स्वतंत्र भारताच्या आरमारांतील एका जहाजाला जयकेशी हें नांव देणें युक्त होईल! जयकेशीनें निर्माण केलेली परंपरा फार दिवस चाललेली दिसत नाहीं. त्याचा प्रपौत्र विजयादित्य ( ११००–११०४ ) याच्या नौकाविहाराचा मात्र उल्लेख आढळतो. हा गोंव्याच्या आसपास समुद्रांतून सहली करीत असे, एवढेंच. ठाण्याच्या शिलाहारांच्या पदरीं थोडेंबहुत आरमार असावें असें दिसतें. महादेव यादवानें सोमेश्वरावर केलेल्या चढाईचें वर्णन हेमाद्रीच्या व्रतखण्डांत दिलेलें आहे. हेमाद्री सांगतो, कोंकणचा राजा सोम हा समुद्रांत पोहण्यांत कुशल होता; तथापि महादेवाच्या मस्त हत्तींच्या गंडस्थळांपासून स्रवणाऱ्या दानोदकांच्या नद्यांत तो बुडून मेला. डॉ. रामकृष्ण भांडारकर सांगतात, हत्तींचा मोठा समुदाय व फौज बरोबर घेऊन महादेवानें कोंकणावर स्वारी केली; जमिनीवरील लढाईत पराभव झाल्यानंतर सोमेश्वरानें जहाजांचा आश्रय केला; तेथें

त्याला मृत्यु आला; बहुशः तो बुडून मेला असावा. हेमाडपंताच्या चरित्रांत श्री. पाध्ये सांगतात : 'कोंकणप्रांत समुद्रालगत असल्यामुळें सोमेश्वराच्या पदरीं आरमार असलें पाहिजे; आरमारी युद्धांतही सोमेश्वरास यश न येता तो आपल्या जहाजांसह समुद्रांत बुडून मेला असावा असें अनुमान काढण्यास जागा आहे.' पण हीं सारीं अनुमानें. प्रत्यक्ष काय परिस्थिति होती हें अजमावण्यास साधन नाहीं. यानंतरचा उल्लेख आढळतो तो शंकरराव मोऱ्यांच्या आरमाराचा. त्यानें हें आरमार बहुशः चांचेगिरीसाठीं पदरीं बाळगलेलें असावें. एकंदरींत आरमाराकडे मध्ययुगीन मराठ्यांचें दुर्लक्ष होतें हेंच खरें. या बाबतींत हेतुपुरःसर कार्य सुरू केलें शिवाजीनें; पण त्यानें निर्माण केलेल्या आरमाराचा यादवीमुळें महाराष्ट्राला पुढें फारसा उपयोग झाला नाहीं.

देवगिरीच्या पाडावानंतर यादव आपल्या मांडलिकी राज्याची पुनर्घटना करून उठावणीच्या उद्योगाला लागले असतां द्वारसमुद्राच्या होयसळ बल्लाळाला दिग्विजयाची सुरसुरी आली. त्यानें कदम्बांच्या वनवासी व हनगल प्रांतांवर स्वारी (१३००) केली. विपरीत परिस्थितींत गुरफटलेल्या यादवांनीं वेळींच मदत पाठविल्यामुळें कदम्बांचा तात्पुरता बचाव झाला. मलिक काफूरच्या नेतृत्वाखालीं देवगिरीवर दुसरी स्वारी (१३१०) आली. यादवांचा पराभव केल्यानंतर मलिक दाक्षिणेकडे मोहिमेवर निघाला तेव्हां त्याला द्वारसमुद्राचा मार्ग दाखविण्याकरितां रामदेवरावानें परशुराम दळवी हा माहीतगार वाटाड्या दिला होता. या सर्व घटनांवरून दिसतें कीं या वेळच्या राज्यकर्त्यांना इस्लामी आक्रमणाच्या दिशेची व संकटाची यथायोग्य कल्पना आलेलीच नव्हती. शेंकडों मैलांवरून दुर्लंघ्य अरण्यें ओलांडून ओंजळभर घोडेस्वार दक्षिणेंत येतात व एकेका मोहिमेंत येथील समर्थ म्हणून नांवाजलेलीं साम्राज्यें नेस्तनाबूद करतात, येथें राज्यें स्थापन करतात, आणि वतनदारीचा तोबरा मिळतांच स्थानिक मातबर घराणीं त्यांचीं साह्यकर्तीं होतात, या प्रकाराचा अर्थ असाच कीं येथील राजे हे नाममात्र राज्यकर्ते होते. त्यांच्या उत्कर्षापकर्षांविषयीं बहुसंख्य प्रजा सर्वस्वीं उदासीन होती. इस्लामी आक्रमणाचे परिणाम राजकारणाविषयीं गैर-

माहितगार असलेल्या बिचाऱ्या प्रजेला आकलन करतां आले नाहींत. प्रजेची समजूत होती, हे जातील, ते येतील, चार दिवस धुडगूस घालतील, इतरांप्रमाणें हेही प्रजेशीं समरस होऊन जातील. आश्चर्य वाटावयास नको. हिंदुस्थानची फाळणी झाली त्या वेळीं सिंध-पंजाबमध्यें रेंगाळणाऱ्या हिंदूंची व त्यांना तेथेंच रहावयास प्रोत्साहन देणाऱ्या एतद्देशीय पुढाऱ्यांची अशीच कल्पना होती. इस्लामी राज्य हिंदु दौलतीसारखें थंडें नाहीं हें प्रत्ययास आलें तेव्हां डोळे उघडले, नव्हे, फाटले ; पण होणारी गोष्ट होऊन गेली. असो. मलिक काफूरच्या दक्षिणेच्या स्वारीबद्दल फेरिष्ता सांगतो कीं गोपकपट्टण उध्वस्त करून मलिक रामेश्वरापर्यंत गेला व तेथें मशीद उभारून उत्तरेकडे परतला. हें रामेश्वर म्हणजे सेतुबंध रामेश्वर असा सर्वसाधारण समज आहे. तो बरोबर नाहीं. हें रामेश्वर म्हणजे गोमन्तकाच्या काणकोण महालांतील रामाचें भूशिर. मलिक काफूरची स्वारी फिरल्यानंतर कदम्बांनीं राज्याची जुळवाजुळव करण्याचा अखेरचा प्रयत्न केला. या वेळीं राष्ट्रीय दुर्दैवाचा व कौटुम्बिक कलहाचा कळस झाला! कदम्ब राजा व त्याचा पुत्र यांचे दरम्यान वितुष्ट आलें. इब्न बतूता सांगतो कीं कदम्ब चिरंजीवांनीं होनावरचा नबाब जमालुद्दीन याजकडे खलिता रवाना करून कळविलें कीं या वेळीं तुम्ही आम्हांस मदत करून राज्यावर बसवाल तर खुद्द आम्ही इस्लामचा स्वीकार करूं आणि तुमची मर्जी असल्यास तुमच्या भगिनीशीं विवाहबद्ध होऊं. नबाबानें हें वेडें कोंकरूं नादीं लावलें. त्यानें गोव्यावर बावन जहाजांचें आरमार पाठविलें (१३४२) व राजधानी काबीज केली. या अनर्थाला कारण झालेल्या कुलांगाराला राज्यपद मिळालें नाहीं व यवनीचाही लाभ झाला नाहीं!

दिल्ली सुलतानांचे दक्षिणेंतील वारस जे बहमनी सुलतान त्यांनीं १३५२ सालीं गोवें काबीज केलें. अल्पसंख्य राज्यकर्त्यांनीं बहुसंख्य प्रजेशीं समरस व्हावयाचें, हा परंपरागत मार्ग त्यांनीं स्वीकारला नाहीं. नांदावयाचें असेल तर बहुसंख्य प्रजेनेंच अल्पसंख्य राज्यकर्त्यांशीं समरस झालें पाहिजे, अशा धोरणानें त्यांनीं राज्यकारभार हांकण्यास

सुरुवात केली. गोमन्तकांतील हिंदूंचा अनान्वित छळ झाला, अनेक पुरातन मंदिरें उध्वस्त झालीं. शेवटीं विजयनगरचा राया हरिहर ( दुसरा १३७९–१४०४ ) यानें आपला सेनापति माधवांक (मध्वाचार्य) याला गोमन्तकावर पाठवून मुसलमानांची उचलबांगडी केली. विजयनगरकरांनीं कदम्बांचा कुलदेव श्रीसप्तकोटीश्वर याच्या उध्वस्त मंदिराचा जीर्णोद्धार केला. गोमन्तकस्थ हिंदूंचें हें सुदैव भवितव्यतेला पाहवलें नाहीं. बहमनींचा वजीर महंमद गवान यानें १४६९ सालीं कोंकणावर स्वारी करून खेळणा किल्ला व गोवें प्रांत काबीज केला. खेळण्याचा सामना किती अटीतटीचा होता याचा वृत्तांत पूर्वी येऊन गेलेला आहे. यानंतर १४७१ सालीं बेळगांवच्या विक्रमरायानें व १४८१ सालीं विजयनगरच्या अमात्यानें गोव्यावर स्वाऱ्या केल्या ; पण त्या यशस्वी झाल्या नाहींत. बहमनी राज्याची फाळणी झाली तेव्हां गोवें आदिलशाहीच्या वांट्याला आलें. मुसलमानी राजधान्या दक्षिणेकडे झुकल्यामुळें अष्टागरांतील बंदरें मागसलीं व गोव्याची चांगली भरभराट झाली होती. गुलबर्गा, बेदर आणि विजयनगर येथील संपन्न बाजारपेठांशीं गोव्याचा निकट संबंध होता. गोवें हें युसफ आदिलशहाचें आवडतें ठिकाण होतें. येथेंच राजधानी स्थापन करण्याचा त्याचा विचार होता. या इराद्यानें त्यानें येथें मोठमोठ्या इमारती, राजवाडे व मशिदी उभारल्या. त्याचा विचार तडीला गेला नाहीं; कारण बहमनशाहीप्रमाणेंच आदिलशाही ही मैदानी सत्ता होती. युसफ आदिलशहाच्या उतारवयांत पोर्तुगीजांनीं १५१० सालीं गोवें काबीज केलें, तेव्हांपासून आजतागायत तें त्यांच्याच ताब्यांत आहे. पोर्तुगीज दर्यावर्दी युरोपांतून मौल्यवान् मद्यें व शस्त्रास्त्रें आणि अरबस्तानांतून उत्तम घोडे आणि उंची कापड यांची गोवें बंदरांत आयात करीत. विजयनगर ही या मालाची मोठी बाजारपेठ. दाक्षिणेंतील मुसलमानी शाह्यांनीं विजयनगरचा विध्वंस केल्यामुळें पोर्तुगीजांचा व्यापार बसला. सास्सेटी नांवाचा प्रवासी सांगतो, हा व्यापार इतका भारी होता कीं त्याची कल्पनासुद्धां होणें कठीण आहे. त्यानेंच सांगितलें आहे कीं धर्ममण्डळांच्या जुलमामुळेंही पोर्तुगीज

व्यापाराला मोठा धक्का बसला. तरीही गोमन्तकावरील पोर्तुगीजांची पकड ढिली झाली नाहीं. आदिलशाही वृद्धिंगत झाली व लयाला गेली. मराठेशाही आली व गेली. ज्यांच्या राज्यावर कधींही सूर्य मावळला नाहीं ती आंग्लाईही उगवली व मावळली; तरीही गोमन्तक अझून-ही पोर्तुगीजांच्याच ताब्यांत आहे!

शिवाजीच्या राज्याचा गाभा अपरान्तांत होता. पश्चिम किनाऱ्यावर फिरंगी व हबशी यांनीं फार वर्षांपासून जम बसविला होता. १५५१ सालीं पोर्तुगीजांनीं मांडवी नदीच्या कांठीं रेइजमागचा किल्ला उभारला; १६१२ सालीं अग्वाद व १६२४ झालीं मुरगांव येथें किल्ले उभारून त्यांनीं आपल्या राजधानीभोंवतीं बंदोबस्त केला. स्वराज्याच्या या शत्रूंचा समूळ उच्छेद करणें अवश्य होतें, तरी तें अशक्य वाटल्यामुळें शिवाजीनें पश्चिम किनाऱ्यावर अनेक दर्यावर्दी दुर्ग सज्ज केले व स्वराज्याचें आरमार सिद्ध केलें. या आरमाराच्या धास्तीनें पोर्तुगीजांनीं शिवाजीशीं व्यापारी तह केला आणि त्याला तोफा, दारूगोळा वगैरे युद्धोपयोगी सामान पुरविण्याचें कबूल केलें. १६७० सालीं शिवाजीनें पोर्तुगीजांचें एक मोठें गलबत दमणजवळ पकडून दाभोळला आणलें; उलटपक्षीं फिरंग्यांनीं मराठ्यांचीं बारा गलबतें पकडून वसईस नेलीं. कोंकणपट्टी-तून चौथ वसूल करण्याचा आपणांस हक्क आहे असा शिवाजीचा दावा होता. वसईच्या पोर्तुगीजांपासून चौथ वसूल करण्याच्या कामगिरी-वर मोरोपंत पिंगळ्याची नेमणूक झाली. यासाठीं त्यानें केलेल्या खट-पटींचा तपशील मिळत नाहीं, पण चौथ वसूल झाल्याचे उल्लेख मात्र आढळतात. १६६८ सालीं शिवाजीनें आपलीं माणसें गोव्यांत पेरून (Infiltration) उठावणी करण्याची योजना केली; पण पोर्तुगीजांची प्रतिकाराची कडेकोट तयारी पाहून त्यानें प्रत्यक्ष चढाई मात्र केली नाहीं. १६७५ सालीं शिवाजीनें आदिलशाहीचा फोंड्याचा किल्ला सर केला. फोंडा गेला कीं गोवें जाईल, हें उघड दिसत असल्यामुळें गोवेंकरांनीं विजापूरकरांना मदत म्हणून धान्यसामुग्री भरलेलीं जहाजें पाठवलीं; तीं मध्येंच मराठ्यांनीं पकडलीं. रसद तोडून व निकरानें लढून मराठ्यांनीं फोंडा किल्ला घेतला. नंतर कारवार, सदाशिवगड

वगैरे आजूबाजूचीं ठाणीं लगोलग काबीज करून शिवाजीनें ही मोहीम आटोपती घेतली. यामुळें गोव्यावर मराठ्यांची दहशत बसली, इतकेंच. पोर्तुगीज मुलखांतल्या हिंदु प्रजेवर यापूर्वी अत्याचार झाले होते व या वेळींही होत होते. याबाबतच्या तक्रारी दरबारीं येत होत्या. पोर्तुगीज व्यापारी, दर्यावर्दी व गोलंदाज मराठ्यांच्या शत्रूंना उघडपणें साहाय्य करीत होते. तरीही महाराष्ट्राच्या किंवा हिंदुत्वाच्या नांवानें शिवाजीनें पोर्तुगीजांवर मोहीम केलेली दिसत नाहीं.

संभाजीनें मात्र निःसंशय हिंदुत्वाच्या व महाराष्ट्राच्या नांवानें पोर्तुगीजांवर चढाई केली. संभाजीनें या युद्धांत अशी तरवार गाजविली, आणि या मोहिमेंत त्याच्या हातीं शिवाजीची भवानी तरवार होती, कीं ग्रँड डफ सांगतो, प्रत्यक्ष भवानी तरवार या युद्धाहून अधिक तेजानें कधीं तळपली नाहीं !

हिंदूंच्या, विशेषतः महाराष्ट्रीयांच्या मनोवृत्तींत साधुसंतांच्या प्रचारसातत्यामुळें सोवळेपणाचा असा गण्ड निर्माण झालेला आहे कीं त्यामुळें व्यक्तिमात्राच्या कर्तृत्वाचें मूल्यमापन त्याच्या आचारांच्या, विशेषतः लैंगिक व औदरिक आचारांच्या शुचितेच्या अनुरोधानेंच करावयाची आपल्याला दुष्ट खोड लागलेली आहे. या वृत्तीच्या योग्यायोग्यतेचा खल करण्याचें हें स्थळ नव्हे. एवढें मात्र खरें कीं या वृत्तीमुळेंच संभाजीची योग्यता उणी मानण्याकडे आपला कल झुकता असतो. शिवाजीचें विभूतिमत्त्व जितकें वंद्य तितकेंच संभाजीचें व्यक्तिमत्त्व हृदयंगम आहे व हृदयद्रावक आहे. शिवाजीच्या साहसाला विवेकाची व साध्याची मर्यादा होती. संभाजी साहसाचा मूर्तिमंत पुतळा होता. रगेल पौरुषाचा व रंगेल मर्दुमकीचा पुतळा. महापुरुषाच्या पोटीं येण्यात संचित भाग्य असतें ; त्याचप्रमाणें दुर्भाग्यही. दुर्भाग्य, कारण ज्या त्या बाबतींत पुत्राची पित्याशीं तुलना केली जाते, कारण पित्याचे सहकारी हरघडी अपेक्षितात कीं पुत्रानें आपल्याशीं आश्रितासारखी वागणूक ठेवावी आणि पुत्र पित्याच्या गैरमर्जीस पात्र झालेला असला म्हणजे विचारावयासच नको. शिवाय

पित्याच्या हयातींत त्याच्या दहशतीमुळें दबलेले शत्रु तर पुढें पुत्राला मुळींच जुमानीत नाहींत.

संभाजी राज्यावर आला तो अशाच विपरीत परिस्थितींत. सगेसोयरे आणि मित्र व शत्रु सारेच त्याच्यावर एकाएकीं उलटले. जणुं दैवही त्याच्या शत्रूंना फितूर झालें होतें; म्हणूनच त्याला अंगीकृत कार्यांत यश आलें नाहीं. कारवार बंदरानजीक उघड्या समुद्रांत अंजदीव बेटावर जलदुर्ग उभारण्याची शिवाजीची योजना होती. संभाजीनें सुभेदार पाठवून बेटावर तटबंदीच्या उभारणीचें काम सुरू केलें. लगेच पोर्तुगीजांनीं आरमार पाठवून अंजदीव बेटच काबीज केलें व मराठ्यांना तेथून हांकून लावलें. याच सुमारास पोर्तुगीजांनीं आणखी एक आगळीक केली. संभाजीनें कल्याणनजीक मोंगलांची फौज कैचींत धरली होती. ती नेस्तनाबूद होण्यास थोडा अवधि राहिला होता. ऐन वेळीं उत्तर कोंकणांतील पोर्तुगीजांनीं मोंगलांना धान्यसामुग्रीची मदत पोंचविली. यामुळें मराठ्यांचा डाव हुकला. या प्रकारांमुळें खवळलेल्या संभाजीनें चौल-रेवदंड्यास वेढा घातला. या वेळीं मराठे मोठ्या निकरानें लढले; अग्निवर्षावामुळें पुष्कळ माणूस कामास आलें, पण ठाणें हातीं आलें नाहीं. मराठ्यांना दहशत बसविण्याकरितां पोर्तुगीजांनीं शूर्पारक व अष्टागर भागांत बाटवाबाटवी, लुटालूट व जाळपोळ यांचा कहर उडवला. क्रौर्याबद्दल मराठे विख्यात, निदान युरपियन व मुसलमानी इतिहासांत बदनाम; त्यांच्याही शरीरावर शहारे यावेत अशीं क्रूर कृत्यें या वेळीं पोर्तुगीजांनीं केलीं. तरी मराठे माघारे जाईनात. म्हणून संभाजीच्या सैन्याची विभागणी व्हावी या हेतूनें गोव्याच्या सुभेदारानें मराठ्यांच्या फोंडा किल्ल्यावर हल्ला चढविण्याची योजना आंखली. मराठ्यांविरुद्ध उठावणी करण्यास त्याला औरंगजेबानें आमिष लावलें व चिथावणी दिली. निकोलो मानूची हा विख्यात व्हेनिशियन प्रवासी या वेळीं गोव्यांत होता. त्याला मोंगल दरबारच्या राजकारणाची चांगली माहिती होती आणि मराठ्यांच्या सामर्थ्याचीही. त्यानें सुभेदाराला सावधगिरीचा इषारा दिला: ' सह्याद्रीची भिंत मध्यें उभी आहे म्हणून तुमचा बचाव होत आहे.

संभाजीशीं वैर करून तुमचें क्षणभर चालणार नाहीं.' बादशहाच्या उत्तेजनामुळें उन्मत्त झालेल्या सुभेदाराला हा सल्ला मानवला नाहीं. १६८३ सालीं त्यानें फोंड्याला वेढा घातला. त्याच्या सैन्यांत आठशें युरपियन व आठ हजार कानडी सैनिक होते. पोर्तुगीजांशीं मराठे मोठ्या निकरानें लढले. तोफांच्या माऱ्यामुळें तटबंदीला खिंडारें पडलीं व बुरूज खचले, तरी मराठे खचले नाहींत. पोर्तुगीजांच्या चढाईची बातमी मिळतांच संभाजी चौलाहून निघाला. तो एवढ्या वेगानें धांवून आला कीं फोंड्याला वेढा घालणारी पोर्तुगीज सेना आघाडीला किल्ल्यांतली शिबंदी व पिछाडीला संभाजीचें लष्कर यांच्या कैचींत सांपडली. या घनघोर युद्धांत साऱ्या पोर्तुगीज सेनेचा संहार झाला. त्यांचें सारें लष्करी सामान संभाजीला मिळालें. एकटा सुभेदार लपतछपत जीव घेऊन पळाला म्हणून बचावला. संभाजीनें लगेच लगट केली असती तर गोवें शहर सहज त्याच्या ताब्यांत आलें असतें, इतके त्या वेळीं पोर्तुगीज असहाय व भयभीत झाले होते. सोबत होते तेवढें सैन्य मोहिमेला पुरेसें नाहीं, या विचारानें संभाजीनें आणखी सैन्य आणविलें; पिछाडीच्या मजबुतीची तजवीज केली पाहिजे, या विचारानें त्यानें फोंड्याची डाग-डुजी केली; गोवें बंदर असल्यामुळें जलयुद्धही करावें लागेल या विचारानें त्यानें जवळपासचीं सर्व जहाजें वेठीला धरलीं. संभाजीनें उभ्या आयुष्यांत एवढ्याच वेळीं दूरवरचा विचार केला; तरी इतिहास-कार त्याला दिरंगाईबद्दल नांवें ठेवतातच! एवढी तयारी करून संभाजीनें गोव्यावर चाल केली. पहिल्या धडाक्यास त्यानें बारदेश व साष्टी महालांचा बराच भाग काबीज केला; गोव्यानजीकचीं कुंभारजुवें व सेंट इस्टोव हीं तटबंदीचीं ठिकाणें हस्तगत केलीं आणि खुद्द गोव्यावर उतरण्यासाठीं उतावळा झाला. तराफ्यावरून खाडी ओलांडण्याच्या त्याच्या पहिल्या प्रयत्नांत समुद्राच्या लहरीविषयीं गैर-माहितगार असलेले आघाडीचे दोनशें मराठे निकरानें लढणाऱ्या पोर्तुगीजांच्या हातून मारले गेले. तरी संभाजी हटला नाहीं. त्याची वृत्ति व तयारी पाहून हताश झालेल्या पोर्तुगीजांनीं निर्वाणीचा उपाय म्हणून

सेंट झेवियरचें थडगें उघडलें आणि गोव्याचा गव्हर्नर व धर्माधिकारी यांनीं शवपेटींतील देहावशेषांशेजारीं राजदंड ठेवून हिंदुस्थानांतील पोर्तुगीज राज्य संताला अर्पण केलें. त्यांनीं जाहीर केलें कीं या वेळीं संभाजी परत गेला तर पुढें राज्य संताच्या नांवानें चालविण्यात येईल. एखाद्या देशी राजानें असें कांहीं केलें असतें तर इतिहास वाचतांना प्रत्येक पिढीनें त्याची अवहेलना केली असती. हा विधि संपला न संपला तोंच काय चमत्कार सांगावा? मराठे छावण्या उठवून निघून जात आहेत अशी बातमी आली! ही संताची कृपा असें भाविकांना वाटलें. वस्तुस्थिति वेगळी होती. पोर्तुगीजांच्या सद्दीनें त्यांना हात दिला होता; आणि मराठ्यांच्या दुर्दैवानें डाव साधला होता. सिद्दीचें आरमार गोळा होऊन फिरंग्यांच्या मदतीला निघालें, तें वेंगुर्ल्यानजीक दाखल झालें होतें; आणि संभाजीचा व मराठ्यांचा निकाल लावण्याच्या ईर्षेनें संघटित झालेलें औरंगजेबाचें प्रचण्ड सैन्य सह्याद्रीचे घाट ओलांडून कोंकणांत घुसलें होतें. भवितव्यतेची गति कशी असते पहा. इस्लामचा नायनाट करण्याच्या प्रतिज्ञेनें हिंदी महासागरांत घुसलेल्या पोर्तुगीजांच्या राज्याचें या आणी-बाणीच्या प्रसंगीं इस्लामच्या कट्टया पुरस्कर्त्यांनेंच संरक्षण केलें! सैता-नांच्या साहाय्याला सैतान धांवले; उत्तरेकडले व पश्चिम किनाऱ्यावरले! आतां संभाजीपुढें व महाराष्ट्रापुढें एकराष्ट्रीयत्वाचा नव्हे, जीवनमरणाचा प्रश्न उभा राहिला होता. महाराष्ट्रावर लोटलेल्या या महान् संकटाचा समाचार घेण्यासाठीं गोमंतकाच्या मुक्ततेचा प्रश्न बाजूला ठेवून संभाजी उत्तरेकडे रवाना झाला.

पोर्तुगीजांची हड्डी कोणी कायमची नरम केली असेल तर ती चिमाजी-अप्पानें! संभाजीला माघार घ्यावी लागल्यामुळें शेफारून गेलेल्या फिरंग्यांनीं कोंकणपट्टीत जुलूम-जबरदस्तीचा कहर उडवून दिला. स्वराज्यांत अंदाधुंदी, यादवी व अराजक चाललें असल्यामुळें या प्रश्नाकडे पाहण्यास सवड नव्हती. शाहूच्या राज्यारोहणानंतर स्थिरस्थावर होऊं लागलीं तेव्हां फिरंग्यांकडे मराठ्यांना लक्ष द्यावें लागलें. महाराष्ट्रांत एकछत्री राज्य स्थापण्याच्या बाबतींत फिरंगी मराठ्यांना जेथें तेथें नडत होते. अलीकडे तर मराठ्यांच्या अंतस्थ संबंधांत व राजकारणांत फिरंगी नाक

घालूं लागले होते. त्यांच्या धर्मच्छळाच्या कागाळ्या वारंवार पुणें व सातारा येथें येऊं लागल्या होत्या. गंगाजी नाईक पाठारे, अनजूरकर व अंताजी रघुनाथ कावळे, मालाडकर हे तर मराठ्यांनीं पोर्तुगिजांवर उठावणी करावी म्हणून बाजीराव व चिमाजीआप्पा यांच्या खणपटीस बसले होते. म्हणून बाजीरावानें फिरंग्यांवर मोहीम करण्याचें ठरविलें. प्रथम त्यानें ही कामगिरी आपल्या सरदारांवर सोंपविली; पण कसुरीमुळें व फितुरीमुळें त्यांचे हातून ती पार पडेना. १७३१ सालीं मराठ्यांनीं साष्टींत घुसण्याचा प्रयत्न केला; पण इंग्रजांनीं फिरंग्यांना ऐन वेळीं मदत केल्यामुळें तो फसला. याच सालीं पिलाजी जाधवरावानें मनोरवर हल्ला केला; पण येथें पोर्तुगीजांनीं मराठ्यांना अक्षरशः भाजून काढलें. म्हणून अखेरीस फिरंग्यांवरील मोहिमेचें नेतृत्व चिमाजीअप्पाकडे सोंपविण्यांत आलें. मराठ्यांच्या हालचालींचा अंदाज आल्यामुळें फिरंग्यांनीं ठाण्यास कोट उभारण्याचें काम १७३४ सालीं सुरू केलें आणि दोनतीन वर्षें खपून तें तडीला नेलें. ठाण्याचा कोट जाणूनबुजून मराठ्यांच्या उरावर उभारलेला असल्यामुळें चिमाजीनें प्रथम ठाण्यावरच हल्ला चढविला. नव्या किल्ल्याच्या मजबुतीवर विसंबून फिरंगी किल्लेदार बेसावध होता. मराठ्यांनीं निकराचा हल्ला चढवून एका रात्रींत ठाण्याचा कोट काबीज (१७३७) केला. या वेळीं मराठ्यांनीं लगट करून वसईवर हल्ला केला असता तर किल्ला सहज त्यांच्या हातीं पडला असता; कारण त्या वेळीं तेथें प्रतिकाराची कांहींच तयारी नव्हती. अंतस्थ माहितीच्या अभावीं मराठ्यांनीं येथवर मोहीम नेली नाहीं. याच सुमारास भोपाळचें राजकारण निघाल्यामुळें फिरंगी-मोहीम बाजूला ठेवून चिमाजीला उत्तरेकडे जावें लागलें. त्यांत वर्ष निघून गेलें. निजामाचें कंबरडें मोडल्यानंतर चिमाजी दक्षिणेंत परत आला.

दक्षिणेंत आल्यावर चिमाजीनें संकल्पित मोहिमेचा कानोसा घेतला. तेव्हां त्याच्या निदर्शनास आलें कीं मराठ्यांनीं फिरंग्यांची दहशत घेतली आहे. लगेच त्यानें मोहिमेचें नेतृत्व आपल्या हातीं घेतलें. उत्तर कोंकणांत वसईच्या रोखानें व दक्षिण कोंकणांत गोव्याच्या

रोखानें मराठ्यांची चढाई सुरू झाली. गोव्याकडील मोहिमेवर व्यंकट-राव घोरपडे व दाजीराव भावे यांची नेमणूक झाली होती. त्यांनीं मडगांव काबीज करून साष्टींत अमल बसविला. थोडे दिवस जोर धरला असता तर गोवें मराठ्यांच्या हातीं पडलें असतें. पण मराठे सरदारांतील फितुरीमुळें त्यांना पोर्तुगीजांशीं तह करावा लागला. इकडे उत्तर कोंकणांत मराठ्यांनीं दमण, वसई व चौल यांखेरिजचीं फिरंगणांतील सर्व ठाणीं घेतलीं. तारापूरचा लढा फार निकराचा झाला. या वेळीं फिरंग्यांच्या युद्धपद्धतीचा मराठ्यांना चांगला अनुभव मिळाला. १७३९ च्या जानेवारींत तारापूर, माहीम, डहाणू वगैरे ठाणीं हस्तगत झाल्यानंतर फेब्रुवारींत मराठ्यांनीं वसईला वेढा घातला.

वसईचा किल्ला फार मजबूत. ‘कोट बिलंद, गच्ची रुंद.’ भोंवतालीं खाड्या आणि दलदल. ‘मोर्चा अथवा सुरुंग चालवीन म्हटल्यास पाणी लागतें.’ पश्चिमेस उघडा समुद्र. या द्वारानें जरूर ती सामग्री मुबलक मिळणार. सबब ‘एक्या तोंडानें झुंजावें’ अशी परिस्थिति. किल्ल्यांतले सैनिक शूर व कसलेले योद्धे. ‘फिरंगियासारखे झुंझणार’. आणि वेढा घालणारे ! ‘दक्षिणेची फौज म्हणजे मऊ लागलें म्हणजे बेजरब घेणार, कठीण लागलें म्हणजे फिरोन पाहणें नाहीं. ऐशी पूर्वापार या राज्यांतील तऱ्हा.’ अशा स्थितींत वेढ्याच्या लांबणीवर विसंबून राहणें शक्य नव्हतें. नुकसानीची पर्वा न करतां कोटावर चालून जाणें भाग होतें. वेढ्याचें व युद्धाचें स्वरूप तीव्र झालें तेव्हां किल्लेदारानें तहाचें बोलणें लावलें कीं जंजिऱ्याच्या शिद्दीला मिळाल्या तशाच सवलती मिळणार असतील व खंडणीवर भागवून घेण्यांत येत असेल तर आपण किल्ला खालीं करून देण्यास कबूल आहोंत.

पण पेशव्यांनीं फिरंग्यांचें समूळ उच्चाटण करण्याचा निर्धार केला होता. यामुळें तहाबाबतच्या वाटाघाटींत कालक्षेप न करतां मराठ्यांनीं चढाईचा जोर केला. त्यांनीं जागोजाग मोर्चे उभारले, तटबंदी-पर्यंत चर खणले आणि बुरुजांना सुरुंग लावले. फिरंगी अहोरात्र आग ओतीत होते, तिला जुमानलें नाहीं. किल्लेदारांनीं सुरुंगांखालीं सुरुंग लावून मराठयांचें यत्न व्यर्थ केले. तटबंदीला पडलेलीं खिंडारें

किल्ल्यांतील बिनलढाऊ बायकामुलांनीं रातोरात मातीनें भरून काढली. खिंडारांतून लोटणाऱ्या मराठ्यांच्या टोळया कापून काढल्या. स्वतः चिमाजीअप्पा या युद्धाबद्दल सांगतात : 'सुरुंग कांहीं उडाले, कांहीं उडणें होते, तोंच लोकांनीं उतावळी करून कोटावर घालून घेतलें, तों दुसरे सुरुंग उडाले, त्यांणीं लोक दडपले व जाया ठार झाले. वरते चढले होते ते उडोन गेले. फिरंगियांनीं मरदुमी शिपाईगिरी करावी तैशी केली. त्याप्रमाणें इकडील लोकांनीं भारती युद्धाप्रमाणें युद्ध केलें. यामागें युद्धें बहुत झालीं. परंतु या लढाईस जोड नाहीं.' स्वतः जिंकलेल्या युद्धाबद्दलचे चिमाजीअप्पाचे हे उद्गार अगदीं यथार्थ आहेत. या संग्रामाबद्दल ग्रँट डफ सांगतो, 'असें निग्रहाचें युद्ध मराठ्यांनीं कधीं केलें नाहीं.' हा संग्राम तीन महिने सारखा गर्जत होता. ता. १३–५–१७३९ रोजीं वसईचा किल्ला सर झाला. यासाठीं मराठयांना हजारों मर्द बळी द्यावे लागले. किल्ला सर करा, नाहीं तर मला तोफेच्या तोंडीं देऊन माझें मुण्डकें तरी किल्ल्यांत पडेल अशी तजवीज करा, असे निर्वाणीचे उद्गार चिमाजीला काढावे लागले. अखेरीस श्रीवज्रेश्वरीच्या कृपाप्रसादानें मोहीम यशस्वी झाली. भार्गवरामाच्या कृपाप्रसादानें परशुरामक्षेत्र सुटलें. तेव्हां-पासून पोर्तुगीजांनीं कधीं मान वर करून मराठयांकडे पाहिलें नाहीं! पण पुढें महावृक्ष उन्मळून पडले व लव्हाळे जीव धरून राहिले!

गोमन्तकाला दक्षिणापथाचें नंदनवन म्हणतात, महाराष्ट्राचें काश्मीर म्हणतात. हीं अभिधानें अनेक दृष्टींनीं यथार्थ आहेत; सभ्य अर्थानें व ग्राम्य अर्थानेंही. खण्डाळयाच्या घाटांतून कितीही वेळां प्रवास केला तरी अधूनमधून तेथील रम्य वनश्रीकडे दृष्टि आकर्षित झाल्यावांचून रहात नाहीं आणि पावसाळ्यांत तर येथील देखाव्यावरून नजर ढळत नाहीं. देशालगतच्या सह्याद्रीच्या कोणत्याही घाटापेक्षां गोमन्तकां-तील घाट अधिक आकर्षक आहेत. खण्डाळयाच्या घाटांतून जातांना उल्हास नदीच्या उगमाचा धबधबा दृष्टीस पडतो; पण तो फक्त पावसाळ्यांत दिसतो; किती दूरवरून दिसतो; मुद्दाम पहावा लागतो; दिसतो न दिसतो तोंच दरींत दडतो; शिवाय त्याचा झंकार क्वचितच

कानीं येतो. सह्याद्रींत अनेक लहानमोठे प्रपात आहेत, त्यांत दूधसागर अद्वितीय आहे. हा धबधबा गोमन्तकाच्या देशावरील प्रवेशद्वारालगत आहे. गोमन्तकाच्या ओसंडून चाललेल्या सौंदर्याची ही वानगी पाहतांच मन प्रसन्न होतें. दूधसागर बारमहा वहात असतो. शरावतीचा जगप्रसिद्ध जोग धबधबा पहावयास मुद्दाम तिकडे जावें लागतें. दूधसागर गोमन्तकाच्या वाटेवरच आहे. प्रवाशाला त्याचें अनायासें दर्शन होतें, इतकेंच नव्हे, त्याचें संगीत स्पष्टपणें श्रवण करतां येतें, त्याचे तुषार अंगावर घेण्याचें श्रेय व सुख सहजासहजीं मिळतें. उन्हाळ्यांत व हिंवाळ्यांत त्याचे फेंसाळ प्रवाह दुधाच्या धारांसारखे दिसतात. भगीरथाच्या तपश्चर्येनें स्वर्गांतून गंगेचा प्रवाह भूतलावर प्रथम लोटला व शंकरानें तो शिरीं धारण केला, त्या वेळचें दृश्य आपण पहात आहोंत, असें वाटतें! जगन्माता यशोदा भूधेनूचें दुग्ध मानवासाठीं दोहीत आहे, असें वाटतें! काळसर हिरवीं गर्द अरण्यें; त्यांतून अधून-मधून डोकावणारे काळेभोर कडे; नद्यांचे व खाड्यांचे नागमोडी व गडद निळे प्रवाह; त्यांतून पांढरीं शुभ्र शिडें डोलवीत जाणारे पडाव; या शांत प्रवाहांत किंचित् हेलकावणारीं भोंवतालच्या वनश्रींचीं प्रतिबिंबें; नारळीपोफळींच्या बागांच्या रांगा; काळजीपूर्वक मशागत केलेलीं हिरवींगार भाताचीं शेतें; त्यांमधून कोठे क्वचित् उघडी पडलेली लालभडक माती; पिंवळ्या धमक पेंढ्यानें शाकारलेल्या झोंपड्यांचे पुंज; त्यांलगत रंगीबेरंगी फुलांचे ताटवे आणि त्यांमधून वावरणारे, भडक व फिकट रंगांचीं वस्त्रें ल्यालेले स्त्रीपुरुष! खरोखर, सृष्टीनें वा मानवानें रंगांची अशी उधळ किंवा तुमुलोत्सव केलेला इतरत्र क्वचितच पहावयास मिळेल. तिकडे भोंवतालचे पाझरते डोंगर शेतजमिनींत विरघळत आहेत आणि इकडे उफाळता दर्या किनाऱ्यावर धडका देत आहे, अशीं दृश्यें एकाच नजरेंत इतरत्र क्वचितच दिसतील. यदृच्छया भेटलेल्या एखाद्या अपरिचित पण अनुकूल, मनपसंत, चंचल, रसिक, विलासी सुंदर तरुणीचा अनुनय करतांना तिच्या मुखावरील भाव क्षणोक्षणीं पालटतांना दिसतात; तिच्या सौंदर्याच्या आणि व्यक्तिमत्त्वाच्या अकल्पित, सूक्ष्म व भिन्न छटा पदोपदीं प्रत्ययाला येऊं लागतात; आपल्या अभि-

जात्याच्या व उत्कटतेच्या प्रमाणांत ; त्याच रीतीनें व गतीनें गोमन्तकाचें सौंदर्य भिन्न भिन्न स्वरूपांत, निरनिराळ्या मांडणींत, वेगवेगळ्या पार्श्वभूमीवर प्रवाशाच्या दृष्टिपथांत येतें व हृदयांत भिनतें. सह्याद्रीच्या घाटमाथ्यावरलि दृश्यें भव्य व रौद्र आहेत तर हीं रम्य व सौम्य आहेत ! तीं स्तिमित करतात ; हीं तृप्त करतात. सह्याद्रीच्या सान्निध्यामुळें महाराष्ट्राच्या मुलखांत घाटमाथ्याचा प्रदेश विशेष मनोहर. समुद्राचें सान्निध्य असलें तरी भूगर्भांतील आर्द्रतेच्या अभावीं कोंकणचा खडकाळ प्रदेश अर्ध्यां-अधिक वर्षभर रुक्ष वाटतो. गोमंतकाला सह्याद्रीचें सान्निध्य आहे. तसेंच आंतवर आलेल्या खाड्यांमुळें समुद्राचेंही ; शिवाय गोमन्तकाची भूमि कोंकणापेक्षां सुपीक आहे. म्हणून गोमंतक घाटमाथ्यालगतच्या प्रदेशाहून व कोंकणापेक्षां मनोहर आहे.

गोमन्तकांतील शेतकरी अति मेहनती आहेत. अशीं स्वच्छ व भरदार शेतें इतरत्र क्वचितच पहावयास मिळतात. गोव्याचा कलमी आंबा जगप्रसिद्ध आहे. येथील रहिवासी विशेष कलाप्रिय आहेत. चित्रकार व मूर्तिकार घरोघर आहेत. नामवंत गायक व गायिका आणि नर्तिका गांवोगांव आहेत. गोमन्तकांत मद्य तयार करण्यावर व तें विकण्यावर विशेष निर्बंध नाहींत. यामुळें येथें तऱ्हतऱ्हेचीं देशीं मद्यें स्वस्त, शुद्ध व विपुल मिळतात. आयातीवरील जकात उपेक्षणीय असल्यामुळें विलायती मद्येंही स्वस्त मिळतात. सरासरीनें पाहिलें तर प्रत्येक खेड्यामागें तीन गुत्ते पडतात. याबाबतच्या बोभाट्यामुळें गोमन्तकांत पहिली फेरी करणाराची कल्पना असते कीं येथें घराघरांच्या खिडक्यांमध्यें गोवेकरणी गिऱ्हाइकांची वाट पहात सायंकाळी उभ्या रहात असतील, रात्रीं जलशांचा जल्लोष उडत असेल आणि रस्त्यांलगत कडेकडेनें जागोजाग झिंगलेले लोक पडलेले असतील ! या समजुती आपल्या पूर्वग्रहदूषित विकृत मनोवृत्तीच्या साक्षी आहेत. मद्यसेवनाच्या प्रमाणाचे आंकडे उपलब्ध नाहींत. हल्लीं असे आंकडे कोठें कोठें विशिष्ट हेतूनें निर्माण करण्यांत येत आहेत ; यामुळें निश्चित विधान करतां येत नाहीं ; तरीही सर्वसाधारणपणें दिसतें कीं येथील रहिवासी आपल्या देशावरल्या किंवा कोंकणांतल्या, रहिवाशांहून अधिक

मद्यपी नसावेत. खुल्या मद्यपानामुळें गुन्हेगारी वाढते असें सांगण्यात येतें. गोमन्तकांत गुन्हे क्वचितच होतात. मोटारीची वाट पहातांना प्रवाशानें ओसरीवर किंवा रस्त्यावर ठेवलेल्या सामनावर पहारा करावयाची किंवा ठरविलेल्या हमालावर नजर ठेवण्याची जरूर नसते. पाय मोकळे करण्यासाठीं इकडे तिकडे जावें व जाग्यावर परत यावें तों हमाल तेथें नसतो, यासाठीं त्याला दटावलें तर तो सरळ सांगतो कीं रस्त्यावरच्या सामानाची चोरी व्हावयाला काय हा देश, म्हणजे महाराष्ट्राच्या पठाराचा प्रदेश आहे ? पण अलीकडे आपल्याकडले पुष्कळ लोक वेगवेगळया कारणांमुळें तिकडे स्थायिक होऊं लागल्यामुळें पूर्वीं-सारखी सुरक्षितता व इमानदारी राहिलेली नाहीं अशी तिकडले लोक तक्रार करतात. गोमंतकांत गांवोगांव स्वच्छ व स्वस्त खाणावळी व उपाहारगृहें आहेत. मत्स्याहारी लोकांना तर भिन्न, चवदार व आवडीचीं पक्वान्नें कोठेंही मिळतात. एखाद्या आडवाटेच्या गांवीं खाणावळीची सोय नसली तरी प्रवाशाची गैरसोय होत नाहीं. मंदिरांत मुक्कामाची व्यवस्था होते आणि आकस्मिक पाहुणचारावर कोणींही अवलंबून रहावें इतके येथील लोक आतिथ्यशील आहेत. कोंकणस्थ विरुद्ध देशस्थ, ऋग्वेदी विरुद्ध यजुर्वेदी, ब्राह्मण विरुद्ध ब्राह्मणेतर, मराठे विरुद्ध मराठेतर, स्पृश्य विरुद्ध अस्पृश्य अशा अनेक परस्परविरोधी छावण्यां-मध्यें पठारावरील महाराष्ट्र-समाज विभागला गेला आहे. एकीकडे शिक्षणाची प्रगति होत आहे आणि लोकशाही संस्था उत्क्रांत होत आहेत आणि दुसरीकडे या साधनांच्या दुरुपयोगामुळें वर्गविरोध दिवसानु-दिवस अधिकाधिक तीव्र स्वरूप धारण करीत आहे. गोमन्तकांत अशा विरोधी छावण्या नाहींत. मग ही परिस्थिति औदासीन्यामुळें, हताशपणा-मुळें अगर शिक्षणाचा फारसा प्रसार झालेला नसल्यामुळें निर्माण झालेली असो, किंवा सत्तासंपादनाची संधि नसल्यामुळें निर्माण झालेली असो ; गोमन्तकातील समाजाच्या वेगवेगळया वर्गामध्यें खेळीमेळीचें वातावरण आहे. वर्गकलह व वर्गविद्वेष अजून निर्माण झालेला नाहीं.

गोमन्तकांतील जनता वृत्तीनें अत्यंत धार्मिक होती व आहे. कोठेंही जा, हिंदूंच्या घरापुढें तुलसीवृंदावन असतेंच ; आणि ख्रिस्त्यांचे घरां-

समोर क्रूसाचें वृंदावन! गोमन्तकांत आहेत तशीं, तेवढीं व तितकीं देवळें एवढ्या टापूंत इतरत्र क्वचितच आढळतील. आहेत त्यांहून आणखी किती तरी देवळें या देशांत होतीं. मुसलमानांच्या व पोर्तुगीजांच्या मंदिर व मूर्तिभंजनाच्या अत्याचारांतून बचावलीं तेवढींच आतां दृष्टीस पडतात. जीं आहेत त्यांचा इतिहास महाराष्ट्रीयांच्या अगतिकतेचा द्योतक आहे; त्याचप्रमाणें महाराष्ट्रीयांच्या धार्मिकतेच्या चिवटपणाचा. मूर्तिभंजकाच्या हातोड्यापासून वांचविण्यासाठीं मूळ मूर्ति पळवावयाची आणि धामधूम ओसरली म्हणजे इतरत्र नवें-जुनें मंदिर उभारून त्यांत पुरातन मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करावयाची, असे प्रकार गोव्यांतील अनेक मंदिरांचे बाबतींत वेळोवेळीं झालेले आहेत. प्रभूच्या प्रेरणेनें निघालेल्या आज्ञेच्या अन्वयें तिसवाडींतील सर्व देवळें १५४१ सालीं धुळीला मिळविण्यात आलीं. लोटली येथील श्री रामेश्वराच्या मंदिराचा विध्वंस १५४३ सालीं करण्यांत आला; आतां हें देवस्थान बांदिवडें येथें आहे. नंतर वेर्णें येथील श्रीम्हालसेचें मंदिर उध्वस्त करण्यांत आलें; आतां हें मंदिर प्रियोळच्या म्हाडदोळ भागांत आहे. श्री मंगेशाचें देवालय पूर्वी कुशस्थली येथें होतें; श्रीशांतादुर्गेचें केळोशी येथें. कदम्बांचा कुलस्वामी श्रीसप्तकोटीश्वर याचें देवालय पूर्वी दीपवती बेटांत नारवें येथें होतें; सांप्रत बतग्रामी नारवें येथें आहे. पुरातन देवालयांच्या जीर्णोद्धाराचीं कामें हिंदूंनीं जिवावर उदार होऊन केलेलीं आहेत. १५६९ सालांत बारदेशांतील सर्व मंदिरें पाडण्यांत आलीं. धामधूम ओसरलीसें वाटल्यानंतर हिंदूंनीं आपलीं देवळें जशींच्या तशीं बांधून काढलीं. यामुळें खवळलेल्या पाद्र्यांच्या चिथावणीवरून सरकारी सैनिकांनीं हीं मंदिरें फिरून उध्वस्त केलीं आणि त्यांचीं स्थानें गोमांसानें भ्रष्ट केलीं; अशीं देवळें जेथें उभारलीं होतीं तीं गांवेंच्या गांवें त्यांनीं जमीनदोस्त केलीं! असे प्रकार पूर्वी महाराष्ट्रांत, देशावरही झालेले आहेत. तुळजापूर व पंढरपूर येथील मूर्तींच्या व मंदिरांच्या बाबतींत अशाच दंतकथा आहेत; फरक एवढाच कीं येथें या मूर्तींची प्राणप्रतिष्ठा मूलस्थानींच झालेली आहे. मंदिरांच्या रक्षणासाठीं त्यांभोंवतीं छातीचा कोट करून कोणी कधीं उभे राहिल्याचें ऐकिवांत नाहीं. गनिमी कावा या नांवाखालीं या

प्रवृत्तीचें समर्थन करतां येत नाहीं ; कारण या युद्धपद्धतींतही निर्वाणीच्या लढ्याचा भाग असतोच. गोमंतकांतील मंदिरें भव्य व विस्तीर्ण, स्वच्छ व सुव्यवस्थित आहेत. प्रशान्त गाभाऱ्यात भव्य मूर्ति, नेटका सभामंडप, समोर उंच दीपमाळ, भोंवतीं स्वच्छ आवार, बाजूला विस्तीर्ण अग्रशाला, नजीक सुंदर तळीं, तटाभोंवतीं गर्द राई, अशी या मंदिरांची मनोहर मांडणी आहे. या देवस्थानांच्या खर्चाची तजवीज अत्यंत व्यवस्थितपणें केलेली आहे. देवाच्या सेवेसाठीं पुजारी व वाजंत्रीं, कलावती व भाविणी यांच्या नेमणुका केलेल्या आहेत. मुख्य देवालयांतील पूजा-अर्चा गंभीर स्वरूपांत होतात आणि पुराणें व कीर्तनें नेहमीं होत असतात ; आणि मोठमोठे उत्सव मोठ्या उत्साहानें साजरे करण्यांत येतात. हीं मंदिरें गोमन्तकाच्या धार्मिकतेचीं प्रतीकें आहेत ; गोमन्तकाच्या जिवंतपणाचीं प्रतीकें आहेत.

गोमंतकीयांनीं प्रतिकूल परिस्थितींत जेवढ्या चिकाटीनें धर्माचें रक्षण केलेलें आहे तेवढ्याच चिकाटीनें व आस्थेनें त्यांनीं मराठी भाषेची जोपासना केलेली आहे. पोर्तुगीजांनीं हिंदुत्वाचा उच्छेद करण्यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली. प्रजेच्या परिवर्तनासाठीं वैकल्पिक धर्माची व धर्मक्षेत्रांची मांडणी केली. परिवर्तन सुकर व्हावें म्हणून फादर स्टीफननें १६१४ सालीं ख्रिस्तपुराण मराठीं भाषेंत तयार केलें. त्यांत त्यानें मराठी भाषेचा गोडवा गाइला आहे :

**जैसी पुष्पांमाजी पुष्प मोगरी । कीं परिमळामाजी कस्तुरी ।**
**तैसी भाषांमाजी साजिरी । मराठीया ॥**

फादर स्टीफननें ख्रिस्तपुराणासाठीं मराठी भाषेचा अवलंब केला, कारण मराठी हीच गोमन्तकाची मातृभाषा होती. बहुजनसमाज मराठी बोलणारा व समजणारा असल्यामुळें धर्मप्रचारासाठीं मराठी भाषेचा उपयोग करण्यांत येऊं लागला. यांत वावगें असें कांहींच नव्हतें. पण यामुळें देशी धर्मोपदेशकांना महत्त्व प्राप्त होऊं लागलें. ही ब्याद कायमची काढून टाकण्यासाठीं परदेशी धर्मोप-देशकांनीं रोममार्फत पोर्तुगालच्या राजावर वजन आणून १६८४ चा कुप्रसिद्ध कायदा पास करून घेतला. त्या अन्वयें देशी भाषेचा

उपयोग सर्व लोकांनीं बंद करावा व तीन वर्षांच्या अवधींत सर्वांनीं केवळ पोर्तुगीज बोलूं लागावें असें होतें. या कायद्याचा परिणाम असा झाला कीं गोव्यांतील ख्रिस्ती लोकांचा ग्रांथिक मराठीशीं असलेला संबंध हळूहळू सुटला आणि कोंकणी हीच आपली मातृभाषा असें ते म्हणूं लागले (श्री. प्रियोळकर : महाराष्ट्र साहित्य संमेलन, कारवार). रोमन लिपींत लिहिलेल्या कोंकणीचा परिवर्तित पुरस्कार करूं लागले आणि देवनागरींत लिहिलेल्या कोंकणीचा स्थानिक संस्कृतीचे अभिमानी. गोमन्तकीयांच्या अंतःकरणांत एवढा विकल्प निर्माण करण्यांत आलेला असला तरी त्यांनीं महाराष्ट्र-सरस्वतीची सेवा अविरतपणें व एकनिष्ठपणें बजावलेली आहे. गोमन्तकाला मराठीबद्दल आस्था आहे, अभिमान आहे. गोमन्तकाचा भाषाभिमान साहित्याच्या निर्मितींत व पुरस्कारांत अविरतपणें व्यक्त होत आहे. या निष्ठेबद्दल त्यांचें अभिनन्दन करावें तेवढें थोडेंच होणार आहे.

असें आहे तरी गोमन्तकांत वावरतांना कोठें तरी कांहीं तरी चुकत असल्यासारखें आपल्याला वाटत असतें.

हिंदुस्थानांतले लोक स्वभावतःच सोशिक आहेत. त्यांचा हा गुण माना किंवा दोष समजा. या जन्मांत जें कांहीं मिळत आहे तें पूर्व-जन्मांतील पापपुण्याचें फळ आहे असें मानावयास शिकविण्यांत आल्या-मुळें किंवा बौद्ध कालांत अहिंसा अंगीं भिनविण्यांत आल्यामुळें आमच्या-मध्यें एवढा सोशिकपणा आलेला असणें संभवनीय आहे. शिवाय हिंदु लोकांइतके अल्पसंतुष्ट लोक इतरत्र कोठें आढळावयाचे नाहींत. पोटापुरतें अन्न व अंग झांकण्यापुरतें वस्त्र मिळालें कीं संतुष्ट; अधिक कष्ट करण्याला सहसा उद्युक्त होणार नाहींत. ब्राह्मणाना जनतेंत चैतन्य जागृत करतां आलें नाहीं; क्षत्रियांना स्वातंत्र्याचें संरक्षण करतां आलें नाहीं. एकेका युद्धांत पराभूत होतांच हतप्रभ होऊन आम्हीं कोठें कांहीं शतकापूर्वी तर कोठें कांहीं वर्षांपूर्वी माना खालीं घातल्या, तेव्हां-पासून आम्हीं कोणाच्या डोळ्याला डोळा भिडविला नाहीं; मग दंड थोपटण्याची गोष्टच राहूं द्या. आम्ही सोशिकपणा शिकलों आणि लाचारी अंगीं भिनवून घेतली. पिढ्यांमागून पिढ्या अशा लाचारींत

काढल्यामुळें आतां आमच्या लाचारीलाही एक प्रकारचा तुकतुकीतपणा आलेला आहे. भारतांतील कोणत्या प्रदेशांत ही तकाकी विशेष प्रत्ययास येत असेल तरी ती गोमन्तकांत. सारे कसे शांत, सस्मित व तुकतुकीत दिसतात. मायामोहांपासून, रागद्वेषांपासून अलिप्त! कोणाच्या मुद्रेवर मस्ती नाहीं, अंगांत रग नाहीं, दण्डाला पीळ नाहीं! गोमन्तक शिवपूजक आहे आणि शक्तिपूजक आहे; पण येथें पुरुषाचें किंवा प्रकृतीचें रौद्र स्वरूप प्रत्ययाला येत नाहीं. येथें शक्तीचें रूप कामाक्षी, महालसा, शांतादुर्गा यांच्या सौम्य स्वरूपांत प्रकट होतें. बंगाल्यांत शक्तीचें रौद्र स्वरूप निदान तिच्या मूर्तींत आढळतें; उपासनेंत प्रत्ययास येतें. येथें तेंही आढळत नाहीं. येथील देवींच्या मूर्ति शांत व सस्मित आणि त्यांच्या सेवेला गायिका व नर्तिका. काय असेल तें असो, जेथें शक्तीची पूजा होते तेथील रहिवासी शरीरानें अशक्त व वृत्तीनें ढिले आढळतात. मग हा वाण दमट जमिनीचा असो किंवा निकस अन्नाचा.

परशुरामाच्या काळांत अपरान्तांत आर्यांच्या वसाहती स्थापन झाल्या. रामचंद्राच्या काळांत दण्डकारण्यांत आर्यांच्या वसाहती झाल्या. सातवाहन-कालांत महाराष्ट्रांत वैदिक संस्कृतीचें पुनरुज्जीवन झालें. याच काळांत बौद्धांनींही महाराष्ट्रावर धार्मिक प्रभुत्व प्रस्थापित करण्यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली. कदम्ब, वाकाटक, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव व शिलाहार यांच्या राजवटींत महाराष्ट्रांत संस्कृतिसंवर्धनाचें कार्य झालें. महाराष्ट्राची विशिष्ट संस्कृति निर्माण झाली. पुढें मुसलमानांचीं आक्रमणें सुरू झालीं व राज्यें स्थापन झालीं. तेव्हां जें भारतांत इतरत्र झालें तेंच महाराष्ट्रांतही झालें. निःपक्षपातानें व निर्भयपणें महाराष्ट्राचा राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक इतिहास लिहिण्यांत येईल तेव्हां निश्चित विधान करावें लागेल कीं मुसलमानांच्या राजवटींत व राजवटीमुळें महाराष्ट्राची धार्मिक अवनति झाली, राजकीय पतन झालें. आर्थिक अधःपात झाला व सांस्कृतिक भ्रष्टता झाली. इस्लामी राजवटींत महाराष्ट्राचें जंगलीकरण झालें, श्वापदीकरण झालें. पोर्तुगीजांचें पाऊल जेथें जेथें पडलें तेथें तेथें तर अत्याचारांचा डोंब उसळला. हिंदुस्थानांतील

पोर्तुगीजांचा इतिहास मुसलमानी इतिहासाहून कडवट, तिखट व विषारी आहे. मुसलमानांना किंवा इंग्रजांना जें साधलें नाहीं तें पोर्तुगीजांना साधलें. राजकीय महत्त्वाकांक्षा किंवा धार्मिक अभिनिवेश नाहीं तोंवरच प्रजेनें जगावें, प्रजोत्पादन करावें, पाहुणचार करावा, मद्यपान करावें, देवभोळ्या जत्रा कराव्या, निरुपद्रवी भजनें किंवा कलापूर्ण नाचगाणीं करावींत; याला मनाई नव्हती, प्रोत्साहन होतें. हिंदूंना धर्मरक्षणाचे बाबतींत राज्यकर्त्यांचें आव्हान होतें. देहधर्म एवढाच धर्म त्यांचे बाबतींत संभवतो असा पोर्तुगीजांचा आग्रह होता. इतरांना जें साधलें नाहीं व पोर्तुगीजांनीं जें साधलें तें हें, कीं यांनीं आपल्या प्रजेचें पौरुष नष्ट केलें. मनुष्य वृत्तीनें किती भोळा असतो, जुलूम किती सहन करूं शकतो, लाचारीचें जिणें किती पिढ्या काढू शकतो, याचें गोमन्तक हें प्रात्यक्षिक आहे. पाणवठ्यावर पडलेल्या पावाच्या तुकड्यानें गांवच्या गांव बाटूं शकतात, आपण बाटलों असें बाटलेले मानतात व त्याविरुद्ध बंड पुकारीत नाहींत; ते बाटले असें त्याचे तोंपर्यंतचे बांधव व धर्मगुरु मानतात आणि त्याविरुद्ध धार्मिक वा राजकीय उपाययोजना करीत नाहींत; आक्रमकांची एखादी टोळी राजवाडा हस्तगत करते, राजाची सपरिवार कत्तल करते, त्या टोळीचा पुढारी परंपरागत सिंहासनावर अधिष्ठित होतो आणि लगेच प्रजा या राजाच्या अधिकाराला निमूटपणें मान्यता देते. राष्ट्राच्या एका भागांत राजकीय व धार्मिक अत्याचार झाले तर हें स्थानिक परिस्थितीचें पर्यवसान असावें असा न करत्यांना सोईस्कर असलेला समज समाजाचे नेते करून घेतात, ही आमच्या नैतिक व राष्ट्रीय अधोगतीची परमावधि आहे.

साहसाविषयीं विख्यात असलेल्या एका शिकाऱ्याची सत्यकथा आठवते. तो आफ्रिकेंत हिंस्र श्वापदांच्या शिकारीसाठीं हिंडत असतां सोबत्यांना सोडून जंगलांत एकटाच घुसला आणि नरमांसभक्षकांच्या रानटी टोळीच्या तावडींत सांपडला. सुटकेसाठीं त्यानें खूप धडपड केली; दारूगोळा संपेपर्यंत बळी घेतले; पण संख्येच्या सामर्थ्यापुढें त्याचा नाइलाज झाला. या जंगली लोकांनीं त्याला एका झाडाला

बांधून ठेवलें आणि त्याच्या भोंवतीं भाल्यांचा नाच सुरू केला. भाले रोंखलेल्या दांडग्यांच्या टोळ्या भोंवतीं उभ्या राहिल्या, ढोलाच्या तालांत भाले पुढेंमागें करीत व अधूनमधून फाळानीं त्याला टोंचीत तासानुतास घुमत राहिल्या. पण तो त्याच्या भक्ष्यस्थानीं पडण्यापूर्वींच त्याच्या मागावर असलेले त्याचे सोबती त्याच्या मदतीला धावून आले. त्यानीं टोळीवाल्यांवर गोळीबार करून याची सुटका केली. सुटका झाली खरी; पण झाल्या प्रकारामुळें त्याच्या मनाची ठेवण पार बदलून गेली. त्याचे धैर्य खचलें, त्याचें पौरुष नष्ट झालें.

गोमन्तकांतील प्रजेची अशीच अवस्था झालेली आहे. आज साडेचारशें वर्षें त्यांच्या भोंवतीं फिरंग्यांच्या भाल्यांचा नाच चाललेला आहे. नरमांसभक्षकांहून भयंकर! ते एकट्या-दुकट्या व्यक्तीला ग्रासतात, आणि हेंही भुकेचे वेळीं; यांनीं सबंध देश गिळंकृत केला. ते व्यक्तीचा देह ग्रासतात, यांनीं देशाची संस्कृति ग्रासली!

पठारावरल्या महाराष्ट्रीयांची अशीच अवस्था झाली होती. आमच्या सुदैवानें सह्याद्रीकडून स्वातंत्र्याची संजीवनी संपादन केलेल्या शिवाजीनें महाराष्ट्राचें चैतन्य जागृत केलें. सह्याद्रीचा स्वामी जो शंभुमहादेव व स्वामिनी भवानी यांच्या कृपेनें शिवाजीचें कार्य यशस्वी झालें. त्यांच्या जयजयकारांत महाराष्ट्रीयांनीं अटकेवर झेंडे रोंवले. दुष्कृतांच्या विनाशासाठीं युगायुगांमधून परमेश्वर अवतार घेतो, असें सांगतात. शिवाजी हा असा एक अवतारच.

तोच सह्याद्रि, सह्याद्रीचा स्वामी व स्वामिनी गोमन्तकाचे पाठीराखे आहेत. त्याच्या प्रेरणेचें स्फुरण होण्याचाच काय तो अवकाश आहे.

शिकाऱ्याच्या गोष्टीचा राहिलेला भाग पुरा करतों.

संकटांतून सुटका झाल्यावर शिकारी स्वगृहीं परत आला. आतां त्याच्या मुखावर अर्धवटाचें स्मित व नेभळटाची तकाकी दिसूं लागली. त्याची आपल्या पत्नीवर अति प्रीति होती. तो नेहमीं तिच्याभोंवतीं असे. देहधर्म एवढाच जीवनव्यापार. कोठें कांहीं खुट्ट झालें कीं घाबरा होई. विख्यात वैद्यक-शास्त्रज्ञांनीं नाना प्रकारचे उपचार केले, पण त्याचें व्यक्तिमत्त्व जागृत होईना. शेवटीं एका मानसशास्त्रज्ञानें

एक विलक्षण प्रयोग करून पाहण्याचें ठरविलें. शिकाऱ्याची पत्नी व जिवलग स्नेही यांना त्यानें विश्वासांत घेतलें. या स्नेह्यानें शिकाऱ्याची अवहेलना करावी व त्याच्या देखत त्याच्या पत्नीवर अत्याचार करण्याचा प्रयत्न करावा असें ठरलें. दोघांनीं नाटक चांगलें रंगविलें. हें दृश्य पाहतांच शिकारी एकाएकीं इतका चवताळला कीं हातीं आली ती वस्तु उगारून तो आपल्या स्नेह्यावर तुटून पडला. प्रयोग यशस्वी झाला. दुबळ्याचें चैतन्य जागृत झालें !

असा कांहीं समरप्रसंग निर्माण होईल आणि गोमन्तकाचें चैतन्य जागृत होईल, तेव्हांच गोमन्तकाचें खरें व्यक्तिमत्त्व आपल्या निदर्शनास येईल.

मात्र यासाठीं गोमन्तकाला सोबत्यांच्या सहकार्याची जरूर आहे; कारण आतां हा प्रश्न स्थानिक किंवा राष्ट्रीय राहिलेला नसून आंतरराष्ट्रीय झालेला आहे. स्थानिक संकटाशीं झगडण्याची जबाबदारी स्थानिक कर्तृत्वावरच सोंपविण्याचे दुष्परिणाम आपण भोगले आहेत, आजही भोगीत आहोंत. या बाबतींत गोमन्तकीयांना नांवें ठेवणें अन्यायाचें आहे. विपरीत परिस्थितींत त्यांनीं स्वत्व राखलें याबद्दल ते अभिनन्दनास पात्र आहेत. त्यांच्या बाबतींतलें आपलें कर्तव्य महाराष्ट्र व भारत पार पाडतील यांत संशय नाहीं. स्फुलिंग उडूं लागले आहेत आणि लवकरच हा संग्राम सुरू होणार आहे.

## (२) जंजिरा–प्रकरण

पोर्तुगीज, हबशी व इंग्रज हे महाराष्ट्राच्या पश्चिम किनाऱ्यावरील अर्वाचीन परदेशी आक्रमक. हिंदुस्थानांत इतरत्र राज्यस्थापनेचा खटाटोप किंवा राजकारणांत लुडबुड करणारे फ्रेंच व डच यांचा महाराष्ट्राच्या पश्चिम किनाऱ्यावर शिरकाव झाला नाहीं. हबशी व देशी मुसलमान, हबशी व इतर परदेशी आक्रमक, कोंकणी व पठारी मराठे आणि पश्चिम किनारा व सह्याद्रि यांचे गुणावगुण जंजिरा-प्रकरणांत विशेष उठावानें दिसून येतात; म्हणून या प्रकरणाची चर्चा थोड्याफार विस्तारानें केलेली आहे.

पोर्तुगीज, हबशी व इंग्रज हे तिघेही दर्यावर्दी, संधिसाधु व कडवे लढवय्ये. तिघांचेंही व्यापारी धोरण व राजकारण दुटप्पी. भौगोलिक दृष्ट्या हबशी हे हिंदुस्थानला अधिक नजीकचे; दक्षिणेंतील दर्यावर्दी व्यापारांत व अंतर्गत राजकारणांत त्यांचा प्रवेश पोर्तुगीज व इंग्रज यांच्या पूर्वींच झालेला; शिवाय देशावरील राज्यकर्त्यांचा त्यांना पाठिंबा होता; तरीही दक्षिणेंतील राजकारणांत त्यांना पहिल्या दर्जाचें स्थान केव्हांही मिळूं शकलें नाहीं; कारण ते मराठ्यांहून सुसंस्कृत किंवा विशेष सुसज्ज कधींही नव्हते; शिवाय त्यांच्या येथील राजकीय उद्योगाला त्यांच्या मायदेशाचा पाठिंबा नव्हता आणि त्यांचा पिंड मांडलिकीचा होता. पोर्तुगीज व इंग्रज यांचा पिंड सम्राटाचा. त्या त्या कालखण्डांतील त्यांची आकांक्षा व आत्मनिष्ठा, युद्ध-सामग्री व युद्ध-पद्धति निःसंशय आमच्याहून श्रेष्ठ दर्जाची; शिवाय प्रत्येक युद्ध ते जीवनमरणाच्या निर्धारानें लढले. अत्याचारी असहिष्णुतेमुळें पोर्तुगीज द्वेष्य झाले आणि मागासले. इंग्रजांनीं सत्तासंपादनाचें धोरण दूरदृष्टीनें आंखलें आणि अतुल्य हिंमतीने ध्येय साधलें. पोर्तुगीज व इंग्रज यांच्या येथील उद्योगांना त्यांच्या मायदेशांचा पाठिंबा होता. एतद्देशीय प्रजेचें सहकार्य आहे तोंवरच त्यांचें अस्तित्व.

पोर्तुगीज, हबशी व इंग्रज हे अनुक्रमें गोवें, जंजिरा व मुंबई येथें स्थायिक झाले. नैसर्गिक प्रदेशांच्या सरहद्दीवर आणि विशेषतः प्रादेशिक सत्तांच्या संक्रमणावस्थेंत परकयांना स्थायिक होण्यास सोईस्कर स्थानें व संधि उपलब्ध होतात; कारण केंद्रसत्तांच्या दौर्बल्यामुळें व स्थानिक वैमनस्यांमुळें प्रजा राजकारणाविषयीं उदासीन झालेली असते. मला वाटतें, म्हणूनच, राजकीय व नैसर्गिक परिस्थितीच्या अनुरोधानें इंग्रजांनीं सुरत व पोर्तुगीजांनीं गोवें या स्थानांची स्थायिक होण्यासाठीं निवड केली. मात्र इंग्रज सुरतेस होते तोंवर त्यांचा पेशा व्यापारी होता; सत्तासंपादनाची कल्पनाही त्यांना सुचलेली नव्हती. हा तेथील भूमीचाच गुण असल्यास न कळे! प्रतिस्पर्धी पोर्तुगीजांनींच त्यांना मुंबई बेट आंदण दिलें आणि इंग्रजी राज्याच्या स्थापनेचा मुहूर्त केला! हे आक्रमक ज्या ज्या स्थानीं स्थायिक झाले त्याभोंवतालच्या नैसर्गिक

परिस्थितीच्या अनुरोधानें त्यांच्या राजकीय कार्यक्षेत्राचा विस्तार वा संकोच झाला. देशावर जाण्यासाठीं ज्यांना सह्याद्रीनें मार्ग दिला त्यांचाच विस्तार झाला. सत्तासंरक्षणासाठीं व चांचेगिरीसाठीं जंजिऱ्या-सारखें दुसरें सोईस्कर ठिकाण पश्चिम किनाऱ्यावर नाहीं; मात्र भूमी-वरील सत्तासंवर्धनास हें स्थान अनुकूल नाहीं; भोंवतालीं सपाट, सुपीक मुलूख नाहीं आणि देशावर येण्यास सोपा मार्ग नाहीं. युरोपां-तील आरमारी पराभवांमुळें व आकांक्षी प्रभावी नेतृत्वाच्या अभावीं हिंदुस्थानांतील पोर्तुगीज सत्ता खुरटली. भोंवतालीं दुर्लंघ्य जंगलें असल्यामुळें आणि देशावर येण्यास वाव नसल्यामुळें पोर्तुगीज सत्ता केवळ स्थानिक राहिली, हेंही तितकेंच खरें. गुजराथ, कोंकणपट्टी व मध्य महाराष्ट्र या तिन्ही प्रदेशांवर वचक ठेवण्यास मुंबईसारखें सोईचें स्थान पश्चिम किनाऱ्यावर दुसरें नाहीं. या ठाण्याचें राजकीय व प्रादेशिक महत्त्व पोर्तुगीजांनीं किंवा इंग्रजांनींच प्रथम ओळखलें असें नाहीं. कोंकणपट्टीवर राज्य करणाऱ्या मौर्यांचें ठाणें अपरसागरलक्ष्मी घारापुरी हें होतें; शिलाहारांच्या एका शाखेची राजधानी ठाण्यास होती; यादवांच्या राज्याचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं प्रयत्न करणाऱ्या प्रतापबिंबानें महिकावतीस राजधानी स्थापन केली होती. याचीं अनेक प्रत्यंतरें अद्याप मुंबईभोंवतीं अस्तित्वांत आहेत. मुंबईच्या उत्तर-दक्षिणेस असलेलीं प्राचीन बंदरें रेतीच्या भरावामुळें निरुपयोगी झाल्या-मुळें आणि जहाजांचा आकार वाढल्यामुळें त्यांना उपयुक्त आणि पावसाळी पुरांपासून अलिप्त व उघड्या समुद्रालगत असें हें बंदर दर्यावर्दी इंग्रजांना यदृच्छेने लाभलें. वाटतें कीं सोळाव्या शतकाच्या सुरुवातीपासून हिंदुस्थानांत ज्या राजकीय घडामोडी झाल्या त्यांचा आगाऊ अंदाज बांधून भवितव्यतेनेंच या परकीय आक्रमकांना ज्या त्या स्थानीं स्थायिक होण्याची प्रेरणा दिली!

सह्याद्रीच्या पश्चिम शाखांची जाळी अपरान्तभर पसरलेली आहे. या जाळीचे धागे दुरंगी आहेत; काळसर करडे व निळसर तांबडे. या धाग्यांचा कोठें गुंता झालेला आहे, तर कोठें ते नागमोडी किनाऱ्या-पर्यंत पसरलेले आहेत. घाटमाथ्यावर उगम पावणाऱ्या नद्या त्यांच्या

घेचक्यांमधून वहात येऊन समुद्राला मिळतात. त्यांनीं हरहंगामीं वाहून आणलेल्या मातीमुळें डोंगरांदरम्यानच्या दऱ्या भरून निघालेल्या आहेत. त्यांचे प्रवाह पावसाळ्यांत फार वेगांत वहात असल्यामुळें त्यांचीं मुखें त्यांच्या लांबीच्या मानानें विशेष विस्तृत आहेत. भरती–ओहोटीच्या क्रियेमुळें त्यांचा विस्तार अधिकच वाढलेला आहे. डोंगराचा आधार नसेल तेथें किनाऱ्याची कड जागोजाग फाटलेली आहे. इतका लांब आणि स्थूलमानानें इतका सरळ, पण वस्तुतः जागोजाग कुरतडलेला किनारा ; अंतर्भागांत आश्रय घेतां येईल अशा असंख्य खाड्या व बंदरें आणि त्यांलगत दर्यावर्दी वाहतुकीच्या टेहळणीला सोईस्कर अशा उंच टेंकड्या व पर्वत ; शिडांवर अवलंबून असलेल्या नौकानयनाला विशिष्ट हंगामांत अनुकूल व प्रतिकूल असे वातप्रवाह आणि त्यामुळें जहाजांना घ्यावा लागणारा किनाऱ्याचा आश्रय ; या पश्चिम किनाऱ्याच्या वैशिष्ट्यांमुळें हा भाग चांचेगिरीला फार अनुकूल असा आहे. पश्चिम किनाऱ्यालगत बेटें अशीं फारशीं नाहींतच ; जीं आहेत तीं आकारानें क्षुद्र व स्वयंपूर्ण वसाहतीला निरुपयोगी आहेत. बेटांचा अभाव, किनाऱ्यालगतच्या प्रदेशांत परस्परविरोधी क्षुद्र स्थानिक सत्तांचें अस्तित्व,

देशाच्या अंतर्भागांत मैदानी सत्तांचा उत्कर्ष, देशावर कर्तृत्वाला भरपूर वाव मिळत असल्यामुळें दर्यावर्दी उद्योगांकडे केंद्रसत्तेचें दुर्लक्ष आणि निकटवर्ती दर्यावर्दी शत्रूंचा अभाव, या कारणांमुळें अपरान्तांत प्रभावी व चिरस्थायी स्वदेशी सागर–संस्कृति निर्माण होऊं शकली नाहीं. गोवा, जंजिरा, मुंबई व वसई या ठिकाणीं ठाणीं मांडून भोंवतालच्या भागांत सत्ता संपादन करणें आक्रमकांना शक्य झालें, कारण या ठिकाणीं किनाऱ्याची कड कुरतडलेली आहे आणि केवळ सागरावलंबी, अभेद्य व अजिंक्य असे जलदुर्ग उभारण्यासाठीं सोईस्कर स्थळें आहेत. किनाऱ्यालगतच्या सह्याद्रीच्या सोंडांवर, एकसंधी भूशिरावर व अलग बेटांच्या मजबूत कातळावर लहानमोठे दुर्ग उभारण्यांत आलेले आहेत ; स्वकीयांकडून संरक्षणासाठीं व परकीयांकडून आक्रमणासाठीं. हीं कामें अर्थातच सागर-संस्कृतीच्या आक्रमणानंतरचीं आहेत. पश्चिम किनाऱ्यालगतच्या अनेक किल्ल्यांना जलदुर्ग ही संज्ञा ढिलाईनें देण्यांत

येते. वस्तुतः समुद्रानें सर्व बाजूंनीं परिवेष्टित असे जलदुर्ग अपरान्तांत फारच थोडे आहेत. जे आहेत त्यांमध्यें हबशांचा जंजिरा अग्रगण्य आहे.

जंजिऱ्याचा कोट राजपुरीच्या विस्तीर्ण खाडीच्या तोंडाशीं उभारलेला आहे. दंडा-राजपूर हें मध्ययुगांतील प्रसिद्ध बंदर या खाडीच्या मुखाशीं उत्तर तीरावर आहे. यादव-कालापर्यंत हें बंदर भरभराटींत होतें. खाडी मुखाशीं चार मैल रुंद असून तिची लांबी सुमारें वीस मैल आहे. अंतर्भागांत या खाडीचे दोन फांटे झालेले आहेत. दक्षिणेस म्हसळयाकडे जाते ती तळखाडी व उत्तरेकडली मांदाड खाडी. येथील समुद्रकिनारा असा फाटलेला असल्यामुळें हबशांना पाऊल रोंवण्यास खासें ठिकाण मिळालें. जंजिरा व सिद्दी आणि मुंबई व इंग्रज यांचें साहचर्य आपल्या मनावर इतकें ठसलेलें आहे कीं या भागांचा महाराष्ट्राच्या प्राचीन आर्थिक व राजकीय इतिहासाशीं निकट संबंध होता असें विधान केलें तर तें अविश्वसनीय व अतिरंजित वाटण्याचा संभव आहे.

महारथी व महाभोज हे सातवाहनांचे सामन्त. महारथींचे शिलालेख घाटमाथ्यावरील लेण्यांत आढळतात आणि महाभोजांचे अपरान्तांत. यावरून दिसतें कीं त्यांचें आधिपत्य त्या त्या भागांत असावें. त्यांच्या राजकीय कर्तृत्वामुळेंच महाराष्ट्र ही प्रादेशिक संज्ञा सिद्ध झालेली असावी. भोज हें हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांतील एक कोडें आहे. भोजांचे प्राचीन विख्यात घराण्यांशीं नात्याचे संबंध होते. 'दण्डक्यो नाम भोजः कामात् ब्राह्मणकन्याम् अभिमन्यमानः सबंधुराष्ट्रो विननाश' ह्या कौटिल्याच्या विधानाचा समाधानकारक उलगडा अद्याप झालेला नाहीं. हा दण्डक भोज कीं ऐक्ष्वाक? भोज हें दण्डक्याचें उपनाम होतें असें अर्थशास्त्राचे संपादक व भाषांतरकार डॉ. शामशास्त्री सांगतात. दण्डकारण्याशीं संलग्न असलेला दण्ड किंवा दण्डक हा इक्ष्वाकुकुलोत्पन्न, असें रामायण सांगतें. दण्डकारण्य या भौगोलिक संज्ञेची अद्याप निश्चितपणें ओळख पटलेली नाहीं. ही संज्ञा ढिलाईनें वापरण्यांत येते. रामायणांतील एका उल्लेखांत विन्ध्य व ऋक्ष पर्वतांच्या परिसरांत दण्डकारण्य मांडलेलें आहे; तर अन्यत्र नर्मदा,

गोदावरी व कृष्णवेणी यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत; आणि जातकांतील दण्डकारण्य नाशिकच्या परिसरांत आहे. रामायणकालांत दण्डकारण्य निर्मनुष्य होतें. विदर्भ व गोवर्धन हा भाग या कालांत असा होता असें अनुमान करण्यास साधन नाहीं. रामानें ओसाडीचें कारण विचारल्यावरून त्यास दण्डकाची कथा सांगण्यात आली. दंतकथेंत उल्लेखिलेल्या रेणुवर्षावाचीं पुसट चिन्हेंही या भागांत आढळून येत नाहींत. येथील मृत्तिका मनुष्याला पोषक आहे, मारक नाहीं. विदर्भ हें प्राचीन भोजांचें आद्यस्थान, याबद्दल आधारग्रंथांची एकवाक्यता आहे. ऐतिहासिक कालांत मात्र या भागांत भोजांचा मागमूसही लागत नाहीं. अशोकाच्या शिलालेखांत उल्लेखिलेले भोज हे हमखास अपरान्ताचेच रहिवासी (Inscriptions of Asoka. Dr. Barua. Part II. p. 257). दण्ड हा भोज असेल तर तो या भागाचा राजा असला पाहिजे. महाभोजांचे शिलालेख मुख्यत्वेंकरून याच भागांत, कुड्याच्या लेण्यांत आहेत, हा मुद्दा येथें विचारांत घेतला पाहिजे. तो ऐक्ष्वाक असेल तर त्याच्या नांवावरून या भागांतील प्रमुख गांवांना नामसदृश अभिधानें प्राप्त झालीं असलीं पाहिजेत. दंड, दंडा, दांडा म्हणजे डोंगराची सोंड. ज्यांच्या नांवांत हा शब्द येतो अशीं दंडा-राजपुरी, रेवदण्डा वगैरे गांवें अपरान्तांत, समुद्रकिनाऱ्यालगतच्या भागांतच आहेत. सह्याद्रीला इतरत्र सोंडा नाहींतच, असेंही नाहीं. अश्मक व मूलक या प्रादेशिक संज्ञांची संगति याच रीतीनें लावण्यांत आलेली आहे. दण्डानें भार्गवाश्रमांत गुरुभगिनीवर बलात्कार केला अशी कथा आहे. गोवर्धन प्रदेशांत भार्गवांचे आश्रम होते हें खरें; पण अपरान्त हेंच त्यांचें मुख्य संचारक्षेत्र. व्यापारी शहरें व बंदरें यांचे अपवाद वगळले असतां अपरान्तांत प्राचीन काळीं मनुष्यवस्ती अत्यंत तुरळक असली पाहिजे असें अनुमान करण्यास जागा आहे. या आधारांवरून दंडा-राजपुरीच्या परिसरांतील प्रदेशाची ओळख दण्डकारण्याशीं पटविणें शक्य आहे, असें वाटतें. मात्र अधिक संशोधनावांचून निश्चित विधान करतां येणार नाहीं.

पेरिप्लस, स्ट्राबो आणि टॉलेमी यांनीं आपल्या टिपणांत सातवाहनकालीन व्यापारी ठाण्यांचे त्रोटक तपशील दिलेले आहेत. पेरिप्लसनें

मंदगोर, पलइसमई ( बलेयपट्टण ) व मेलिझेगर ( स्ट्राबोचें सिगेर्दिस ) या बंदरांचा उल्लेख केलेला आहे. बलेयपट्टण म्हणजे राजपुरी व मेलिझेगर म्हणजे जंजिरा, अशीं संशोधकांचीं अनुमानें आहेत. मंदगोर बंदराचा उल्लेख टॉलेमीनेंही केलेला आहे. बाणकोट, म्हशेळें, मांडलें ( बाग व कोळ ) आणि मण्डनगड ( ऊर्फ मदगड ) यांशीं मंदगोरची ओळख वेगवेगळया संशोधकांनीं पटविलेली आहे. मला वाटतें, मंदगोर म्हणजे मांदाड. स्थानिक संज्ञांचे उच्चार अपभ्रष्ट स्वरूपांत करण्याची पाश्चिमात्यांची लकब लक्षांत घेतली म्हणजे या रूपांचा उलगडा होतो. मांदाड हेंही मादार या शब्दाचें अपभ्रष्ट रूप असणें शक्य आहे. मांदाड हें बंदर मांदाड खाडीच्या कांठावर आहे. शेजारींच कुड्याचीं लेणीं आहेत. त्यांत महाभोजांचे शिलालेख आहेत.

मंदगोर बंदराच्या ओळखीच्या अनुषंगानें महाराष्ट्राच्या प्राचीन बंदरांचें एक वैशिष्ट्य येथें सांगतों. सोपारा, कल्याण व चौल या प्राचीन व्यापारी ठाण्यांच्या ओळखीबद्दल मतभेद नाहीं. सोपारा हें बंदर नसून पेठेचें गांव होतें व धर्मप्रचाराचें केंद्र होतें. या पेठेसाठीं मालाची व उतारूंची नेआण करणारें बंदर वैतरणेच्या किंवा उल्हासच्या खाडींत असलें पाहिजे. वसईच्या खाडींतलें घोडबंदर अद्याप वापरांत आहे. प्राचीन प्रवाशांनीं उल्लेखिलेलें हिप्पोकुर तें हेंच असा अर्थसादृश्यावरून संशोधकांनीं कयास केलेला आहे. कल्याण हें विशेष विख्यात बंदर आणखी अंतर्भागात आहे ; इतकें, कीं तें एका काळीं परदेशी व्यापाराचें बंदर असेल हेंही आतां खरें वाटत नाहीं. हीं बंदरें अशीं अंतर्भागांत होतीं ; कारण बऱ्याच जहाजांना वारा फिरेपर्यंत बंदरांत पुष्कळ दिवस मुक्काम करावा लागत असल्यामुळें सुरक्षिततेसाठीं खाड्यांच्या अंतर्भागाचा आश्रय घेणें व्यापाऱ्यांना व नाखव्यांना भाग होतें. उघड्या समुद्रावर संचरणारे चांचांचे काफिले आणि नैसर्गिक प्रकोप यांपासून सुरक्षितता मिळविणेसाठीं त्यांना खाडयांच्या अंतर्भागाचा आधार घ्यावा लागे. त्या काळचीं व्यापारी जहाजें अवजड नव्हतीं. उथळ खाडयांच्या अंतर्भागांत तीं सहज संचार करूं शकत आणि मालाची चढउतर करण्यासाठीं सपाट

किनाऱ्यानजीक येऊं शकत. प्राचीन बंदरांना धक्के नव्हते व त्यांची जरूरही नव्हती. या बंदरांभोंवतालचा प्रदेश ज्या स्थानिक सत्तांच्या हुकमतींत असेल त्यांना दर्यावर्दी व्यापारापासून किफायत होत असल्यामुळें बंदरांत नांगरून पडलेल्या जहाजांच्या सुरक्षिततेविषयीं ते खबरदारी घेत असत. प्राचीन महाराष्ट्रांतील सत्ता ह्या मुख्यत्वेंकरून भूसत्ता असल्यामुळें त्यांना अशा तजविजा जमिनीवर व खाड्यांच्या अंतर्भागांतच करणें शक्य होतें. सातवाहनांना कल्याण बंदर सुरक्षित करतां आलें, पण दर्यावरील चांचांचा तितका बंदोबस्त करतां आला नाहीं. शिवाय त्या कालांत आक्रमक सागरसंस्कृति निर्माण झाल्याही नव्हत्या, निदान त्यांचा पल्ला हिंदुस्थानच्या किनाऱ्याला अद्याप भिडलेला नव्हता. प्राचीन बंदरांची परिस्थिति अशी असल्यामुळें मांदाड कुडें हें स्थान खाडीच्या अंतर्भागांत आहे या संभाव्य आक्षेपामुळें ह्या ओळखीला बाध येत नाहीं, उलट दुजोरा मिळतो. खाड्यांच्या मुखां-जवळ वाळूचे बांध सांचत गेले, राजधान्या बदलल्यामुळें व्यापारी वाहतुकीचे मार्ग बदलले आणि व्यापारी जहाजांचा आकार वाढत गेला; यामुळें खाड्यांच्या अंतर्भागांतलीं जुनीं बंदरें निरुपयोगी झालीं व मागसलीं आणि उघड्या समुद्रावरील बंदरें भरभराटलीं.

मलिक काफूरनें १३१२ सालीं कोंकणावर स्वारी करून माहीम, चौल व दाभोळ हीं ठाणीं काबीज केलीं. दिल्लीचें स्वामित्व झुगारून बहमनी सुलतान १३४७ सालीं व गुजरात सुलतान १४०१ सालीं स्वतंत्र झाले. महिकावतीच्या यादवांच्या पाडावानंतर माहीम येथें मुसलमान सुभेदारीचें ठाणें बसलें. येथें गुजरात सुलतानाचा अंमल केव्हांपासून व कसा सुरू झाला याचा तपशील मिळत नाहीं. गुजरातचा सुलतान अहमदशहा ( १४११ ते १४४१ ) याच्या कारकीर्दीत त्याचा माहीमचा सुभेदार कुत्बखान मरण पावला. ही संधि साधून ( Ras-Mala : Forbes : 1873 : p. 269 ) बहमनी सेनापति मलिक्-उल्-तुजार यानें कोंकणावर स्वारी करून साष्टी परगण्यांतील ठाण्या-भोंवतालचा प्रदेश काबीज केला. अहमदशहानें लगेच समुद्रावरून आरमार व जमिनीवरून लष्कर पाठवून बहमनी सैन्यांचा माहीम,

मुंबादेवी व ठाणें येथें पराभव केला. दक्षिण कोंकणच्या बंडखोर स्थानिक राजांवर जरब बसविण्यासाठीं मलिक उत्तुजारानें केलेल्या स्वारीची शिरके व मोरे यांनीं कशी धूळधाण उडवली याचा वृत्तांत पूर्वी येऊन गेलेला आहे. पुढें बहमनशाहीला उतरती कळा आली. राज्यकारभाराला जबाबदार असणाऱ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांमधील वैमनस्यें तीव्र झालीं, मुसलमानांमध्यें देशी व परदेशी असे तट पडले आणि ते एकमेकांचा निःपात करावयास सज्ज झाले. मुख्यत्वेंकरून या यादवीमुळेंच बहमनी साम्राज्य नष्ट झालें. बहमनी वजीर महमूद गवान हा इराणी असून परदेशी पक्षाचा पुढारी होता. त्याचा प्रतिस्पर्धी मलिक हसन नायब निजामुल्मुल्क बहिरी हा दक्षिणी पक्षाचा पुढारी. महमूद गवानाच्या शिफारशीनेंच याला महत्पद प्राप्त झालें होतें. हा मूळचा ब्राह्मण, दुर्गादेवीच्या दुष्काळांत देशोधडीला लागलेल्या पाथरी येथील देशपांडे कुलांतला. गुलाम म्हणून विकला गेला व बाटून मुसलमान झाला. त्याच्या बापाचें नांव बहिरूपंत. म्हणून तो स्वतःला बहिरी म्हणवी. राजधानींतले हबशी त्यालाच आपला पुढारी मानीत. राज्य परकयांचें असलें म्हणजे राज्यकर्त्यांना आपलें आसन सांभाळण्या-साठीं व राज्यकारभाराचा भार पेलण्यासाठीं विशिष्ट वृत्तीचीं व दर्जाचीं परदेशी माणसें पदरीं ठेवावींच लागतात. जबाबदारीच्या वरिष्ठ जागांसाठीं कर्तबगार व सुसंस्कृत, देशी–परदेशी शत्रूंच्या कत्तलींसाठीं क्रूर व रानवट; आणि त्यांच्या खिजमतीसाठीं लालची देशी लोकांनाही आश्रय द्यावा लागतो; स्वधर्मनिष्ठेहून धर्मातीत राज्यनिष्ठा श्रेष्ठ होय हें पारतंत्र्याच्या राजकारणाचें आद्यतत्त्व वेगवेगळ्या मार्गांनीं प्रजेच्या गळीं उतरवावें लागतें. हिंदुस्थानच्या संपत्तीची कीर्ति सर्वत्र विख्यात झाल्यामुळें मध्यआशियांतील ताज्या दमाच्या, कडव्या, पण तहानलेल्या अफगाण, मोंगल व तुर्की मुसलमानांच्या टोळ्यांची दिल्लीकडे रीघ लागली होती. दिल्लीश्वरांना कधीं त्यांचा उपयोग होई, तर कधीं उपसर्ग. यांपैकीं कांहीं लोक स्वाऱ्यां-बरोबर दक्षिणेकडे आले; पण इकडे फारसे स्थायिक झाले नाहींत. अव्वल सुलतानींत अस्सल मुसलमानांच्या वसाहती दक्षिणेंत स्थापण्याचे प्रयत्न

झाले. पण येथील अडचणी असह्य झाल्यामुळें व उत्तरेंतील अडचणींना तोंड देण्यासाठीं राज्यकर्त्यांना स्वजनांची जरूर भासल्यामुळें येथील दौलताबादची वसाहत दोनदां उठवावी लागली. बहमनशाही-च्या स्थापनेमुळें उत्तर व दक्षिण हिंदुस्थानाचा संबंध तुटला. तिकडे येणारीं माणसें इकडे येणें बंद झालें, इतकेंच नव्हे, तिकडे देण्याविषयीं ज्या जमातींना प्रोत्सान मिळे त्यांचे सदस्य इकडे फिरकणारही नाहींत अशी खबरदारी बहमनी राज्यकर्ते व मुत्सद्दी घेऊं लागले. पश्चिम किनाऱ्यावरचा दर्यावर्दी व्यापार अरबस्तानकडे वहात असल्यामुंळें इराण, अरबस्तान व अबिसीनिया देशांचे साहसी रहिवासी बहमनी राजधानीकडे लोटूं लागले. राज्ययंत्रांतील वरिष्ठ जागांवर बहमनींनीं सुसंस्कृत व उमरावी इराण्यांच्या नेमणुका केल्या. यामुळें स्थानिक मुसलमानांना त्यांच्याबद्दल वैषम्य वाटूं लागलें. परस्परांशीं वैरभाव बाळगणाऱ्या परदेशी व दाक्षिणी मुसलमानांवर शह ठेवण्यासाठीं बहमनींनीं हबशांची आयात केली. मराठी कागदपत्रांत या जमातीला हबशी, सिद्दी व सामल या संज्ञा दिल्या आहेत. इजिप्तजवळून आले म्हणून हबशी, आफ्रिकेंतून आले म्हणून सिद्दी व सोमाली लँडचे रहिवासी म्हणून सामल (श्री. राजवाडे. प्रस्तावना पृ. १६४). शहाच्या शरीरसंरक्षणाचें काम काळ्याकभिन्न, क्रूर, कुरळ्या हबशाकडे सोंपवि-ण्यांत आलें. यामुळें ते फार चढून गेले. सुसंस्कृत इराणी उमराव अबुज हबशांना हीन मानीत. या चिडीनें ते दक्षिणी पक्षांत सामील झाले. वजीर व सेनापति महमूद गवान यानें जागोजाग लागोपाठ मोठमोठे विजय मिळविल्यामुळें बहमनशाहींत त्याला अद्वितीय स्थान प्राप्त झालें. वजीर वा सेनापति यांनीं स्वतःचें सामर्थ्य वाढवून राज्यपद काबीज करावयाचें, अशी प्रथा असल्यामुळें गवानाच्या प्रतिस्पर्ध्यांना त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप करणें शक्य झालें. त्यांनीं व्यसनासक्त शहाचे कान भरले. मदिरेच्या धुंदींत असतांना त्यांच्या चिथावणी-वरून बेफाम होऊन शहानें गवानाचा वध ( १४८१ ) करविला. या-नंतर मलिक हसन वजीर झाला. गवानाच्या वधाच्या बाबतींत झालेली फसवणूक निदर्शनास आल्यानंतर शहाला पश्चात्ताप झाला. माझ्या वधा-

मुळें बहमनी राज्य नष्ट होईल, ही गवानाची अखेरची भविष्यवाणी त्याच्या कानांत सारखी घुमूं लागली. महमूद गवानाची मूर्ति अहोरात्र त्याच्या नजरेसमोर उभी राहूं लागली. या मनस्तापांतून मुक्त होण्यासाठीं त्यानें मदिरेचा आश्रय घेतला आणि मद्यपानाच्या अतिरेकामुळेंच तो मृत्यु पावला. यानंतर महमूदशहा गादीवर आला. त्या वेळीं तो अज्ञान होता. यामुळें निजामुलमुल्क सर्वसत्ताधारी झाला. विजापूरच्या आदिलशाहीचा संस्थापक युसफ आदिलखान हा परदेशी पक्षाचा पुढारी झाला. दक्षिणी व परदेशी मुसलमान एकमेकांच्या कत्तली करूं लागले. सर्वत्र अंदाधुंदी माजली. या परिस्थितीचा फायदा घेऊन वजिरानें शाही खजिना जुन्नरला रवाना केला; कारण या भागांत त्याची जहागीर होती; शिवाय हा किल्ला मजबूत म्हणून विख्यात होता आणि तेथें त्याचा मुलगा मलिक अहमद हा सुभेदार होता. तो स्वतंत्र होण्याच्या खटपटींत होता. तोरणा, तिकोना, कोंडाणा, पुरंदर, लोहगड, जीवधन, मनरंजन वगैरे किल्ले त्याच्या ताब्यांत होते. बहमनींची सद्दी संपुष्टांत आली आहे हें त्यानें ओळखलें होतें. सह्याद्रीच्या आश्रयानें, मैदानी बहमनींच्या उपसर्गांपासून अलिप्त असलेल्या अपरान्तांत स्वतंत्र राज्य स्थापन करणें शक्य आहे हें त्यानें ओळखलें होतें. शाही खजिना हातीं येतांच त्यानें सैन्याची जमवाजमव करून कोंकणावर (१४८२) स्वारी केली. पालीचा किल्ला काबीज करून त्यानें दंडाराजपुरीस वेढा घातला. येथील कोट या वेळीं स्थानिक कोळयांच्या ताब्यांत होता. त्यांचा नाईक रामजी पाटील यानें निकराचा प्रतिकार केल्यामुळें वेढ्याचें काम रेंगाळलें. इकडे महमूदशहाच्या चिथावणीवरून बेदरचा कोतवाल पसंदखान यानें वृद्ध निजामाचा गळा दाबून खून केला. या पसंदखानास निजामुलमुल्कानेंच महत्पदास चढविलें होतें! विश्वासघाताचा बदला विश्वासघातानेंच घेतला जातो, तो असा! राजधानींतील या घडामोडींमुळें मलिक अहमदला दंडा राजपुरीचा वेढा उठवून देशावर परत यावें लागलें. दक्षिणी व परदेशी, इराणी व हबशी, शिया व सुनी, या तटांच्या वैमनस्यांमुळें बहमनशाहीचीं शकलें उडालीं. १४८९ सालीं विजापूरचा सुभेदार युसफ आदिलखान स्वतंत्र झाला. १४९० सालीं

बहमनी सैन्याचा निर्णायक पराभव करून मलिक अहमद स्वतंत्र झाला व स्वतःस निजामशहा म्हणवूं लागला. १४९४ सालीं त्यानें नगर येथें राजधानी स्थापन केली आणि स्थिरस्थावर झाल्यानंतर दंडाराजपुरीवर फिरून धडक मारली.

निजामशहानें दंडाराजपुरीस वेढा घातला असा उल्लेख इतिहासांत आढळतो. मात्र हा वेढा किनाऱ्यालगतच्या किल्ल्याचा कीं हल्लींच्या जंजिऱ्याच्या जागीं पूर्वीपासून असलेल्या मेढेकोटाचा, याबद्दल नीटसा खुलासा मुसलमानी इतिहासकारांनीं नमूद केलेल्या हकीगतींवरून मिळत नाहीं. एवढें मात्र निश्चित कीं कोळयांनीं जिवावर उदार होऊन दीड वर्षपर्यंत कोट लढविला. कोळयांनीं परक्या आक्रमकांना केलेल्या कडव्या प्रतिकाराचीं अनेक उदाहरणें महाराष्ट्राच्या इतिहासांत आढळतात. शेवटीं फितुरीमुळेंच कोट पडला. किल्ला काबीज झाल्यावर निजामशहाच्या हुकमानें कैद झालेल्या कोळयांना समुद्रांत फेंकून जिवें मारण्यांत आलें. शहानें कोटाची डागडुजी मजबुती करविली व तेथें सिद्दी याकूतखान याची नेमणूक केली. या वेढ्याबद्दलच्या दंतकथा उत्तरकालीन मुसलमान इतिहासकारांनीं नमूद केलेल्या आहेत. कोट सर होत नाहीं असें पाहून निजाम निराशेनें उद्गारला : ज्या कोटाला समुद्राचें संरक्षण आहे तो कोण घेऊं शकणार ? हे उद्गार ऐकतांच सिद्दी याकूतखानानें समुद्रांत उडी घेतली व लगोलग किल्ला सर केला ; म्हणून शहानें त्याला किल्लेदारी दिली. ही हकीगत उघड अविश्वसनीय आहे. आणखी एक हकीगत सांगण्यांत येते ती अशी : निजामशहाच्या स्वारीच्या वेळीं जंजिऱ्याच्या कातळावर कोळयांचा लांकडी ओंडक्यांचा ओबडधोबड मेढेकोट होता. हरघडी होणाऱ्या चांचांच्या उपद्रवापासून स्वतःच्या मालमत्तेचें संरक्षण करतां यावें म्हणून कोळयांनीं हा कोट उभारला होता. लढून कोट काबीज होत नाहीं असें दिसून आल्यावर निजामशहानें विश्वासघाताची योजना ठरविली. पेरिमखान नांवाचा निजामशाही सरदार उत्तरेकडून जहाज हांकारीत जंजिऱ्याकडे आला. आपण व्यापारी आहोंत व जहाज नादुरूस्त झाल्यामुळें संकटांत आहोंत अशी बतावणी करून

त्यानें राम पाटलाकडे आसरा मागितला. त्याला खूष करण्यासाठीं खानानें उंची दारूच्या बाटल्या पाठविल्या. मद्यपानानें धुंद झालेल्या पाटलाकडून खानानें खडकावर माल उतरविण्याची परवानगी मिळवली. कातळावर उतरविलेले अवजड पेटारे उघडून खानानें दारूच्या बाटल्या बाहेर काढल्या. कोंकणी कोळ्यांसारखे दारूचे भोक्ते आणि खाना-सारखा उदार यजमान! मग काय विचारतां? सारे कोळी बेहोष झाले. मध्यरात्र झाली तरी मद्यपानांत खंड पडला नाहीं. कोळ्यांचा दुय्यम नाईक इतबारराव यानें तर पाहुण्यांच्या स्वागतासाठीं व रात्रीच्या विश्रांतीसाठीं कोटाचे दरवाजे उघडले! यावरून त्या धुंदींतही राम पाटलाचें त्याच्याशीं भांडण झालें. अनुकूल परिस्थिति पाहून खानानें बाकीचे पेटारे खोलले. त्यांत लपलेले ११७ सशस्त्र सैनिक बाहेर आले आणि बेसावध धुंद कोळ्यांवर तुटून पडले. त्यांनीं काटाकाटी करून कोट काबीज केला. पुढें इतबारराव मुसलमान झाला व शहानें त्याला जंजिऱ्याची किल्लेदारी दिली (शिवाजी निबंधावली : जंजिरेकर सिद्दी. श्री. बेंद्रे. पृ.९९–१००). श्री. भोंसले (जंजिरा संस्थानचा इतिहास : पृ. २२–२३) थोडी वेगळी हकीगत सांगतात : जो बाटला तोच राम पाटील, त्यालाच शहानें यतीबारराय हा किताब दिला आणि छत्री व निशाण हीं मानचिन्हें दिलीं. पुढें तो जंजिऱ्याच्या मुसलमान सुभेदाराचा हुकूम मानीनासा झाला; म्हणून शहाच्या हुकमावरून त्याचें डोचकें मारण्यांत आलें (१५२२). राम पाटलानें स्वजनद्रोह केला आणि स्वधर्मद्रोह केला. स्वदेशद्रोहाचें पातक त्याच्यावर लादतां येत नाहीं; कारण त्या वेळीं मराठ्यांचें स्वराज्य असें नव्हतेंच आणि कोंकणचे कोळी सोईप्रमाणें अधूनमधून आपल्याला गुजरात सुलतानांचे मांडलिक म्हणवीत असत. एवढा द्रोह करून यानें मिळविलें काय? श्री. भोंसले सांगतात, टापूवरील हरएक कामें करण्याच्या मोबदल्यांत ताडी पिण्याकरितां चारा राहाट्या व मच्छी मारण्याकरतां खुटांस जागा! आमचे लोक किती भोळे, किती अल्पसंतुष्ट; आणि आमची समाजसंघटना किती तकलादी!

जंजिऱ्याचा कोट राजपुरीच्या खाडीच्या तोंडाशीं आहे. कोटाचा

पाया पक्क्या कातळावर आहे. हा कातळ पूर्ण ओहोटीच्या वेळीं तेवढा उघडा पडतो. पूर्ण भरतीचे वेळीं समुद्रसपाटीपासून तटबंदीची उंची पन्नास फूट आहे. कोटाला एकोणीस बुरूज आहेत. किल्ल्याच्या आंत आणखी दोन बुरूज आहेत. महाद्वार पूर्वेस, राजपुरीला सन्मुख आहे. त्याची उभारणी प्रेक्षणीय व बांधकाम मजबूत आहे. पश्चिम बाजूला दर्यादरवाजा आहे. त्यानजीक धक्का आहे. भरतीच्या कमाल मर्यादेपेक्षां याची उंची वीस फूट अधिक आहे. या दरवाजाचा व धक्क्याचा उपयोग दर्यावर्दी उद्योगांसाठीं व चांचेगिरीसाठीं आणि वेळ्याचे वेळीं करण्यांत येत असे. कोटावर व बुरुजांवर लहानमोठ्या देशी-विलायती तोफा नेहमीं जय्यत तयार ठेवलेल्या असत. १६६९ सालीं येथें ५७२ तोफा होत्या. त्यांपैकीं बऱ्याच हबशांनीं चांचेगिरीनें पैदा केलेल्या होत्या असें त्यांवरील लेखांवरून दिसतें. जंजिऱ्याचा बालेकिल्ला सुमारें दोनशें फूट उंचीचा असून त्यावर हबशी सरदारांचे वाडे आहेत. गोड्या पाण्याच्या तलावानजीक हबशी सरकारचा वाडा आहे. त्याचें नांव हेटकरी वाडा; कारण त्यावर आठशें इमानी हेटकऱ्यांचा पहारा असे. हेटकरी हे मावळ्यांच्या तोडीचे मराठे लढवय्ये आणि शिवाजीचे सहकारी. पण येथें त्यांच्या इमानावर विसंबून हबशी निर्धास्त असत. सेवाधर्माची परम गहनता हीच कीं नामधारी इमानदारीसाठीं स्वजनांचा द्रोह करावा लागतो आणि त्यांतच भूषण मानावें लागतें !

जंजिऱ्याचा कोट केव्हां उभारण्यांत आला याबद्दल निश्चित माहिती मिळत नाहीं. बहमनी राज्याची फाळणी झाली तेव्हां कोंकणाचा उत्तर भाग निजामशाहीच्या व दक्षिण भाग आदिलशाहीच्या मुलखांत सामील झाला. उत्तर कोंकणचें स्वामित्व सांभाळण्यासाठींच निजामशहांनीं जंजिऱ्याच्या उभारणीवर लक्ष केंद्रित केलें असलें पाहिजे. मलिक हसन व मलिक अहमद यांच्या उद्योगांना हबशांचें साह्य होतें. हबशी हे विख्यात दर्यावर्दी व चिकाटीचे लढवय्ये; शिवाय पश्चिम किनाऱ्यावरील निजामशहांच्या प्रतिस्पर्धी गुजराथ सुलतानांकडे त्यांचें वळण नव्हतें आणि व्यापाराचे बाबतींत हबशांची पोर्तुगीजांशीं स्पर्धा होती; म्हणूनच जंजिऱ्याच्या सुभेदारीसाठीं निजामशहांनीं हबशांची निवड केली



२४ मुंबईभोंवतालचीं प्राचीन व मध्ययुगीन ठाणीं

असावी असें वाटतें. श्री. भोंसले सांगतात, दंडाराजपुरीच्या ठाणेदारानें बुऱ्हाण निजामशहाचा हुकूम मागवून १५६७ सालीं जंजिऱ्याचा कोट बांधण्याचें काम सुरू केलें आणि १५७१ सालीं कोट पुरा करून त्यास किल्ले महरूब ऊर्फ जंजिरा हें नांव दिलें. पुढें निजामशाहीला उतरती कळा लागली. मूर्तजा निजामशहाच्या कारकीर्दीत मलिक अंबर या हबशी वजिरानें स्थानिक मातबर राजनिष्ठ मराठ्यांच्या मदतीनें कांहीं वर्षे निजामशाही सांवरून धरली. त्यानें १६१७ सालीं सिद्दी अंबर हबशी याला जंजिऱ्याच्या कारभारावर नेमलें. चांच्यांच्या उपसर्गांमुळें व आरमाराच्या अफाट खर्चांमुळें या परगण्याला इकडील उत्पन्न पुरेना, म्हणून १६२१ सालीं जंजिरेकर हबशांना दंडाराजपुरी परगणा जहागीर देण्यांत आला. याचा प्राकृत अर्थ असा कीं हबशांना समुद्रावरील चांचेगिरीची व कोंकणपट्टींत लूटमार करण्याची शाही सनद देण्यांत आली! धारकाच्या केवळ अभिधानांत बदल केल्यामुळें परगण्याच्या उत्पन्नांत बदल पडणें शक्य नाहीं हें उघड आहे. कोणी सांगतात, ही जहागीर वंशपरंपरेची होती आणि कोणी सांगतात, आरमारांतील सर्वांत लायक दर्यासारंगाची नेमणूक या जागेवर करण्यांत येत असे. मलिक अंबर १६२६ सालीं मरण पावला आणि मोंगलांनीं निजामशाही १६३७ सालीं नष्ट केली. जंजिऱ्याच्या जोरावर सिद्दी इतके प्रबळ झाले होते कीं १६२८ सालीं सिद्दी अंबरनें निजामशाही मांडलिकी झुगारून बंड उभारलें. पक्षोपपक्षांच्या वैमनस्यांमुळें निजामशाही इतकी दुबळी झाली होती कीं सिद्दीला वठणीवर आणण्यासाठीं मध्यवर्ती सत्तेनें दंडाराजपुरीवर रवाना केलेली मोहीम पदरीं अपयश घेऊन परतली. या अपयशाचें मुख्य कारण घाटमाथ्यावरील मराठ्यांचा या स्वारीशीं असहकार. सह्याद्रीच्या आश्रयाचें महत्त्व नुकतेंच ध्यानीं येऊं लागल्यामुळें व शहाजीच्या कर्तबगारीचें प्रात्यक्षिक दृष्टीसमोर असल्यामुळें घाटमाथ्यावरील मराठ्यांना आतां आपल्या सामर्थ्याची जाणीव इतक्या स्पष्टपणें झालेली होती कीं या आणीबाणीच्या वेळीं निजामशाही

सेनापतीची सहकार्याची मागणी धुडकावून लावण्याची त्यांनीं प्रथमच हिंमत केली. कल्याण सुभा निजामशाहीचा, १६३६ च्या तहाचे अन्वयें मोंगलांकडे जावयाचा; पण काळवेळ पाहून तो आदिलशहांनीं दाबला. या सुभ्याच्या उत्तर भागाचें आदिलशाही ठाणें कल्याण-भिवंडी येथें असे. या भागाची हद्द नागोठण्यापर्यंत. दक्षिण भागाचें आधिपत्य सिद्दीकडेच राहिलें; कारण नवें व डळमळीत सरकार जुन्या व्यवस्थेंत सहसा फारसे फेरबदल करीत नाहीं. व्यापारी जहाजांना संरक्षण देणें आणि मक्केच्या दक्षिणी यात्रेकरूंची नेआण करणें हीं कामें सिद्दीकडे सोंपविण्यांत आलीं होतीं. आदिलशहानें सिद्दीला वजीर हा किताब व दर्यासारंग हा हुद्दा दिला आणि शाही आरमार त्याच्या हवालीं केलें. १६३९ पासून १६४६ पर्यंत दंडाराजपुरीचा भाग मोंगलांच्या ताब्यांत होता; नंतर तो पुन्हां आदिलशाहीच्या ताब्यांत गेला. १६८६ सालीं मोंगलांनीं आदिलशाही नष्ट केली. या घटनेचा सिद्दीच्या सामर्थ्यावर वावगा परिणाम झाला नाहीं. उलट या अंदाधुंदीचा सिद्दीला फायदाच झाला. सिद्दीला सहकार्यासाठीं हव्या त्या सवलती देण्याला आदिलशहांप्रमाणेंच मोंगलही उत्सुक होते. या संधीचा सिद्दींनीं पुरा फायदा घेतला. वेळप्रसंगाप्रमाणें ते कधीं स्वतःला आदिलशाही सरदार म्हणवीत तर कधीं मोंगली. वस्तुतः ते दोघांनाही जुमानीत नसत. जंजिऱ्याचें राज्य छोटें, विंचवाच्या कांट्याएवढें; नांगी तुटली तरी कांटा वळवळत राहतो, तसा प्रकार झाला. मराठ्यांच्या वाढत्या सामर्थ्याला तोंड देण्यासाठीं जंजिऱ्याची मजबुती वाढविण्याची अपूर्व योजना आंखून ती सिद्दी सरकारनें पार पाडली. सिद्दी कासीम ऊर्फ याकूतखान यानें १७०१ सालीं जंजिऱ्याला दुसरा तट बांधण्याचें काम सुरू केलें. हें काम सिद्दी सुरूलखान याच्या कारकीर्दींत १७२८ सालीं पुरें झालें. या कामाला सुरुवात झाली त्या वेळीं कोंकणपट्टींतील बावीस किल्ले सिद्दी सरकारच्या ताब्यांत होते. अवरंगजेबाच्या स्वारीमुळें कांहीं काळपर्यंत मराठी राज्याची धूळधाण उडाली होती, त्या धामधुमींत हबशांनीं हे किल्ले काबीज केले होते. अवचितगड, रायगड, प्रतापगड, गोवळकोट व अंजनवेल हे नांवाजलेले किल्ले त्यांच्या हातीं होते; यावरून

त्यांच्या राज्यविस्ताराची व सामर्थ्याची कल्पना करतां येते. जंजिऱ्याचा एक एक बुरूज व फांज यांचा खर्च राज्यांतील एकेका किल्लेदारानें भागवावा असा हुकूम सिद्दी सरकारनें काढला व त्याची कांटेकोरपणें अमलबजावणी केली. पश्चिम किनाऱ्यानजीकच्या समुद्रांत हबशांची चांचेगिरी पूर्वीपासून सुरू होती. या व्यवसायामुळें पोर्तुगीज व इंग्रज यांबरोबर सिद्दीचे संघर्ष झाले. शेजारच्या मुलखावर वेळोवेळीं स्वाऱ्या करून खंडणी गोळा करण्याच्या उपक्रमामुळें सिद्दीचे मराठ्यांबरोबर संघर्ष झाले. मराठी सैन्यें अटकपासून कटकपर्यंत जवळजवळ निष्कंटकपणें वावरत होतीं; पण महाराष्ट्राच्या कुशींत कुरूप करून राहिलेला हा विषारी कांटा त्यांना उखडून काढतां आला नाहीं; कारण दक्षिण हिंदुस्थानांतील विपरीत राजकीय परिस्थिति; संरक्षणाला अनुकूल अशी जंजिऱ्याची नैसार्गिक परिस्थिति; सिद्दींचा एकोपा व चिकाटी, दुर्दम्य आत्मनिष्ठा व स्वातंत्र्यप्रीति; आणि आमची अदूरदृष्टि व आरंभशौर्य, वैमनस्यें व ढिलाई, बढाई व औदासिन्य!

शिवाजीनें स्वराज्यस्थापनेचा उद्योग सह्याद्रीच्या आश्रयानें मावळांत सुरू केला; कारण मराठेशाहीचे शत्रु मैदानी होते. त्यांची सत्ता मोंगलांनीं खिळखिळी केली होती; तरीही त्यांनीं जागोजाग स्थापन केलेले एतद्देशीय हस्तक त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांना स्वतःचे शत्रु मानून निकराचा लढा देण्यास सज्ज होते. संकल्पित स्वराज्य या घरफोड्यांच्या व घरभेद्यांच्या कोंडींत सांपडूं नये म्हणून सह्याद्रीच्या आश्रयानें कोंकणांत राज्य वाढविण्याचा निर्णय शिवाजीनें सुरुवातीसच घेतलेला असावा; कारण या भागांत मोंगलांचा अद्याप प्रवेश झालेला नव्हता आणि या भागावरली दक्षिणी सुलतानांची पकड ढिली होती.

जावळीचे रावराजे मोरे हे आदिलशाही उमराव. राजनिष्ठ मोऱ्यांनीं शिर्के, गुजर, मोहिते, महाडिक वगैरे मातबर बंडखोर मराठ्यांचा उच्छेद केला म्हणून त्यांना शहानें चंद्रराव हा किताब दिला. मोऱ्यांना मुलूखमरातब दिला शहानें; तरी ते म्हणत, "आमचा राजा श्रीमहाबळेश्वर, त्याचे कृपेनें राज्य करितों." आयुष्याच्या पूर्वार्धांत शिवाजीमहाराज स्वतःस राजे म्हणवीत. त्यांनीं रावराजांबरोबर

सामीलनाम्याच्या वाटाघाटी सुरू केल्या. तेव्हां शाही आवेशानें खवळून रावराजांनीं सवाल केला, "तुम्हांस राज्य कोणें दिधलें ? मुस्तफद राजा आपले घरीं म्हटालियावर कोण मानतो ?" वाटाघाटी मोऱ्यांनीं उधळून लावल्या आणि शिवाजीला सामील झालेल्या मावळांतील देशमुखांना फोडून स्वराज्याला सुरुंग लावण्याचा उद्योग सुरू केला. यामुळें त्यांचा उच्छेद करणें शिवाजीला भाग झालें.

शिवाजीनें जावळी व रायरी हीं मोऱ्यांचीं ठाणीं काबीज केलीं (१६५६) आणि नंतर त्यांचा निःपात केला. यामुळें जेता या नात्यानें मध्य-कोंकणाचें आधिपत्य त्याचेकडे आलें. कल्याण-भिवंडी सुभा (१६५७) काबीज करून शिवाजीनें उत्तर-कोंकणावर कबजा केला. याच सालीं त्यानें जुन्नर व नगर या शहरांवर छापे घालून लूट केली. येणेंप्रमाणें कृत्यें करून शिवाजीनें आदिलशाही व मोंगलाई या उभयतांची आगळीक केली. शिवाजीच्या उद्योगाला पायबंद घालण्यासाठीं आदिलशाहा व शहाजहान यांनीं आपसांत तह केला. त्या अन्वयें कोंकणांतील निजामशाही किल्ले विजापूरकरांना मिळावेत असें ठरलें. संयुक्त शाही आघाडीचें पर्यवसान अफझलखान व शायिस्ताखान-प्रकरणांत झालें. या सर्व घटनांमुळें निर्माण झालेल्या अनिश्चित परिस्थितीचा फायदा घेण्याचें शिवाजीनें ठरविलें आणि आपलें कार्यक्षेत्र विस्तृत केलें ; आणि सिद्दीनेंही.

कोंकणपट्टी निर्धास्त करण्याचें शिवाजीनें ठरविलें तेव्हांपासून सिद्दी त्याच्या कुशींत सलूं लागले. सिद्दींशीं मराठ्यांचा संघर्ष १६५७ सालीं सुरु झाला. पहिली आगळीक अगर चढाई कोणीं केली याचा खुलासा मिळत नाहीं. १६३९ पासून १६४६ पर्यंत दंडाराजपुरी भाग मोंगलांच्या ताब्यांत होता. या काळांत जंजिऱ्याभोंवतालच्या भागांत सिद्दींनीं अनन्वित अत्याचार केले. १६६५ च्या सुमारास सिद्दी युसफखानानें घाटापावेतों चढाई केल्याचा उल्लेख मिळतो. जावळी प्रांतांत घाटमाथ्यालगत शिवाजीच्या हालचाली सुरू झाल्या. त्यांचा सुगावा ठेवून तळकोंकणांत सिद्दीनेंही मराठ्यांविरुद्ध आघाडी उघडली. याचेंच पर्यवसान शिवाजीच्या सिद्दीवरील पहिल्या मोहिमेंत झालेलें दिसतें.

या मोहिमेचा तपशीलवार वृत्तांत उपलब्ध नाहीं. एवढें मात्र निश्चित कीं मोहिमेच्या पहिल्या फेरींत (१६५७) मराठ्यांचा मोड झाला. या फेरीचें नेतृत्व शामराज नीलकंठ पारसनीस याजकडे होतें. शिवाजीनें त्याची नेमणूक केली, कारण त्यानें नुकतीच कल्याणची कामगिरी यशस्वी केली होती. श्री. भोंसले सांगतात: सिद्दीनें विश्वास दिल्यावरून शामराजपंत पेशवे वाटाघाटी करण्यासाठीं किल्ल्यांत गेले असतां सिद्दी खैर्यतखानानें त्यांस कैद केलें आणि जंजिऱ्यावर पुन्हां येणार नाहीं असें वचन घेऊन त्याची सुटका केली; शिवाजीनें त्यास पुन्हां जंजिऱ्यावर जाण्यास सांगितलें असतां या वचनामुळें त्यानें मोहिमेचें नेतृत्व स्वीकारावयाचें नाकारल्यामुळें पंतावर महाराजांची इतराजी झाली. या पराभवाचें मुख्य कारण, या वेळचें शिवाजीचें सैन्य मुख्यत्वेंकरून पठारी मराठ्यांचें होतें व आरमारी तयारी बेताची होती. दुसऱ्या फेरींत (१६५८) तळें, घोसाळें वगैरे किल्ले व त्यांभोंवतालचा प्रदेश मराठ्यांनीं काबीज केला आणि जंजिऱ्याला वेढा घातला. त्यांचा जोर पाहून सिद्दी फत्तेखान इतका भ्याला कीं शत्रूस किल्ला देऊन जिवाचें रक्षण करावें अशी मसलत तो आपल्या सरदारांशीं करूं लागला. सिद्दी खैर्यतखान व सिद्दी कासीम यांनीं त्याची निर्भर्त्सना केली व सांगितलें (जंजिरा संस्थानचा इतिहास. श्री. भोंसले: पृ. ३७) कीं 'आम्ही हबशी लोकांनीं मोठी मेहनत घेऊन ही जागा संपादन केली आहे. तेव्हां ही जागा आपण होऊन शत्रूस देण्यापेक्षां मृत्यु बरा. जर तुझा जीव तुला आवडता होता तर मग तूं असला मोठा अधिकार स्वीकारावयाचा नव्हता. राज्य म्हटलें कीं प्रथम जीवित्वाची आशा सोडावी लागते.' दुसऱ्या दिवशीं सिद्दी सरदार मोठ्या निकरानें लढले आणि मराठ्यांना वेढा उठवावा लागला. तिसऱ्या फेरीसाठीं (१६५९) शिवाजीनें मोठी तयारी केली होती. व्यंकाजी दत्तो हा साहसी नेता, त्याच्यासमवेत निवडक लढवय्ये, मायनाक भंडारी व दर्यासारंग दौलतखान यांच्या हुकमतींतलें नवीन आरमार. जंजिऱ्याला चोहींकडून वेढा पडला. दौलतखानानें जंजिऱ्या-नजीक काशा खडकावर किल्ला उभारला व त्याचें नांव प्रदुर्ग (पद्मदुर्ग)

ठेवलें. जमिनीवरच्या झुंजांत हबशांचा मोड झाला. सिद्दी कोटाकडे पळाले. व्यंकाजीपंतास बारा जखमा झाल्या होत्या, तरी ते 'पाठलाग करीत जंजिरेयाच्या समुद्रांत बैसोन किल्लयांत प्रवेश करावयाचे स्थळा-पर्यंत गेले.' हबशांचें आरमार मराठ्यांनीं हस्तगत केलें. यामुळें सिद्दी फत्तेखान गांगरून गेला व किल्लयासह सर्व मुलूख मराठ्यांच्या स्वाधीन करून पळून जाण्यास तयार झाला. तेव्हां सिद्दी खैर्यतखानानें त्यास कैद केलें. तरीही सर्व बाजूंनीं नाइलाज झाल्यामुळें शिवाजीला दंडा-राजपुरी देऊन सिद्दीला तह करावा लागला. या वेळीं विजयाची खात्री असूनही शिवाजीला सिद्दीशीं तह करावा लागला. कारण शिवाजीचा फडशा पाडण्यासाठीं विजापुराहून प्रचण्ड तयारीनिशीं निघालेल्या अफझलखानाच्या मोहिमेच्या नौबती दक्षिण महाराष्ट्रांत धडाडूं लागल्या होत्या. अफझलखान हिंदुधर्माचा कट्टा द्वेष्टा होता; त्याच्या प्रेरणेमुळें महाराष्ट्रांतील पुरातन मंदिरें उध्वस्त होऊं लागलीं होतीं, पवित्र मूर्ति विच्छिन्न होऊं लागल्या होत्या. अफझलखानाचें कपटपटुत्व विख्यात होतें. शिवाजीच्या कर्तृत्वामुळें दबलेली फितुरी व गांगरलेलीं वैमनस्यें अफझलखानाच्या प्रोत्साहनामुळें उफाळूं पहात होतीं. एकीकडे सुसर, दुसरीकडे अजगर, अशी शिवाजीची अवस्था झाली. खानाचा निःपात करण्यासाठीं शक्तिसर्वस्व एकत्रित करणें भाग झाल्यामुळें जंजिऱ्या-भोंवतालचीं मराठी सैन्यें वेढा उठवून जावळीच्या जंगलाकडे रवाना झालीं. आणि दुर्दैवानें जंजिऱ्याची ही मोहीम अपेशी झाली.

जंजिऱ्याची मोहीम यशस्वी झाली नाहीं, हें खरें; पण या मोहिमे-साठीं शिवाजी राजापुरास आला असतां त्याला एक नररत्न लाधलें. याबाबतची आख्यायिका अशी : आवजी हरी चित्रे, मुजुमदार, हा प्रभु गृहस्थ जंजिऱ्याच्या सिद्दीजवळ दिवाण होता. राजद्रोहाच्या संशयावरून त्याजवर सिद्दी सरकारची इतराजी झाली. सिद्दी सरदारांनीं विषप्रयोग करून आवजीला मारलें आणि त्याचा भाऊ खंडेराव याला पेटाऱ्यांत घालून समुद्रांत बुडविलें; त्यांच्या घरादाराची जाळपोळ करण्यांत आली; आवजीची पत्नी रखुमाबाई (गुलबाई, बुलगाई) आणि तिघे अज्ञान पुत्र बाळाजी, चिमणाजी व शामजी यांना सिद्दीच्या

हुकमावरून राजापुराच्या बाजारांत गुलाम म्हणून विकण्यांत आले. रखुमाईचे भाऊ विसो व लिंगो शंकर तुंगारे यांनीं खलाशांना ओळख न देतां या मंडळींस पंचवीस होनांस विकत घेतलें आणि त्यांचा अज्ञातवासांत प्रतिपाळ केला. बाळाजीचें लेखनकौशल्य नजरेस आल्या-मुळें शिवाजीनें त्याला आश्रय दिला व पुढें चिटणिशी दिली. चिटणि-सांना शिवाजी जीव कीं प्राण मानीत असे, एवढें सांगितलें म्हणजे त्यांच्या योग्यतेचें आणखी वर्णन करावयास नको. सिद्दीच्या अवकृपेमुळें व अपकृत्यांमुळें आणखी अनेक नररत्नें मराठेशाहीला प्राप्त झालीं; इतकेंच नव्हे, सिद्दीच्या शक्तीचें मर्म ध्यानीं आल्यामुळेंच शिवाजीनें कोंकण किनाऱ्यालगत अनेक जलदुर्ग उभारले आणि मराठ्यांचें पहिलें राष्ट्रीय आरमार सज्ज केलें.

अफझलखानाच्या मोहिमेचें संकट निवारण्यासाठीं १६५९ सालीं शिवाजीला जंजिऱ्याचा वेढा उठवावा लागला. यानंतर स्वराज्यावर एकामागून एक अशीं अनेक संकटें कोसळूं लागल्यामुळें त्यांना तोंड देण्यासाठीं त्याला आपलें शक्तिसर्वस्व वेळोवेळीं पठारावर एकत्रित करावें लागलें. तरीही त्याचें पश्चिम किनाऱ्याकडे दुर्लक्ष झालें नाहीं. महाराष्ट्राच्या अर्वाचीन इतिहासाच्या स्वराज्य–पर्वांत कोंकणाला जें महत्त्व होतें तें साम्राज्य–पर्वांत राहिलें नाहीं; म्हणूनच साम्राज्य गेलें व स्वराज्यही गेलें! शिवाजीच्या राज्याचा पायाच पश्चिम किनाऱ्यावर होता. सुरत-पासून कारवारपर्यंतचा अविच्छिन्न प्रदेश आपल्या ताब्यांत असावा, समुद्रावर आपलें प्रभुत्व असावें व दर्यावर्दी व्यापारानें आपला देश समृद्ध व्हावा अशी त्याची उत्कट इच्छा होती. जंजिऱ्याची प्रतिकार-शक्ति निदर्शनास आल्यावर त्यानें किनाऱ्यावर विजयदुर्ग, सिंधुदुर्ग, सुवर्णदुर्ग वगैरे अनेक जलदुर्ग उभारले. पोर्तुगीज लोक तोफा-बंदुका चालविण्यांत व दर्यावर्दी कामांत निपुण म्हणून प्रसिद्ध होते. आपल्या वकिलांमार्फत त्यांचेकडील पटाईत कारागीर पैदा करून शिवाजीनें तोफांचा कारखाना काढला आणि आरमार उभारलें. मराठी आरमाराचा वीस संगमेश्वरी जहाजांचा पहिला काफिला १६५९ सालीं सिद्ध झाला. याच सालीं तुकोजी आंग्रे शिवाजीच्या पदरीं राहिला. १६६४ सालीं

शिवाजीनें सिंधुदुर्गाची उभारणी सुरू केली. या सालीं मराठी आरमारांत ८५ गलबतें आणि ३ महागिऱ्या होत्या. या आरमारानिशीं खुद्द शिवाजीनें दर्यावर्दी मोहिमेचा मुहूर्त १६६५ सालीं केला. ही सारी तयारी शिवाजीनें मुख्यत्वेंकरून सिद्दीसाठीं केली होती; पण सिद्दीची सद्दी अद्याप संपली नव्हती. बसरूरची मोहीम आटोपून व गोकर्णमहाबळेश्वराचें दर्शन घेऊन शिवाजी भीमगडास आला तेव्हा मिर्झा राजा जयसिंग याच्या नेतृत्वाखालीं प्रचंड मोंगल फौज दक्षिणेंत दाखल झाल्याची वर्दी मिळाल्यामुळें किनाऱ्यावरील शत्रूंशीं दर्यावर्दी युद्धाचा बेत सोडून या प्राणसंकटाला तोंड देण्यासाठीं त्याला घाटमाथ्यावर यावें लागलें.

शिवाजीवरील मोहीम यशस्वी करण्यासाठीं जयसिंहाला आरमाराची अत्यंत जरूर होती. त्यानें सिद्दीला मोंगल बादशाहीचा आधार ( १६६५ ) देऊन शिवाजीवर उठविलें. जयसिंहाशीं तहाच्या वाटाघाटी सुरू झाल्या तेव्हां शिवाजीनें जंजिऱ्याची मागणी केली. जंजिरा द्यावा, अशी जयसिंहानें बादशहाकडे शिफारस केली आणि किल्ला खालीं करून शिवाजीच्या ताब्यांत द्यावा असा सिद्दीला हुकूम दिला. खुद्द बादशहाच्या हुकमाशिवाय किल्ला खाली करण्याचें सिद्दींनीं नाकारलें आणि बादशहाकडे राजकारण केलें. त्यावरून बादशहानें शिवाजीची ही मागणी अमान्य केली. जंजिऱ्याचें महत्त्व मैदानी जयसिंहाच्या ध्यानीं आलें नाहीं; मात्र औरंगजेबाला तें उमगलें होतें. जंजिरा ही कोंकणची किल्ली. ती हातीं ठेवण्याचा फायदा पुढें औरंगजेबास मिळाला. आग्ऱ्याहून परत आल्यानंतर शिवाजीनें सिद्दीशीं फिरून युद्ध सुरु केलें. १६६७ च्या मोहिमेंत सिद्दी फत्तेखान इतका जेरीस आला कीं त्यानें शिवाजीला जंजिरा खाली करून देण्याचें कबूल केलें; परंतु इतर सिद्दी सरदारांनीं फत्तेखानाला प्रथम पदच्युत व नंतर ठार केलें आणि युद्ध सुरू ठेवलें. शिवाजीच्या आरमारामुळें सिद्दीची चांचेगिरी जवळजवळ बंदच पडली होती. यावर तोड म्हणून सिद्दी खैर्यतखानानें मोंगलांचें स्वामित्व पत्करलें आणि सिद्दी संबूल यानें मोंगल आरमाराचें आधिपत्य स्वीकारलें. बादशहानें सिद्दी संबूल यास याकूबखान हा किताब व तीन लाखांची नेमणूक करून दिली. यामुळें

जंजिऱ्याचा प्रश्न अधिक गुंतागुंतीचा झाला. शिवाजी व सिद्दी दोघेही एकांमेकांविरुद्ध इंग्रजांकडे मदतीची मागणी करीत आणि परस्परांना नकळत इंग्रज त्यांना थोडीबहुत रसद व दारूगोळा पुरवीत; उघडकीस आलेंच तर त्याची जबाबदारी एखाद्या पुंडाच्या अंगीं लावून मोकळे होत. त्यांचें स्वतःचेंच आसन स्थिर नसल्यामुळें या जबरदस्तांच्या झटापटींत त्यांना अशा दुटप्पी राजकारणाचा अवलंब करणें भाग होतें.

१६७१ सालीं होळीच्या रात्रीं सिद्दी कासीम व सिद्दी खैर्यत यांनीं दंडाराजपुरी येथील शिवाजीच्या ठाण्यावर हल्ला चढविला आणि दारूगोळयाच्या कोठाराला आग लावली. मोठा धडाका उडाला. शिवाजी रायगडावर झोपेंत होता, तो या वेळीं एकदम दचकून जागा झाला आणि कोठें तरी दगा झाला असें अंतर्ज्ञानानें म्हणूं लागला. थोडक्याच वेळानें राजपुरीची बातमी आली. या वेळीं सिद्दीनें राजपुरी घेतली, पुरुषांची कत्तल केली आणि बायकामुलांना गुलाम केलें. या कामगिरीबद्दल सिद्दीला मोंगलांकडून शाबासकी मिळाली. १६७२ सालीं सिद्दीनें मराठी आरमारांतील पन्नास मचवे बुडविले आणि जंजिऱ्याला वेढा घालून बसलेल्या मराठी सैन्यांतील पंधरा हजार शिपायांची कत्तल केली! उलट १६७४ सालीं शिवाजीने सिद्दीचे शेंकडों लोक कापून काढले आणि सिद्दीचें आरमार सुरतेपर्यंत पिटून लावलें.

एवढ्या निकराचीं इतकीं युद्धें लढूनही जंजिरा हातीं येत नाहीं हें पाहून शिवाजी हताश झाला. राज्यारोहणानंतर तर त्याला जंजिरा अधिकच सलूं लागला. येथें वारंवार येणारें अपयश त्याला सहन होईना. त्यानें जंजिऱ्याचा ध्यास घेतला. यशासाठीं कोणा सिद्ध पुरुषाचा आशीर्वाद मिळवावा म्हणून शिवाजी तपास करूं लागला. केळशी येथें बाबा याकूत नांवाचे लोकोत्तर साधु होते. शिवाजी त्यांच्या दर्शनाला गेला. जंजिरा केव्हां हातीं येईल असें त्यांस विचारलें. उत्तर किंवा आशीर्वाद देण्याऐवजीं बाबा याकूत उठून चालूं लागले. महाराज त्यांचे मागें हिंडूं लागले. अखेरीस त्यांच्या पायांशीं लागले. तेव्हां बावांनीं पिकला केस दाढीचा व मिशीचा महाराजांचे हातीं दिला. त्यांचा ताईत करण्यासाठीं शिवाजीनें ते गोविंद विश्वनाथ प्रभु याचे

हवाली केले. त्याचे हातून ते हरवले. म्हणून त्याचेवर इतराजी होऊन शिवाजीनें त्याला पोतानिशीच्या जागेवरून दूर केलें. या कामीं यश नाहीं हें शिवाजीनें जाणलें. या दंतकथेला आधार नाहीं; तरीही हें अपयश शिवाजीनें जिवाला किती लावून घेतलें होतें हें या कथेवरून दिसून येतें, म्हणून ती येथें दिली आहे.

दैवयोगाचा प्रत्यय आला तरी शिवाजीनें प्रयत्न सोडला नाहीं. १६७८ सालीं शिवाजीनें खांदेरीस जलदुर्ग उभारला. उंदेरीवर तटबंदी करून सिद्दीनें तोड केली. १६८० सालीं शिवाजीनें अलीबागेनजीक नवघर येथें जलदुर्ग उभारला आणि त्याला जंजिरे कुलाबा असें नांव ठेवलें. आरमारासाठीं शिवाजीनें येथें गोदी व कारखाना उभारला. या तयारीमुळें इंग्रज व पोर्तुगीज इतके दचकले कीं ते म्हणत शिवाजी जन्मजात दर्यावर्दी नव्हता हें आमचें नशीब! नाहीं तर त्यानें आम्हासह दर्या साफ करून टाकला असता! पश्चिम किनाऱ्यावरील परक्यांचें सुदैव व मराठयांचें दुर्दैव कीं या आरमारानिशीं दर्यावर वावरूं लागण्यापूर्वीच शिवाजीचा अंत झाला!

सिद्धीच्या सामर्थ्यामुळे हतप्रभ झालेलीं भूतपिशाच्चें मंत्रशक्ति नष्ट होतांच अक्राळविक्राळ आकार धारण करून धुडगूस घालूं लागतात. शिवाजीच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रांत अशीच अवस्था झाली. दक्षिण-दिग्विजयाची प्रतिज्ञा करून औरंगजेब बऱ्हाणपुरास (१६८१) दाखल झाला. तो आला तेव्हां मोंगल साम्राज्याची अद्वितीय आर्थिक शक्ति त्याच्या पाठीशीं होती आणि प्रचण्ड लष्करी सामर्थ्य त्याच्या हाताशीं होतें. अलाउद्दीन खलजीनें मूठभर घोडेस्वारांच्या जोरावर एकेका सपाट्यात दक्षिणेंतील संपन्न व समर्थ हिंदु राज्यें धुळीला मिळविलीं. त्याची तयारी औरंगजेबाच्या मानानें कःपदार्थ होती; शिवाय त्याला दाक्षिणेंत कोणाचाही आधार नव्हता. तरीही त्याला जें साधलें तें अद्वितीय सामग्रीनिशीं याला साधलें नाहीं. दाक्षिणेंत औरंगजेबाचा मुक्काम सव्वीस वर्षें होता. या काळांत त्यानें दक्षिणेंतील मुसलमानी राज्यें मात्र नष्ट केलीं. तीं नष्ट झालीं, कारण तीं बांडगुळें होतीं. मराठ्यांचा निःपात करण्याच्या हिरीरीनें तो दाक्षिणेंत आला होता. मराठ्यांच्या छोट्या स्वराज्याची

धूळधाण करण्यासाठीं त्यानें मोंगल साम्राज्याचें सर्वस्व पणाला लावलें. त्यानें महाराष्ट्रांत फितुरी माजविली व अनेक मोहऱ्यांचे बळी घेतले; वेळोवेळीं मराठ्यांची दाणादाण केली आणि मराठ्यांच्या राजाला रानोमाळ वणवण करावयास लावलें. औरंगजेबाच्या सैन्यांत खानदानीचे उमराव होते. त्याच्या घोडदळांत अफगाणिस्तान, पंजाब व राजपुताना या भागांतील धिप्पाड व कसलेले लढवय्ये होते. मराठ्यांसारखीच युद्धपद्धति अवलंबिणारे चपळ व कणखर बुंदेली व मेवाडी सैनिक त्याच्या पायदळांत होते. रांगड्या व भुरट्या, किरकोळ व रानवट मराठ्यांनीं या परचक्राचा प्राणपणानें प्रतिकार केला. एवढा दीर्घकालीन व इतक्या निकराचा स्वातंत्र्य-संग्राम हिंदुस्थानांतच नव्हे, त्यापूर्वी व नंतर, इतरत्र कोठेंही झालेला नाहीं. झाला असलाच तर तो महाराष्ट्रांतच, पहिल्या शतकांत, सातवाहनांचा शक–क्षत्रपांशीं स्वातंत्र्यसंग्राम झाला त्या वेळीं. शिवाजीनें आरंभिलेला हा स्वातंत्र्यसंग्राम यशस्वी झाला, कारण या वेळीं महाराष्ट्रां-तील व्यक्तिमात्रानें महाराष्ट्राच्या स्वातंत्र्यप्रीतीचें व प्रतिकारशक्तीचें प्रतिनिधित्व स्वीकारलें होतें.

दक्षिणेंत येतांच औरंगजेबानें सिद्दीला उठावणीची प्रेरणा दिली. कारण त्याला मराठशाहीचा विध्वंस करावयाचा होता आणि त्या वेळीं मराठी राज्य मुख्यत्वेंकरून कोंकणापुरतें मर्यादित होतें; महाराष्ट्राच्या बगलेवर सारखे हल्ले चढवीत राहणें सिद्दीलाच शक्य होतें; शिवाय बादशहाला इंग्रज व पोर्तुगीज यांजवरही शह ठेवावाचा होता; यासाठीं त्यानें सुरत येथील मोंगली आरमार सिद्दीच्या मदतीस दिलें. सिद्दी हा मराठ्यांचा कट्टा दुष्मान. बादशहाचा पाठिंबा मिळतांच सिद्दीनें दांडगाई मांडली. मराठ्यांचीं गलबतें गांठून तीं जाळण्याचा सपाटा सुरू केला. किनाऱ्या-लगतच्या मराठी मुलखांत लुटालूट व जाळपोळ हे अत्याचार रोजचे प्रकार झाले. सिद्दी कासीमनें मराठी मुलखांतील लोक पकडून खंडणीसाठीं कांहीं संभावीत अटकेंत ठेवले आणि वरकड मुंबईस गुलाम म्हणून विकले. खांदेरीकडे निघालेल्या तीनशें मराठ्यांची त्यानें कत्तल केली आणि त्यांपैकीं ऐंशीं इसमांचीं डोकीं कापून गलबतांतून मुंबईस नेलीं व माजगांव

येथें तीं माल्यांवर खोंचून रांगेनें लावून ठेवलीं. याबाबत संभाजीनें इंग्रजांकडे तक्रार केली. शिवाजीची जरब अद्याप नष्ट झालेली नव्हती. असा प्रकार पुन्हां होऊं देणार नाहीं, असें इंग्रजांनीं संभाजीच्या वकिलास आश्वासन दिलें. १६८१ सालीं सिद्दीनें पनवेलपासून चौल-पर्यंतचा मुलूख उध्वस्त केला. सिद्दीचा कायमचा बंदोबस्त करण्यासाठीं संभाजीनें मराठी आरमार सज्ज केलें व जंजिऱ्यावर रवाना केलें. त्यांत लहानमोठीं दीडशें गलबतें होतीं व त्यांवर पांच हजार कसलेले लढाऊ खलाशी होते. दर्यासारंग दौलतखान, मायनाक भंडारी व गोविंदराव काथे हे या आरमारावर अधिकारी होते. स्वतः संभाजीनें वीस हजार फौजेनिशीं खुष्कीनें जंजिऱ्यावर चाल केली. महाडचा देशपांडे दादजी रघुनाथ प्रभु याजकडे जंजिऱ्याच्या मोहिमेचें नेतृत्व होतें. सिद्दीचा पाडाव केल्यास अष्टप्रधानांतें पद देण्याचें वचन त्याला संभाजीनें दिलें होतें. मराठ्यांनीं जोर करून समुद्रांतून व जमिनीवरून जंजिऱ्यावर तीस दिवसपर्यंत तोफांच्या गोळ्यांचा वर्षाव केला. किल्ल्याचा तट जागोजाग कोसळला, तरी सिद्दीचा प्रतिकार थंडावला नाहीं व तोफखाना बंद झाला नाहीं. तेव्हां सिद्दीच्या दारुखान्यास आग लावण्यासाठीं खंडोजी (कोंडाजी) फर्जंद रवाना झाला. संभाजीशीं हाडवैर असल्याचा बहाणा करून त्यानें जंजिऱ्यांत नोकरी मिळविली. असे अनेक हरामखोर पदरीं असल्यामुळें सिद्दीला या बहाण्यांत अघटित असें कांहीं वाटलें नाहीं. खंडोजीनें इष्टसिध्यर्थ एका लवंडीला विश्वासांत घेतलें. तिनें ऐन वेळीं विश्वासघात केला. त्याचें कपट तिनें सिद्दी खैर्यतखानास कळविलें. त्याबरोबर त्यानें खंडोजी व त्याचे साथीदार यांना हालहाल करून जिवें मारलें. नंतर सिद्दी कासीमनें संभाजीचें आरमार खाडींतून हांकून लावलें. तेव्हां आठशें वार रुंदीचा व तीस वार उंचीचा दगडी भराव घालून जंजिऱ्याची खाडी ओलांडण्यासाठीं पायरस्ता तयार करण्याची शक्कल संभाजीनें स्वीकारली. हें अचाट काम पुरें होण्यापूर्वीच मोंगलांना तोंड देण्यासाठीं संभाजीला उत्तर कोंकणांत जावें लागलें. त्याच्या मागोमाग सिद्दी कासीम आरमार बरोबर घेऊन मुंबईकडे रवाना झाला. दादाजीनें खाडी

भरण्याचें काम सोडून दिलें आणि लढाई शिकस्तीनें सुरू ठेवली. सिद्दी आरमाराची गस्त थांबल्याची संधि साधून दादाजीनें एका रात्रीं चार हजार सैनिकांसह जंजिऱ्यावर छापा घातला. या वेळीं अलीबागच्या कोळ्यांच्या मदतीनें मराठ्यांनीं जंजिऱ्याच्या कोटास शिड्या लावून आंत शिरण्याचा यत्न केला. किल्ल्यांतील जागरूक पहारेकऱ्यांनीं शिड्यांना बिलगलेल्यांवर दगडांचा आणि उथळ कातळावरून पुढें सरकणारांवर गोळ्यांचा वर्षाव करून मराठ्यांना पिटून लावलें. या चकमकींतून फक्त पांचशें लोक जीव बचावून परत आले. पुढें निसर्ग सिद्दीच्या मदतीला धांवला. पावसाळा सुरू झाला. तुफानी लाटांपुढें मैदानी मराठ्यांचा इलाज चालेना. तेव्हां निराश होऊन दादाजीनें वेढा उठवला. ह्या वेढ्याचे वेळीं सिद्दीला पोर्तुगीजांनीं वेळोवेळीं मदत केली म्हणून संभाजीनें गोव्यावर स्वारी केली. तीही त्यानें तडीला नेली नाहीं. जंजिऱ्यावरील छाप्याची हकीगत समजतांच सिद्दी कासीमनें कुलाब्याचा किनारा लुटला, ठिकठिकाणीं गोवध केला आणि अनेक खेडीं जाळलीं. त्यानें महाडापर्यंत दादाजीचा पाठलाग केला व त्याची बायको पळवून नेली. याचा सूड उगविण्यासाठीं संभाजीनें आपलें सारें आरमार एकवटून सिद्दीवर रवाना केलें. माजगांवच्या आरमारी लढाईंत मराठ्यांचा पूर्ण पराभव झाला आणि आपलीं जहाजें शत्रूच्या हातीं पडूं नयेत म्हणून त्यांना तीं बुडवावीं लागलीं !

दक्षिणेंत औरंगजेबाचें पाऊल पडलें तेव्हांपासून शाहूच्या पुनरागमनापर्यंत महाराष्ट्रांत अराजक माजलें होतें. परकी दर्यावर्दी सत्तांच्या अस्तित्वामुळें या काळांत कोंकणपट्टींत अंदाधुंदीचा कळस झाला होता. या काळांत पश्चिम किनाऱ्यावर कान्होजी आंग्र्यानें मराठ्यांचें नांव राखलें !

सिदोजी ऊर्फ भिवजी गुजर हा मराठी आरमारावरील मुख्य अधिकारी. कान्होजी आंग्रे हा त्याचा दुय्यम; पण वृत्तीनें असा बेताल कीं कांहीं बेबनावावरून यानें सिदोजीला अटकेंत ठेवलें ! सिदोजीच्या मृत्यूनंतर ( १६९८ ) मराठी आरमाराचें आधिपत्य कान्होजीला देण्यांत आलें. सरखेलीवरील सनदशीर मंजुरीची त्याला फारशी मातबरी

नव्हती ; पूर्वी आणि पुढेंही. यापूर्वीच तो आपलें आरमार स्वतंत्रपणें फिरवूं लागला होता. मध्यवर्ती सत्तेच्या आधाराच्या अभावीं त्यानें स्वपराक्रमानें समुद्रावरील प्रभुत्व संपादन केलें. साधारणतः खुष्की सेनापतीपेक्षां दर्यासारंग अधिक बेबंद. हिंदुस्थानांतील लढवय्या जमातींमध्यें मराठे बेबंद आणि दर्यावर्दी मराठ्यांमध्यें कान्होजी अग्रगण्य ! नजर ससाण्याची, झेंप गरुडाची आणि पकड मगरीची ! घेरिया ऊर्फ विजयदुर्ग हें या गरुडाचें घरटें. त्याच्या आधारावर यानें वाघोटण्याच्या खाडींत पहिला आरमारी कारखाना काढला. पुढें कुलाबा व सुवर्णदुर्ग येथेंही त्यानें असेच कारखाने काढले. राजारामाच्या कारकीर्दीत सरखेलीवर नेमणूक झाली तेव्हांपासून आयुष्याच्या अखेरी-पर्यंत या आरमाराच्या जोरावर सुरतेपासून त्रावणकोरपर्यंत दर्यावर्दी उद्योग करणारांना कान्होजीचा दरारा जाणवला. शिवाजीनें खुष्कीवर सुरू केलेली चौथाईची पद्धत यानें दर्यावर सुरू केली. मराठी दर्यावर वावरणाऱ्या जहाजांनीं आपला परवाना घेतला पाहिजे आणि परवाना नसेल त्या जहाजांनीं चौथाई दिली पाहिजे, असा याचा कडक दण्डक होता. ही पद्धत त्यानें इंग्रज व पोर्तुगीज यांचेपासूनच घेतली होती. या नियमांचा भंग करणारीं जहाजें बेलाशक लुटावींत अशी त्याची सारंगांना आज्ञा होती. ही पद्धत ज्यांना जाचली ते याला चांचा म्हणत. शिवाजीला दरवडेखोर म्हणतात, त्याच सुरांत. या काळचे इंग्रज दर्यावर्दी कान्होजीचा उल्लेख शिवाजी याच नांवानें करीत असत. परराष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पत्रव्यवहारांत या दोघांइतका अपशब्दांचा वर्षाव कोणावरही करण्यांत आलेला नाहीं. स्वदेशी वीर व मुत्सद्दी यांच्या परराष्ट्रीय मूल्यावरूनच त्यांचें महत्त्वमापन करण्याची आधुनिक प्रथा किती फसवी व धोक्याची आहे हें यावरून चांगलें प्रत्ययास येतें.

मुंबईनजीकच्या खांदेरी बेटावरील किल्ल्यावरून कान्होजीच्या आरमाराच्या हालचाली शिस्तींत सुरू झाल्या तेव्हां इंग्रज बिचकले व सिद्दी हादरले. दिल्लीची सत्ता दुबळी झाल्यामुळें पश्चिम किनाऱ्या-वरील मोंगली आरमाराची वाताहात झाली आणि सिद्दीचा आधार तुटला ; पण त्यानें धीर सोडला नाहीं. पोर्तुगीजांचें समुद्रावरील

प्रभुत्व नष्ट झाल्यामुळें पूर्वी काबीज केलेल्या जमिनीवर शक्य तोंवर पाय रोंवून राहण्यापुरतेंच त्यांचें राजकारण मर्यादित राहिलें. बेबंद-शाहीच्या काळांत इंग्रज मात्र चांगलेच बळावले होते. आंग्रयांचें सामर्थ्य त्यांनाच विशेष डांचलें. मराठ्यांचें आरमारी सामर्थ्य नेस्त-नाबूद केल्यावांचून त्यांना जिवंत राहणेंही अशक्य होतें. व्यापाराच्या सुरक्षिततेसाठीं परवान्याकरितां आंग्रयांना दरसाल पन्नास हजार पौंड खंडणीसारखे द्यावे लागत. या जाचांतून सुटण्याकरितां त्यांनीं अनेक वेळां आंग्रयांशीं झटापटी केल्या; यासाठीं त्यांनीं कधीं पोर्तुगीजांची मदत घेतली तर कधीं सिद्दीची; पण प्रत्येक वेळीं त्यांना हार खावी लागली. कारण आंग्रयांचें आरमार इंग्रजांहून प्रबळ व चपळ होतें; त्याचें नेतृत्व कसलेल्या दर्यासारंगाकडे होतें आणि मराठी आरमाराला देशावरून रसद व कुमक मिळण्याची सोय होती. शिवाजीची गनीमी युद्धपद्धति कान्होजीनें समुद्रावर सुरू केली. कान्होजीच्या चपळ लढाऊ गलबतांनीं इंग्रजांचीं व्यापारी जहाजें लुटलीं, इंग्रजांचीं अवजड आरमारी गलबतें पकडलीं व पेटवून दिलीं, इंग्रज नाविकांच्या कत्तली केल्या आणि आपलें प्रभुत्व अबाधित राखिलें, तरी इंग्रजांनीं प्रयत्न सोडला नाहीं. शेवटीं आमच्या दुर्दैवामुळें आम्हीच त्यांच्या हातांत खेळलों आणि आम्हीं आपल्या हातानें आपल्या आरमारी सामर्थ्याला जलसमाधि दिली व अग्निसंस्कार केला! पण आपण इंग्रजांच्या नादांत फार पुढें आलों.

शाहू दक्षिणेंत आला तेव्हां कान्होजी बाह्यतः ताराबाईच्या तटांत होता; पण वस्तुतः स्वतंत्र होता. त्याचा आधार ताराबाईला जरूर होता. याला मात्र मध्यवर्ती सत्तेच्या पाठबळाची दिक्कत नव्हती. शाहू दक्षिणेंत आला तेव्हां ताराबाईच्या गटांतील सरदारांनीं त्याच्याविरुद्ध उठावणी केली. कान्होजीनें कल्याण प्रांत व्यापला आणि घाटमाथ्या-वरील राजमाची व लोहगड हे किल्ले काबीज केले. यापुढें कान्होजी पुणें-साताऱ्यावर चालून येणार अशी आवई उठली. त्याच्या बंदोबस्ता-करितां शाहूनें आपला पेशवा बहिरोपंत पिंगळे याला फौज देऊन पाठविलें. कान्होजीनें त्याचा पराभव केला व त्याला लोहगडावर अटकेंत

(१७१२) ठेवलें. म्हणून प्रतिनिधीनें पेशवेपद स्वीकारावें आणि आंग्र्यांचें पारिपत्य करावें अशी शाहूनें आज्ञा केली ; पण प्रतिनिधीची हिंमत होईना. त्यानें ही कामगिरी पत्करण्याचें नाकारलें. तेव्हां शाहूनें बाळाजी विश्वनाथाला या मोहिमेचें नेतृत्व आणि पेशवेपद दिलें.

कोंकणांतून नशीब काढण्यासाठीं देशावर आलेल्या भटाचें भाग्य कोंकणांतील कान्होजीच्या निमित्तानें उदयाला आलें; पेशवेपद त्याच्या नशीबींच लिहिलेलें होतें. पुरुषस्य भाग्यम्; किंपुरुषस्य नव्हे! सिद्दीच्या अत्याचारांमुळें उत्तरकालीन मराठेशाहीला लाधलेल्या नररत्नांमध्यें बाळाजी अग्रगण्य, कौस्तुभासमान! देशोधडीला लागलेल्या श्रीवर्धनच्या देशमुख कुलांतला हा तंतु मराठेशाहीच्या कलंडत्या महावृक्षाला सांवरता झाला. नाकांत बोलणारा, म्हणून तोंडभर बोलणारांनीं व घरंदाज वतनदारांनीं, धेंडांनीं व झोंडांनीं याची कुस्करी केली, पण त्यांची तोंडें सुकलीं, तेव्हां यानेंच कोंकणची कामगिरी फत्ते केली.

बाळाजी विश्वनाथ हा उत्कृष्ट सेनापति होता तसाच उत्कृष्ट मुत्सद्दीही होता. आंग्र्यांचे बाबतींत त्याची मुत्सद्देगिरी प्रत्ययास आली. आपली चढाई आरंभीं यशस्वी झाली तरी देशावरील मोहीम आपल्याला पेलणार नाहीं हें कान्होजी जाणून होता. आपलें दर्यावर्दी सामर्थ्य नष्ट करण्यास इंग्रज, सिद्दी व फिरंगी टपलेले आहेत हें त्याला ठाऊक होतें. त्यांच्या कडव्या विरोधामुळें देशावरील सत्तेच्या तात्त्विक आधारावांचून आपलें समुद्रावरील प्रभुत्व टिकणार नाहीं हें त्याला समजलें होतें. शाहू हाच राज्याचा कायदेशीर वारसदार आहे हें त्याला मान्य होतें. ताराबाईचा पक्ष मध्य महाराष्ट्रांत नामोहरम होऊं लागलेला आहे हें त्यानें ओळखलें होतें. म्हणूनच शाहूशीं तडजोडीचें बोलणें करावयास तो उत्सुक होता. बाळाजीला आंग्र्यांच्या अवस्थेची पूर्ण कल्पना होती. कान्होजी व बाळाजी यांचा पूर्वीपासून परिचय होता. बाळाजीच्या मुत्सद्देगिरीमुळेंच कान्होजी शाहूच्या पक्षांत सामील झाला (१७१३). पुढें आंग्र्यांचा मराठी दरबाराशीं तह झाला

(१७१५). त्या अन्वयें कान्होजीला सरखेल हा किताब व मराठी आरमारावरील मुख्य अधिकार देण्यांत आले; त्याला कोंकणपट्टींतील दहा किल्ले व सोळा महाल सरंजामादाखल मिळाले; मराठेशाहीच्या वतीनें पश्चिम किनाऱ्यावर रखवाली करण्याची कामगिरी त्याच्यावर सोंपविण्यांत आली आणि आंग्र्यांना कोणा शत्रूनें उपद्रव दिल्यास साहाय्य करण्याची जबाबदारी मध्यवर्ती सत्तेनें स्वीकारली. मराठ्यांना वेळोवेळीं उपयोगी पडलेल्या, व नडलेल्या, सरंजामी पद्धतीची सुरुवात आंग्र्यांपासून झाली. वस्तुतः आंग्र्यांना शाहूच्या मदतीची जरूर नव्हती; इतरांना मदत करण्यासारखी शाहूची परिस्थिति नव्हती; आपल्याला वेळेवर मदत मिळेल अशी आंग्र्यांची अपेक्षाही नव्हती. शाहूलाच आंग्र्यांच्या मदतीची जरूर होती, निदान तटस्थतेची. मराठी दरबारच्या अगतिकतेची जाणीव कान्होजीनें शाहूला पुढें वेळोवेळीं शब्दानें व कृतीनें करून दिलेली आढळते. त्याच्या या वृत्तीची तुलना करावयाचीच तर ती जंजिऱ्याच्या सिद्दी सुभेदाराशींच.सुभ्याच्या वसुलीचा हिस्सा आम्ही मध्यवर्ती सत्तेला देणार नाहीं, रखवालीबद्दल आपल्यालाच तनखा मिळाला पाहिजे असा दोघांचाही दावा होता.

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर दिल्लीच्या बादशाहीचा जोर ओसरला; यामुळें सिद्दीची सत्ता क्षीण झाली. औरंगजेबानें दक्षिणेंतील मुसलमानी राज्यें बुडविलीं; यामुळें सिद्दीला उठावणीला चिथावणी किंवा मराठ्यांच्या पिछाडीवर त्याच्या हालचालींना साथ देणारी सत्ता राहिली नाहीं. यामुळें सिद्दीची कुचंबणा झाली. कान्होजीच्या आरमारी सामर्थ्याची इतरांना आलेली प्रचीति पाहून सिद्दीची झांज उतरली होती. आंग्रे व सिद्दी हे शेजारी असल्यामुळें त्यांच्या कुरकुरी नेहमींच चालत. आतां तर शाहूशीं झालेल्या तहाचे अन्वयें हबशांनीं बेबंदशाहीच्या काळांत दडपलेला मुलूख आंग्र्यांकडे सनदशीरपणें आलेला होता व त्यावर कबजा करावयास आंग्रे उत्सुक होते. कान्होजीनें सिद्दीवर मोहीम काढली तेव्हां कराराप्रमाणें बाळाजी विश्वनाथ मराठी सैन्यासह सरखेलाच्या मदतीला आला. पहिल्या सपाट्यास सिद्दी नरम आल्यामुळें बाळाजीनें त्याचा कान्होजीशीं सलोखा करून दिला (१७१६). या व्यवस्थेचे

अन्वयें सिद्दीकडील अकरा किल्ले मराठ्यांना परत मिळाले. सिद्दी नरम आला, पण नष्ट झाला नाहीं.

परकीयांचे हातीं असलेली राजसत्ता स्वकीयांचे हातीं आल्यानंतर कांहीं काळपर्यंत संतमहंतांचें, स्वामींचें व आचार्यांचें, थोतांड पिकतें. जणुं आपल्याच प्रेरणेमुळें व पुण्याईमुळें स्वराज्य प्राप्त झालें अशा अभिनिवेशानें, परमेश्वराच्या प्रेषिताच्या आविर्भावानें आणि रामराज्य-स्थापनेच्या मिषानें हें छद्मस्वामी व दुष्टाचार्य राजकारणांत व राज्य-कारभारांत लुडबूड करूं लागतात. असेच एक घमंडानंद शाहूच्या राज-वटीच्या सुरुवातीस कोंकणांत परशरामक्षेत्रीं प्रकट झाले. यांचें नांव ब्रह्मेंद्रस्वामी. परशुरामनजीकचा धामणी गांव स्वामीस राजारामाकडून इनाम मिळाला होता. भार्गवरामाच्या पुरातन मंदिराचा जीर्णोद्धार करण्यासाठीं द्रव्य संपादन करण्याकरितां हातीं निशाण व कर्णा आणि पाठीशीं अलौकिक सामर्थ्याचा बोभाटा, एवढें भांडवल बरोबर घेऊन स्वामी भिक्षेस निघाले (१७०७). महाराष्ट्र दरिद्री असला तरी भाविक असल्यामुळें देवकार्याला द्रव्याची टंचाई कधींही पडत नाहीं; शिवाय परशुराम हा अपरान्ताचा देवाधिदेव आणि स्वामीही कर्तृत्ववान्; म्हणून स्वामीला बरेंच द्रव्य मिळाले. या द्रव्यांतून स्वामीनें देवालयाचा जीर्णोद्धार केला आणि तो स्वतः दरबारी इतमामांत राहूं लागला. स्वामी मोठा धूर्त व दूरदर्शी. बाळाजी विश्वनाथ देशावर निघाला तेव्हा याने त्याला आशीर्वाद दिला (ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर: चरित्र व पत्रव्यवहार: श्री. पारसनीस. पृ. ९). शाहू चंदनवंदन किल्ल्यांसाठीं झुंजत होता, तेव्हां यानें प्रसाद म्हणून आपली कौपीन व कटिसूत्र आशीर्वादासह त्याच्याकडे पाठविलीं आणि सत्पुरुषाच्या वरदानामुळेंच आपल्याला यश प्राप्त झालें असें महाराज मानूं लागले (उपरोक्त: पृ. ९). बरें तर बरें, मराठ्यांचा भगवा झेंडा यापूर्वीच फडकूं लागला होता; नाहीं तर तें श्रेयही स्वामीनें पटकावलें असतें! स्वामीला स्वराज्याच्या शत्रुमित्रांची क्षिति नव्हती. स्वामीनें १७०८ सालीं जंजिऱ्याच्या सिद्दी याकूतखानाला असाच प्रसाद दिला होता! दंतकथा सांगते, कीं सिद्दीच्या भेटीला जातांना स्वामीनें केळीच्या

पानावर बसून राजपुरीची खाडी ओलांडली आणि हें सिद्दीनें जंजिऱ्याच्या बुरजावरून प्रत्यक्ष पाहिलें! पाणी कापण्यासाठीं या पानाला मासे जोडले होते कीं काय नकळे! तें कसेंही असो. एवढें मात्र खरें कीं स्वामीनें सिद्दीकडून परशुराम देवस्थानासाठीं पेढें व आंबडस हे दोन गांव इनाम मिळवले. कोणाचें कांहीं भलें झालें, माझ्या आशीर्वादाचें फळ; कोणाचें काहीं बुरें झालें, माझ्या अवकृपेचें फळ; असा दावा स्वामी मांडूं लागला. खुद्द महाराज तसें मानीत, मग स्वामीनें कां न मानावें? स्वामी द्रव्याचे बाबतींत मोठा दक्ष होता. भिक्षेच्या निमित्तानें स्वामी गांवोगांव हिंडत असे. वरप्राप्तीच्या आशेनें किंवा शापाच्या धास्तीनें मातबर लोक स्वामीला द्रव्य देत असत. संचित संपत्तीवर स्वामी सावकारी करूं लागला. यासाठीं त्यानें एक गुजर आपल्या पदरीं ठेवला होता. मराठाशाहींतील अनेक सरदारांना स्वामीनें कर्ज दिलीं होतीं; आंग्र्यांना व पेशव्यांनाही. अशा रकमेला स्वामी श्रीचा ऐवज म्हणत असे. वसुलीला सोईस्कर! सारे सरदार कर्जासाठीं स्वामीची खुशामत करीत आणि वसुलीसाठीं तगादा सुरू झाला म्हणजे अजीजी. स्वामीच्या तगाद्यांना बाजीरावानें पाठविलेलीं कांहीं पत्रें अत्यंत हृदय-द्रावक आहेत. कोणी त्याला परमहंस म्हणत, कोणी भार्गवरामाचा अवतार म्हणत. यामुळें स्वतःच्या स्थानाबद्दल व सामर्थ्याबद्दल स्वामीनें अवास्तव कल्पना करून घेतली होती. यामुळेंच कोंकणपट्टीवर एक भयंकर प्रसंग गुदरला.

जंजिऱ्याच्या हबशांचा अंजनवेल येथील सुभेदार सिद्दी सात याला सावनूरच्या नबाबानें बहुमानार्थ एक हत्ती नजर केला. सिद्दी व मराठे यांमध्यें कायमची तेढ असल्यामुळें स्वतःचीं माणसें पाठवून हत्ती आणविणें सिद्दीला अशक्य होतें. म्हणून गोसाव्याच्या हातें साप धरण्याची युक्ति सिद्दीनें काढली. प्रांतोप्रांतींच्या राजांच्या मुलखांतून हत्ती सांभाळून आणण्याची कामगिरी त्याच्या विनंतीवरून स्वामीनें पत्करली; कारण स्वामी खुशामत्यांचा मोठा चाहता होता. यासाठीं अगोदर दस्तकें घेऊन ठेवावींत असें सिद्दीनें सुचविलें असतां स्वामीनें घमेंडींत ही सूचना धुडकावून लावली. कारण सारेच आपले शिष्य,

आपला अनादर करण्यास देशीं परदेशीं कोणी धजवणार नाहीं अशी स्वामीची खात्री होती. सावनुरास स्वामीनें हत्ती ताब्यांत घेतला. हत्तींचा सराव असलेले पठाण सिद्दीनें स्वामीबरोबर पाठविले होते. या सर्व लवाजम्यासह स्वामी कोंकणाकडे निघाले. विशाळगडच्या घाटांत प्रतिनिधींच्या चौकीदारांनीं हत्ती अडविला; कारण तो उघडपणें पठाणांच्या ताब्यांत होता. हा हत्ती आपल्या स्वारींतला आहे असें स्वामीनें दडपून सांगितल्यानंतर किल्लेदाराच्या हुकमावरून चौकीदारांनीं हत्ती सोडला. घाटावरून कोंकणांत उतरल्यानंतर एकदां स्वामी स्नानसंध्येसाठीं मागें राहिले आणि स्वारी पुढें गेली. माखजनच्या मेटावर आंग्रे व हबशी या उभयतांच्या सरहद्दीवरील चौक्या होत्या. येथील मराठी चौकीदार दस्तकावांचून हत्ती पुढें जाऊं देईनात; आणि पठाणाच्या ताब्यांत असलेला हत्ती आपल्या सुभेदारासाठीं आणलेला आहे हें समजल्यावरून तो कबजांत घेण्यासाठीं हबशी चौकीदार झटूं लागले. मराठी चौकीदारांनीं ठाण्यावरून मदत आणली, जबरदस्तीनें हत्ती ताब्यांत घेतला व तो जयगडास रवाना केला. माखजनास आल्यावर हें वृत्त स्वामीला समजलें. त्यानें जयगडच्या हवालदाराला हत्ती परत करण्याबद्दल निरोप पाठविला. या निरोपाप्रमाणें हत्ती परत आला असताही; कारण स्वामी हे कान्होजीचे गुरु असल्याचा बोभाटा होता. पण तसें होण्यापूर्वींच या हत्तीपायीं मोठा अनर्थ गुदरला.

हत्ती हातून गेलेला पाहतांच खवळलेल्या हबशी चौकीदारांनीं अंजनवेलीस सुभेदाराकडे निरोप पाठविला कीं गोसाव्यानें कज्जाचें निमित्त करून हत्ती आंग्र्यांचे लोकांचे स्वाधीन केला! सिद्दी सात हिंदूंचा कट्टा द्वेष्टा; जंजिऱ्याच्या नबाबाच्या सामोपचारी वृत्तीमुळें खवळलेला; निमित्ताला टेंकलेला. स्वतःच्या कामाकरितां स्वामीच्या वजनाचा उपयोग करून घ्यावयासाठींच त्यानें हत्तीची कामगिरी गोसाव्याच्या गळ्यांत अडकविली होती. आपल्या बहुमानाचा हत्ती आपला अपमान करण्यासाठीं स्वामीनें जाणून बुजून पूर्वसंकेतानुसार चौकीचा देखावा करून आंग्र्यांच्या हवालीं केला अशी हटवादी समजूत करून घेऊन सिद्दी सात यानें जबरदस्तीनें हत्ती आणण्याकारितां अंजनवेलीहून

जयगडास फौज पाठवली, ती आंग्र्याचे किल्लेदारांनीं पिटून लावली. तेव्हां आणखी खवळून सिद्दी सात यानें १७२७ च्या फेब्रुवारींत शिवरात्रीच्या दिवशीं परशुराम क्षेत्रावर एकाएकीं हल्ला चढविला. त्यानें गांव बेचिराख केला व देऊळ उध्वस्त केलें, लूटमार केली, द्रव्यासाठीं लोकांचे अनन्वित हाल केले. गांवांतील व देवळांतील बायकामाणसांची अब्रू घेतली. अनपेक्षित आघाताच्या प्रतिक्रियेंत मनुष्याचा मूलस्वभाव व खरें चारित्र्य व्यक्त होतें, असा मानसशास्त्राचा सिद्धांत आहे. परशुरामच्या अत्याचाराचा वृत्तांत समजतांच स्वामीनें कान्होजीला पत्र पाठविलें, "तुमचे लोकांनीं आमचे समागमें हत्ती होता तो नेला, सबब सिद्दी सात यानें परशुरामीं स्वारी पाठवून देवब्राह्मणांचा उच्छेद केला, तरी पत्रदर्शनीं जयगडकरी यास पत्र पाठवून हत्ती सोडून देवविणें, हत्ती न सोडल्यास तुझें भलें होणार नाहीं." स्वामीच्या शापाच्या धास्तीमुळें नव्हे, सिद्दीशीं युद्ध पुकारण्यास पुरेसें कारण व तयारी आणि परिस्थितीची अनुकूलता नसल्यामुळें, विशेषतः गोसाव्याची बिलामत आपल्या गळ्यांत नको, म्हणून कान्होजीनें ताबडतोब जयगडास हुकूम पाठवून हत्ती स्वामीकडे पोंचता केला. अलीकडे गाजलेलें असेंच एक प्रकरण आठवून वाचकांनीं तोलून पहावें. हत्ती समागमें घेऊन स्वामी गोवळकोट येथें आला आणि सिद्दी सात यास बोलावून घेऊन हत्ती त्याच्या स्वाधीन केला. यानंतर झाला वृत्तांत स्वामीनें जंजिऱ्यास कळविला. सिद्दी रसूल याकूबखान भला मनुष्य होता. स्वामीची लुटलेली चीजवस्त परत करण्याबद्दल त्यानें सिद्दी सात यास हुकूम दिला. त्याप्रमाणें बहुतेक मालमत्ता परत आली. सिद्दी सात लाचारीची भाषा करूं लागला, तेव्हां स्वामीनें त्याला शाप दिला, 'तूं देवब्राह्मणांचा उच्छेद केलास, अतःपर तुझाही उच्छेद लवकरच होईल.' परशुरामचा विध्वंस झाल्यामुळें यापुढें आपण कोंकण प्रांतीं रहावयाचें नाहीं असें स्वामीनें ठरविलें. असा त्रागा करूं नये म्हणून कान्होजीनें विनवणी केली व शेवटीं शपथही घातली. यामुळें संतुष्ट होण्याऐवजीं स्वामी साशंक मात्र झाला. आणि कोंकणांतून निसटण्यासाठीं निमित्त शोधूं लागला.

स्वामीची समजूत करण्यासाठीं सिद्दीनेंही आणखी दोन गांवें इनाम देण्याचें आश्वासन दिलें. यामुळें स्वामी आणखी एक वर्षभर परशुरामीं राहिला. हत्तीच्या प्रकरणांत आपली मानखंडना झाली अशी समजूत झाल्यामुळें सिद्दी सात स्वामीवर डूख धरून होता. तो स्वामीला नाना प्रकारें उपसर्ग देऊं लागला. पुंडांचा रिवाजच असतो; एकानें भलावणी करावयाची व त्याच्या साथीदारानें उठावणी. यामुळें परशुरामीं आपली निभावणी लागणार नाहीं हें स्वामीच्या प्रत्ययाला आलें. धर्मकारणाच्या सबबीवर उपाध्यायांनीं कागाळी निर्माण करावयाची, नंतर मुत्सद्यांनीं राजकारणी समजावणीचा देखावा उभा करावयाचा आणि अखेरीस सैन्यांनीं देश पादाक्रांत करावयाचा, या आधुनिक आक्रमक मोर्चेबंदीचा आरोप संशयापुरताही ब्रह्मेंद्रस्वामीवर करतां येत नाहीं. स्वामीची मनोवृत्ति ओळखून कान्होजीनें त्याला शपथेंतून मोकळें केलें आणि पडत्या फळाची आज्ञा मानून स्वामी देशावर आला व धावडशीस स्थायिक झाला. स्वामीच्या हा वेळपर्यंतच्या उद्योगाला राजकारणाचा गंधही नव्हता आणि राजकारण समजण्याइतका पोंचही स्वामीचे अंगीं नव्हता हें खरें; पण यानंतर मात्र सिद्दी सात याच्या पारिपत्यासाठीं व परशुरामक्षेत्र निर्भय करण्यासाठीं स्वामीनें मराठी दरबारांत बऱ्याच खटपटी केल्या; याचें श्रेय मात्र स्वामीला दिलेंच पाहिजे.

परशुरामाचा प्रश्न धसाला लावण्याचा उद्योग स्वामीन सुरू केला न केला, तोंच महाराष्ट्राचें दुर्दैव ओढवलें. कान्होजी आंग्रे १७२९ सालीं मरण पावला. कोळ्यानें समुद्रांत टाकलेल्या जाळ्यांत मिळालेल्या चंबूच्या तोंडावरील सुलेमानाची मोहोर निघतांच आंत कोंडलेला राक्षस उसळून वर आला आणि आभाळाला भिडला, अशी अरबी कथा आहे. कान्होजीच्या दहशतीचा दाब दूर होतांच तोंवर जंजिऱ्यांत दबून राहिलेल्या सिद्दीच्या मस्तीला व अत्याचारी वृत्तीला ऊत आला. आणि हें पुरें झालें नाहीं म्हणूनच कीं काय, कोण जाणे, आंग्र्यांच्या घराण्यांत यादवी माजली. मराठेशाही मोठी दुर्दैवी. हाताच्या आंगठ्याच्या पेराच्या जोरावर एक यव असतो; त्याचीं अग्रें दुभंगलेलीं असलीं कीं

हातीं आलेलें यश निसटून जातें, असें हस्तसामुद्रिक सांगतात. मराठे-शाहीच्या अंगुष्ठावर असाच अपेशी यव होता कीं काय ? आणीबाणीच्या प्रत्येक क्षणीं महाराष्ट्रातील राजकारणी आघाडीवरील घराणीं भाऊ-बंदकीला बळी पडलेलीं आहेत. शाहूच्या पुनरागमनाच्या वेळीं ताराबाईच्या तुफानी प्रचारामुळें चंचल झालेली राजनिष्ठा स्थिर करण्यासाठीं महाराष्ट्राच्या कर्तृत्वाला सरंजामी धाटणी द्यावी लागली. तत्कालीन राजकारण सर्वसाधारणपणें व्यक्तिनिष्ठ असल्यामुळें कौटुंबिक दुहीचें पर्यवसान राष्ट्रीय आपत्तींत झालेलें आहे; कधीं तावडतोब, कधीं कालांतरानें. आंग्रे घराण्यांत भडकलेल्या यादवीमुळें प्रथम कुटुंबाचें माहात्म्य नष्ट झालें आणि अखेरीस या कृत्येनें मराठी आरमारी सामर्थ्याचा बळी घेतला !

जंजिऱ्याचा प्रमुख अधिकारी सिद्दी रसूल याकूबखान मरण ( फेब्रुवारी, १७३३ ) पावल्यानंतर सिद्दी घराण्यांत अशीच यादवी माजली. या दुहीचा फायदा घेऊन मराठ्यांनीं सिद्दीवर आक्रमण केलें; पण सिद्दी सरदारांनीं यादवी मोडून काढली आणि आक्रमण परतविलें. प्रतिनिधीचा मुत्सद्दी यशवंतराव पोतनीस याच्या खटपटीमुळें सिद्दी रसूलचा वडील मुलगा अबदुल्ला व त्याचा मुलगा सिद्दी रहमान आणि सिद्दी सरदार शेखजी हे मराठ्यांना सामील झाले. शेखजी हा मूळचा कोळी, बाटून मुसलमान झालेला. सामीलनाम्याच्या मोबदल्यांत शेखजीला मराठ्यांच्या आरमाराचें आधिपत्य आणि हबशी मुलखाची सुभेदारी, त्याच्या भावाला रायगडची किल्लेदारी आणि फौजेला लाख रुपयांची बक्षिसी देण्याचें यशवंतरावानें प्रतिनिधींच्या संमतीनें कबूल केलें. या योजनेला जबाबदार असणाऱ्या पुढाऱ्यांच्या मुत्सद्देगिरीचें करावें तेवढें कौतुक थोडेंच होणार आहे. पूर्वीं हातीं तरवार घेऊन शत्रूचा पाठलाग करणारे मराठे आतां हातीं लांचेच्या थैल्या घेऊन त्यांच्या पुढें पुढें करूं लागावे, या एका गमकावरून आपल्या राष्ट्रीय अधोगतीची कल्पना करतां येते. एवढें राजकारण शिजतांच शाहूनें मोहिमेची योजना ठरविली. मोहिमेचें राजकीय नेतृत्व प्रतिनिधींकडे व लष्करी नेतृत्व बाजीरावाकडे सोंपविण्यांत आलें; जंजिऱ्याला आरमारी

वेढा घालण्याची कामगिरी आंग्र्यांना सांगितली ; सुरतेहून सिद्दी मसूद आरमार घेऊन जंजिऱ्याच्या कुमकेस निघालाच तर त्याला थोपवून धरण्याची व्यवस्था मराठ्यांचे गुजरातेंतील सरदार दाभाडे व गायकवाड यांजवर सोंपविण्यांत आली. शाहूनें एवढी तयारी केली तरी ही मोहीम अखेरीस फसली.

प्रतिनिधि व पेशवे या घराण्यांची चुरस होती ; बाळाजी विश्वनाथाला पेशवाई मिळाली तेव्हांपासून. बाजीरावाला पेशवाई मिळाली तेव्हां-पासून तर ती अधिक तीव्र झाली होती. प्रतिनिधि मानानें मोठा आणि पेशवा कर्तृत्वानें. बाजीरावाच्या कर्तृत्वावर शाहूचा विश्वास होता, पण भोंवतालीं वावरणारांच्या कागाळ्यांमुळें बाजीरावाच्या राजनिष्ठेविषयीं तो साशंक होता. म्हणूनच शाहूनें प्रतिनिधीचें लोढणें या मोहिमेच्या गळ्यांत अडकविलें होतें ; आणि या दोघांवर शह ठेवण्यासाठीं फत्तेसिंग भोंसले याचीही या कामगिरीवर योजना केली होती. आंग्र्याच्यासंबंधानें शाहू व बाजीराव दोघेही साशंक होते. मध्यवर्ती सत्तेला आरमारी धोरण नव्हतें, इतकेंच नव्हे, पश्चिम किनाऱ्यावरील परिस्थितीचें आकलनही झालेलें नव्हतें ; आणि आरमारी सुभा सवता आहे असें मानणाऱ्या सरखेलांना मध्यवर्ती सत्तेशीं सहकार्य करण्याची जरूर अद्याप पटलेली नव्हती. प्रतिनिधीनें आंग्र्यांचा सरदार बांकाजी महाडीक याचा हिरमोड केला. म्हणून नाराज होऊन बांकाजीनें मोहि-मेंतून अंग काढून घेतलें. दाभाडे व गायकवाड यांचें व बाजीरावाचें वांकडें असल्यामुळें सुरती आरमाराला अडविण्याचा शाहूचा हुकूम त्यांनीं मानला नाहीं ; यामुळें आरमारी मदत मिळून जंजिरा बळावला. मराठ्यांच्या उठावणीची पहिली धडक पेलण्यासाठीं जंजिऱ्याचें अस्तित्व व सामर्थ्य टिकविणें इंग्रजांना इष्ट होतें ; म्हणून जंजिऱ्याची सत्ता डबघाईला आली तेव्हां इंग्रजांनीं मदत करून ती सांवरून धरली. आणि सिद्दी हें जीवनमरणाचें युद्ध प्राणपणानें लढले. म्हणून मराठ्यांची मोहीम फसली आणि सिद्दीचें अस्तित्व अबाधित राहिलें.

सिद्दीच्या मुलखांत घुसतांच बाजीरावानें पहिल्या धडाक्यास तळें व घोसाळें हे किल्ले काबीज ( मे १७३३ ) केले. नंतर तो राजपुरीवर

चालून गेला. इकडे मानाजी आंग्र्यानें जंजिऱ्याला वेढा घातला आणि पहिल्या सपाट्यास सिद्दीच्या आरमाराचा पूर्ण पाडाव केला. मराठ्यांना फितूर झालेला सिद्दी अबदुल्ला कोट पडावयाची वाट पहात जंजिऱ्यांत दबा धरून बसला होता. मराठ्यांची चढाई सुरू होतांच सिद्दी सरदारांनीं अबदुल्लाचा वध केला. त्याचा मुलगा सिद्दी रहमान हा आजाचा मुर्दा दफन् करण्याकरितां राजपुरीस गेला तेव्हांच सिद्दी सरदारांनीं त्याला जंजिऱ्यांतून हद्‌पार केला होता. बाजीराव राजपुरीस आला तेव्हां सिद्दींनीं त्याच्यावर निकराचा हल्ला चढविला. या युद्धांत सिद्दी रसूलचा एक मुलगा ठार झाला आणि एक सिद्दी सरदार कैद झाला. यानंतर पेशव्यानें अवचितगड, नागोठणें, निजामपूर, बिरवाडी वगैरे ठाणीं व किल्ले लढून काबीज केले. यशवंतराव पोतनिसाने रायगडावर भेद केला होता ; त्यास अनुसरून प्रतिनिधीनें चढाई करून 'तक्ताचा जागा' काबीज केला. आंग्र्यांचा सरदार बांकाजी महाडीक यानें बाणकोट व मंडणगड हे किल्ले मोठ्या जवामर्दीनें काबीज केले. आणि नंतर विजयगड व गोवळकोट या किल्ल्यांवर चढाई केली. युद्ध जोरांत सुरू असतां बांकाजीची चढाई प्रतिनिधीनें रोखली. कारण सिद्दी सात याने प्रतिनिधीशीं सलोख्याचें बोलणें सुरू केलें होतें आणि जंजिऱ्याच्या मोहिमेचें यश आपल्या मर्दुमकीला अगर मुत्सद्देगिरीला मिळविण्याला प्रतिनिधि उत्सुक होता. प्रतिनिधीच्या हालचालींमुळें बाजीरावाचें मन मोहिमेवरून उडालें. बांकाजीचें गाऱ्हाणें ऐकून आंग्र्यांनीं त्याला परत बोलावलें. तोंवर सिद्दी सात यानें भोळ्या प्रतिनिधीला झुलवीत ठेवलें आणि तो आपल्या जाळ्यांत पुरता गुरफटला असें दिसून येतांच त्याच्यावर हल्ला चढवून मराठ्यांची राळ उडवली. प्रतिनिधीनें साताऱ्याहून मदत मागितली. शाहूनें पदरच्या सरदारांना गळ घातली. जिंकलेला प्रदेश जहागीर मिळावा या अटीवर सारे अडून बसले. मदत येईना म्हणून हार खाऊन प्रतिनिधि देशावर परतले. तिकडे सेखोजी आंग्र्यानें मुंबई-नजीकचे थळ व रावळी हे किल्ले काबीज केले आणि खांदेरीवरून उंदेरीवर हल्ला चढविला. यामुळें इंग्रजांना धास्ती पडली. त्यांनीं

सिद्दीला फौज, दारूगोळा, अन्नसामुग्री वगैरेचा पुरवठा केला आणि नंतर जंजिऱ्याच्या मदतीला लढाऊ जहाजेंही पाठविलीं. यामुळें सिद्दीला मोठा हुरूप आला व तो अधिक निकरानें लढूं लागला. तेवढ्यांत सुरतेचें आरमार जंजिऱ्यास दाखल झालें आणि हबशी जास्तच बळावला. एवढ्यांत सेखोजी आंग्रे एकाएकीं मरण पावला ( सप्टेंबर १७३३ ) आणि संभाजी व मानाजी आंग्रे यांच्यामध्यें तंटा सुरू झाला. मराठ्यांची मोहीम घारगळूं लागलेली पाहून शेखजी व सिद्दी रहमान यांनीं इंग्रजांच्या मध्यस्तीनें जजिऱ्याच्या सिद्दी सरदाराबरोबर समेट केला. छत्रपति संभाजीच्या कारकीर्दीपासून बहुधा दरसाल उन्हाळयाच्या दिवसांत जंजिऱ्यावर जमिनीवरील मोर्च्यांतून मराठे गोळे सोडीत. या मोहिमेला आतां जवळजवळ तसेंच मामुली स्वरूप प्राप्त आलें आणि अखेरचें मोहरें हातांतून निसटलें, हें पाहून बाजीरावानें स्वारी आटोपती घेण्याचें ठरविलें. वेढ्यामुळें हबशीही हैराण झाले होते. त्यांनीं राज्याचा अर्धा वसूल मराठ्यांना देण्याचें कबूल करतांच त्यांजबरोबर तह करून बाजीराव देशावर रवाना झाला. पुढें उदाजी पवारानें १७३४ सालीं शामलावर हल्ला चढविला. पाचाड येथील लढाईंत हबशांचा मोड झाला. सिद्दी अंबर अफवानी ठार झाला. गेल्या मोहिमेंत मराठ्यांनीं काबीज केलेल्या मुलखास सिद्दी सात उपद्रव देऊं लागला. चौल येथील शाबा मशीद आंग्रे मोडणार आहेत अशी अफवा उठली होती, तिचा फायदा घेऊन सिद्दी सात कुलाब्याच्या आसपास लुटालूट करूं लागला. म्हणून त्याच्या बदोबस्तासाठीं व आंग्र्यांच्या मदतीसाठीं शाहूनें चिमाजीआप्पास कोंकणांत पाठविलें. रेवसनजीक कामारलें उर्फ श्रीगांव येथें सिद्दीबरोबर मराठ्यांची निकराची लढाई झाली. मानाजी आंग्र्यास उरांत गोळी लागली. उंदेरीचा किल्लेदार सिद्दी याकूब हा या युद्धांत मारला गेला आणि सत्तावीस जखमा झाल्या तरी नेट धरून नानाजीराव सुर्वे यानें सिद्दी सातास ठार केला ( १९-४-१७३६ ). 'सिद्दी सात रावणासारखा दैत्य, तो मारून हबशांचा मूळ कंदच उपटून काढला!' या विजयानें मराठामंडळास अतिशय आनंद झाला. हबशांचे दोन प्रमुख सरदार पडल्यामुळें सिद्दी रहमान यानें

पेशव्यांशीं तह केला. या तहाचे अन्वयें सहा महाल मराठ्यांना मिळाले व सहा सिद्दीकडे राहिले आणि जंजिरा, गोवळकोट व अंजनवेल हीं स्थळें हबशाच्याच हातीं राहिलीं. परशुरामक्षेत्र हबशाचे उपसर्गापासून निर्वेध होण्यापूर्वीच ब्रह्मेंद्रस्वामी मरण पावला ( १७४५ ).

आंग्रे घराण्यांतील यादवी मिटविण्यासाठीं पेशव्यांनीं खूप खटपट केली ; पण मानाजी व संभाजी यांचा सलोखा झाला नाहीं. अखेरीस त्यांच्या मुलखाची वांटणी करून मानाजीनें कुलाब्यास व संभाजीनें सुवर्णदुर्गी रहावें अशी व्यवस्था करून देण्यांत आली. मानाजी पेशव्यांच्या पक्षांतला व संभाजी प्रतिनिधीच्या. या मतभेदामुळें त्यांचें वैमनस्य वाढत गेलें. मानाजीला मराठी दरबारशीं मिळून राहणें भाग होतें. कारण त्याच्या उरावर इंग्रज व सिद्दी हे शत्रु होते. संभाजीला यांचा विशेष उपसर्ग नसल्यामुळें तो दरबारशीं फटकून वागे. संभाजीच्या मृत्यूनंतर त्याचें आरमार व अधिकार त्याचा सावत्र भाऊ तुळाजी यानें बळकावले. बाणकोट ते सावंतवाडी या भागांत देशावर व समुद्रावर तो धुमाकूळ घालूं लागला. त्याच्या लुटालुटीमुळें इंग्रज चवताळले. पुढें तर तो साताराच्या दरबारालाही जुमानीना. म्हणून या डोईजड सरंजामदाराचा उच्छेद करावयाचें दरबारनें ठरविलें. तुळाजीच्या तोडीचें आरमार मराठ्यांजवळ नव्हतें. म्हणून पेशव्यांनीं यासाठीं इंग्रजांशीं तह केला. या तहाचे अन्वयें ठरलें कीं आंग्र्यांचा पाडाव करण्यास इंग्रजांनीं पेशव्यांस मदत करावी आणि त्याचा मोबदला म्हणून इंग्रजांचा ताबा सर्व पश्चिम किनाऱ्यावर रहावा आणि बाणकोट, हिंमतगड व नजीकचीं पांच गांवें इंग्रजांना बक्षीस द्यावींत ( मराठे व इंग्रज : श्री. केळकर. उत्तरार्ध, पृ. १४ ). इंग्रजांना आंग्र्यांचा उपसर्ग असह्य झाला होता. मुंबईच्या गव्हर्नरनें केलेली आंग्र्यांचा नाश करण्याची प्रतिज्ञा पुरी व्हावयाची होती. यासाठींच त्यांनीं पूर्वी सिद्दीबरोबर तह केला होता ; पण त्यांतून कांहींच निष्पन्न झालें नव्हतें. मराठी दरबारनें व कुलाबकर मानाजी आंग्र्यानें नुस्ती तटस्थता ठेवली तरी आपण तुळाजीचा उच्छेद करूं शकूं असा आतां त्यांना आत्मविश्वास वाटत होता. म्हणून इंग्रजांनीं पेशव्यांशीं तह केला.

मराठी दरबारपाशीं स्वतंत्र आरमार नव्हतें, मानाजीच्या मानानें तुळाजीचें आरमार फार बलिष्ठ होतें आणि दुसऱ्या कोणाहीकडून आरमारी मदत मिळणें अशक्य होतें, म्हणून पेशव्यांना इंग्रजांची मदत घेणें भाग झालें. या तहाच्या अटीमुळें इंग्रज बलिष्ठ होतील हें पेशवे जाणून होते; पण नुकताच त्यांनीं वसईच्या लढ्यांत पोर्तुगिजांचा मोड केला होता, म्हणून इंग्रजांची त्यांना दिक्कत वाटत नव्हती. तहानंतर मोहीम सुरू झाली. दोस्तानीं १७५६ सालीं सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग हे आंग्र्यांचे नांवाजलेले किल्ले काबीज केले. विजयदुर्गच्या लढाईंत इंग्रजांनीं तुळाजीचें आरमार वेढलें व जाळून टाकलें. येथें इंग्रजांना अपरंपार लूट मिळाली. यापूर्वी इंग्रजांनीं विजयदुर्गावर हल्ला केला होता, पण त्यांना मार खाऊन परतावें लागलें होतें. आतां मिळालेल्या जयामुळें आंग्र्यांच्या नाशाची शतकारंभीं केलेली त्यांची प्रतिज्ञा बहुतांशीं पूर्ण झाली. मराठी आरमाराचा नाश झाल्यामुळें यापुढें पश्चिम किनाऱ्यावर व नजीकच्या समुद्रावर इंग्रजांना पहिल्या दर्जाचें महत्त्व प्राप्त झालें. हें लवकरच मराठी दरबाराच्या प्रत्ययास आलें. तुळाजीचा दाब नष्ट होतांच मानाजी आंग्र्याच्या मुलखांत सिद्दी लुटालूट करूं लागले. म्हणून मराठी दरबारच्या मदतीनें मानाजीनें जंजिऱ्यावर स्वारी केली (१७५८). मराठ्याच्या ताब्यांत असलेल्या दंडाराजपुरीवर त्यानें तळ दिला, जंजिऱ्याला आरमारी वेढा घातला व तोफा सुरू केल्या. वेढा रंगाला आला न आला तोंच मानाजी आजारी पडला व एकाएकीं मरण पावला! यामुळें मराठ्यांचा निम्मा जोर ओसरला. तरीही पेशव्यांचा कोंकणचा सुभेदार रामाजीपंत यानें मोहीम तशीच चालू ठेवली. यासाठीं त्यानें पोर्तुगीजांची मदत घेतली म्हणून आणि पूर्वीच्या दोस्तीच्या तहानुसार आरमार घेऊन इंग्रज सिद्दीच्या मदतीला आले. तरीही रामाजीपंतानें युद्ध चालू ठेवलें. अखेरीस, निर्वाणीचा उपाय म्हणून इंग्रजांनीं जंजिऱ्यावर आपलें निशाण चढविलें आणि श्री. ग्रँट डफ सांगतात, इंग्रजांच्या झेंड्याला मान दिलाच पाहिजे हा धडा मराठ्यांना शिकवला (History of the Marathas: Third Edition P. 324.). या झेंडा-

उभारणीची रामजीपंतावर काय प्रतिक्रिया झाली याबाबत कांहीं उल्लेख उपलब्ध नाहीं. मात्र इतिहासकार सांगतात, या झेंड्यामुळें नव्हे, पानपतच्या पराभवाची बातमी आल्यामुळें रामजीपंतानें वेढा उठविला आणि जंजिरा पुन्हां बचावला !

पूर्वी शिवाजीच्या कारकीर्दीत, पन्हाळ्याच्या वेढ्याच्या वेळीं (१६६१) सिद्दी जोहरच्या मदतीला आलेल्या राजापूर येथील इंग्रजी वखारीवरील अधिकाऱ्याने तोफखान्यानजीक आपला झेंडा फडकावला होता ; या धाष्टर्याबद्दल शिवाजीकडून इंग्रजांना भरपूर प्रायश्चित्त मिळालें होतें. त्या वेळीं शिवाजीचें राज्य किती छोटें होतें, पण त्याचा दरारा केवढा होता ! आणि आतां मराठ्यांचें राज्य केवढें विस्तृत झालें होतें, तरीही त्यांनीं आपल्या निशाणाचा मान राखलाच पाहिजे अशा भावना व अपेक्षा इंग्रजांच्या मनांत उत्पन्न झाल्या होत्या ! शिवाजीची मूठ पोलादी होती आणि ती मिटलेली होती ; पेशव्यांची मूठ ढिली होती व ती उघडी पडलेली होती. राज्याचें सामर्थ्य त्याच्या विस्तारावर अवलंबून नसतें, नेत्याच्या कर्तृत्वावर अवलंबून असतें, हेंच खरें ! उत्तरकालीन मराठशाहीजवळ नांव घेण्याजोगें आरमार नव्हतें, इतकेंच नव्हे, आरमारी धोरणही नव्हतें, म्हणूनच तुकोजीचा उच्छेद केला गेला आणि यासाठीं इंग्रजांची मदत घेतली गेली. मराठ्यांनीं आपलें आरमार आपखुशीनें नष्ट करविलें आणि आपल्या हातांनीं आपल्या राज्याला व सामर्थ्याला सुरुंग लावला, असेंच म्हणावें लागतें.

एकूण समुद्रांत घुसलेल्या सह्याद्रीच्या एका कातळाच्या आधारावर अढळ झालेल्या सिद्दीबरोबर मराठ्यांनीं अनेक युद्धें केलीं ; पण सिद्दीचा पूर्ण असा पराभव त्यांना कधींही करतां आला नाहीं. हबशाच्या आधारामुळेंच मोंगलांचा महाराष्ट्रांत टिकाव लागला आणि मराठ्यांशीं असलेल्या हबशांच्या शत्रुत्वामुळें इंग्रज बळावले. मराठ्यांच्या राज्यविस्तारामुळें पश्चिम किनाऱ्यावरलें सिद्दीचें वर्चस्व नष्ट झालें पण त्याचें घरटें मराठ्यांच्या हातीं लागलें नाहीं. कारण, पूर्वी सांगितल्याप्रमाणें दक्षिण हिंदुस्थानांतील राजकीय परिस्थिति, जंजिऱ्याला मिळालेलें सह्याद्रीचें संरक्षण, संरक्षणाला अनकूल अशी जंजिऱ्याची नैसर्गिक परिस्थिति,

सिद्दींचा एकोपा व चिकाटी, दुर्दम्य निष्ठा व स्वातंत्र्यप्रीति आणि आमची अदूरदृष्टि व आरंभशौर्य, वैमनस्यें व ढिलाई, बढाई व औदासीन्य !

## परशुराम

शंकर हा सह्याद्रीचा स्वामी आणि परशुराम हा अपरान्ताचा ; केवळ स्वामीच नव्हे, प्रत्यक्ष निर्माता ; फक्त भूमीचा निर्माता, एवढेंच नव्हे, स्वयंनिर्मित भूमींत स्वयंप्रेरित जमातींचा प्रस्थापक ; शुद्धीकृत वंशांचा पुरस्कर्ता आणि दुर्बलांचा साहाय्यकर्ता ; विशिष्ट मनोवृत्तीचा व युद्ध-पद्धतीचा प्रणेता ; क्षत्रियोत्तमांचा धनुर्वेदाचार्य आणि क्षत्रियाधमांचा संहारकर्ता ; अर्थात् जड व जीव सृष्टीचा अधिष्ठाता. दश अवतारांमध्यें परशुरामाचें कार्य अद्वितीय व स्थान सर्वश्रेष्ठ ; आणि सप्त चिरंजीवांमध्यें त्याचें कर्तृत्व अग्रगण्य !

सह्याद्रीच्या अंतिमोत्तर भागांत साल्हेरचा डोंगर आहे. कळसूबाई हें मराठी सह्याद्रीचें उच्चतम शिखर. त्याच्या खालोखाल साल्हेरचें शिखर. या डोंगरावरील मध्ययुगीन गड प्रसिद्ध आहे. या गडाच्या उच्चतम टोंकावर परशुरामाचें मंदिर आहे. " देवळाच्या उत्तरेस शंभर हात अंतरावर कड्याच्या माथ्यावर मनुष्याच्या पावलांच्या चौपट आकाराचीं दोन पावलें खोदलेलीं आहेत. बाण मारतांना मनुष्य ज्या पविञ्यांत पावलें ठेवील त्यांतच बिनचूकपणें पावलांची योजना केलेली आहे. ह्या ठिकाणीं उभा राहून जमदग्निपुत्रानें बाण मारून समुद्र हटाविला. ह्या कड्यावरून सुमारें तीन कोस अंतरावर एका डोंगराच्या तटाला आरपार भोंक पडलेलें स्पष्ट दिसेल. परशुरामाच्या बाणानें हें भोंक पडलें अशी लोकसमजूत आहे. साल्हेरपासून समुद्र सुमारें पंचवीस कोसांवर आहे." (संचार : महाराष्ट्राच्या छपरावर : श्री. चिं. वि. जोशी. पृ. ९६-९७). सह्यगिरीच्या शृंगावरून परशु फेंकून परशुरामानें शूर्पारक प्रदेश निर्माण केला आणि हा प्रदेश सागरानें परशुरामाला दिला अशाही कथा आहेत. सह्याद्रीच्या अंतिम दक्षिण भागांत त्रावणकोर संस्थानांत महेंद्रगिरी

नांवाचा डोंगर आहे. मल्याळी सह्याद्रीचें हें अत्युच्च ( ५५०० ' ) शिखर. शूर्पारकाप्रमाणेंच त्रावणकोर प्रदेशही परशुरामानें समुद्र हटवून निर्माण केला आणि नंतर तो महेंद्रागिरीवर स्थायिक झाला, अशा स्थानिक कथा या भागांत प्रचलित आहेत ( Travancore : E. G. Hatch. p. 214-5 ). परशुराम प्रतिज्ञापूर्तीनंतर जेथें स्थायिक झाला तो महेंद्रपर्वत हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावरील कलिंग प्रांतांतील असावा असें महाभारतांतील पांडव-यात्रा-प्रसंगांतील उल्लेखावरून वाटतें ; उलटपक्षीं परशुरामाचें निवास-स्थान करवीरनजीक वेणी नदीच्या आसपास कोठें तरी असावें असें हरिवंशांतील कृष्ण-बलराम प्रवासांतील उल्लेखावरून वाटतें. कृष्णा-वेणा संगमावरील खेड या गांवाला पूर्वी परशुराम क्षेत्र असे नांव होतें ( चित्पावन : श्री. चापेकर—श्री. डिकसळकर यांचे टिपणावरून : पृ. १३ ). चिपळूणनजीक परशुरामाचा डोंगर आहे. येथें ब्रह्मेंद्रस्वामींनीं जीर्णोद्धारिलेलें परशुरामाचें प्रसिद्ध मंदिर आहे. या डोंगराला महेंद्र पर्वत असें स्थानिक नांव आहे. ( माझी तीर्थयात्रा : भाग ४ : श्री. फडके. पृ. १०७ ; श्रीक्षेत्र परशुरामवर्णन : श्री. जोशी. पृ. १३ ; Legends of the Konkan : Crawford. p. 28 ). हरिवंशांतील उल्लेख या स्थानाला अनुलक्षून केलेला असणें संभवनीय आहे. भृगुकच्छ म्हणजे भृगूंचा प्रांत. भडोच जिल्ह्यांत सहाव्या शतकांतील भृगूचें देवालय आहे. ( चित्पावन : श्री. चापेकर : पृ. ९ ) गोदावरीवरील नाशिकनजीकचें गोवर्धन हें भार्गवांचें निवासस्थान असें मार्कण्डेय पुराणांत ( ३७.३४-३५ ) सांगितलेलें आहे. समुद्रकांठानें भृगुकच्छपासून वज्रेश्वरी व परशुराम-वरून गोकर्णमहाबळेश्वरापर्यंत, सह्यशिखरांवर साल्हेरपासून महाबळेश्वरा-वरून गोमंत पर्वतापर्यंत आणि पठारावर नर्मदातीरावरील माहिष्मती-पासून गोवर्धन, माहूर व आंबेजोगाईवरून करवीरपर्यंत महाराष्ट्राचा प्रदेश परशुरामाच्या पदस्पर्शानें पुनीत झालेला आहे. पंजाबांत कांग्रा जिल्ह्यानजीक परशुरामाचें पुरातन मंदिर ( Imperial Gazetteer Vol XIX : p. 124 ) आहे. आसामच्या पूर्व सीमेवरील प्रभु पर्वताच्या दरींतून ब्रह्मपुत्रा हिंदुस्थानांत प्रवेश करते. परशुरामानें परशु

फेंकल्यामुळें ही दरी निर्माण झाली अशी स्थानिक दंतकथा आहे. ( Ancient Geography of India : Wieford : Asiatic Researches : XIV. p. 382 ). क्षत्रियसंहारानंतर परशुरामानें येथील डोहांत आपला परशु धुतला अशी ही स्थानिक कथा आहे. ( Imperial Gazetteer of India : vol. IX. p. 8 ). परशुरामाच्या कर्तृत्वामुळे तीर्थक्षेत्रांचा दर्जा प्राप्त झालेलीं स्थानें हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत विखुरलेलीं आहेत; विशेषतः महाराष्ट्रांत आणि त्यांतही अपरान्तांत.

हा परशुराम होता तरी कसा ?

दशरथाला परशुरामाचें दर्शन झालें तो प्रसंग महर्षि वाल्मीकींनीं रामायणांत ( बालकाण्ड : ७४·१७–१९ ) वर्णन केलेला आहे : जटामण्डलधारणामुळें भव्य दिसणाऱ्या परशुरामाला पाहून राजाला वाटलें कीं जणुं पंचमहाभूतांपैकीं तेज हें तत्त्वच मूर्तिमंत समोर ठाकलें आहे! राजाला तो कैलासाप्रमाणें दुर्धर्ष आणि कालाग्नीप्रमाणें दुःसह वाटला. जरासंधाच्या तावडींतून निसटून श्रीकृष्ण व बलराम दक्षिणापथांत आले, तेव्हां सह्याचलविभूषित करवीरपुरानजीक वेणा नदीच्या तीरावरील एका प्रचण्ड वटवृक्षाखालीं बसलेल्या परशुरामाचें त्यांना दर्शन झालें. हरिवंशांत महर्षि व्यास ( विष्णुपर्व : अध्याय ३९ : १८–२५ ) सांगतात : त्यानें जटा व वल्कल यांचें धारण केलें होतें; त्याच्या खांद्यावर परशु होता; त्याचा वर्ण गौर व तेज भास्करासारखें होतें; त्याचा देह सागरासारखा गंभीर होता आणि त्रिकालस्नानामुळें स्निग्ध झालेला होता; त्याच्या आसनाचा आकार अग्नीच्या ज्वालेसारखा होता. परशुरामाचीं हीं वर्णनें त्याच्या वृद्धावस्थेंतील, त्याच्या अवतारकृत्याच्या परिसमाप्तीनंतरचीं आहेत; परशुरामाच्या ब्राह्मतेजाचीं आहेत. या अवस्थेचें वर्णन करतांना व्यास-वाल्मीकींची वाणी कुंठित होते, मग परशुरामाच्या प्रज्वलित क्षात्रतेजाचें वर्णन कोण करूं शकणार !

एवंगुणविशिष्ट परशुरामाचें अवतारकृत्य या अध्यायांत सांगतों, तें ऐकावें.

परशुरामाचा जन्म भार्गवकुलांत झाला. ब्राह्मणांचीं मूल गोत्रें कोणतीं याबद्दल आधारग्रंथांत मतभेद आहेत. कारण, त्यांबद्दलची माहिती ज्यांत दिलेली असते तीं इतिहास-पुराणें वेगवेगळ्या राजघराण्यांच्या व पुरोहितकुलांच्या पुरस्काराखालीं निर्माण किंवा संपादित झालेलीं असल्यामुळें त्यांमध्यें त्या त्या कुलाच्या माहात्म्याला प्रामुख्य देण्यांत आलेलें आहे. साधारणतः भार्गव व वसिष्ठ हीं ब्राह्मणांचीं मूलगोत्रें, एवढ्यापुरती मात्र त्यांमध्यें एकवाक्यता आहे (Ancient Indian Historical Tradition : Pargiter. p. 186 ). या कुलाची परंपरा वेदकालापासून महाभारतकालापर्यंत अखण्डित आहे. इतिहास-पुराणांतील उल्लेखांवरून भार्गवकुलोत्तमांची वंशावळ तयार होते, ती पुढील पानावर दिली आहे.

इतिहास–पुराणांत प्रसिद्ध कुलांच्या वंशावळी दिलेल्या आहेत आणि कुलोत्तमाच्या कर्तृत्वाचे वृत्तांत दिलेले आहेत. या वंशावळी व हे वृत्तांत सदोष आहेत. परंपरेचें विस्मरण आणि विविध व्यक्तींनीं वेळोवेळीं केलेल्या संकलनांमुळें निर्माण झालेली परंपरांची प्रादेशिक भिन्नता, प्रत्येक वंशांत वेगळ्या पिढ्यांमध्यें एकच नांव धारण करणाऱ्या व्यक्तींचें अस्तित्व, एकाच व्यक्तीला अनेक नांवें देण्याची प्रथा, ऐतिहासिक दृष्टीचा अभाव,संकेतांची योजना आणि लौकिक व अलौकिक यांची भेसळ करण्याची प्रवृत्ति, या दोषांमुळें या वंशावळींच्या वृत्तांतांचा मुकाबला लावतां येत नाहीं, समकालीन म्हणून उल्लेखिलेल्या व्यक्तींचा समन्वय करतां येत नाहीं आणि नमूद वृत्तांतांतील ऐतिहासिक व अलौकिक यांची निवड करतां येत नाहीं. वस्तुतः इतिहासपुराणांतील अलौकिक प्रतीकात्मक असतें ; पण त्या काळीं समजण्यास सुलभ व प्रचलित असलेले संकेत आतां आपल्याला अगम्य झाले आहेत. ब्राह्मणकुळांच्या वंशावळींच्या व वृत्तांतांच्या बाबतींत या अडचणी विशेष जाणवतात. वंशावळी व परंपरा यांचें रक्षण हें सूतांचें आनुवंशिक कार्य. सामान्यतः सूत हे राजदरबारीं राहणारे आणि ऋषिकुलें अरण्यांतील आश्रमांत ;



भृगु = दिव्या ; पौलोमी.
च्यवन = सुकन्या
= आरुषी
द्वादश भार्गव.
= गो उर्फ आंगी.
शुक्र = ऊर्जस्वती.
= जयन्ती.
अप्रवान्.
= ऋचो
प्रमति.
= घृताची
दधीच.
= सरस्वती
वरत्रिन.
शंड.
मर्क.
त्वष्टृ.
अरजा.
देवयानी.
और्व.
रुरु.
= प्रमद्वरा.
सारस्वत.
रजत.
पृथुरश्मि.
बृहदांगिरस.
त्रिशिरस्.
विश्वरूप.
विश्वकर्मन्.
ऋचीक
= सत्यवती.
शुनक.
जमदग्नि = रेणुका.
अजीगर्त.
रुमण्वान.
सुषेण.
वसु.
विश्वावसु.
परशुराम.
शुनःपुच्छ.
शुनोलाङ्गूल.
शुनःशेप.

यांच्या कार्यांविषयीं, किंबहुना अस्तित्वाविषयींही बहुजनसमाज साधारणपणें उदासीन. यामुळें ब्राह्मणकुळांच्या वंशावळींत अनेक पिढ्या गळतात आणि त्यांमध्यें ऋषींच्या शिष्यांचाही समावेश होतो. ब्राह्मणऋषींच्या विस्ताराचा पुरावा आद्य ऋषींशीं संलग्न असलेल्या गोत्रांच्या गुणाकारांत मिळतो; मात्र या माहितीचें ऐतिहासिक महत्त्व अद्याप तरी शून्यांशावर आहे. 'एखाद्या कुलांत एखादा असाधारण पुरुष निर्माण झाला म्हणजे त्याच्या कर्तृत्वावर व व्यावहारिक कृत्यांवर अलौकिकाचा मुलामा चढविण्यांत येतो आणि त्याचा देवाशीं संबंध जोडण्यांत येतो. या वृत्तांतांतील अतिशयोक्तीचा भाग वगळला असतां इतिहासाचे धागेदोरे हातीं लागतात.

या दृष्टीनें भार्गवकुलाच्या कार्याचे व परशुरामाच्या कर्तृत्वाचें विवेचन यथामति करीत आहे.

आद्य ऋषि भृगु हा भार्गवकुलाचा व यशाचा प्रस्थापक. भृगु अनेक आहेत. त्यांपैकीं स्वायंभुव मन्वंतरांतील भृगु ब्रह्मदेवाच्या हृदया-पासून निर्माण झाला; म्हणून त्याला ब्रह्ममानसपुत्र अशी संज्ञा देण्यांत आलेली आहे. भृगु हा प्रजापति आहे. इतर प्रजापति ब्रह्मदेवाच्या अवयवांपासून निर्माण झाले. भृगु त्या सर्वांहून श्रेष्ठ; कारण त्याची उत्पत्ति ब्रह्मदेवाच्या हृदयापासून! वैवस्वत मन्वंतरांतील भृगूला वारुणी ही संज्ञा आहे; कारण हा भृगु वरुणापासून निर्माण (ऐतरेय ब्राह्मणः ३·३४; शतपथ ब्राह्मण: ११·६·१·१; तैत्तिरीय आरण्यक: ९·१.) झालेला आहे. भृगुकुलावर महादेवाची विशेष कृपा. ह्या वरुणाचें रूप महादेवानें धारण केलें होतें अशी कथा आहे. भृगूंचे अनेकवचनी अनेक उल्लेख ऋग्वेदांत (१·५८·६; २·४·२; ३·२·४; ४·७·१) आलेले आहेत. भृगुकुलाचा अग्निसांप्रदायाशीं आणि अग्नि-स्थापनविधींशीं (तैत्तिरीय संहिता: ४·६·५·२; ५·६·८·६.) निकट संबंध आहे. सकल ऐश्वर्यांचा स्वामि असा जो अग्नि तो भृगुऋषींनीं त्रिभुवनांच्या प्रयत्नांचें बळ खर्चून स्वर्गांतून आणून पृथ्वीच्या मध्य-भागीं वेदीवर प्रस्थापित केला (१·१४३·४), भृगूंनीं अरणींतून मंथन करून अग्नि प्रकट केला (१·१२७·७), असे अनेक उल्लेख

ऋग्वेदांत आलेले आहेत. भृगु व अंगिरस या कुलांनीं अथर्ववेद निर्माण वा संपादित व प्रकट केला. भृगूंची युयुत्सु ( ऋग्वेदः ७·१८·६ ; १०·६१·१-३. ) आणि ब्राह्मणांवर अन्याय अगर अत्याचार करणारांविषयींची प्रतिहिंसक ( अथर्ववेद : ४ १·५·१ ; ऐतरेय ब्राह्मण : ५·१९·१ ) वृत्ति वेदकालापासून विख्यात आहे.

भार्गववंशावळींच्या अग्रस्थानीं असलेल्या भृगूला संजीवनी विद्या अवगत होती. त्याला दिव्या, ख्याति व पौलोमी या नांवांच्या स्त्रिया होत्या. दिव्या ही हिरण्यकशिपूची कन्या आणि ख्याति ही कर्दम-प्रजापतीची. दिव्या ही पुलोम्याची कन्या म्हणून पौलोमी, असें ब्रह्माण्ड-पुराणांत सांगितलेलें आहे. भृगूचे पुत्र व त्यांना जन्म देणाऱ्या माता यांच्या तपशिलांवरून हीं तिन्ही नांवें एकाच स्त्रीचीं असावींत असें दिसतें. दिव्येला तिच्या बालपणीं तालजंघ कुलांतील ( रेणुकामाहात्म्य : अ. ५ ) पुलोमा ( पद्मपुराणांत याचें नांव दमन असें दिलेलें आहे. ) नांवाच्या राक्षसानें मनानें वरलें होतें. तिच्या बापानें तिला भृगूस अर्पण केले. पुढें एकदां पुलोमा मनुष्यरूपानें भार्गवाश्रमीं आला. त्या वेळीं भृगु स्नानार्थ बाहेर गेलेला होता. हा अतिथि असावा अशा कल्पनेनें दिव्येनें याचा सत्कार केला. आश्रमांत पुरुष-माणसें नाहींत असे दिसून येतांच पुलोम्यानें जबरदस्तीनें तिला ओढून नेलें. या वेळीं ती गरोदर होती. महाभारतांत सांगितलें आहे कीं या अत्याचारामुळें संतप्त झालेल्या गर्भानें आपल्या तेजानें राक्षसाला दग्ध केलें. पुराणें सांगतात कीं गर्भच्युतिमुळें या बालकाला च्यवन हें नांव प्राप्त झालें.

च्यवन हा भृगूचा ज्येष्ठ पुत्र होय असें या वृत्तांतावरून दिसतें. हा कनिष्ठ असें महाभारतांत मात्र स्पष्ट सांगितलेलें आहे. ऋग्वेदांत च्यवनाचा उल्लेख ( १०·६१·१-३ ) आलेला आहे. वेदवेदांगांत पारंगत झाल्यावर च्यवनानें अतिशय मोठी तपश्चर्या आरंभिली. दीर्घ कालपर्यंत एकाच जागीं निश्चल बसून राहिल्यामुळें याच्या अंगावर वारूळ वाढलें. वैवस्वत मनूचा पुत्र शर्याति हा कुशस्थली ( द्वारका ) येथील आनर्त या राजघराण्याचा संस्थापक.

त्याची कन्या सुकन्या ही आपल्या मैत्रिणींसह खेळत खेळत त्या वारुळापाशीं आली असतां त्यांतील छिद्रांतून चकाकणारे च्यवनाचे डोळे तिला दिसले. बालिश कुतूहलानें तिनें एक कांटी वारुळांत टोंचली. यामुळें च्यवनाचे डोळे फुटले. तेव्हां यानें संतप्त होऊन कांहीं मंत्रसाधन केलें. त्यामुळें राजासह सर्व सेनेचा मलमूत्रावरोध झाला. राजा चौकशी करूं लागला, तेव्हां सुकन्येचा अपराध त्याच्या कानीं आला. राजा ऋषीला शरण गेला. पापाच्या परिमार्जनार्थ व अपराधाच्या क्षालनार्थ शर्यातीनें सुकन्या आपणांस अर्पण करावी असा च्यवनानें आग्रह धरला. नाइलाज झाल्यामुळें शर्याति राजानें ही शर्त मान्य केली आणि तरुण व सुस्वरूप राजकन्येचा या वृद्ध, अंध व दरिद्री तापसाशीं विवाह झाला. शतपथ-ब्राह्मणांत (४·१·५) थोडी वेगळी व अधिक समंजस हकीगत दिलेली आहे : शर्यातीच्या जमातीचा तळ भार्गवाश्रमानजीक पडला होता; शर्यातीच्या मुलांनीं जराजर्जर च्यवनावर ढेकळांचा वर्षाव केला; अपमानामुळें खवळलेल्या च्यवनानें जमातींत दुही पेरली; पिता पुत्रांशीं लढूं लागला आणि भाऊ भावांशीं; याचें कारण उमजल्यावर शर्याति च्यवनाला शरण गेला आणि ऋषीला आपली कन्या अर्पण करून यानें त्याचें सख्य संपादन केलें. विवाहानंतर सुकन्या वैडूर्य पर्वतावरील भार्गवाश्रमांत राहून पतीची सेवा करूं लागली. ओंकार-मांधात्यानजीकच्या सातपुड्याच्या भागाला वैडूर्य पर्वत असें नांव होतें. यावरून च्यवनाचा महाराष्ट्राशीं असलेला संबंध प्रस्थापित होतो. अश्विनीकुमार हे देवांचे धन्वंतरी; स्वरूपसंपन्न व सदा तरुण. त्यांनीं सुकन्येला तिच्या विवाहप्रतिज्ञांपासून च्युत करण्याचा यत्न केला; पण हिने आपल्या पातिव्रत्याच्या प्रभावानें त्यांना दिपविलें. अश्विनीकुमार प्रसन्न झाले आणि त्यांच्या प्रसादानें च्यवनाला तारुण्य व दृष्टि प्राप्त झाली. च्यवनाला अश्विनांनीं तारुण्य दिलें (ऋ: १·११६·१०), यामुळें वृद्ध व जीर्ण च्यवन असा तरुण पठ्या बनला कीं त्यानें नवयुवतीचा कामज्वर उद्दीपित केला (ऋ: ५·७४·५) आणि याचा मोबदला म्हणून इंद्राचा विरोध न जुमानतां च्यवनानें अश्विनीकुमारांना सोम-

पान (देवी भागवत : स्कंध ७. अध्याय ७) करविलें; म्हणून इंद्रानें त्याशीं युद्ध (पूर्वोक्त; जैमिनीय ब्राह्मण : ४·१·५) केलें. पुढें च्यवनाच्या पुरस्कारामुळें शर्यातीला साम्राज्य प्राप्त झालें.

शुक्र हा दिव्येचा पुत्र. उशनस्, कवि व काव्य आणि शुक्र हे एकच, असें कांहीं आधारांवरून दिसतें. त्यांचे दरम्यान कांहीं पिढ्या गेलेल्या असणेंही संभवनीय आहे. शुक्र हा असुरांचा कुलगुरु व अध्वर्यु. दैत्यांचा राजा बलि हा हिरण्यकशिपूचा पणतू आणि शुक्र हा बलीचा पुरोहित व प्राध्यापक. प्रह्लादाला अर्थ व काम हे पुरुषार्थ यानेंच शिकविले. याचें नीतिशास्त्र विख्यात आहे. भृगुकच्छ येथें बलीनें अखेरचा अश्वमेध आरंभिला. तेव्हा वामनाचें रूप धारण करून विष्णु या यज्ञाला हजर होता. बलीनें या अतिथीची पूजा केली व दान मागण्याबद्दल विनविलें. वामनानें त्रिपादभूमि मागितली. अंतर्ज्ञानानें वामनाचें मूळ व दानाचें भावी स्वरूप ओळखून शुक्राचार्यानें या दानाला विरोध केला. त्याची सूचना अव्हेरून बलि संकल्पाचें उदक सोडूं लागला. अतिथीच्या हातावर दानाचें उदक पडूं नये म्हणून शुक्र सूक्ष्म रूप धारण करून झारीच्या तोंडाशीं जाऊन बसला. बलीनें दर्भानें झारीचें तोंड मोकळें केलें. तेव्हां दर्भाग्रामुळें याचा एक डोळा फुटला, दानाचें उदक सुटलें आणि बळीचें राज्य नष्ट झालें. शुक्राला भृगूपासून संजीवनी विद्या प्राप्त झाली होती. शुक्राचार्यांच्या प्रभावामुळें प्रबळ झालेले असुर देवांना भारी झाले. एकदां देव असुरांवर चालून आले तेव्हां भृगुऋषि आश्रमीं नव्हते आणि शुक्र विद्यासंपादनार्थ तपश्चर्येला गेला होता. यामुळें असुरांचा पराभव होण्याचा समय प्राप्त झाला. तेव्हां शुक्राची माता पुढें झाली. तिच्या सामर्थ्यामुळें देव दग्ध होऊं लागले. यामुळें घाबरलेल्या इंद्राच्या विनंतीवरून विष्णूनें चक्र फेंकून तिचे शिर छेदलें. पुढें भृगूनें संजीवनीचे साह्यानें तिला सजीव केलें आणि स्त्रीहत्येबद्दल विष्णूला शाप दिला. तेव्हां इंद्रानें घाबरून सलोखा साधण्यासाठीं आपली जयंती नांवाची कन्या शुक्राचार्याला दिली. ऊर्जस्वती व जयंती हीं एकाच स्त्रीचीं नांवें आणि देवयानि ही तिची कन्या. पुढें शुक्राचार्य हा दानव वृषपर्व्याचें

पौरोहित्य करूं लागला. ऐल नृप नहुष याचा वृषपर्वा हा प्रतिस्पर्धी. ययाति हा नहुषाचा पुत्र. देवयानीमार्फत कचाला संजीवनी विद्या प्राप्त झाली. यानंतर ययातीशीं देवयानीचा विवाह झाला. या विवाहाची कथा विचारांत घेण्यासारखी आहे. वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा व शुक्राचार्यांची कन्या देवयानि या सख्यांसह वनविहारार्थ गेल्या असतां सरोवरांत जलक्रीडेला उतरल्या. त्या काळांत नग्न स्नानाची प्रथा प्रचलित असल्यामुळें सर्वांनीं कांठावर वस्त्रें सोडून ठेवलीं होतीं. पाण्यांत डुंबून बाहेर आल्यावर त्या आपापलीं वस्त्रें नेसूं लागल्या. शर्मिष्ठा चुकून देवयानीचें वस्त्र ल्याली. यावरून दोघींचें भांडण झालें. शब्दावरून शब्द वाढत गेला. देवयानी म्हणाली, 'माझ्या पित्याच्या बळावर तुम्ही दानव राज्य करतां आणि हें माहीत असून तुला माझा अपमान करण्याचें धारिष्ट कसें झालें?' शर्मिष्ठा म्हणाली, 'मी दात्याची कन्या आणि तूं याचकाची; याचकांना कोठला आला मान व अपमान?' अग्रतेबद्दलच्या दोघींच्याही समजुती आपआपल्या परीनें समर्थनीय होत्या. चिडलेल्या शर्मिष्ठेनें देवयानीच्या हातीं असलेलें आपलें वस्त्र ओढून घेतलें आणि तिला एका कूपांत ढकलून देऊन राजकन्या तातातावानें आपल्या सख्यांसह राजवाड्याकडे निघून गेली. देवयानीच्या मैत्रिणी मदत आणण्यासाठीं आचार्यांच्या आश्रमाकडे गेल्या. तेवढ्यांत मृगयेसाठीं अरण्यांत हिंडत असलेला नहुषपुत्र ययाति या कूपासमीप प्राप्त झाला. त्यानें तिच्या हस्ताचें ग्रहण करून तिला बाहेर काढलें आणि तिचा निरोप घेऊन तो स्वनगरास जाता झाला. तोंच शुक्राचार्य तेथें दाखल झाला. शर्मिष्ठेनें उच्चारलेले तीव्र शब्द पदरचे तिखटमीठ लावून देवयानीनें आपल्या पित्याच्या कानीं घातले आणि यापुढें पित्यानें दानवांचें आचार्यत्व करूं नये असा हट्ट धरला. शुक्रानें आचार्यत्व सोडलें तर अनर्थ होईल हें जाणून वृषपर्वा शरण आला आणि ज्ञातीच्या कल्याणार्थ शर्मिष्ठेनें देवयानीचें दास्य पत्करलें. पुढें क्षत्रिय ययातीशीं देवयानीचा प्रतिलोमविवाह झाला आणि शर्मिष्ठा ही तिची दासी असल्यामुळें तिच्याबरोबर ययातीच्या घरीं गेली व नांदली. या विवाहामुळें भृगूंचा प्रमुख क्षत्रिय कुलांशीं संबंध जडला. तो असा :




ययातीच्या वंशजांचीं नांवें हीं वस्तुतः जमातींचीं नांवें आहेत. त्यांचीं राज्यें गंगायमुना मैदानापासून नर्मदेपर्यंत पसरलेलीं होतीं.

शुक्राला अरजा नांवाची आणखी एक कन्या होती. तिचा गुरुबंधु राजा दंड यानें बलात्कारानें तिचें कौमार्य नष्ट केलें. यामुळें संतप्त झालेल्या भार्गवाच्या शापानें राजा बलकोशादिकांसह नष्ट झाला आणि धुळीच्या वर्षावानें त्याचा देश अरण्यप्राय झाला. दंडकारण्याची ओळख परंपरेनुसार महाराष्ट्राशीं पटविण्यांत येत असल्यामुळें शुक्राचार्यांचा आश्रम या देशांतच, सह्याद्रीच्या टापूंत असला पाहिजे, असें अनुमान करतां येतें. शुक्राचार्यांचा पुत्र त्वष्टृ. हस्तकौशल्यानें जें करावयाचें तें यानें करावें असा याचा अधिकार होता. सुंदोपसुंदवधाकरितां यानें तिलोत्तमा निर्माण केली आणि वृत्रवधाकरितां दधीचि या भार्गव ऋषीच्या अस्थींपासून वज्र तयार केलें. याचा पुत्र विश्वरूप याला इंद्रानें मारलें. विश्वरूप व त्रिशिरस् हे एकच, असें पुराणांत सांगितलेलें आहे. त्रिशिरस् हा एका मुखानें अन्न भक्षण करी, एकानें सोमपान करी व एकानें सुरापान करी! याच्या आचारभ्रष्टतेचें हें प्रतीक असावें. शुक्राचे पुत्र शंड व मर्क हे असुरांचे पुरोहित होते. त्यांना देवांनीं सोमाची लालूच दाखवून फितविलें व अखेरीस फजीत केले. मार्कण्डेयांचा उल्लेख भार्गव (मार्कण्डेय पुराण: ४·२३) असा होत असल्यामुळें ते मर्कांचे वंशज असणें संभवनीय आहे. त्यांचे आश्रम मध्यप्रांतांतील पूर्णेच्या कांठांवर

( महाभारत : ३·८८·४ ) होते. वरत्रिन् याचे पुत्र असुरयाजक होते, म्हणून विरोधी आर्यांनीं त्या सर्वांना ठार केलें.

महाभारताच्या आदिपर्वांत और्व भार्गवाचा वृत्तांत दिलेला आहे. भार्गव हे हैहयांचे उपाध्याय. हैहयांनीं अनेक यज्ञ केले होते आणि भृगूंना पुष्कळ संपत्ति दिली होती. एकदां हैहयांना द्रव्याची टंचाई भासूं लागली, म्हणून त्यांनीं आपल्या उपाध्यायांकडे द्रव्याची मागणी केली. कांहींनीं धास्तीनें राजाला थोडेंबहुत द्रव्य दिलें व कांहीं अकृतज्ञांनीं आपलें द्रव्य जमिनींत पुरून ठेवून आपण निर्धन आहोंत असा बहाणा सुरू केला. राजाज्ञेनें एका भार्गवाचें घर खणून पाहिलें असतां गुप्त निधि सांपडला. यामुळें हैहय चिडले आणि भार्गव ऋषि शरण आले असतांही यांनीं त्यांची कत्तल सुरू केली. राजाच्या चिथावणीनें बेफाम झालेले क्षत्रिय भार्गवांचा समूळ उच्छेद करण्याच्या इराद्यानें त्यांच्या स्त्रियांची कत्तल करूं लागले आणि गर्भिणींच्या गर्भांचाही नाश करूं लागले. म्हणून भार्गवकुलांतील स्त्रिया हिमालयाकडे पळाल्या. यांपैकीं एका स्त्रीनें वंशरक्षण व्हावें म्हणून आपला गर्भ गर्भाशयातून काढून मांडींत लपवून ठेवला. शस्त्रक्रिया करणाऱ्या स्त्रीच्या फितुरीमुळें ही गोष्ट राजाला कळली. हैहयांनीं त्या गर्भिणीला पकडलें व ते गर्भाच्या नाशाला उद्युक्त झाले. तोंच आईची मांडी फोडून गर्भ बाहेर आला; म्हणून त्याला और्व हें नाव देण्यांत आलें. या वेळीं त्याच्या आजूबाजूला असलेले क्षत्रिय दृष्टिहीन झाले. पुढें मोठा झाल्यावर यानें क्षत्रियांच्या संहारार्थ उग्र तप आरंभिलें. यामुळें भयंकर अग्नि उत्पन्न झाला व तो क्षत्रियांना जाळूं लागला. तेव्हां क्षत्रिय त्याच्या पितरांना शरण गेले आणि पितरांच्या समाधानार्थ यानें आपला क्रोधाग्नि समुद्रांत सोडला. याचा जन्म शत्रूकडून पाठलाग होत असतां अज्ञातवासांत झाला, हैहयांच्या संहारार्थ यानें भार्गवांची संघटना केली, यामुळें दचकलेल्या क्षत्रिय पुढाऱ्यांनीं भार्गवकुलांतील वृद्धांशीं समेटाचें बोलणें केलें आणि कुलप्रमुखांच्या समाधानासाठीं यानें आपली सूडाची योजना स्थगित केली, असा या ( महाभारत : आदिपर्व : अध्याय १७८-१८०. ) कथेचा अभिप्रेत अर्थ असला पाहिजे.

और्वानें आपली क्षत्रियसंहाराची योजना स्थगित केली; मात्र यासाठीं सिद्ध केलेलीं शस्त्रास्त्रें त्यानें आपला पुत्र ऋचीक याला दिलीं. हैहयांनीं हैराण केल्यामुळे दाणादाण झालेल्या भार्गवांची मध्यदेशांत संघटना करून हा त्यांचा पुढारी झाला. तीर्थयात्रा करीत असतां यानें विश्वामित्री नदीच्या कांठीं कान्यकुब्जराज गाधि याची कन्या सत्यवती स्नानास आलेली पाहिली. तिच्या रूपाला मोहित होऊन यानें गाधिराजाकडे तिला मागणी घातली. राजाला या मागणीचा अव्हेर करतां येईना; कारण भार्गव आतां संघटित व प्रबळ होत चालले होते; आणि स्वीकारही करवेना; कारण हे भार्गव अद्याप संपन्न व स्थायिक झालेले नव्हते. राजानें एक हजार श्यामकर्ण अश्व शुल्क म्हणून मागितले. पुराणें सांगतात कीं राजाला हा संबंध नको होता, म्हणून त्यानें आपल्या समजुतीप्रमाणें अशक्य कोटींतली अट घातली. अर्थ स्पष्ट आहे. राजाला भार्गवांच्या सामर्थ्याचा अंदाज घ्यावयाचा होता. वरुण हा भार्गवांचा पूर्वज. ऋचीकानें त्याच्याकडे घोडदळाची मागणी केली व वरुणानें ती पुरविली.

अट पुरी झाल्यावर गाधिराजानें सत्यवतीचा ऋचीकाशीं विवाह लावून दिला आणि शुल्क म्हणून मिळालेले एकजात हजार घोडे वरदक्षिणा म्हणून त्याला अर्पण केले. गाधिराजानें नाखुषीनें व नाइलाजानें या विवाहाला मान्यता दिली असें पुराणें सुचवितात. मला वाटतें, या अनुमानांतील अगतिकता उत्तरकालीन असावी. या कथेचा ऐतिहासिक अर्थ स्पष्ट आहे. हैहयांच्या स्वाऱ्यांमुळें कान्यकुब्ज देश उध्वस्त झाला होता. गाधिराजाला या संकटसमयीं स्वसंरक्षणासाठीं समर्थांचें सहकार्य हवें होतें. भार्गव हे हैहयांचे हाडवैरी. आतां ते केवळ तपस्वी व अथर्वाधिकारी, अरण्यवासी व निरुपद्रवी ब्राह्मण राहिले नव्हते. भार्गवांचें नेतृत्व ऋचीकाकडे आलें होतें आणि कुलकार्य तडीला नेण्यासाठीं त्यानें लढाऊ घोडदळ उभारलें होतें. जाधवरावांच्या मुलीचा विवाह त्यांच्या तोलाच्या घराण्याशीं व्हावा म्हणून निजामशहांनीं भोंसल्यांना मनसब दिली, ही घटना आपण मानतों; मग वरुणाच्या प्रसादाची गोष्ट भाकडकथा कां समजावी? एकजात हजार

घोडे काय केवळ अश्वशाळेच्या शोभेसाठीं गाधिराजाला हवे होते ? या विवाहामुळें समसंकटांचा स्नेह झाला, भार्गवांचा आणखी एका क्षत्रिय राजघराण्याशीं नात्याचा संबंध जडला आणि कान्यकुब्जाच्या अधिपतीला एक प्रबळ व चपळ साह्यकर्ता प्राप्त झाला.

ऋचीकानें सत्यवतीसह स्वतंत्र संसार थाटला तेव्हां या जोडप्याला आशीर्वाद देण्यासाठीं आद्य भृगुऋषि त्यांच्या आश्रमांत आला. प्रसन्न होऊन त्यानें सत्यवतीला वर मागण्यास सांगितलें. तिच्या मातेला तोंवर पुत्रप्राप्ति झालेली नव्हती. म्हणून सत्यवतीने स्वतःस व मातेस उत्तम लक्षणयुक्त पुत्र मागितले. भृगूनें विराटपुरुषाभिमंत्रणानें सिद्ध केलेले दोन चरु तिला दिले; ब्राह्मणोत्पत्तीसाठीं तिला व क्षत्रियोत्पत्तीसाठीं तिच्या मातेला. ऋचीक तपश्चर्येला निघाला तेव्हां त्यानेंच हे चरु सत्यवतीला दिले, अशीही कथा आहे. ते चरु पाहतां तिच्या मातेला वाटलें कीं कन्येच्या चरूंत कांहीं विशेष सामर्थ्य असेल, म्हणून तिनें चरूंची अदलाबदल केली. हा प्रकार अतर्ज्ञानामुळें ऋचीकाच्या लक्षांत आला व त्याचे संभवनीय परिणाम त्यानें सत्यवतीला समजावून सांगितले. कांहीं विपरीत प्रकार होऊं नये अशी तिनें प्रार्थना केली, तेव्हां ऋचीकानें अशी मंत्रयोजना केली कीं सत्यवतीला पुत्र ब्राह्मणलक्षणांचाच व्हावा आणि पौत्र मात्र क्षत्रियलक्षणांचा व्हावा. पुढें मातेच्या पोटीं विश्वामित्र जन्मला आणि कन्येच्या पोटीं जमदग्नि.

या चरूंच्या बाबतीत जैन ग्रंथांत एक कथाभेद आढळतो ( आवश्यक चूर्णि : पृ. ५२० ; वसुदेवहिण्डि: पृ. २३५-२४० ), तो येथेंच सांगून टाकतों. या जैन ग्रंथांनीं चरुनिर्मितीचें श्रेय जमदग्नीला दिलेलें आहे. जमदग्नीनें बंभणचरु रेणुकेला दिला आणि खत्तियचरु तिच्या बहिणीला. ही बहीण हस्तिनापुराच्या अनंतवीर्याची राणी होती. ह्या चरूंची अदलाबदल रेणुकेनें केली. यामुळें रेणुकेच्या पोटीं परशुराम आला आणि तिच्या बहिणीच्या पोटीं कार्तवीर्य. रामानें अनन्तवीर्य आणि कार्तवीर्य यांचा वध केला. कार्तवीर्याचा पुत्र सुभूम. हा जैनांचा आठवा चक्रवर्ती. यानें परशुरामाचा वध केला आणि पृथ्वी एकवीस वेळां

निर्ब्राह्मण केली ( हेमचंद्रः त्रिषष्ठिशलाकापुरुषः ६·४ ), तेव्हां त्याची शांति झाली. मध्ययुगीन जैनांची विकृत मनोवृत्ति दर्शविण्यासाठीं आणि विरुद्ध असेल तेंही सांगितल्यावांचून राहूं नये म्हणून ही उघडाउघडी बनावट असलेली कथा येथें उध्दृत केली आहे. असो.

ऋचीकानें अशी योजना केली तरी विश्वामित्र व जमदग्नि यांवर चरूंचा, त्यांच्या अदलाबदलीचा व मंत्रयोजनेचा असर पडलाच. विश्वामित्राचें जन्मनाम विश्वरथ. राजकीय संकटांनीं गांजल्यामुळें त्यानें राज्यत्याग केला व वनवास पत्करला आणि अखेरीस विश्वामित्र या नांवानें तो ब्रह्मर्षिपद पावला; तरीही त्याची उपजत क्षात्रवृत्ति नष्ट झाली नाहीं आणि कन्येच्या पोटीं जमदग्नि निपजला. ऋचीकाच्या योजनेनुसार हा ब्राह्मणलक्षणयुक्त होता, तरीही आयुष्याच्या पूर्वार्धांत त्यानें उग्र वृत्तीबद्दल दुर्लौकिक मिळविला!

जमदग्नी हा ऋग्वेदांतील कांहीं सूक्तांचा कर्ता ( ३·६२·१८; ७·१०१·८; ८·१०१·८; ९·६२·२४ ) असावा असें दिसतें. ऋग्वेदांतील कांहीं ऋचांत जमदग्नीचा उल्लेख आलेला ( १०·१६७·४ ) आहे. अथर्ववेदांत विषनाशक ( २·३२ ) आणि केशवृद्धिकारक वनस्पतीचा संशोधक ( ६·१३७ ) म्हणून जमदग्नीचा उल्लेख आढळतो. त्याचा पिता ऋचीक व पुत्र परशुराम यांचा मात्र वेदवाङ्मयांत उल्लेख आलेला नाहीं. जमदग्नी हा विश्वामित्राचा स्नेही व वसिष्ठाचा शत्रु. यानें तप करून इंद्रापासून कामधेनु मिळविली. इक्ष्वाकुवंशाच्या एका पोटशाखेंतील राजा प्रसेनजित् ऊर्फ रेणु याची कन्या रेणुका ही जमदग्नीची पत्नी. जमदग्नि अत्यंत रागीट होता. यामुळें या व्यक्तिनामाला विशेषणाचें रूप प्राप्त झालेलें आहे. दुर्दैवानें या क्रोधाचा ताप भार्गवांच्या शत्रूंना होण्याऐवजीं याच्या कुटुंबियांनाच भोंवला. हा धनुर्विद्या-प्रवीण होता. एकदां विद्येचे प्रयोग करीत असतां यानें बाण सोडावे व ते रेणुकेनें परत आणावे, असें बराच वेळ चाललें होतें. वेळ उन्हाची असल्यामुळें रेणुका दमली व विश्रांतीसाठीं थोडा वेळ एका वृक्षाच्या छायेंत बसली. यामुळें बाण परत यावयास उशीर लागला. जमदग्नि रागावला. तिनें उशीराचें कारण सांगतांच हा सूर्यावर संतापला व

बाणानें सूर्याला वेधण्यास सिद्ध झाला. बिचारा सूर्य; बाणाच्या धास्तीनें जमदग्नीला शरण आला आणि त्याच्या पोटीं येण्याचें आश्वासन देऊन जिवानिशीं सुटला! सांगण्यांत येतें कीं यामुळेंच परशुरामाच्या अंगीं सूर्याच्या तेजाचा संचार झाला! एकदां रेणुका सरोवरावर स्नानाला व ताजें पाणी आणायला गेली होती. त्याच सरोवरांत चित्ररथ ऊर्फ चित्रांगद गंधर्व आपल्या स्त्रियांसह जलक्रीडा करीत होता. हें दृश्य पाहण्यासाठीं ती थोडा वेळ तेथेंच थबकली. त्यांचें ऐश्वर्य पाहून ती बावरली. तिच्या मनांत अभिलाष उत्पन्न झाला. आपला पति असा सुंदर व संपन्न असता तर आपणही असेच विलास केले असते, अशी कल्पना तिच्या मनांत येऊन गेली. तिला परत येण्याला विलंब लागला. यामुळे धार्मिक विधींसाठीं अवश्य असलेलें ताजें पाणी जमदग्नीला वेळेवर मिळूं शकलें नाहीं. सरोवरावरील प्रकार त्याला अंतर्ज्ञानानें समजला. यामुळें जमदग्नि संतापला; इतका, कीं त्यानें ही व्यभिचारिणी म्हणून आपल्या पुत्रांना तिचा वध करण्याची आज्ञा दिली. या आज्ञेच्या बाबतींत एक कथाभेद आढळतो, तो येथें सांगतों. पुरुषमाणसें नाहींत अशी संधि साधून रेणुकेवर लुब्ध झालेला चित्ररथ गंधर्व जमदग्नीचें रूप धारण करून आश्रमांत आला; त्याची लबाडी रेणुकेला उमजली नाहीं; अतिथिधर्मानुसार तिनें त्याचें स्वागत केलें; तोंच जमदग्नि आश्रमांत दाखल झाला; त्याला पाहतांच गंधर्व पळाला; या प्रकारामुळें त्यानें आपल्या पुत्रांना मातृवधाची आज्ञा दिली. यांपैकीं कोणताही वृत्तांत स्वीकारावा. पित्यानें स्पष्ट आज्ञा दिली तरी मातृहत्या करण्यास पुत्र धजावेनात; तेव्हां या अवज्ञेमुळें आणखी चिडून यानें त्यांचा वध केला. एवढ्यांत परशुराम अरण्यांतून परत आला. जमदग्नीनें त्याला सारा प्रकार समजावून सांगितला आणि मातृवधाची आज्ञा दिली. लगेच त्यानें आपल्या परशूनें मातेचा शिरच्छेद केला. तेव्हां प्रसन्न होऊन यानें त्याला वर मागावयास सांगितलें. माता व भ्राते जिवंत व्हावेत आणि होऊन गेलेल्या घोर प्रसंगाचें त्यांना स्मरण नसावें, तसेंच आतांपासून पित्यानें क्रोधरहित व्हावें, असा वर परशुरामानें मागितला. लगेच तसें झालें. जमदग्नीनें संयमानें स्वतःचा क्रोध

आवरला. पुढें त्याला कधींही क्रोध आला नाहीं. प्रत्यक्ष क्रोधदेवतेनें त्याच्या धर्मश्रद्धेला डिंवचलें तरी; कुलशत्रूंनीं त्याच्या आश्रमांत घुसून अत्याचार केले तरीही !

हैहय वंशांतील राजा कार्तवीर्य अर्जुन हा जमदग्नीचा समकालीन. कृतवीर्याचीं शंभर मुलें च्यवनाच्या शापानें मेलीं; सप्तमीव्रतस्नानामुळें हा एकटा बचावला. गर्गमुनींच्या सांगण्यावरून यानें सह्याद्रीच्या खोऱ्यांत (पद्म: उ० १२६) दत्ताची सेवा केली. यामुळें त्याला सहस्रबाहु प्राप्त झाले. माहिष्मती ऊर्फ भोगवती येथें नागांची राजधानी होती. हैहयांनीं नागांचा पराभव करून येथें कार्तवीर्यास राज्याभिषेक केला. माहिष्मतीचें हल्लींचें नांव ओंकार मांधाता. ही ओळख जवळजवळ सर्वमान्य आहे. माहिष्मती नगरी मुचकुंदानें नर्मदातीरीं, विन्ध्य व ऋक्ष (सातपुडा) पर्वतांच्या दरम्यान, नर्मदेच्या उतारानजीक उभारली, असे स्पष्ट उल्लेख आहेत. माहिष्मतीची ओळख महेश्वराशीं पटविण्याचा प्रयत्न श्री. विष्णुपंत करंदीकरांनीं केलेला आहे. श्री. चापेकर (चित्पावन: पृ. १६) आणि श्री. मुनशी माहिष्मतीची ओळख भडोचशीं पटवितात; कारण, श्री. मुनशी सांगतात, ही नगरी अनूप देशांत होती आणि तिच्या सीमेपर्यंत सागराच्या लाटा येत होत्या असे उल्लेख आधारग्रंथांत आढळतात (The Early Aryans in Gujarata: Munshi, p. 34). परशुरामानें हैहयांची राजधानी उध्वस्त केल्यानंतर आपल्या पूर्वजांच्या गौरवार्थ तेथेंच भृगुकच्छ या नांवानें नवी नगरी स्थापन केली असावी असें त्यांचें अनुमान आहे. कार्तवीर्य अर्जुन हा भारतांतील पहिला सम्राट् व चक्रवर्ती (वायु: ९४·९·२३; हरिवंश ३३. १८५७. १८६५). त्याच्या कारकीर्दीत हैहयांचें साम्राज्य नर्मदेच्या मुखापासून हिमालयाच्या पायथ्यापर्यंत पसरलेलें होतें.

या प्रभुत्वामुळें कार्तवीर्याचा विवेक नष्ट झाला. तो उन्मत्त झाला, देवब्राह्मणांना जुमानीनासा झाला. त्यानें वसिष्ठाश्रम निष्कारण बेचिराख केला. तेव्हां आपव वसिष्ठानें त्याला शाप दिला कीं भार्गवकुलोत्पन्न परशुराम तुझे सहस्र बाहु तोडून तुझा वध करील. म्हणून भार्गवांच्या

सामर्थ्याचा अंदाज घेण्यासाठीं तो जमदग्नीच्या आश्रमीं आला. येथें जमदग्नि व रेणुका यांनीं इंद्रदत्त कामधेनूच्या कृपेनें त्याचें उत्कृष्ट स्वागत केलें. ह्या समृद्धीचें कारण समजल्यावर हा कामधेनु मागूं लागला. ती त्याला देण्याचें जमदग्नीनें साफ नाकारलें. तेव्हां हा जबरदस्तीनें सवत्स कामधेनु घेऊन गेला. पुराणें सांगतात कीं कामधेनूनें स्वसंरक्षणासाठीं यवनसैन्य निर्माण केलें; पण कार्तवीर्यानें त्यांचा पराभव केला, आश्रमाचा विध्वंस केला आणि नंतर धेनुहरण केलें. परदेशी सैन्यांचा दचका पुराणांपासून भारतीयांच्या मनावर बिंबविण्यांत आलेला दिसतो. प्रजेचे धन तें आपलेंच, जोंवर त्यावर आपली नजर नसते तोंवरच तें इतरांचे, अशीच जुलमी राज्यकर्त्यांची भावना असते. धेनुहरणाचे वेळीं परशुराम तपश्चर्येला गेलेला होता. दिव्यास्त्रें संपादन करून तो आश्रमांत परत आला तेव्हां त्याला झाला वृत्तांत समजला. तेव्हा त्यानें कार्तवीर्याचा वध करण्याची प्रतिज्ञा केली. हें समजलें तेव्हां खुद्द जमदग्नीनें त्याला या प्रतिज्ञेपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. हें कर्म ब्राह्मणांना अयोग्य होय असेंही सांगितलें; पण परशुराम ऐकेना. तेव्हां जमदग्नीनें ब्रह्याची व ब्रह्यानें शंकराची संमति घ्यावयास सांगितलें. याप्रमाणें संमति मिळतांच परशुराम नर्मदेच्या तीरावर आला व तेथून दूत पाठवून त्यानें कार्तवीर्यास युद्धाचें आव्हान दिलें.कार्तवीर्याची पत्नी मनोरमा हिला वसिष्ठाच्या शापाची माहिती होती.स्वतः युद्धाला जाऊं नका, सैन्य व सेनापति पाठवा, असें हिनें त्याला जीव तोडून सांगितलें; पण यानें तिचा सल्ला ऐकला नाहीं. अनेक अक्षौहिणींसह आलेल्या कार्तवीर्याशीं परशुरामाचें युद्ध झालें.ब्रह्माण्डपुराणांत या युद्धाचें तपशीलवार वर्णन केलेलें आहे. मत्स्यराज, विदर्भेश्वर, मिथिलेश्वर, निषधाधिपति, मगधाधिपति वगैरे कार्तवीर्याचे सामन्त या युद्धांत ठार झाले. खुद्द कार्तवीर्याशीं परशुरामाचें द्वंद्वयुद्ध झालें. परशुरामानें त्याचे सहस्र बाहु तोडले आणि अखेरीस ठार केलें. द्वंद्वयुद्ध चालू असतां कार्तवीर्याच्या पुत्रांनीं परशुरामावर बाण सोडले; तेव्हां हें धर्मयुद्ध नव्हे हें जाणून परशुराम रथारूढ झाला व सर्वांशीं लढूं लागला. शेवटीं हैहयांचा पराभव झाला.

त्यांचें शंभर अक्षौहिणी सैन्य नष्ट झालें; शूर, शूरसेन, वृष, वृषास्य व जयध्वज हे कार्तवीर्याचे पुत्र जीव बचावून रणांगणावरून पळाले आणि हिमालयाच्या अरण्यांत लपले. युद्धांत विजय संपादन करून आणि कामधेनु घेऊन परशुराम आश्रमांत परत आला. युद्धाचा वृत्तांत त्यानें जमदग्नीला सांगितला.

परशुरामाच्या पूर्वजांनीं हैहयांच्या उच्छेदाच्या प्रतिज्ञा केल्या होत्या; त्यासाठीं सैन्यें जमविलीं होतीं, राजघराण्यांशीं स्नेहसंबंध जोडले होते; पण या प्रतिज्ञा त्यांच्या हातून पूर्ण झाल्या नव्हत्या. कुलशत्रूंचा नाश करून हें कुलकार्य परशुरामानें तडीला लावलें; पण याबद्दल पित्याकडून त्याला काय पारितोषिक मिळालें? जमदग्नीनें त्याचें अभिनन्दन करण्याऐवजीं क्षत्रहत्येच्या दोषाबद्दल वैष्णव-तीर्थांची बारा वर्षें यात्रा व तप करून प्रायश्चित्त घेण्याची पुत्राला आज्ञा केली! कारण, त्यानें सांगितलें, अभिषिक्त राजाच्या हत्येचें पाप ब्रह्महत्येहून अधिक असतें (विष्णुपुराण : ४.११; भागवत पुराण ९.१५-१६). तरी बरें, अक्रोधानें क्रोध जिंकण्याचें थोतांड अद्याप अस्तित्वांत आलेलें नव्हतें! बिचारा, काय करणार? पित्याची आज्ञा प्रमाण मानणें हा परशुरामाचा पण असल्यामुळें तो सह्य पर्वतावरील तीर्थांची यात्रा करून (श्रीपरशुरामविजयकल्पतरु. श्रीशुकाचार्य : अध्याय ८) महेंद्रगिरीवर तप करण्यासाठीं निघून गेला.

परशुराम तपश्चर्येला गेल्यानंतर इकडे भार्गवाश्रमीं हाहाःकार उडाला. त्याच्या वनवासाची कुणकुण लागतांच कार्तवीर्याच्या वधाचा व युद्धांतील पराभवाचा सूड घेण्यासाठीं हैहयांनीं भार्गवाश्रमावर छापा घातला. हा प्रकार कार्तवीर्याच्या वधानंतर बारा वर्षांनीं झाला असेंही सांगण्यांत येतें. ह्या हल्ल्याचें नेतृत्व कार्तवीर्याचे पुत्र व त्यांचे सामन्त यांजकडे होतें. ते आश्रमावर चालून आले तेव्हां जमदग्नि ध्यानस्थ होता. याची तमा न बाळगतां या अधमांनीं बाण सोडून त्याला ठार केलें; नव्हे, त्याचा खून केला. परशुरामानें आव्हानयुद्धांत शस्त्रसज्ज कार्तवीर्याचा वध केला होता. कार्तवीर्य खरा क्षत्रिय होता. त्याचे पुत्र अधम क्षत्रिय होते. त्यांनीं या वृद्ध, तपस्वी, एकाकी, निरपराध, बेसावध ब्राह्मणाचा

हेतुपुरःसर व योजनापूर्वक खूनच केला. त्याच्या बाणांच्या एकवीस जखमा जमदग्नीला झाल्या होत्या. यावरून या आक्रमकांच्या क्लैब्याची कल्पना करता येते. या वेळीं रेणुकेनें त्यांच्याशीं युद्ध केलें व या युद्धांत एकवीस बाण लागून ती जर्जर झाली, असेंही कांहीं कथांत सांगितलेलें आहे. जमदग्नीचें छाटलेलें मुण्डकें बरोबर घेऊन हे वीर माहिष्मतीकडे निघून गेले. ह्या घोर प्रकाराचें वृत्त विद्युद्वेगानें भारतांत पसरलें. ही बातमी समजतांच पापक्षालनाची तपश्चर्या स्थगित करून परशुराम आश्रमाकडे परतला. त्याला पाहतांच रेणुकेनें हंबरडा फोडला आणि पतीच्या कलेवरावरील एकवीस जखमा पुत्राला दाखवून एकवीस वेळां ऊर बडवून घेतला!

पित्याच्या मृत्यूमुळें परशुराम कळवळला. पित्याच्या निर्घृण हत्येमुळें परशुराम खवळला. पित्याच्या कलेवरावरील एकवीस जखमा त्यानें पाहिल्या. मातेनें एकवीस वेळां ऊर बडवून घेतलेला त्यानें पाहिला. मातेचें सांत्वन कसें करावयाचें? विधिलिखिताचा संकेत सांगून? ब्रह्मदेव आयुष्यपट लिहितो ते सामान्य जनांचे. असामान्य पुरुष इतिहास-पटावर आपल्या आयुष्याचा लेख स्वयंप्रेरणेनें लिहितात! परशुरामाची माता क्षत्रियकन्या होती. तिच्या सांत्वनार्थ आणि स्वतःच्या अंतर्यामांत उफाळलेल्या क्रोधाच्या शमनार्थ परशुरामानें प्रतिज्ञा केली कीं 'हैहयांनीं व त्यांच्या सहकारी क्षत्रियाधमांनीं केलेल्या ह्या गुन्ह्याबद्दल शिक्षा म्हणून मी एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करीन!' एकवीस वेळां! कारण जमदग्नीच्या शरीरावर एकवीस जखमा झाल्या होत्या आणि रेणुकेनें एकवीस वेळां ऊर बडवून घेतला होता! रेणुका क्षत्रियकन्या होती. प्रतापी परशुरामाच्या कर्तृत्वावर तिचा विश्वास होता. ही प्रतिज्ञा परशुराम पुरी करीलच अशी तिची खात्री होती. परशुरामाची प्रतिज्ञा तिनें ऐकली आणि देह ठेवला! तिनें देह ठेवला तेव्हां तिचा अंतरात्मा शांत झाला होता. कारण तिनें परशुरामाची प्रतिज्ञा ऐकली होती आणि या प्रतिज्ञेनुसार भविष्यांत जें व्हावयाचें तें जणुं भूतकाळांत होऊन गेलें आहे अशी वर्तमानकाळांत तिची खात्री पटली होती. जमदग्नीच्या हत्येचा सूड घेण्याची तिची इच्छा परशुरामा-

इतकीच तीव्र होती. अधम क्षत्रियांनीं केलेल्या अपराधाचें परिमार्जन त्यांच्या रुधिराच्या मार्जनानेंच होईल अशी तिची अपेक्षा व निष्ठा होती.

कारण रेणुका ही क्षत्रियकन्या, ब्राह्मणपत्नी व वीरमाता असली तरी ती कृत्या होती ! कृत्या म्हणजे नाशासाठीं अगर मंत्रसिद्धीसाठीं बळी देऊन जिला प्रसन्न करून घेतात अशी देवता. कृत्या हें भूमातेचेंच एक रूप आहे. षड्रिपूंच्या आहारीं जाऊन मनुष्यजातीनें केलेल्या पापांच्या भारानें पृथ्वी क्लान्त होते, तेव्हां तिला मानवाच्या रुधिराची तहान लागते. भूदेवी म्हणते, 'मैं भूकी हूं, मैं प्यासी हूं.' मग माणसें युद्धें करतात आणि आपल्या रुधिरानें तिची भूक-तहान शमवितात. तृषार्त कृत्येनें शंकराकडे रुधिर मागितलें आणि 'युगायुगांमध्यें तुला तृप्त करीन' असें शंकरानें आश्वासन दिलें. कृत्येचा आकान्त हा युगस्वामिनीचा आकान्त ! तिला शान्त करण्यासाठीं शंकर ताण्डव करतो आणि रुधिराचें अर्घ्य देतो ! कथाकल्पतरूंत सांगितलें आहे :

> कृते च रेणुका कृत्या, त्रेतायां जानकी सती ।
> द्वापारे द्रौपदी कृत्या, कृत्या म्लेच्छगृहे कलौ ॥

रेणुकेसाठीं ब्राह्मण-क्षत्रिय युद्ध झालें आणि तिच्या तृप्तीसाठीं परशुरामानें कुरुक्षेत्रावरील स्यमंतपंचक नांवाचे डोह क्षत्रियांच्या रुधिरानें भरले. जानकीसाठीं दक्षिणापथांत रामरावण युद्ध झालें. द्रौपदीसाठीं पुन्हां कुरुक्षेत्रावरच कौरवपाण्डव युद्ध झालें.

पित्याचें शरविद्ध प्रेत पाहून आणि मातेचा हृदयस्पर्शी आक्रोश ऐकून परशुराम क्रोधाविष्ट झाला. क्रोध काय, कोणालाही येतो ; कारण तो जीवसृष्टीचा स्वभावधर्मच आहे. क्रोध क्लीबालाही येतो ; मात्र तो केवळ आत्मक्लेशांतच व्यक्त होतो आणि वीराला येतो तो पराक्रमांत प्रकट होतो. क्रोधाच्या धगीची प्रखरता त्याचें आदिकरण आणि तो धारण करणाराच्या मूल व संपादित सामर्थ्यावर अवलंबून असते. पितृवंशाकडून ब्राह्म तेज आणि मातृवंशाकडून क्षात्र तेज परशुरामाच्या अंगीं केंद्रित झालेलें होतें. दीर्घकालीन तपस्या करून त्यानें शंकराची व केशवाची कृपा आणि दिव्य शक्ति व शस्त्रास्त्रें प्राप्त करून घेतलीं होतीं. परशु हें परशुरामाचें विशिष्ट हत्यार. तो त्याला प्रत्यक्ष शिवानें

दिलेला होता. असाधारण कारण व असामान्य कर्तृत्व यामुळेंच त्याचा क्रोधाग्नि भडकला आणि प्रतिज्ञापूर्तीपर्यंत धगधगत राहिला. या ज्वालामुखीच्या उद्रेकामुळें धरणीकंपांत होते तशी मानवसमाजांची उलथापालथ झाली. उद्रेकामुळें पृथ्वीच्या पोटांतील तप्त द्रव्यें उफाळून वर येतात त्याप्रमाणें कांहीं जमातींचें कर्तृत्व दैदीप्यमान् झालें.

रेणुकामाहात्म्यांत सांगितलें आहे कीं कावडीच्या एका पारड्यांत जमदग्नीचें प्रेत व दुसऱ्या पारड्यांत सजीव रेणुका यांना बसवून परशुराम कान्यकुब्जाश्रमांतून निघाला आणि अनेक तीर्थें, क्षेत्रें व अरण्यें ओलांडून सह्याद्रीवरील मल्लकीनामक दत्तक्षेत्रांत आला. क्षणभर विश्रांति घेऊन निघणार, इतक्यांत 'येथेंच अग्निसंस्कार कर' अशी आकाशवाणी झाली. मग दत्तात्रेयाच्या अनुमतीनें रामानें जमदग्नीच्या देहाला अग्निसंस्कार केला आणि या वेळीं रेणुका सती गेली. मल्लकी म्हणजे हैद्राबाद राज्यांतील माहूर क्षेत्र. हें स्थान सातमाळ श्रेणीच्या पश्चिम किनारीवर आहे. तेथें डोंगरावर दत्तात्रेयाचें स्थान आहे आणि रेणुकेचें मंदिर आहे. रेणुकेची मूर्ति नाहीं, फक्त मुखवटा आहे; कारण स्थानिक दंतकथा सांगते कीं येथेंच जमदग्नीचा आश्रम होता आणि परशुरामानें पित्याच्या आज्ञेवरून येथेंच रेणुकेचा वध केला. सतीस्थानाला मातृतीर्थ हें नाव देण्यात आलेलें आहे आणि तेथें प्रत्यक्ष रेणुका वास करीत असते अशी भाविकांची श्रद्धा आहे.

और्ध्वदेहिक संस्कार पूर्ण झाल्यानंतर परशुराम प्रतिज्ञापूर्तीच्या मोहिमेवर निघाला. गणेशपुराणांत सांगितलें आहे कीं मोहिमेवर निघण्यापूर्वी परशुरामानें कृष्णा नदीच्या उत्तरप्रदेशांत वस्ती करून अनुष्ठान केलें; तेथें गजाननानें प्रकट होऊन परशुरामाला परशु दिला व विजयी होशील असा आशीर्वाद दिला. माहिष्मतीनजिक त्यानें अगस्तीचें स्मरण केलें. या पुराणपुरुषानें त्याला आशीर्वाद दिला आणि अश्वांसहित उत्तम रथ व आयुधें दिलीं. रथारूढ होऊन तो हैहयांच्या राजधानीकडे निघाला. रुद्रानें त्याला अमित्रजित् नांवाचा शंख दिला होता. परशुरामानें शंख फुंकून हैहयांना युद्धाचें आव्हान दिलें. कार्तवीर्याचे पाच पुत्र आपल्या सहकारी राजांसह युद्धाला आले. गेल्या खेपेस, परशुरामाचें कार्तवीर्याशीं

द्वंद्वयुद्ध झालें त्या वेळीं, या पुत्रांनीं धर्मयुद्धाचे क्षत्रियांना अनुल्लंघ्य असे नियम बाजूला ठेवून परशुरामावर बाण सोडले होते. या वेळीं यानें त्याना तसा कांहीं प्रकार करण्यास संधीच दिली नाहीं. या युद्धांत कार्तवीर्य-पुत्र सहकाऱ्यांसह ठार झाले; एकटा वीतिहोत्र जीव घेऊन पळाला व ब्राह्मण्य स्वीकारता झाला, म्हणून बचावला. या विजयानंतर परशुरामानें माहिष्मती जाळून टाकली. पहिली फेरी झाल्यावर तो महेंद्रगिरीवर तपश्चर्येला गेला. दहा वर्षें तपश्चर्या आणि नंतर दोन वर्षें क्षत्रियसंहाराची मोहीम अशीं एकवीस तपें लोटलीं. अंग, वंग, कलिंग, विदेह, काश्मीर, दरद, कुन्ती, शिबि, क्षुद्रक, ताम्रलिप्ति, वीतिहोत्र, त्रिगर्त, मार्तिकावर्त, मालव वगैरे देशांचे राजे या संहारांत नष्ट झाले. अशा प्रकारें यानें प्रतिज्ञेप्रमाणें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली. क्षत्रिय संघटित होऊन पुन्हां पुन्हां उठावणी करीत आणि हा त्यांची कत्तल करी. असा प्रकार अनेक वेळां झाल्यानंतर क्षत्रिय डोकें वर करीनासे झाले. त्यांनीं क्षात्रकर्म सोडलें आणि ते अज्ञातवासांत काळ कंठूं लागले. अखेरच्या फेरींत कैद केलेले अनेक राजे बरोबर घेऊन परशुराम कुरुक्षेत्रावर आला आणि तेथें त्यानें पांच डोह खणून ते त्यांच्या रक्तानें भरले. यावरून दिसतें कीं परशुरामानें अखेरचें युद्ध कुरुक्षेत्रावर केलें. समंतपंचकाचा वृत्तांत महाभारताच्या अरण्य-पर्वांत दिलेला आहे; शांतिपर्वांत मात्र हा भाग गाळलेला आहे. (अ. ४९). नंतर त्याचा पितामह ऋचीक यानें त्याला दर्शन दिलें आणि क्षत्रियसंहारापासुन परावृत्त व्हावयास सांगितलें. तेव्हां आपली प्रतिज्ञा पुरी झाली असें गृहीत धरून त्यानें शस्त्र खालीं ठेवलें. मात्र शस्त्र ठेवतांना त्यानें घोषणा केली कीं 'ब्रह्मविद् ब्राह्मणांना आपत्काल प्राप्त झाला व त्यांवर अत्याचार होऊं लागला तर मी पुन्हां शस्त्र धारण करीन!' यानंतर त्यानें त्या डोहांत स्नान केलें.

आणि त्याच रुधिराच्या अर्घ्यांनीं त्यानें आपल्या पितरांचें तर्पण केलें. या तर्पणाचे वेळीं क्षत्रियहत्या आपणांस पसंत नसल्याचें पितरांनीं त्याला सांगितलें आणि पापमुक्त होण्यासाठीं प्रायश्चित्त करण्याचा सल्ला दिला! पितरांची आज्ञा स्वीकारून यानें क्षेत्रांचीं दर्शनें घेत व तीर्थांवर

स्नानें करीत तीनदां पृथ्वीप्रदक्षिणा केली आणि नंतर अश्वमेध यज्ञ केला. परशुरामानें समुद्रवलयांकित पृथ्वी हस्तगत केलेली असल्यामुळें त्याला यज्ञाधिकार प्राप्त झालेला होता. क्षत्रियसंहाराच्या पापांतून मुक्त होण्यासाठींही त्याला यज्ञ करणें भाग होतें. श्री. चापेकर सांगतात ( चित्पावन : पृ. १६ ) ' क्षत्रियांचा उच्छेद केल्यानंतर भार्गवी साम्राज्य हिंदुस्थानच्या बऱ्याच मोठ्या भागांत कित्येक वर्षें चाललें.' परशुरामानें किंवा भार्गवांनीं राज्य केल्याचा उल्लेख आधारग्रंथांत मात्र आढळत नाहीं. या यज्ञासाठीं उभारलेली वेदी सुवर्णाची होती. ती दहा वांव लांब व नऊ वांव उंच होती. या यज्ञांत काश्यप हा अध्वर्यु, गौतम हा उद्गातृ, विश्वामित्र हा होतृ व मार्कण्डेय हा ब्रह्म असे कर्माधिकारी होते. यज्ञानंतर दान देण्याच्या प्रसंगीं त्यानें स्वतःच्या तपश्चर्येसाठीं महेंद्रपर्वत राखून ठेवला, जिंकलेल्या समुद्रवलयांकित पृथ्वीचें उदक कश्यपाच्या हातावर सोडलें आणि सुवर्णपुष्प म्हणून सुवर्णाची वेदीही त्याला देऊन टाकली. परशुराम हा खरा ब्राह्मण होता. राजांचा पराभव करून त्यानें राज्यें जिंकलीं होतीं; पण त्याला राज्य करावयाची हांव नव्हती; म्हणून त्यानें वेदीसह पृथ्वी कश्यपाला दान दिली. कश्यप हाही तसाच निर्लोभ व निर्भीड ब्राह्मण होता. तो त्या काळचा सर्वश्रेष्ठ मुनि होता. मुंजीच्या वेळीं त्यानेच परशुरामाला ब्राह्मणदीक्षा दिली होती. कश्यपानें सुवर्णवेदीचीं खांडें केलीं आणि यज्ञार्थ जमलेल्या ऋत्विजांना तीं वांटून टाकलीं. कश्यपाला तरी राज्य कोठें हवें होतें ? परशुरामानें क्षत्रिय कुलें नष्ट केलेलीं असल्यामुळें केवळ धर्मानुरोधानें समाजाचें धारण होईना; म्हणून राज्यें चालविण्यासाठीं कश्यप क्षत्रियांचा शोध करूं लागला. कांहीं क्षत्रियकुलांचे अज्ञातवासांत असलेले अवशेष त्याला जागोजाग आढळले; पण परशुरामाच्या धास्तीनें ते प्रकट होईनात. तेव्हां कश्यपानें परशुरामाला बजावलें कीं ' यज्ञांत दान मिळाल्यामुळें पृथ्वी माझी झालेली आहे, सबब याउपर तुला येथें वावरण्याचाही अधिकार नाहीं.' " याचा सरळ अर्थ असा दिसतो कीं क्षत्रिय संहाराची कल्पना अतःपर समाजाला बिलकुल मान्य राहिली नव्हती आणि म्हणूनच ती घेऊन उठलेल्या माणसाला या भूमींत स्थान उरलें

नव्हतें" (श्री. माटे : परशुराम : पृ. ५७). कश्यपाची आज्ञा प्रमाण मानून परशुराम महेंद्र पर्वतावर रहावयास गेला. नंतर कश्यपानें जागोजाग क्षत्रिय-कुलांची स्थापना केली, त्यांचीं राज्यें त्यांना देऊन टाकलीं आणि विस्कळित झालेली समाजाची घडी पुन्हां बसविली. म्हणूनच श्री. माटे सांगतात ( उपरोक्त : पृ. १२९ ) ज्या अब्राह्मण जातींना किंवा कुलांना आपलें गोत्र माहीत नसते त्या जाती व कुलें काश्यपगोत्राचा स्वीकार करतात.

रामावतारीं अयोध्येस जाऊन परशुरामानें रामचंद्राची भेट घेतली आणि त्याचे क्षत्रियत्व मान्य केलें. परशुरामाच्या प्रचण्ड धनुष्यावरून बाण सोडून बाल रामाने त्याचें तेज हरण केलें, अशीही कथा आहे. महाभारतांतील महान् योद्धे भीष्म, द्रोण आणि कर्ण यांना परशुरामानेंच धनुर्विद्या शिक-विली. द्रोणाला तर यानें आपलीं सर्व दिव्य अस्त्रें दिलीं. आपण ब्राह्मण आहोंत असा बहाणा करून कर्णानें विद्या प्राप्त करून घेतलेली असल्या-मुळें ऐन वेळीं तुला विद्येचा विसर पडेल असा यानें त्याला शाप दिला व तो खरा झाला. पुढें अंबेच्या प्रकरणांत यानें टाकलेला शब्द भीष्मानें मानला नाहीं म्हणून या दोघांचें युद्ध झालें. त्यांत याला भीष्माचा पाडाव करतां आला नाहीं. अखेरीस देवांनीं व परशुरामाच्या पूर्वजांनीं मध्यस्थी करून हें युद्ध थांबविलें. कौरव-पाण्डव युद्ध टळावें म्हणून यानें शिष्टाई केली; पण याचा सल्ला दुर्योधनानें जुमानला नाहीं. एकूण अश्वमेधानंतर जेव्हां जेव्हां परशुरामाचा क्षत्रियांशीं संबंध आला तेव्हां तेव्हां याचा पाणउताराच झाला. या कथा कालविपर्यासाच्या दोषानें लिप्त आहेत. कारण उघड आहे; त्याचें तेज नष्ट झालें होतें, त्याचें अवतारकृत्य समाप्त झालें होतें; आणि व्यावहारिक कारण हें कीं इतिहासपुराणांवरून क्षत्रियांनीं हात फिरविला तेव्हां ब्राह्मणांचें उट्टें काढण्यासाठीं या गोष्टी मूळ ग्रंथांत घुसडून दिल्या.

महेंद्र पर्वतावर रहात असतांना परशुरामानें समुद्र हटवून परशुरामक्षेत्र निर्माण केलें. वैतरणेपासून कन्याकुमारीपर्यंतच्या प्रदेशाला मध्ययुगीन ग्रंथांत परशुरामक्षेत्र ही संज्ञा दिलेली आढळते; तर कोठें ती शूर्पारका-भोंवतालच्या आणि कोठें चिपळूणभोंवतालच्या भागाला अनुलक्षून

वापरलेली दिसते. परशुरामानें त्र्यंबकेश्वरापासून कन्याकुमारीपर्यंतचा प्रदेश निर्माण केला असें सह्याद्रिखण्डांत सांगितलेलें आहे. कांहीं आधारग्रंथ सांगतात कीं आपल्याला नवें निवासक्षेत्र मिळावें म्हणून परशुरामानें सागराला मागें हटण्याची विनंति केली व ती मान्य करून सागरानें शूर्पारकाचा प्रदेश मोकळा करून दिला. कोणी सांगतात कीं परशुरामाची विनंति सागरानें अमान्य केली तेव्हां हा खवळला आणि यानें बाण सोडून समुद्र मागें हटविला व चारशें योजनें लांबीचा शूर्पारक प्रदेश निर्माण केला. परशुरामानें वज्रेश्वरीनजीक महायज्ञ केला अशी आख्यायिका असून त्याची साक्ष म्हणून येथें यज्ञरक्षेचे डोंगर दाखविण्यांत येतात. जवळच्याच एका स्थानाला परशुरामाची वेदी अशी संज्ञा आहे. वज्रेश्वरीनजीक उन्हाळीं आहेत. ज्वालामुखींच्या उद्रेकांमुळें झालेल्या भौगोलिक क्रान्तीला तीं साक्ष आहेत. गोकर्ण-महाबळेश्वराचें मंदिर समुद्रांत बुडूं लागलें तेव्हां परशुरामानें चिपळूण-नजीकच्या महेंद्र पर्वतावरून सागरावर परशु फेंकून त्याचें आक्रमण थांबविलें आणि मंदिर व नगर वांचविलें अशी कथा ब्रह्माण्डपुराणांत आहे. संगमेश्वर येथील एका मंदिराचें कर्तृत्व खुद्द परशुरामाला देण्यांत येतें. परशुरामानें अगस्त्यमलै नजीकच्या महेंद्रपर्वतावरून परशु भिरकावला, तो कन्याकुमारीनजीक समुद्रांत पडला आणि यामुळें केरल प्रांत निर्माण झाला अशी कथा केरलमाहात्म्यांत सांगितलेली आहे.

सह्याद्रीच्या कुशीवरला प्रदेश परशुरामानें निर्माण केला, इतकेंच नव्हे, त्यानें हा प्रदेश वसाहतीला योग्य केला आणि ठिकठिकाणांहून ब्राह्मण-क्षत्रियांचीं कुळें आणून यानें त्यांची या भागांत स्थापना केली. केरलमाहात्म्यांत सांगितलें आहे कीं यानें कृष्णा, गोदावरी व नर्मदा या नद्यांच्या खोऱ्यांतील आठ गोत्रें धारण करणारे ब्राह्मण आणले आणि त्यांची केरलांत स्थापना केली. केरलोत्पत्तिनामक मल्याळी पुराणांत सांगितलें आहे कीं हे ब्राह्मण त्यानें कुरुक्षेत्रामधील समंत-पंचकावरून आणले. याचप्रमाणें त्यानें अठरा क्षत्रिय सोमवंशी सामन्त कुळें आणलीं आणि हा प्रदेश त्यांना वाटून दिला. शेती मेहनतीनें करण्याकडे लोकांनीं प्रवृत्त व्हावें म्हणून त्यानें सुवर्णाचे छोटे टंक

पाडवले आणि ते केरलच्या शेतजमिनींत जागोजाग विखरून टाकले. तेथील शेतांतून सूक्ष्म सुवर्णमुद्रा अद्याप सांपडतात आणि आपली समृद्धि ही परशुरामाचीच कृपा असें तेथील रहिवासी अजूनही मानतात. यज्ञकर्में करावयास ब्राह्मण मिळेनात म्हणून परशुरामानें कूर्ग प्रांतांतील कोळयांना ब्राह्मण्य दिलें अशी हकीगत ' परशुराम-सृष्टि-कथे ' या पुराणांत दिलेली आहे. चित्पावनांना दिला तसाच शाप यांनाही मिळालेला आहे. कावेरी पुराणांत सांगितलें आहे कीं परशुरामानें या कोळयांना त्यांच्या जाळ्यांचीं जानवीं करून दिलीं. परशुरामानें जाळीं तोडलीं, म्हणजे त्यांचा मच्छीमारीचा धंदा बंद केला ; आणि त्यांना जानवीं दिलीं, म्हणजे समाजांत सर्वोच्च स्थान प्राप्त करून दिलें. परशुरामक्षेत्रांत त्याला कांहीं यज्ञ करावयाचे होते. यासाठीं आजूबाजूला गौड-ब्राह्मण मिळेनात. म्हणून त्यानें त्रिहोत्रपुराहून दहा गोत्रें धारण करणारीं सारस्वत-ब्राह्मणांचीं सहासष्ट कुळें आणलीं आणि त्यांना शहाण्णव गावांचे अधिकार देऊन त्यांची गोमंतकांत स्थापना केली. केरल, तुळु व हविग या प्रदेशांतील ब्राह्मणही परशुरामानेंच उत्तर हिंदुस्थानांतून आणले व बसविले अशी कथा ( History of Kerala : K. P. Padmanabha Menon : Chap. I ) आहे. भार्गवकुलांत दधीच नांवाचा ऋषि होऊन गेला. त्याला सरस्वतीपासून सारस्वत नांवाचा पुत्र झाला होता. त्याचा ह्या जमातीशीं संबंध असणें संभवनीय आहे ; कारण आद्य ऋषीच्या नांवावरून जमातीला अभिधान किंवा कुलाला गोत्र प्राप्त झाल्याचीं अनेक उदाहरणें आहेत.

सह्याद्रीखण्डांत चित्पावन ब्राह्मणोत्पत्तीचा इतिहास दिलेला आहे. त्यांबद्दल अनेक दंतकथा प्रचलित आहेत. त्यांचा मथितार्थ असा : परशुरामाला कांहीं यज्ञ करावयाचे होते. यासाठीं त्यानें देशावरील ब्राह्मणांना आमंत्रण केलें. ब्राह्मणांनीं कोंकणांत येण्याचें नाकारलें. अश्वमेधानतर परशुराम निर्धन झाला असावा, म्हणून कीं काय कोण जाणे ! आपल्या आमंत्रणाच्या अनादरामुळें परशुराम त्रस्त झाला आणि धर्मकृत्यांसाठीं नवे ब्राह्मण निर्माण करण्याचा त्यानें निश्चय केला. एके दिवशीं परशुराम समुद्रालगतच्या वाळवंटावरून हिंडत असतां

किनाऱ्याला लागलेलें एक फुटकें जहाज त्याला दिसलें. त्यानें जवळ जाऊन पाहिलें, तेव्हां समुद्रांतून वाहून आलेलीं चौदा प्रेतें आसपास पडलेलीं त्याला दिसलीं. हीं प्रेतें त्यानें जिवंत केलीं आणि त्यांना ब्राह्मण्य दिलें. हींच चित्पावनांचीं चवदा गोत्रें. या कथेंत ह्या जमातीचें परदेशांतून समुद्रमार्गें आगमन सूचित आहे. दुसरी कथा आहे ; तींत अशी सूचना नाहीं ; ती अशी : एके दिवशीं सकाळीं परशुराम समुद्रकिनाऱ्यावरून जात असतां त्याला वाळवंटावर कांहीं माणसें दिसलीं. जवळ जाऊन त्यानें विचारलें, ' तुम्ही कोण, कोठून आलां ? ' त्यांनीं सांगितलें, ' आम्ही कोळी. सिंधुतीरचे राहणारे. ' मग परशुरामानें त्यांना ब्राह्मण्य दिलें. हा विधि चितास्थानीं झाला, म्हणून या ब्राह्मणांना चित्पावन हें नांव मिळालें. पुढे हे ब्राह्मण त्याचीं धर्मकृत्यें, यज्ञकर्में करूं लागले. यामुळें प्रसन्न होऊन परशुरामानें महेंद्रगिरीनजीकची भूमि त्यांना दान दिली आणि तो गोकर्णाकडे तपश्चर्येला गेला. जाण्यापूर्वी त्यानें या नवब्राह्मणांना विशिष्ट नीतीचा उपदेश केला आणि सांगितलें कीं ' तुमच्यावर कधीं काळीं संकट आलें तर माझें स्मरण करा, म्हणजे मी स्वतः येऊन त्याचें निवारण करीन. ' या ब्राह्मणांनीं महेंद्रपर्वतावर परशुरामाचें मंदिर उभारलें आणि ते तेथील मूर्तीचें पूजन करूं लागले. वर्षांमागून वर्षें गेलीं. या ब्राह्मणांच्या वंशांची वृद्धि झाली. समृद्धीमुळें ते फुशारून गेले. हळूहळू ते आपसांत परशुरामाची कुचेष्टा करूं लागले. त्यानें दिलेलें आश्वासन हें थोतांड आहे असें मानूं लागले. अखेरीस त्यांनीं परशुरामाचें आश्वासन पारखून पहावयाचें ठरविलें. वस्तुतः त्यांच्यावर कोणतेंही संकट आलेलें नव्हतें ; तरी ते महेंद्र पर्वतावरील परशुराममंदिरांत जमले आणि आक्रोश करूं लागले. या वेळीं परशुराम समाधिस्थ होता. एकाएकीं त्याची समाधि उतरली. याचें कारण लक्षांत आल्यावर क्षणार्धांत परशुराम येथें प्रकट झाला आणि त्यांना आक्रांताचें कारण विचारूं लागला. तेव्हां मात्र यांची गाळण उडाली. खरें बोलण्यावांचून गत्यंतरच उरलें नव्हतें. आपण केवळ मौज म्हणून आश्वासनाची पारख पाहिली असें त्यांनीं कबूल केलें. परशुराम क्रोधाविष्ट झाला. त्यानें चित्पावनांना शाप दिला कीं ' तुमच्या

सुखासाठीं मीं निर्माण केलेली ही समृद्ध भूमि यापुढें नापीक होईल आणि पोटापुरतें अन्न निर्माण करण्यासाठीं ती तुम्हांला सालोसाल भाजावी लागेल; तुम्हांला मीं जीवन दिलें आणि ब्राह्मण्य दिलें, याची कृतज्ञता तुम्हीं बाळगली नाहीं, म्हणून यापुढें तुमचा स्वभाव कुत्सित व निंदक, भांडखोर व संशयी होईल!'

परशुरामानें बाण मारून अगर परशु फेंकून समुद्र हटविला आणि किनाऱ्यालगतची भूमि प्रत्यक्षपणें निर्माण केली ही घटना तंतोतंत खरी आहे असा आग्रह धरणे अशक्य आहे. या घटनेंत एक भौगोलिक सत्य सामावलेलें आहे एवढें मात्र खरें. एका काळीं आफ्रिका खण्ड हिंदुस्थानशीं जुळलेलें होतें. भूकंपामुळें दरम्यानचा प्रदेश बुडाला आणि हिंदी महासागराच्या लाटा सह्याद्रीवर धडाडूं लागल्या. यानंतर पृथ्वीचा पापुद्रा जरा कलला आणि अपरान्ताचा प्रदेश समुद्रांतून पृष्ठभागावर आला. सप्तकोंकण ही दक्षिणापथाला सागराची देणगी आहे हें अगदीं खरें आहे. भूगर्भशास्त्रज्ञांनीं अलीकडे प्रस्थापित केलेला हा सिद्धांत परशुरामकथेंत प्रतीक रूपांत मांडलेला आहे. प्राचीनांनीं हें अनुमान निरीक्षण व तर्क या शक्तींच्या साह्यानें केलेलें आहे हें उघड आहे. या भूमींत आढळणाऱ्या शंख-शिंपल्यांवरून ती समुद्रांतून वर आलेली आहे असें प्रत्ययास आलें, नंतर स्थानिक दंतकथा निर्माण झाल्या आणि पुढें परशुरामकथेंत त्यांचें एकीकरण झालें. कोंकण किनाऱ्यावरील समुद्र शेतजमीनींसाठीं व वसाहतींसाठीं प्रत्यक्षपणें हटविण्याच्या योजनांशीं परशुरामाचा संबंध असला पाहिजे, एवढें मात्र निर्विवाद. समकालीन समाजाच्या मानानें ज्यांचे अंगीं विशेष कर्तृत्व असतें त्यांचे अंगीं देवाचा अंश आहे असें मानण्यांत येतें. पाश्चात्यांच्या प्राचीन इतिहासांतही अशीं उदाहरणें आढळतात. कोंकणांत शिलोत्री व आगरी लोकांनीं तुटपुंज्या साधनांचे साह्यानें अनेक ठिकाणीं समुद्र हटविलेला आहे आणि शेतजमीन अक्षरशः निर्माण केलेली आहे. अशा काहीं प्रचण्ड योजनांशीं परशुरामाचा संबंध असावा आणि म्हणूनच समुद्र हटविण्याचें आणि क्षेत्रनिर्मितीचें श्रेय त्याला देण्यांत आलेलें असावें.

कोंकणची भूमि मुळांत सकस होती आणि परशुरामाच्या शापामुळें ती वरकस झाली, असेंही परशुरामकथा सुचविते. या कथेच्या या भागांतही एक भौगोलिक सत्य सामावलेलें आहे (The Parasurama Myth : डॉ. इरावती कर्वे : Journal of the University of Bombay : Vol. I, Part 1 : p. 118–9). शूर्पारकाचा व अष्टागराचा प्रदेश सुपीक आहे; दक्षिण कोंकणांतली जमीन मात्र खडकाळ, निकस व नापीक आहे. राब भाजल्याशिवाय तींत हलकीं पिकेंही पैदा होत नाहींत. पृथ्वीच्या पाठीवर इतकी दरिद्री जमीन इतरत्र क्वचितच आढळेल! पण हा भाग पूर्वी उत्तर कोंकणासारखा सुपीक होता आणि पुढें तो नापीक झाला असा निष्कर्ष काढावयास मुळींच जागा नाहीं. जंगलें तुटल्यामुळें पाऊस कमी झाला असेल, राजकीय अंदाधुंदीमुळें जमिनी ओसाड पडल्या असतील आणि दुर्लक्षामुळें त्यांवरील मळई वाहून गेली असेल. अशा कारणांमुळें जमिनीचा कस कितीसा धुपून जाणार? याचा उलगडा होत नाहीं, म्हणून परशुरामाच्या शापाची कथा निर्माण करण्यांत आली; आणि चित्पावन हे सर्वांत अल्पसंख्य व याच दुर्दैवी प्रदेशाचे रहिवासी असल्यामुळे या दोषांचें खापर त्यांच्या माथ्यावर फोडण्यांत आलें. अशा या खडबडीत प्रदेशाचे रहिवासी होण्याचें दुर्भाग्य नशिबीं असल्यामुळेंच चित्पावनांचा स्वभाव परशुरामाच्या शापांत सांगितलेला आहे तसा बनलेला आहे; किंवा तो तसा आहे असें इतरांना भासत असावें.

## परशुराम-अवतार-रहस्य :

पौराणिक कथांचे सामान्यतः तीन भाग होतात: सत्यकथा, सत्यांशकथा आणि काल्पनिक कथा. सर्वस्वीं काल्पनिक अशा कथा समकालीनांच्या मनोरंजनासाठीं, विडंबनासाठीं किंवा महत्त्ववर्धनासाठीं रचण्यांत येतात; किंवा सत्याचा प्रतीकरूपानें आविष्कार करण्यासाठीं. पौराणिक कथांतील सत्यांशाभोंवतीं स्थानिक व काल्पनिक दंतकथांचीं आवरणें, हेतुपुरःसर अगर अहेतुकपणें सारखीं चढविण्यांत येत असतात.

परशुरामकथेंत सत्याचा अंश कितीसा आहे हें निश्चित करण्यासाठीं केवळ आधारग्रंथांच्या अंतर्गत पुराव्यावरच अवलंबून राहिलें पाहिजे. परशुरामाचीं मुख्य कृत्यें तीन : उन्मत्त क्षत्रियांचा संहार हें त्याचें अवतार-कृत्य; अपरान्ताची निर्मिति आणि तेथें निर्वासितांच्या वसाहती, हीं त्याचीं कार्यें निवृत्तीनंतरचीं आहेत.

परशुरामानें क्षत्रियांचा संहार केला, या घटनेबद्दल सर्व आधार-ग्रंथांची एकवाक्यता आहे. आपल्या इतिहासपुराणांवरून अनेकांचे हात वेगवेगळ्या कालखण्डांत फिरलेले आहेत, ब्राह्मणांचे आणि क्षत्रियांचेही. यामुळें एकाच ग्रंथाच्या वेगवेगळ्या संस्करणांतही भिन्नता दिसते. परशुरामकथेच्या गाभ्याच्या बाबतींत मात्र मूलभूत मतभेद आढळत नाहींत. यावरून ही कथा ब्राह्मणांनीं ब्राह्मणांसाठीं किंवा केवळ आपल्या वर्गाचें माहात्म्य वाढविण्यासाठीं निर्माण केली, असा आक्षेप घेतां येत नाहीं. अर्थात् ह्या घटनेची सत्यता इतिहास-पुराण-संस्करणकालीं सर्वमान्य झालेली होती असें अनुमान काढावयास प्रत्यवाय नाहीं.

परशुराम हा ब्राह्मण आणि त्यानें क्षत्रियसंहार केला, ही घटना ब्राह्मण प्रौढीनें सांगतात, हें मध्ययुगीन जैनांना डांचलें; हें आधुनिक ब्राह्मणेतरांना डांचतें. परशुरामानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली, तरी क्षत्रिय नष्ट झाले नाहींत, हें सत्य आहे; ब्राह्मणप्रेरित पुराणेंही तें नाकबूल करीत नाहींत, मात्र क्षत्रियांच्या वंशांचें रक्षण व पुनर्निर्माण केल्याचें श्रेय ब्राह्मण ऋषि घेतात, एवढेंच. पहा : हैहयकुलांतील कांहीं क्षत्रिय बायकांत दडून जगले; पौरवकुलांतील ऋक्षवान् अस्वलांनीं वांचविला, शिबिकुलांतील गोपतीचें गाईंनीं संरक्षण केलें आणि बृहद्रथाचें वानरांनीं; पराशरानें सौदास कल्माषपादाचा पुत्र सर्वकर्मा याचें रक्षण केलें आणि गौतमांनीं दधिवाहनपौत्र अंगाचें; सूर्यवंशांतील अश्मक व मूलक यांना वसिष्ठांनीं वाढविलें. येणेंप्रमाणें क्षत्रिय तर नष्ट झाले नाहींत, मग परशुरामाची प्रतिज्ञापूर्ति ही वायफळ गप्प आहे कीं काय? तसें असेल तर परशुरामकथा निरर्थक किंवा अनर्थकारक मानावी लागेल.

तसें नाहीं. हल्लीं जो उठतो तो स्वतःला ब्राह्मण किंवा क्षत्रिय म्हणवितो. पूर्वीं अशी परिस्थिति नव्हती. या संज्ञांच्या योजनेवर राजकीय

व सांस्कृतिक शासनसंस्थांचें नियंत्रण होतें. वेदपठण करतो तो किंवा त्याच्या वंशांत जन्माला येतो तो ब्राह्मण व शस्त्रधारण करतो किंवा त्याच्या कुलांत जन्माला येतो तो क्षत्रिय, असें आज आपण मानतों. प्राचीन काळींही हाच अर्थ रूढ होता असें मानणें ही चूक आहे. याबाबत एकच प्रमाण देतों. श्री. रिचर्ड फिक् हे प्राच्यविद्या-पण्डित (Die Sociale Gliederung im Nordostlichen Indian zu Buddhas Zeit : मराठी भाषांतर : बुद्धकालीन समाजरचना : लेखक श्री. नारायण गोविंद कालेलकर : पृ. ५९) सांगतात : " पाली-वाङ्मयांतील खत्तिय हें पद संस्कृतांतील क्षत्रिय या शब्दाशीं समानार्थक असून धर्मशास्त्रांत योग्यतेनें ब्राह्मणांनंतरची जी ' लढणारी जात ' ती या पदानें व्यक्त होते, असा आपला समज आहे...वीर-काव्यांतून जो पुरावा उपलब्ध होतो त्याच्या आधारानें क्षत्रिय या पदाचा अर्थ शोधण्याचा आपण प्रयत्न केला, तर योध्दृवर्गाला क्षत्रिय हें विशेषण पूर्णत्वानें लागू पडत नसून फक्त राजा, त्याचे सरदार, मांडलिकवर्ग आणि सेनेंतील वरिष्ठ प्रकारचे अधिकारी यांचाच समावेश क्षत्रिय या पदांत करतां येतो असें आपणांस दिसून येईल... खत्तिय या पाली धर्मग्रंथांतील पदानें व्यक्त केलेली कल्पना याहून संकुचित आहे. ती राजन्य या वैदिक पदाशीं समानार्थक असून ज्याच्या नेतृत्वाखालीं आर्यांनीं गंगानदीच्या प्रदेशांतील आपलीं निवासस्थानें काबीज केलीं अशा सर्व वीर पुरुषांचा तींत समावेश होतो. " क्षत्रिय ही संज्ञा परशुरामकथेंत याच अर्थानें योजण्यांत आलेली असली पाहिजे. शिवाय परशुरामानें क्षत्रियांचा संहार केला तो फक्त अधम क्षत्रियांचा (रेणुकामाहात्म्य : अ. ४०·२७; रामायण : बालकाण्ड, अ. ७ ; अयोध्याकाण्ड, अ. ५ ; युद्धकाण्ड, अ. १०) आणि तोही केवळ उत्तर हिंदुस्थानांतच, हेंही विचारांत घेतलें पाहिजे. परशुरामाच्या काळांत नर्मदेच्या दक्षिणेस क्षत्रिय राज्यसंस्था अस्तित्वांतच नव्हती. हीं लक्षणें लक्षांत घेतलीं असतां परशुरामानें केलेला क्षत्रियसंहार केवळ काल्पनिक अगर सकृद्दर्शनीं वाटतो तेवढा अमानुष किंवा अतिमानुष नव्हता अशी खात्री होते. इतिहासपुराणाच्या संकलन-

काळीं क्षत्रिय हेच राज्यकर्ते होते आणि ब्राह्मण हे त्यांचे पुरोहित, आश्रित होते. पुराणपुरुषांच्या अतिरंजित कर्तृत्वाच्या आधारानें राज्यकर्त्यांवर आपल्या वर्गाचें महत्त्व ठसविण्याचा प्रयत्न संकलनकार ब्राह्मणांनीं केलेला असणें असंभवनीय नाहीं. परशुरामकथेंतही निःसंशय अतिशयोक्ति आहे; जी आहे ती आवर्तनांच्या व संहारितांच्या संख्येंत; कथेचा मूळ गाभा मात्र सत्य आहे.

परशुरामकथेंतील क्षत्रियसंहाराची व्याप्ति याहूनही अधिक मर्यादित होती असें समकालीन इतिहासाच्या अवलोकनावरून दिसून येणार आहे; कारण एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करणें हा मुळांतच वदतोव्याघात आहे. शिवाय क्षत्रियसंहाराचें कार्य त्यानें एकट्यानें केलें असें सांगण्यात येतें ( महाभारत : द्रोणपर्व : अ० ७० ), तेंही संभवनीय नाहीं. यासाठीं त्यानें कांहीं राज्यकर्त्यांचें व जमातींचें साहाय्य घेतलें असलेंच पाहिजे. हे परशुरामाचे सहकारी राज्यकर्ते कोणते? परशुरामाला समकालीन असलेले सारेच राज्यकर्ते क्षत्रिय होते; क्षत्रियांनींच क्षत्रियांविरुद्ध झालेल्या या उठावणींत भाग कां घेतला? आणि परशुरामाच्या नेतृत्वाखालीं एकत्रित व संघटित होऊन उठावणी करत्या झालेल्या जमाती कोणत्या ?

या प्रश्नांचा उलगडा होण्यासाठीं आपणांस समकालीन इतिहास पाहिला पाहिजे. इतिहासपुराणकालांतील व्यक्तींचें समकालीनत्व केवळ अनुमानजन्य आहे. परशुरामाच्या बाबतींत तरी अशी निश्चिति अशक्यप्राय आहे; कारण तो चिरंजीव असल्यामुळें युगांयुगांमध्यें प्रकट झालेला आहे. आरंभींच सूचना देऊन ठेवतों कीं या विवेचनांतील विधानें माझ्या त्रोटक अध्ययनावर आधारलेलीं आहेत. त्यांची संगति तर्कशुद्ध आहे कीं हें केवळ तर्कट आहे हें अधिकारी विद्वानांनीं ठरवायाचें आहे.

हैहय व यादव या यदुकुलाच्या मुख्य शाखा; दोन्ही वंश देवयानीपासून संभवलेले; अर्थात् भृगुकुलाशीं संबद्ध; पैकीं हैहय ज्येष्ठ व यादव कनिष्ठ. उत्तर हिंदुस्थानचा उत्तर-पश्चिम भाग यादवांनीं व्यापला आणि दक्षिण भाग हैहयांनीं. हैहयांचें साम्राज्य हें संघराज्य होतें. वीतिहोत्र,

शर्यात, भोज, अवन्ति व तुण्डिकेर या पांच कुलांचा समावेश हैहय या संघसंज्ञेंत ( Ancient Indian Historical Tradition : Pargiter : p. 102 ) होतो. पैकीं शर्यात हेही भार्गवांचे संबंधी होते. या संघाला हैहय–तालजंघ अशीही संज्ञा होती. हीं व्यक्ति-नामें आहेत, तशींच कुलनामेंही आहेत. कार्तवीर्य हैहयाला अनेक पुत्र होते. पैकीं शूरसेन, शूर, तालजंघ व आनर्त हीं व्यक्तिनामें ( मत्स्य-पुराण : ४३ : ४६–४९ ) तशींच कुलनामेंही असल्यामुळें त्यांचाही समावेश या संघांतच केला पाहिजे. हैहयांचें मूळ राज्य दक्षिण माळव्यांत होतें. येथून ते पूर्वेस, मध्यप्रांतांत, रायपूरकडे पसरले. ह्या भागांत मध्ययुगांतही हैहयांचीं राज्यें होतीं. आतांचे गोंड हे हैहयांचे वंशज ( J. R. A. S. XXI, p. 209–266 ). वीतिहोत्र (मार्कण्डेयपुराण : ५७. ५५ ) व तुण्डिकेर ( मत्स्यपुराण : ११४. ५४ ) यांचीं राज्यें विन्ध्य–पठारावर होतीं. वीतिहोत्र ऊर्फ वरहोत्र यांचा उल्लेख खि. पू. दुसऱ्या शतकांतील सांचीच्या एका शिलालेखांत आलेला आहे. अमर-कण्टकच्या उत्तरेस तेण्डुखेड नांवाचें एक गांव आहे. त्याचा तुण्डिकेरांशीं संबंध ( Markandeya Purana : Pargiter. p. 344. टीप ) असावा. शर्यातांचें राज्य सौराष्ट्रांत ; भोजांचें उत्तर गुजरातेंत, अरवलीच्या आसमंतांत व विदर्भांत ; शूरसेनांचें मथुरेच्या व शूरांचें पारियात्र पर्वताच्या ( Tribes in Ancient India : Dr. Law: p. 63 ) परिसरांत. या संघांतील शूर या कुलनामावरून गुजरातला सुराष्ट्र हें नांव प्राप्त झालेलें आहे असें श्री. मुनशी ( The Early Aryans in Gujarata : p. 30) यांचें म्हणणें आहे. शूरांशीं संबंध जोडण्याच्या इच्छेव्यतिरिक्त या विधानाला कांहींही आधार नाहीं. हैहयसंघांत समाविष्ट असलेल्या कुलांच्या राज्यांच्या मांडणीवरून दिसतें कीं हैहय साम्राज्यानें गुजरातपासून पंजाबपर्यंतचा आर्यावर्ताच्या पश्चिम सीमेवरील प्रदेश व्यापला होता. मत्स्य, विदर्भ, मिथिला, निषध व मगध येथील अधिपति कार्तवीर्याचे सामन्त होते असा उल्लेख आढळतो. ही संघटना हैहय साम्राज्याच्या उत्तर कालांतील आहे.

हैहयांच्या आक्रमणाचा आरंभ भद्रश्रेण्यानें केला. त्यानें काशीचें

राज्य जिंकलें. काशीचा राजा हर्यश्व, त्याचा पुत्र सुदेव व पौत्र दिवोदास यांचा वीतहव्यांनीं अनेक युद्धांत पराभव केला. एका युद्धांत हर्यश्व मारला गेला आणि पराभूत दिवोदासाला भारद्वाजांच्या आश्रमांत आश्रय घ्यावा लागला. त्याचा पुत्र प्रतर्दन. यानें निकरानें लढून वीतहव्यांचा पराभव केला आणि काशीचे राज्य परत मिळविलें. मात्र या धामधुमीमुळें खुद्द काशींत अराजक माजलें. पुराणें सांगतात कीं या काळांत क्षेमक राक्षसानें काशी व्यापली. या विधानाचा व्यावहारिक अर्थ असा कीं काशींत जंगली जमातींचा धुमाकूळ सुरू झाला ( Ancient Indian Historical Tradition : Pargiter : p. 263 ). अनेक पिढ्या चाललेल्या या संघर्षामुळें काशी घराण्यांत हैहयांचें शत्रुत्व बाणलें होतें. वैशालीचा राजा करंधम, त्याचा पुत्र अवीक्षित व पौत्र मरुत्त यांचाही हैहयांशीं संघर्ष झाला. मरुत्ताला महाभारतांत चक्रवर्तिन् ( १२·२९·९८१ ) म्हटलेलें आहे. यावरून त्यानेंही हैहयांचा पराभव केलेला असावा असें दिसतें. कान्यकुब्जचा राजा गाधि याचें राज्य हैहयांनीं उध्वस्त केलें. त्यांचा सूड घेण्यासाठीं त्यानें आपली कन्या सत्यवती हैहयांचा वैरी ऋचीक भार्गव याला दिली. गाधि राजाच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र विश्वरथ गादीवर आला. हैहयांच्या उपसर्गामुळें त्यानें राज्यत्याग केला आणि तपश्चर्या करून ब्रह्मर्षि पद मिळविलें. विश्वामित्राचा देह क्षत्रियाचा, पण पिंड ब्राह्मणाचा. त्यानें राज्यप्राप्तीसाठीं किंवा कुलशत्रूंच्या उच्छेदासाठीं प्रयत्न केलेला दिसत नाहीं. उत्तर महाराष्ट्रांत नर्मदा व तापी या नद्यांच्या खोऱ्यांत नागांच्या वसाहती होत्या. नागांच्या वसाहती अपरान्तापासून आसामपर्यंत पसरलेल्या होत्या. मौनेय गंधर्वांनीं मध्यप्रांतांतील नागांचा पराभव केला. या काळांत दक्षिणापथांत संघटित राजसत्ता प्रस्थापित झालेल्या नव्हत्या. म्हणून नागांनीं अयोध्येच्या सूर्यवंशी मांधातृची मदत मागितली. मांधातृनें गंधर्वांचा पाडाव केला. मांधातृचा पुत्र पुरुकुत्स. याची राणी नर्मदा. ही नागकन्या होती. नागांनीं तिच्यामार्फत अयोध्येची मदत मिळविली असावी किंवा मिळालेल्या मदतीचा मोबदला म्हणून त्यांनीं पुरुकुत्साला नागकन्या

नर्मदा अर्पण केली असेल. गंधर्वांवर मिळविलेल्या विजयाचें स्मारक म्हणून मांधातृचा पुत्र मुचकुंद यानें नर्मदातीरीं तटबंदी करून माहिष्मती नगरी स्थापन केली. यानंतर अयोध्येचे मांडलिक या नात्यानें नाग येथें राज्य करीत असतां कार्तवीर्य अर्जुनानें कर्कोटक नागाचा पराभव करून माहिष्मती जिंकली आणि तेथें आपली राजधानी स्थापन केली. सूर्यवंशी राजा त्र्य्यारुण हैहयांच्या उपद्रवामुळें गांजून गेला. इक्ष्वाकूंचा राजपुरोहित वसिष्ठ हा हैहयांचा वैरी; कारण पूर्वी हैहयांनीं वसिष्ठाश्रम अग्निसात् केला होता. त्याच्या प्रेरणेनें त्र्य्यारुण हैहयांना विरोध करीत होता. सत्यव्रत ऊर्फ त्रिशंकु हा त्याचा पुत्र. याची राणी सत्यरथा. ही विदर्भ राजकन्या; नुकतेंच स्थापन होऊं घातलेलें विदर्भ राज्य हैहयांच्या प्रभावक्षेत्रांतलें; म्हणून हैहयांशीं समेटाचें धोरण ठेवावें असें त्याचें मत होतें. राज्यात या घातकी धोरणाचा प्रचार व प्रसार होऊं नये म्हणून देवराज वसिष्ठाच्या सांगण्यावरून सत्यव्रताला हद्दपार करण्यांत आलें. वसिष्ठांशीं शत्रुत्व असल्यामुळें विश्वामित्रानें सत्यव्रत त्रिशंकूचा पक्ष उचलला आणि त्याला राज्यपद मिळवून दिलें. त्रिशंकूचा पुत्र हरिश्चंद्र व पौत्र रोहित. या तीन्ही कारकीर्दीत अयोध्येंतील राजकारणावर विश्वामित्राचें वर्चस्व होतें. यामुळें स्थानभ्रष्ट झालेले वसिष्ठ दक्षिणापथांत स्थायिक झाले. हैहय-सत्तेचा पुरस्कर्ता अयोध्येच्या राज्यावर आला तरी हैहयांचीं आक्रमणें स्थगित झालीं नाहींत. पुराणें सांगतात कीं पुढें हैहय–ताल-जंघांनीं वायव्य सरहद्दीपलीकडील शक, कांबोज, यवन व पल्हव या लढाऊ जमातींची कुमक आणवून अयोध्येवर हल्ला केला आणि या युद्धांत सूर्यवंशी राजा बाहु याचा पराभव झाला. सरहद्दीपलीकडील राज्यकर्त्यांशीं किंवा जमातींशीं हैहयांचा संबंध असेल असें अनुमान करावयास जागा नाहीं. म्हणून या युद्धाबद्दलच्या विधानाचा अर्थ उलटा लावला पाहिजे : हैहयांच्या स्वाऱ्यांमुळें अयोध्येची सत्ता खिळ-खिळी झाली. ही संधि साधून वायव्य सरहद्दीपलीकडील लढाऊ जमा-तींनीं उत्तर हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या. उत्तर हिंदुस्थानांत अशी धामधूम सुरू झाल्यामुळें आणि हैहयांच्या उपसर्गापासून दक्षिणापथ

अलिप्त असल्यामुळें बाहूनें भार्गवाश्रमांत आश्रय घेतला. येथेंच दिग्विजयी सगर जन्मला. भार्गवांनीं त्याचें पालनपोषण केलें. और्वानें त्याला भार्गव नांवाचें अग्न्यस्त्र दिलें, च्यवनानें शस्त्रास्त्रपारंगत केलें आणि वसिष्ठानें त्याला हैहय–तालजंघांशीं युद्ध करण्यास प्रवृत्त केलें. नाशिक-नजीक गोदातीरीं गोवर्धन येथें भार्गवांचे आश्रम होते. गोदावरीच्या उत्तर तीरावरील वसाहतींचें नेतृत्व गौतमाकडे व दक्षिण तीरावरील नेतृत्व वसिष्ठाकडे होतें, असें गोदावरीच्या उत्तर व दक्षिण कांठांना देण्यांत आलेल्या अभिधानांवरून दिसतें. यावरून अनुमान करतां येतें कीं सगरकालांतील हैहयांविरुद्ध झालेल्या उठावणीची आंखणी गोदावरीच्या परिसरांत झालेली असावी. पुढें सगरानें हैहय संघाचा धुव्वा उडविला व अयोध्येचें राज्य परत मिळविलें.

या वृत्तांतावरून प्रस्तुत विषयापुरतें समकालीनांचें कोष्टक ( पहा : Ancient Indian Historical Tradition : Pargiter : Dynastic Lists : pp. 144–149 ) तयार होतें तें पुढें दिलें :

श्री. पार्जिटर यांच्या कोष्टकांत जरूर तेवढा फेरफार करून हें कोष्टक तयार केलेलें आहे. श्री. पार्जिटर यांनीं पिढ्यांचा क्रम मनूपासून सुरू केलेला आहे. या कोष्टकांतील ‘ पिढ्यांचा क्रमांक ’ या सदरांतील अंक अनुक्रमानें येत असले तरी त्यांमधील अंतर एकेकाच पिढीचें आहे असें निश्चितपणे सांगतां येणार नाहीं.

श्री. पार्जिटर यांनीं ऋषिवंशांचेंही कोष्टक तयार केलेलें आहे. ( पूर्वोक्त : पृ. १९१–१९२ ) त्यांत भार्गवांच्या सदरांत भृगूला स्थान दिलेलें नाहीं. त्यांनीं भार्गवकुलाचें सदर च्यवनापासून सुरू केलेलें आहे. त्याला क्रमांक २ दिलेला आहे. या लेखांत प्रारंभीं दिलेल्या वंशावळीवरून और्व हा च्यवनाचा नातू असें दिसतें; पण श्री. पार्जिटर यांनीं सम-कालीन उल्लेखांवरून त्याला क्र. ३० दिलेला आहे ; म्हणजे मधल्या पिढ्यांची कांहींही माहिती आपल्याला पुराणांवरून उपलब्ध होत नाहीं. भार्गवकुलाचा वृत्तांत कालविपर्यासामुळें किती दूषित झालेला आहे हें या कोष्टकावरून स्पष्ट दिसून येतें. मनूपासून आठव्या पिढींत हैहय-शाखेची सुरुवात सहस्रजितापासून होते; किंवा अगदीं कांटेकोरपणें

| पिढ्यांचा क्रमांक : | क्षत्रिय राजघराणीं | | | | | ऋषिकुलें | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | हैहय. | ऐक्ष्वाक. | काशी. | कान्यकुब्ज. | वैशाली. | भार्गव. | इतर. |
| २१ | | माधातृ. | | | | | |
| २२ | | पुरुकुत्स. | | | | | |
| २३ | | | भीमरथ. | | | | |
| २५ | भद्रश्रेण्य. | | दिवोदास १. | | | | |
| २७ | दुर्दम. | | | | | | |
| | | | | | | ऊर्व. | |
| ३० | कृतवीर्य. | | | गाधि. | | ऋचीक. | |
| ३१ | अर्जुन. | त्र्यारुण. | | | | जमदग्नि. | दत्त आत्रेय. |
| ३२ | | सत्यव्रत. | | विश्वामित्र. | | परशुराम. | देवराज–वसिष्ठ. |
| ३३ | जयध्वज. | हरिश्चंद्र. | | | | | |
| ३४ | तालजंघ. | रोहित. | | ० | | | |
| ३६ | वीतिहोत्र. | | | | | | |
| ३८ | | | हर्यश्व. | | करंधम. | | |
| ३९ | | बाहू. | सुदेव. | | अवीक्षित्. | | कश्यप. |
| ४० | ० | | दिवोदास. २. | | मरुत्त. | | |
| ४१ | | सगर. | प्रतर्दन. | | | | |
| ४२ | | | | | | | विश्वामित्र–( शकुन्तलेचा पिता.) |

चवदाव्या पिढींतील हैहय राजापासून होते. पंचविसाव्या पिढींत हैहयांचीं आक्रमणें सुरू होतात; तिसाव्या व एकतिसाव्या पिढींत त्यांचें कर्तृत्व कळसाला पोंचतें; बत्तिसाव्या पिढीपासून त्यांच्या सत्तेला उतरती कळा लागते आणि चाळिसाव्या पिढीनंतर कोष्टकांतील हैहयांचें खातेंच बंद होतें.

हैहयकुलांतील मुख्यत्वेंकरून कृतवीर्य व अर्जुन यांचींच आक्रमणें उत्तर हिंदुस्थानांतील अंतर्वर्तुलांतील क्षत्रिय राज्यकर्त्यांना बाधलीं आणि कार्तवीर्य अर्जुन व त्याचे पुत्र यांचा उन्मत्तपणा भार्गवांना. परशुरामाच्या अवतारकृत्याचा पौराणिक वृत्तांत या कोष्टकाशीं ताडून पाहिला असतां दिसून येतें कीं कार्तवीर्यार्जुन व त्याचे पुत्र यांचा वध आणि खुद्द हैहय घराण्याचा उच्छेद हीं कृत्यें निःसंशय परशुरामाच्या अंगीं लावतां येतात. या कार्यांत परशुरामाला अयोध्या, काशी व वैशाली येथील राज्यकर्त्यांचें साहाय्य झालेलें असणें संभवनीय आहे आणि आसाम गसून अपरान्तापर्यंतच्या नागांचें; आणि अवतारकृत्याचे समाप्ती-नंतर त्याने ज्या जमाती अपरान्तीं वसविल्या त्यांचेंही. परशुरामानें हैहय-घराण्याचें सामर्थ्य नष्ट केलें आणि हैहयांच्या सहकाऱ्यांचें व सामन्तांचें सामर्थ्य खिळखिळें केले हें वरील कोष्टकावरून स्पष्ट दिसून येतें. हैहयसाम्राज्य हें संघराज्य होतें. हैहयसंघाचा व साम्राज्याचा उच्छेद ऐक्ष्वाक सगरानें केला; त्याच्याही पाठीशीं भार्गव होतेच!

इतिहासपुराणकारांनीं परशुरामाचें कर्तृत्व एवढ्यापुरतें मर्यादित ठेवले असतें तर त्यांत अलौकिकतेची चमत्कृति आली नसती हें खरें; पण तार्किकाला खटकणारी अशक्यता टळली असती. ऐतिहासिक वृत्तीनें पडताळा घेऊन झाला तेवढाच वृत्तांत सांगण्यांत आला असता तर परशुरामानें हैहयाशीं व त्यांच्या सहकाऱ्याशीं केलेल्या युद्धाला ब्राह्मणाने ब्राह्मण म्हणून अगर ब्राह्मण्यासाठीं केलेल्या क्षत्रियसंहाराच्या आवर्तनाचें अभिनिवेशी स्वरूप आलें नसतें हें खरें; पण कथेंतील या अतिशयोक्तीमुळे ब्राह्मणेतरांना डांचणारी कटुता हमखास टळली असती. जैनांच्या कडवट उद्गारांचा नमुना पूर्वी सांगितला; आतां मराठी कटुतेचा मासला देतों. श्री. काशीराव बापूजी देशमुख (जातवार क्षत्रियांचा इतिहास: भाग दुसरा: पृ. २७) सांगतात:

"परशुराम नांवाचा एक मदोन्मत्त ब्राह्मण होऊन गेला. त्याची आई क्षत्रियकन्या होती. स्वतःच्या आईचा परशुरामानें वध केला आणि इतर अबला व गार्भिणी स्त्रियांचीं पोटें फोडून तो जनतेस ताप देऊं लागला. श्रीरामचंद्रानें त्याला जिंकून विश्वामित्रादि पंचांच्या न्यायासनासमोर उभें केलें आणि त्यास पंचांच्या न्यायास अनुसरून सह्याद्रीपलीकडील समुद्रकांठच्या स्मशानभूमींत एकांतवासाची काळे पाण्याची शिक्षा भोगण्यास भाग पाडलें. याच पापी परशुरामाचें नांव भिक्षुकांनीं अवतारांत दडपून दिलें."

परशुरामाचें कर्तृत्व व कार्यक्षेत्र हीं मर्यादित केलीं असतीं तरी त्यांतसुद्धां अलौकिकता काय कमी होती? परशुरामाच्या मानानें शिवाजीचें कार्य किती मर्यादित होतें? तरी शिवाजीलाही आपण अवतारी पुरुष मानतोंच कीं नाहीं?

परशुराम हा विष्णूचा सहावा अवतार.

वेदवाङ्मयांत अवतारकल्पना बीजरूपानें आढळते. शतपथ ब्राह्मणांतील मत्स्य मनूला तारतो; पण येथें तो अवतार नसून प्रजापति (१·८·१) आहे. शतपथांतील कूर्म (७·५·१५) आणि तैत्तिरीयांतील वराह (७·१·५·१) हेही प्रजापति आहेत. वामनअवताराचें बीज ऋग्वेदांत (७·१००·४) आढळतें. येथें विष्णूच्या तीन पावलांचा उल्लेख आलेला आहे; पण वामनाचा किंवा बलीचा उल्लेख नाहीं. शतपथांतील वामनविष्णूची (१·२·२·१-५) कथा मात्र जवळजवळ पुराणांतल्यासारखीच आहे. वेदवाङ्मयांत परशुरामाचा उल्लेख आलेला नाहीं. ऋग्वेदांत (१०·९३·१४) एका रामाचा उल्लेख आलेला आहे. हा बलाढ्य आहे, पण भार्गवेय नाहीं. ऋग्वेदांतील १०·१०० या सूक्ताचें कर्तृत्व सर्वानुक्रमणीनें राम जामदग्न्याला दिलेलें आहे. शतपथ ब्राह्मण (४·६·१·७) व जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण (३·४०·१ ; ४·१६·१) यांत रामाचे उल्लेख आलेले आहेत ; पण त्यांचा परशुरामाशीं कांहीं संबंध नाहीं. ऐतरेय ब्राह्मणांत (७-२७·३) भार्गवेय रामाचा उल्लेख आहे. पौरोहित्याचे बाबतींत याचा विश्वंतर राजाशीं संघर्ष झालेला आहे. हा उल्लेख भार्गवेय रामाचा असणें

संभवनीय आहे असें विद्वानांचें मत ( History of Ancient Sanskrit Language : Max Muller : p. 251) आहे. महाभारतांत दशावतारांचा सिद्धांत मांडलेला आहे आणि त्यांमध्यें परशुरामाला स्थान देण्यांत आलेलें आहे. प्रचलितांहून महाभारतांतील दशावतार ( शांतिपर्व : मोक्षधर्मपर्व : १२·३३९·१०३ ) थोडे वेगळे आहेत.

हंसः कूर्मश्च मत्स्यश्च प्रादुर्भावाद्विजोत्तम ।
वराहो नरसिंहश्च वामनो राम एव च ।
रामो दाशरथिश्चैव सात्वतः कल्किरेव च ।

या यादींत बुद्धाचा समावेश नाहीं हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. याच अध्यायांत (११·३३९·८४) परशुरामाचा अधिक स्पष्ट असा आणखी एक उल्लेख आहे.

त्रेतायुगे भविष्यामि रामो भृगुकुलोद्भवः ।
क्षत्रं चोत्सादयिष्यामि समृद्धबलवाहनम् ।

या उल्लेखांबाबत डॉ. सुकथनकर ( Memorial Edition : Critical Studies in the Mahabharat : Epic Studies : VI. p.316) सांगतात : " हे दोन्ही उल्लेख मोक्षधर्माच्या नारायणीय भागांत आलेले आहेत. महाभारताला हा भाग उत्तर कालांत जोडलेला आहे हें कुप्रसिद्ध आहे. महाभारतांतील अवतारासिद्धान्त अपरिपक्व अवस्थेंत आहे. अवतारांची संख्या व प्रतिज्ञा अद्याप निश्चित झालेल्या नाहींत. अर्थात् भार्गवराम हा विष्णूचा अवतार असल्याचें महाभारताला मान्य आहे असें गृहीत धरण्याचें कारण नाहीं. " महाभारतांतील अवतारसिद्धान्त अस्पष्ट व दशावतारांचे उल्लेख प्रक्षिप्त असले तरी भगवद्गीतेच्या ब्रह्मार्पणयोगांतील ( ४ : ७–८ ) युगायुगीं साधूंच्या परित्राणासाठीं, दुष्कृतांच्या विनाशासाठीं व धर्मसंस्थापनेसाठीं होणाऱ्या संभवांतील अवतार-सिद्धान्ताची सूचना स्पष्ट आहे. विभूतियोगांत 'रामः शस्त्रभृतामहम्' असें वचन (१० : ३१) आहे. हा उल्लेख संदिग्ध आहे. हा राम दाशरथी होय असें स्पष्टीकरण ज्ञानेश्वरांनीं ( १०.२५१-२५५ ) केलेलें आहे. डॉ. सुकथनकर सांगतात कीं हा उल्लेख निःसंशय परशुरामाचाच ( पूर्वोक्त. पृ. ३०८ ) आहे. यांपैकीं कोणतीही ओळख

मानली तरी स्पष्ट दिसतें कीं गीतेंतील या वचनांत अवतारसंकेताचें बीज आहे ; त्याचप्रमाणें वरील उल्लेखांवरून दिसून येतें कीं महाभारतांतील परशुराम हा महापुरुष अगर पुरुषोत्तम (Super-Man) आहे. रामायणांतही त्याला अवताराचा दर्जा प्राप्त झालेला दिसत नाहीं. भिक्षुकांनीं परशुरामाचा समावेश अवतारांत केला हें खरें आहे ; पण हाच न्याय इतर अवतारांनाही लागू पडतो, हेंही तितकेंच खरें आहे.

भारतीय संस्कृतीच्या पुनरुत्थापनकाळांत इतिहासपुराणांची रचना व संकलनें झालीं. या काळांत ब्रह्मा, विष्णु, महेश या देवत्रयाला देवमंडळांत प्रामुख्य प्राप्त झालें आणि या तिघांतील अग्रस्थान विष्णूला. वेदकालांत विष्णूला विशेष महत्त्व नव्हतें. पौराणिक विष्णु हा सृष्टीचा धारणकर्ता व सुसंस्कृताचा देवाधिदेव. त्याला अग्रस्थान मिळाल्यामुळें ब्रह्मदेव मागसला. महेश हा मूळचाच बहुजनसमाजाचा देवदेवेश्वर. पुराणरचना-काळांत त्याचाही महिमा वाढला. तरी त्याला अवतारांची सुसंघटित प्रभावळ प्राप्त झाली नाहीं. या काळांत दशावतारांचा सिद्धान्त पूर्ण व स्पष्ट झाला आणि त्याला मूर्त स्वरूप प्राप्त झालें. ऋग्वेद व भगवद्गीता यांतील उपरोक्त वचनांच्या अनुरोधानें विष्णूच्या युगसंभवाच्या सिद्धान्ताभोंवतीं अवतारकल्पनेची मांडणी करण्यांत आली. अर्थात् अवतारसिद्धान्त हा मूलतः वैष्णव आहे. परशुरामाचा संबंध विशेषतः शंकराशींच आलेला आहे ; तरीही त्याचें माहात्म्य स्थिर करण्यासाठीं त्याची गणना विष्णूच्या दशावतारांत करण्यांत आलेली आहे. हरिवंशानंतरच्या पुराणांत परशुरामाला अवतारांत स्थान मिळालेलें आहे. पुराणांचें संपादन झालें त्या काळांत बौद्ध धर्माला उतरती कळा लागली होती, तरी संघानुयायांची संख्या व सामर्थ्य उपेक्षणीय नव्हतीं. म्हणून त्यालाही दशावतारांत स्थान देण्यांत आलें. वस्तुतः या काळांतील ब्राह्मणांना व क्षत्रियांना जें जें प्रिय व आदरणीय तें तें बौद्धांना त्याज्य व तिरस्करणीय होतें. एवढें मात्र खरें कीं बुद्धाचा दशावतारांत समावेश केल्यामुळेंच प्रथम बौद्धधर्माचें अलग व्यक्तिमत्त्व मोडलें आणि नंतर त्याचें अस्तित्वही हिंदुस्थानांत नष्ट झालें. जेथें पूर्वीचे दुसरे देव नव्हते तेथेंच बुद्धधर्म टिकला. असो. पुराणरचना-

काव्यांत राजकारणांत क्षत्रियांचें व समाजकारणांत ब्राह्मणांचें अग्रस्थान सर्वमान्य झालेलें होतें. क्षत्रिय राज्यकर्त्यांचे ठायीं विष्णूचा अंश असतो हें ब्राह्मणांनीं मान्य केलें होतें आणि याच्या मोबदल्यांत ब्राह्मणकुलोत्पन्न व्यक्तिमात्राचे ठायीं ब्रह्मदेवाचा अंश असतो, म्हणून शास्त्रधारी ब्राह्मणाचें पालनपोषण करणें हें शस्त्रधारी क्षत्रियाचें कर्तव्य आहे, या सिद्धान्ताला क्षत्रियांनीं मान्यता द्यावी अशी ब्राह्मणांची अपेक्षा होती. क्षत्रियांचें सार्वभौमत्व ब्राह्मणांच्या मान्यतेवर अवलंबून आहे, ब्राह्मणांची अवहेलना केल्यास घोर परिणाम होतात, हें क्षत्रियांच्या मनावर ठसविण्यासाठींच पुराणकालीन ब्राह्मणांनीं परशुरामकथेंत अतिरंजित कर्तृत्वाचा समावेश केलेला असावा. त्या काळचे क्षत्रियही कांहीं कमी नव्हते. परशुरामकथेंतील क्षत्रियांच्या संहाराचें उट्टें काढण्यासाठीं त्यांनीं परशुरामाचा दाशरथी रामाकडून तेजोभंग करविला; आणि हाही विष्णूचाच अवतार होता. परशुरामाचेंच तेज रामचंद्राच्या अंगीं त्या प्रसंगीं संचारलें असा कोणी आक्षेप घेऊं नये म्हणून भीष्म व दुर्योधन यांच्याही करवीं परशुरामाचा पाणउतारा करविला !

दशावतारांत परशुरामाचें स्थान कोणतें ?

मत्स्य, कूर्म व वराह हे तीनही अवतार विश्वरूपदिग्दर्शक आहेत (On the Original Inhabitants of Bharatavarsha or India : Prof. Gustav Oppert. p. 310). प्रलयकालीं मत्स्यानें मनूचें रक्षण केलें (शतपथ ब्राह्मण: १·८·१·१) व नंतर मनूनें मानवजाति निर्माण केली. प्रजापति कूर्मरूपानें संतति निर्माण करण्याकरिता पाण्यांत संचार करतो (शतपथ ब्राह्मण : ७·५·१·५–१०). प्रजापतीनें वराहरूपानें पाण्यांत जाऊन पृथ्वी तारली (तैत्तिरीय ब्राह्मण: ७·१·५·१ ). दैत्य व दानव यांजकडून आर्य दैवतांना मान्यता मिळविणें हें नृसिंहाचें कार्य. वन्यजाति अजूनही या व अशा दैवतांची पूजा करतात. सद्धर्माच्या विधिनियमांची प्रस्थापना करण्यासाठीं (ऋग्वेद : १·२२·१९ ) आणि पृथ्वी मनुष्यांना राहण्यासाठीं व कृषि-कर्मासाठीं योग्य व्हावी (ऋग्वेद : ७·१००·४ ) म्हणून वामनानें त्रिपाद

आक्रमण केलें. आर्यांच्या प्रभुत्वाला वामनानें बलीकडून मान्यता मिळविली किंवा आधुनिक भाषेंत सांगावयाचे म्हणजे बलीनें मांडलिकी सामीलनाम्याला मान्यता ( Vicissitudes of Aryan Civilization in India : Shri Kunte : p. 249 ) दिली.

परशुरामाच्या अवतारकार्याचें रहस्य अधिक संकीर्ण आहे.

नृसिंह व वामन या दोन्ही अवतारांचे बाबतींत प्रस्तुत विषया-पुरता विशेष महत्त्वाचा मुद्दा हा कीं या दोघाच्याही प्रतिस्पर्ध्यांचे भार्गव हे पुरोहित होते. भार्गव हे अग्नि-उपासक व अथर्वांगिरसाचे पुरस्कर्ते. अथर्वसंहिता ऋग्वेदाच्या नंतरची. मात्र अथर्वसंहितेंतील धार्मिक कल्पना बहुजनसमाजाला अधिक जिव्हाळ्याच्या. सामान्य जनांत प्रच-लित असलेल्या धार्मिक भावना व सामाजिक रूढि आणि नैसर्गिक व अलौकिक समजुती, एतद्देशीयांचे आद्य आचार व अभिचार यांचा अथर्वांत समावेश झालेला आहे. या संहिता करण्याचें श्रेय भार्गवांचें. अभिचार व मंत्रविद्या यांच्या पुरस्कारामुळें शिष्ट आर्य अथर्ववेदाला पूज्य मानीत नसत आणि संभवनीय आहे कीं अथर्ववेद व मंत्रविद्या यांच्या पुरस्कारामुळें भार्गवांना सांप्रदायिक ब्राह्मण निंद्य मानीत असत. वस्तुतः "आचार्य व जादूगार मुळांत एकच. प्रत्येक देशांतील लोकांच्या इतिहासांत असा एक काल येतो कीं त्या वेळेस परमार्थसंप्रदाय व मंत्रविद्या एकमेकांपासून विभक्त होऊं पाहतात. देवांशीं सख्य ठेवणारा पुरोहित पिशाच्चांशीं संबंध ठेवणाऱ्या जादूगाराचा अनादर करतो " (महाराष्ट्रीय ज्ञानकोश : वेदविद्या : डॉ. केतकर : पृ. ५४ ). शिवाय शिष्ट ब्राह्मण-क्षत्रियांपेक्षां भार्गवांचे संबंध दैत्य व असुर यांशीं अधिक निकटचे होते. भार्गवकुलोत्पन्न शुक्र हा दैत्यांचा आचार्य. त्याच्या मंत्रशक्तीमुळें दैत्य देवांना आजिंक्य झाले. वामनाला त्रिपादभूमि दिल्यास बलीचें सार्व-भौमत्व नष्ट होईल हें ओळखून शुक्राचार्यानें संकल्पाला कसून विरोध केला. मनुष्यांशीं फार संबंध ठेवतात म्हणून देवांनीं अश्विनीकुमारांचा यज्ञांतील हविर्भाग बंद केला होता; देवांचा विरोध न जुमानतां च्यवनानें अश्विनीकुमारांना हविर्भाग मिळेल अशी तजवीज केली. भार्गवकुलांतील ऋषि असुरयाजक म्हणून देवांनीं कांहींचा उपहास केला आणि कट्टर

आर्यांनीं कांहींचा उच्छेद केला. या वृत्तांतावरून दिसतें की समकालीन शिष्ट व सांप्रदायिक ब्राह्मणांबरोबरचे भार्गवांचे संबंध मित्रभावाचे नसावेत. म्हणूनच आर्यावर्तांतील गंगायमुनातटाकींचे आश्रम सोडून भार्गव दक्षिणापथांत आले आणि अपरान्तांत व गोदातीरीं स्थायिक झाले; म्हणूनच त्यांनीं नवब्राह्मणांचा पुरस्कार केला; भृगूनें पराभूत वीतहव्याला संरक्षणार्थ ब्राह्मण्य दिलें आणि बहिष्कृत विश्वामित्राशीं स्नेह ठेवला; म्हणूनच यज्ञासाठीं परशुरामाला शिष्ट ब्राह्मण मिळाले नाहींत आणि म्हणून त्याला दलित जमातींतून नवे ब्राह्मण निर्माण करावे लागले. दस्यु व दैत्य, दानव व असुर वगैरे आर्य देवांना न जुमानणाऱ्या व आर्यसंस्कार न पाळणाऱ्या अशा भारतांतील कृष्णवर्णीय आदिवासी जमातींचें परिवर्तन आर्यसंस्कृतीच्या विकासाला विशेष पोषक होईल; त्यांची उन्नति साधावी, उच्छेद करूं नये; त्यांच्या मूल संस्कारांना सुसंस्कृत स्वरूप द्यावें व आपण त्यांचें ग्रहण करावें; यामुळें आपली उन्नति किंचित्कालपर्यंत स्थगित झाली तरी चालेल; त्यांचा सांस्कृतिक दर्जा विचारांत घेऊन त्यांना पेलतील तेवढ्याच आर्य संस्कारांचें त्यांचेकडून ग्रहण करवावें, यामुळें त्यांचें परिवर्तन तांतडीनें झालें नाहीं तरी चालेल; आदिवासींचे सामर्थ्य नष्ट करूं नये, त्यांचें संगोपन करावें; अशी भार्गवाची विचारसरणी व कार्यपद्धति असावी. मनुष्यांशीं फार संबंध ठेवतात म्हणून अश्विनीकुमार हविर्भागांतून बहिष्कृत झाले, त्याचप्रमाणें भार्गव आदिवासींशीं फार संबंध ठेवतात म्हणून शिष्ट सांप्रदायिकांकडून तत्त्वतः नव्हे, पण वस्तुतः बहिष्कृत मानले गेले असावे.

विषयाच्या अनुरोधानें रेणुकेचा वृत्तांत येथेंच सांगणें सोईस्कर वाटतें.

इक्ष्वाकु-कुलांतील प्रसेनजित् ऊर्फ रेणु याची रेणुका ही कन्या. हिला कामली असें नामांतर होतें. रेणूनें कन्याकामेष्टि यज्ञ केला असतां ही यज्ञकुण्डांतून निर्माण झाली. हिची उत्पत्ति पद्मापासून झाली असें भारतांत सांगितलेलें आहे. अदितीनें तप करून अयोनिसंभव देह प्रार्थिला आणि पोटीं त्रिभुवनेश्वर हरी यावा असा वर मागितला. तीच रेणुका.

तिनें स्वयंवरांत जमदग्नीला वरिलें. या प्रसंगीं इंद्रानें तिला कामधेनु, कल्पतरु, चिंतामणि व परीस दिले. पठारावर चांदवड, चांदा, नेमावर व माहूर येथें रेणुकेचीं मंदिरें आहेत आणि कोंकणांत अनाळा, गुंज, परशराम व वज्रेश्वरी येथें. गुंज येथील मंदिरांत रेणुका, वज्रेश्वरी व कालिका अशा तीन मूर्ति आहेत. वज्रेश्वरी ही कोळ्यांची देवी. नेमावर व माहूर येथें जमदग्नीचे आश्रम होते व रेणुकावधाचा प्रसंग येथेंच झाला, अशा स्थानिक दंतकथा आहेत. नेमावरनजीक नर्मदेचा धबधबा आहे. सहस्रार्जुनानें येथेंच नर्मदा अडविली होती अशी दंतकथा आहे. अनाळा व परशुराम येथील मंदिरांत रेणुकेची स्थापना खुद्द परशुरामानें केली अशा दंतकथा आहेत. म्हैसूर संस्थानांत चंद्रद्राण पर्वतावर रेणुकेचें मंदिर आहे. येथें तिला कोंकणादेवी असें नांव आहे. एकवीरा आणि रेणुका या एकच ( रेणुकामाहात्म्य : १.३ ). विहारगावची एकवीरा ही कोळ्यांची देवी. कार्ल्याच्या लेण्यांसमोर या देवीचें पुरातन मंदिर आहे. बुद्धधर्म बुडाला, पण या आद्यदेवतेची यात्रा अद्याप भरते. वसई, सोपारें, विहारगांव ( कार्लें ) व वेहेर ( जुन्नर ) येथें एकवीरेचीं स्थानें आहेत. विहारगांव व वेहेरगांव येथील एकवीरा या चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंच्या कुलदेवता. एल्लम्मा ( एल्ल = सर्व, अम्म = आई : सर्वांची ) व रेणुका या एकच. एल्लम्मा ही आदिशक्ति. ती भूमींतून निर्माण झाली. उमा व अम्मा या एकच, असा डॉ. कीथ ( Religion of the Veda : p. 199 ) यांचा तर्क आहे. एल्लम्मा ही पुनरुज्जीवित रेणुका, इतकेंच. डॉ. ओपर्ट ( On The Original Inhabitants of India : p 464 ) यांनीं रेणुकेची तामील प्रदेशांत प्रचलित असलेली कथा दिलेली आहे. ती अशी : चित्ररथ गंधर्वाची जलक्रीडा पाहून रेणुका चळली व द्रवली. कल्पनेनें तिचें पातिव्रत्य भ्रष्ट झालें हें अतर्ज्ञानानें ओळखून जमदग्नीनें तिचा वध करण्याची आज्ञा पुत्रांना दिली; ती मान्य करून परशुराम आपला वध करावयास निघाला आहे हें समजतांच रेणुका घाबरली आणि नजीकच्या अंत्यजांच्या वस्तींत लपून राहिली. परशुरामानें तिला शोधून काढली आणि त्यानें तिचा व तिला आश्रय

देणाऱ्या स्त्रियांचा वध केला. परशुरामानें मातेला पुनरुज्जीवन मागितलें. जमदग्नीनें वर दिल्यावर परशुराम घाईघाईनें अंत्यजांच्या वस्तींत आला. तेथें धडांचा खच पडला होता; त्यांपैकीं एकाला त्यानें रेणुकेचें मुण्डकें चिकटवून दिलें आणि मंत्र जपून जलसिंचन केलें. लगेच धड अंत्यजेचें व शिर ब्राह्मणीचें, असा विचित्र देह जिवंत झाला. धर्मपत्नी म्हणून तिचा स्वीकार करण्याचें जमदग्नीनें नाकारलें. त्यानें ती अंत्यजांना देवी म्हणून दिली. ते अद्याप तिची पूजा करतात. एल्लम्माच्या प्रत्येक मंदिरांत एका मुखवट्याची स्थापना केलेली असते; अम्माचार या नांवानें रेणुकेच्या शिराची स्वतंत्रपणें पूजा करण्यांत येते. महाराष्ट्रांत ही दंतकथा प्रचलित नसली तरी येथेंही देवींच्या मुखवट्यांची पूजा करण्यांत येते. त्यांची संगति रेणुकेशीं लावतां येणें शक्य आहे. डांग प्रदेशांत जमदग्नि, परशुराम व रेणुका यांच्या असंस्कृत मूर्ति कोंकणदेव या नांवानें पूजिण्यांत येतात, हें पूर्वी सांगितलेंच आहे. दक्षिण हिंदुस्थानांतील एल्लम्माच्या प्रत्येक मंदिरात परशुरामाची मूर्ति असते. एल्लमाचे भक्त परशुरामालाही भजतात. डॉ. ओपर्ट यांनीं रेणुकेची आणखी एक कथा सांगितलेली आहे. या कथेंतली रेणुका आश्रयासाठीं चांडालांच्या वस्तींत लपली. तिचें मुण्डकें घेऊन परशुराम आश्रमाकडे गेल्यानंतर कांहीं चांडालांनीं रेणुकेचें धड पळविलें. म्हणून त्याला तिचें शिर चांडाल स्त्रीच्या धडाला चिकटवावें लागलें. पुनरुज्जीवन होतांच ती परशुरामाच्या अंगावर धांवली. म्हणून जमदग्नीनें ही देवी चांडालांना दिली. दक्षिण हिंदुस्थानांतील ग्रामदेवतांमध्यें एल्लम्माला अग्रस्थान आहे. एल्लम्माच्या देवळांत जमदग्नि, परशुराम, पोतुराज मल्लुजेठि, विघ्नेश्वर आणि भद्रकाली मातंगी यांच्याही मूर्ति असतात. तामील तुलु प्रदेशांतील कोळीही एल्लम्माला भजतात.

डॉ. इरावती कर्वे (The Parasurama Myth) सांगतात कीं परशुरामकथेच्या उत्तर हिंदुस्थानी पाठांतील रेणुकावधाचें महत्त्व दुय्यम दर्जाचें आहे; कारण तेथील समाजव्यवस्था पितृकुल-प्रधान आहे; दाक्षिण हिंदुस्थानांतील समाजव्यवस्था मातृगोत्रप्रधान

( matriarchal ) असल्यामुळें इकडील परशुरामकथेंतील रेणुका-वधाचें माहात्म्य अव्वल दर्जाचें आहे. डॉ. ओपर्ट ( पूर्वोक्त : पृ. ४६७ ) सांगतात कीं एल्लम्मा या देवतेच्या निर्मितीच्या कथेवरून व पूजनाच्या प्रथेवरून परशुराम या क्षत्रियांच्या कट्टर वैऱ्याचा आदिवासी जमातीशीं असलेला निकटचा संबंध प्रस्थापित होतो. डॉ. मजकुरांनीं अधिक पुराव्याचे अभावीं या कथेचा निष्कर्ष काढण्याचें टाळलें आहे. मात्र एवढें स्पष्टपणें सुचविलें आहे कीं स्पष्टीकरण करतां आलें नाहीं म्हणून या कथाभागाकडे दुर्लक्ष करणें योग्य होणार नाहीं. मला वाटतें कीं एक-वीरेची व एल्लम्माची मूर्ति हें भार्गवांच्या मिश्र धर्मभावनेचें व परशुरामाच्या मातृपितृभक्तीचें मूर्त स्वरूप आहे आणि रेणुकेला तिच्या वेगवेगळ्या रूपांत आज भजणाऱ्या जमातींत मला परशुरामाच्या या अवतारकार्यांतील सहकाऱ्यांचे वंशज दिसतात !

आश्रमवासी ब्राह्मणांनीं तपश्चर्या, अध्ययन आणि अध्यापन व संस्कृतिसंवर्धन करावयाचें, नागरी ब्राह्मणांनीं पौरोहित्य व राज-कारण करावयाचें आणि क्षत्रियांनीं या संस्कृति–प्रतीकांचें संरक्षण व संगोपन करावयाचें, अशी शिस्त प्राचीन आर्य समाजांत पाळली जात असे. ऐतेरेय ब्राह्मणाच्या आठव्या भागांत या शिस्तीचें विवेचन व समर्थन केलेलें आहे. व्यावहारिक दृष्ट्यां शास्त्रधारी ब्राह्मण दुर्बळ ; कारण ते अल्पसंख्य, एकाकी व व्रतानें दरिद्री. शस्त्रधारी क्षत्रिय प्रबळ ; कारण ते बहुसंख्य, संघटित व संपन्न. शास्त्र व शस्त्र यांच्या नियोजित सहकार्यानें व समतोल संगोपनानें संस्कृतीचें संवर्धन होतें, असा प्रवर्तक समाजशास्त्राचा सिद्धान्त आहे. जमदग्नीच्या काळांत शास्त्र व शस्त्र या आदिशक्तींचा तोल बिघडला. जमदग्नीच्या पूर्वींचे भार्गव व्यक्तिशः समर्थ होते ; कारण त्यांना असुर राजसत्तांचा पाठिंबा होता. जमदग्नीनें कोणाचें पौरोहित्य पत्करलें नाहीं किंवा हैहयोच्छेदाच्या कुलकार्याची जोपासना केली नाहीं. विशिष्ट वृत्तीमुळें भार्गवांना शिष्ट व सांप्रदायिक ब्राह्मण-क्षत्रियांचा पाठिंबा नव्हता, म्हणूनच उन्मत्त हैहय त्यांच्यावर हात उगारावयास धजावले. हैहयांनीं भार्गवांवर अधम आक्रमण केलें म्हणूनच परशुरामाला शास्त्र बाजूला ठेवून शस्त्र हातीं घ्यावें लागलें.

हैहयांनीं भार्गवांविरुद्ध पहिली उठावणी केली ती भार्गवांच्या संचित संपत्तीच्या प्राप्तीसाठीं. ही संपत्ति भार्गवांना हैहयांपासूनच यज्ञप्रसंगीं मिळालेली होती असें गृहीत धरलें तरी भार्गवांनीं मिळविलेल्या धनावर हैहयांचा कांहींही हक्क नव्हता. हैहयांनीं भार्गवांविरुद्ध दुसरी उठावणी केली ती कामधेनूसाठीं. कामधेनूच्या प्रसादानें जमदग्नीनें कार्तवीर्याचें आदरातिथ्य केलें. अशी अद्वितीय धेनु आपल्यासारख्या सम्राटाच्याच संग्रहीं असावी म्हणून कार्तवीर्यानें बलात्कारानें कामधेनूचें हरण केलें. हें समजतांच परशुरामानें आपली धेनु परत मागितली. या मागणीचा अव्हेर होतांच त्यानें माहिष्मतीवर स्वारी करून कार्तवीर्याचा वध केला व कामधेनु सोडवून आणली. याबाबत श्री. माटे ( परशुराम : पृ. ८४–८५ ) सांगतात, " गायीची बाब क्षुल्लक दिसते. यावरून दोन वर्णांचें प्राणांतिक युद्ध उद्भवावें हें संगतिहीन वाटतें. शिवाय परशुरामाच्या व क्षत्रियांच्या भांडणांत आकस दिसतो. म्हणून अनुमान होतें कीं या तापसांच्या आश्रमांतून ज्या वस्तु क्षत्रियांनीं उचलल्या त्या केवळ गायी नसून मुख्यतः स्त्रिया होत्या." या अनुमानाच्या समर्थनार्थ त्यांनीं अथर्ववेदांतील स्त्रीहरणाबाबतचीं कांहीं सूक्तें उद्धृत केलेलीं आहेत. त्यांपैकीं एकच येथें देतों : " अपहरण करून नेलेली ब्राह्मण स्त्री मोठीच भयंकर होय, उंच आकाशांतही ती दुःख उत्पन्न करते ( ५·४·१७·६ )." आधारग्रंथांत स्पष्ट असा उल्लेख आलेला नसला तरी या अनुमानाला पोषक असा धागा महाभारतांत आढळतो : अर्जुनाच्या बाहूंचा छेद केल्यानंतर परशुरामानें हैहयांच्या "अन्तःपुरांत" फिरत असलेलें गोवत्स आश्रमीं परत आणलें ( शांतिपर्व. अ० ४९ ). ब्राह्मणांच्या स्त्रियांबद्दल क्षत्रियांना आसक्ति वाटावी, ती त्यांनीं जबरदस्तीनें भागवावी व यामुळें त्यांच्या राज्यांचा विध्वंस व्हावा ही परंपरा फार पुरातन आहे. ऋग्वेदांतही असे उल्लेख आढळतात. भार्गवांच्या अनेक पिढ्यांना या अपहरणप्रथेचा उपसर्ग भोगावा लागला होता. पुलोमा, अश्विनीकुमार, चित्ररथ, इंद्र व दण्डक यांचे वृत्तांत आधारग्रंथांत दिलेले आहेत. कामधेनूच्या अपहरणामुळें उद्भवलेला संग्राम तिच्या पुनःप्राप्तीनंतर संपला असता. अर्जुनपुत्रांनीं

जमदग्नीचा खून केल्यामुळें क्षत्रियसंहाराची घोर प्रतिज्ञा परशुरामाला करावी व तडीला न्यावी लागली. ब्राह्मणांना आर्य संस्कृतीचें प्रतीक मानण्यांत येत असल्यामुळें त्यांना उपसर्ग देणें अक्षम्य. अथर्ववेदांतील पुढील वचनें पहा : " देवांना न मानणारा व लोभी असा जो कोणी ब्राम्हणाला मऊ समजून मारतो त्याचा दोन्ही लोक द्वेष करतात (४. ५. १८. ५);" " ज्याला आपला देह हवा आहे त्यानें अग्नीची तशी ब्राह्मणाची हिंसा करूं नये (४. ५. १८. ६);" कारण "ब्राह्मणाचे बाण तीक्ष्ण असतात (४. ५. १८. ९)" आणि " अपमान करणाराचा ते नाश करतात (४. ५. १८. १५)." परशुरामाचें अवतारकार्य हें ह्या तत्त्वाचें प्रात्यक्षिक आहे.

सह्याद्रीच्या पश्चिमेकडील प्रदेशाचा परशुराम हा देवाधिदेव. कोंकणांत अवर्षण पडतें तेव्हां तेथील शेतकरी व कामकरी पावसासाठीं परशुरामाची आळवणी करतात. कोंकणांत जुलूमजबरदस्तीचा डोंब उसळतो तेव्हां परित्राणासाठीं प्रजा भार्गवरामाची आळवणी करते. कारण परशुराम हा दुर्बलांचा त्राता आणि उन्मत्तांचा संहारकर्ता. दरिद्री, दुर्बल, एकाकी, तपस्वी ब्राह्मणांवर संपन्न, समर्थ, सुसंघटित, उन्मत्त क्षत्रियांनीं केलेल्या जुलमांविरुद्ध झालेल्या पहिल्या उठावणीचा परशुराम हा नेता. क्षत्रिय बहुसंख्य व बलवान् असले तरी ते उन्मत्त झाले असतां त्यांचाही निःपात अल्पसंख्य जमातींतील एक अस्त्रधारी ब्राह्मण करूं शकतो, या सिद्धान्ताचें परशुरामाचें कर्तृत्व हें प्रात्यक्षिक आहे! जमदग्नीचें चरित्र ही ब्राह्मणाच्या सहनशक्तीची परिसीमा, त्याचप्रमाणें परशुरामाचें चरित्र ही ब्राह्मणाच्या प्रतिकारशक्तीची परिसीमा! संसारापासून निवृत्त झालेल्या व ब्रह्मकर्मांत निमग्न असलेल्या जमदग्नीचा अरण्यांतील आश्रम अग्नीचें भक्ष्य होऊं शकतो, त्याचप्रमाणें राजकारणांत कर्तृत्वानें विख्यात व युद्धकर्मांत प्रवीण असलेल्या क्षत्रियांची तटबंदीची राजधानी ही भस्मसात् व नामशेष होऊं शकते, हें परशुरामानेंच प्रत्ययास आणून दिलें! नर्मदेचाही प्रचंड प्रवाह थोपवून धरण्याचें व समुद्रांत आवर्त निर्माण करण्याचें सामर्थ्य ज्याच्या बाहूंत आहे व ज्यानें सर्व ज्ञात शस्त्रास्त्रें धारण केलेलीं

आहेत अशा विख्यात व प्रतापी क्षत्रियाग्रणी कार्तवीर्यार्जुनाचे सहस्रही हात परशुरामासारख्या अज्ञात व तपस्वी, राजकीय स्पर्धाक्षेत्रापासून अलिप्त अशा ब्राह्मणाग्रणीनें एका हातानें व परशूसारख्या मामुली हत्यारानें उतरले. नाग, कैवर्तक इत्यादि आदिवासी जमातींनीं आपल्या स्थानिक पुरोहितांच्या नेतृत्वा-खालीं क्षत्रियसंहारकार्यात परशुरामाशीं सहकार्य केलें; अनेक पुत्र व माण्डलिक ह्यांचें साहाय्य आणि अनेक अक्षौहिणींचें सैन्य यांहीं सज्ज असलेल्या अव्वल दर्जाच्या राजसत्तेचा उच्छेद एका पुरुषोत्तमानें प्राण-पणानें लढणाऱ्या मूठभर अनुयायांच्या मदतीनें केला. या घटनेमुळें प्राचीन युद्धशास्त्राचे महत्त्वाचे मूलसिद्धान्त प्रस्थापित झाले, कीं लढाऊ सामर्थ्य केवळ हातांच्या संख्येवर किंवा शस्त्रांच्या वैपुल्यावर अवलंबून नसतें, तें मनगटाच्या कणखरपणावर व इच्छाशक्तीच्या दृढतेवर आणि अनुयायांच्या निष्ठेवर अवलंबून असतें. पहा : विख्यात विक्रमादित्याला अज्ञात शालिवाहनानें नुसत्या सोडग्यानें मारलें; अक्राळविक्राळ अफझल-खानाला शिवाजीनें नुसत्या वाघनखानें गारद केलें. विक्रमादित्याचें सैन्य अफाट, नांवाजलेलें व शस्त्रास्त्रसज्ज होतें; शालिवाहनाचें सैन्य पैठणच्या कुंभारवाड्यांत तयार केलेल्या मातीच्या हत्ती-घोड्यांचें; म्हणजे त्यांचीं तट्टे खुजट, भीमथडी होतीं व सैनिकांची तयारी बेताचाताचीच होती; पण त्यांचा निर्धार दृढ असला पाहिजे. विन्ध्य पर्वताच्या परिसरांत झालेल्या युद्धांत हें दक्षिणी सैन्य नर्मदेच्या पुरांत वाहून गेलें, पण पराभूत होऊन परतलें नाहीं. परशुरामानें अधम क्षत्रियांचा निःपात करावयाचें निश्चित केलें तेव्हां त्यानें असेच सहकारी निवडले, कीं ज्यांचे हातपाय चपळ व मनगटें कणखर आहेत आणि ज्यांचीं अंतःकरणें गंजापासून अलिप्त, पोलादी आहेत. गोदाकिनाऱ्यावर मोहिमांची आंखणी करून परशुरामानें नर्मदातीरावर झडप घातली. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच तेथील उन्मत्त क्षत्रियांचा संहार करून परशुराम व त्याचे साथीदार सह्याद्रीच्या जंगलांत गडप झाले. याप्रमाणें परशुरामानें वेळोवेळीं व जागोजाग एकाएकीं प्रकट होऊन

क्षत्रियसंहाराची प्रतिज्ञा पुरी केली. परशुरामाच्या मोहिमा मराठ्यांच्या दुर्गाश्रयी गनीमी युद्धपद्धतीच्या असाव्यात असें मला वाटतें. याला प्रमाण हरिवंशांत ( विष्णुपर्व : अ. ३९ ) मिळतें. जरासंधाच्या पराक्रमामुळें पराभूत झालेले कृष्ण-संकर्षण हे सह्याद्रीच्या परिसरात संचार करीत असतां त्यांना परशुरामाचें दर्शन घडलें. पुरुषोत्तमानें आपली परिस्थिति परशुरामाला निवेदन केली व सल्ला विचारला. तेव्हां परशुरामानें सांगितलें कीं तुम्ही पर्वतशिखरांवर वनचरांप्रमाणें संचार करून जरासंधाशीं दुर्गयुद्ध करा, म्हणजे विजयी व्हाल ( ६८ ), पर्वतयुध्दांत तो अशक्त ठरेल ( ६९ ) आणि निकराचें युध्द सुरू झालें म्हणजे तुम्हांला योग्य तीं आयुधें प्राप्त ( ७० ) होतील. मला वाटतें, परशुरामाच्या या उद्‌गारांत त्याच्या विशिष्ट युद्धपद्धतीचें सार आहे.

परशुरामाच्या हातीं असलेलें परशु हें आयुध शस्त्रास्त्रांच्या उत्क्रांतींतील विशिष्ट अवस्थेचें द्योतक आहे असें कांहीं विद्वानांचें अनुमान आहे. श्री. माटे ( परशुराम : पृ. ६२–६३ ) सांगतात : "परशुरामाचें युद्धाचें मुख्य आयुध परशु हें होतें. रामायणांत व महाभारतांत जीं शस्त्रास्त्रांचीं अनेक नांवें आलेलीं आहेत, त्यांचे गुणधर्म पाहतां परशु हें आयुध फारच कमी प्रतीचें आहे असें दिसून येतें ... योद्ध्याचें शस्त्रागार कुऱ्हाडीपासून उत्क्रांत होतां होतां धनुर्बाणापर्यंत येऊन ठेपावयास पुष्कळ कालावधि लागलेला असला पाहिजे. दाशरथि राम हा परशुरामाहून निराळा म्हणून दाखवावयाचा असला तर त्याला धनुर्धारी राम म्हणतां येतें. हे दोघेही आपआपल्या काळचे सर्वोत्तम प्रतिनिधि होते. त्यांच्या हातीं असलेलीं आयुधें त्या त्या काळीं सर्वोत्तम होतीं." हें अनुमान उत्क्रांतिशास्त्राच्या सिद्धान्तानुसार समर्थनीय आहे, पण वस्तुस्थितीशीं विसंगत आहे. परशुराम हा केवळ परशुधर नव्हता, धनुर्धरही होता ( वायुः ९१·९१ ; ब्रह्मः १०·५२–५३ ; ब्रह्माण्डः ३·६६·६२–६३ ; हरिवंशः २७·१४५५ ) आणि त्यानें रथारूढ होऊन शरयुद्धें केलीं, असे उल्लेख महाभारतांतही जागोजाग आढळतात. भीष्मानें परशुरामाचा उल्लेख धनुर्धारी असाच केलेला ( १·९८·३ ) आहे. दुर्योधन व भीम हे गदा हें प्रागैतिहासिक आयुध

वापरतात आणि अर्जुन धनुष्यबाण वापरतो; कृष्ण सुदर्शनाच्या वेगावर विसंबतो आणि बळराम हातीं नांगर घेऊन युद्ध करतो. ज्याचें हत्यार त्याला. परशुरामाचा परशु प्रासादिक होता. प्रत्यक्ष शंकरानें हा दिव्य परशु जामदग्न्याला दिलेला होता. परशुराम हा शंकरापाशीं धनुर्वेदाचें शिक्षण घेत असतां देवांचें दैत्यांशीं युद्ध जुंपलें. देवांच्या विनंतीवरून शंकरानें दैत्यसंहाराची कामगिरी परशुरामावर सोंपविली. भार्गवरामानें साध्या शस्त्रानें आजिंक्य असुरांचा पराभव केला. म्हणून प्रसन्न होऊन शंकरानें दिव्य परशु त्याला अर्पण केला, अशी कथा कर्णपर्वांत (अ. २५) सांगितलेली आहे. ह्या परशूचें तेज अग्नीच्या लोळासारखें होतें, त्याची धार अखंडित व गति अकुंठित होती. धनुष्यबाण, भाला, खड्ग व परशु या हत्यारांची योजना युद्धांत शत्रूशीं असलेल्या अंतरावर अवलंबून असते. छातीला छाती भिडवून लढतांना तोकडी तरवार किंवा आंखूड दांड्याचा परशु हींच आयुधें कामास येतात. पंचहत्यारांनीं सज्ज होऊन वावरणें अशक्य असतें तेव्हां परशूसारखें सुटसुटीत हत्यारच कामास येतें. क्षत्रियसंहारासाठीं परशुरामानें परशु हें आयुध धारण केलें; कारण तत्कालीन परिस्थिति आणि परशुरामानें अवलंबिलेली विशिष्ट युद्धपद्धति.

पुराणरचनाकालांत परशुरामाला विष्णूच्या दशावतारांत व सप्त चिरंजीवांत स्थान मिळालें. पुरुषोत्तमालाही कृतकृत्य वाटावें असा हा दर्जा; पण बिचारा परशुराम, किती दुर्दैवी! पुराणांत सात चिरंजीवांची यादी आढळते ती अशी: "अश्वत्थामा बलिर्व्यासो हनुमांश्च बिभीषणः। कृपः परशुरामश्च सप्तैते चिरंजीविनः॥" दशावतारांपैकीं बाकीचे सारे मर्त्य आहेत. परशुराम हा एकटाच चिरंजीव आहे. या सात महापुरुषांना एका सूत्रांत कां गोंवलें? त्यांच्यांत साधर्म्य काय आहे? श्री. माटे (परशुराम: पृ. ४७–४९) सांगतात: "हे सातही लोक निरनिराळ्या अवतारकालांत भेटतात, इतिहासपुराणांत त्यांच्या कर्तबगारीचा उल्लेख पुष्कळदां झालेला, पण त्यांचा अंत शेवटीं कसा झाला हें सांगितलेलें नाहीं. यांचें पुढें काय झालें हें कळत नाहीं, म्हणून चिरंजीव हें विशेषण त्यांना लागलें.

हा वाङ्मयसंकेत असावा असें दिसतें." हें युक्तिसिद्ध अनुमान तर्कशुद्ध आहे. हे सातही चिरंजीव दुर्दैवी. त्यांच्या चरित्रांवरून त्यांच्या जीवनाची विफलता कमी-अधिक प्रमाणांत दृष्टोत्पत्तीस येते. अश्वत्थामा व कृपाचार्य हे पाण्डवांचे चहाते; पण कौरवांचे आश्रित; भारतीय युद्धांत त्यांना इमानासाठीं पाण्डवांचा संहार करावा लागला. चिरंजीव अश्वत्थामा महारोगानें ग्रस्त झालेला अरण्यांतून एकलकोंडा भटकत आहे. बळी हा दैत्यांचा राजा व विष्णूचा भक्त; देवांनाही अजिंक्य झाला, म्हणून विष्णूनेंच त्याला राज्यभ्रष्ट केलें; आतां पाताळांत बायकांत फांसे खेळत बसला आहे. व्यास वेदविद्यापारंगत; यानें भारत लिहिलें, त्याचें श्रेय वैशंपायनाला मिळालें. यानें आठ व्याकरणे व अठरा पुराणें लिहिलीं; पण भाविष्यपुराण लिहिलें तेव्हां श्रोत्यांचे अभावीं त्यानें तें स्वतःलाच ऐकाविलें! चिरंजीव झाल्यानंतर बिभीषणाला रामेश्वराजवळ द्रविडांनीं मरेपर्यंत मारहाण केली, पण हा मेला नाहीं! हनुमान आणि परशुराम हे मात्र सह्याद्रीला सामर्थ्य व चैतन्य देत संचार करीत आहेत. तसें पाहिलें तर परशुराम हाही दुर्दैवीच. मात्र त्याच्या दुर्दैवांतही त्याचें अद्वितीयत्व समाविष्ट झालेलें आहे. पितृभक्तीमुळें मातृहत्येचें पाप त्याच्या पदरीं पडलें आणि पितृभक्तीबद्दल कीर्ति मात्र गाजली केवळ वनवास पत्करणाऱ्या रामचंद्राची! भारतीय परंपरेला परशुराम हा एकच एक मातृहंता ज्ञात आहे; असें आहे तरीही आजही परशुरामाचें चिरंजीव अस्तित्व कोणाला जाणवत असेल व त्याच्या माहात्म्याला कोठें सर्वमान्यता असेल तर ती ज्या भागांतील समाज-व्यवस्था मातृगोत्रप्रधान आहे तेथेंच! पितृहत्येमुळें परशुरामाचा त्वेष शुभ्रोष्णकोटीप्रत पोंचणें सहाजिक आहे; पण परशुरामानें क्षत्रिय-संहाराची प्रतिज्ञा केली ती केवळ मातृभक्तीमुळें, मातेच्या सांत्वना-साठीं! रेणुका ही क्षत्रियकन्या होती; कृत्या होती; साधारण आहुतीनें तिचें समाधान अशक्य होतें; म्हणूनच परशुरामाला महासंहार करावा लागला.

परशुरामानें केला त्याहून अधिक क्षत्रियांचा संहार क्षत्रियांनींच एकेका महायुध्दांत केलेला आहे. तरीही ह्या हिंसकांबद्दल कोणी घृणा

प्रकट केलेली नाहीं. कारण युध्द हा क्षत्रियांचा धर्म असल्यामुळें हिंसा हा त्यांचा हक्क आहे. भारतीय युद्धांतील हिंसेला तर प्रत्यक्ष श्रीकृष्णाची प्रेरणा होती. दुःशासनाची छाती फोडून भीम त्याचें रक्त प्याला व रक्तानें माखलेल्या हातांनीं त्यानें द्रौपदीची वेणी घातली ; उघडपणें अधर्मयुध्द करून भीमानें दुर्योधनाची मांडी फोडली व त्याच्या डोक्यांत लाथ घातली. भीमाच्या या भिषण क्रौर्याचें आपण समर्थनही करतों. मग परशुरामानें केलेल्या संहाराचें शल्य कां डांचतें ? कारण परशुराम हा ब्राह्मण होता आणि भारतीय आर्य समाजांतही ब्राह्मण हे आरंभापासूनच अल्पसंख्य होते. श्री. कालेलकर ( जिवंत व्रतोत्सव : १०) सांगतात : “ परशुराम ब्राम्हण असूनसुद्धां त्यानें मन्यूला मोकळीक देऊन शरीरबळाचाच अवलंब केला ... क्षत्रिय हा रक्षणासाठीं आहे; तोच जेव्हां प्रजाभक्षक बनतो तेव्हां प्रजेचें रक्षण कोण करणार ? परशुरामाला वाटलें कीं क्षत्रियाचा शास्ता ब्राम्हण आहे. गोष्ट खरी, पण क्षत्रियाला शासन करतांना ब्राम्हणानें आपलें ब्राम्हण्य मात्र सोडतां कामा नये.” मग त्यानें काय करावयाला हवें होतें ? सत्याग्रह. तो कसा ? भगवान् बुद्ध जाणें ! ब्राह्मणांचा क्षत्रियांबरोबरचा संघर्ष मुळापासून धर्मकृत्यांतील अग्रस्थानाबद्दल होता; तोंवर त्यांचें वर्चस्व क्षत्रियांनीं कसेंबसें सहन केलें. शास्त्रधारी ब्राह्मणांनीं शस्त्र धारण करून आपल्या राखीव क्षेत्रांत पदार्पण करावें व आपला पराभव करावा हें क्षत्रियांना सहन झालें नाहीं. परशुरामानें क्षत्रियसंहार केला म्हणून क्षत्रिय त्याचें पूजन करीत नाहींत आणि क्षत्रिय बहुसंख्य म्हणून त्यांच्या धास्तीनें ब्राह्मणही त्याचें पूजन करीत नाहींत. नामशेष ब्रह्मदेवाहूनही कमी मंदिरें चिचाऱ्याच्या वांट्याला आलेलीं आहेत. त्याची ही अवहेलना उत्तरकालीन आहे असेंही नाहीं. प्रतिज्ञापूर्तीचें उपफल म्हणून प्राप्त झालेली पृथ्वी संचित संपत्तीसह परशुरामानें यज्ञदक्षिणा म्हणून कश्यपाला दान दिली. कश्यपानें पृथ्वीवर धर्मराज्य प्रस्थापित करावें एवढीच त्याची इच्छा होती ; पण परशुरामाच्या धास्तीनें क्षत्रिय प्रकट होईनात आणि त्यांच्या अभावीं कश्यपाला पृथ्वीचें धारण करतां येईना; म्हणून दान दिलेली पृथ्वी सोडून जाण्याबद्दल कश्यपानें त्याला

निक्षून बजावलें; तेव्हांच आपल्याबद्दलची वर्तमान समाजाची वृत्ति परशुरामाच्या प्रत्ययाला आली. उद्विग्न अंतःकरणानें त्यानें देशत्याग केला आणि अपरान्तांत विधायक कार्य सुरू केलें.

एकूण परशुरामाचें जीवन विफल झालें असा निष्कर्ष काढावयाचा कीं काय? नाहीं. परशुरामाचें जीवित विफल झालें नाहीं. परशुराम उसळून उठला म्हणून ब्राह्मण्य जिवंत राहिलें, ब्राह्मणाला अभिमानानें जीवन जगणें शक्य झालें आणि ब्राह्मणाला समाजव्यवस्थेंत व क्षत्रियाला राज्यव्यवस्थेंत अग्रस्थानें प्राप्त झालीं. एवढेंच नव्हे, परशुरामामुळेंच आर्यावर्तांत अभिनव राजनीति उत्क्रांत झाली. राज्यधर्म व धर्मराज्य यांचा समन्वय झाला. परशुरामाच्या कार्यामुळेंच रामराज्याची कल्पना निर्माण झाली व स्थापना शक्य झाली. अक्षय्यतृतीयेच्या निमित्तानें ब्राह्मण-क्षत्रिय परशुराम व क्षत्रिय-ब्राम्हण बुद्ध यांची तुलना करतांना श्री. कालेलकर (पूर्वोक्त : पृ. ४८) सांगतात : " परशुरामामुळें साम्राज्याची कल्पना अुद्भवली. साम्राज्याच्या कल्पनेनें दिग्विजयाचा मोह उत्पन्न केला आणि दिग्विजयाची कल्पना म्हणजे निरंतर विग्रह ! " अवैरनिष्ठेच्या प्रचारार्थ सद्धेतूनें सत्पुरुषानें केलेलें असलें तरी हें विधान साफ खोटें आहे. परशुरामाची उठावणी साम्राज्यविरोधी होती. अनुमानसिद्ध ऐतिहासिक कालांतील पहिल्या ज्ञात साम्राज्याचा परशुरामानेंच विध्वंस केलेला आहे. उलटपक्षीं बुद्धधर्म हाच अनियंत्रित राजसत्तेला व साम्राज्यस्थापनेला पोषक आहे ( Ancient India : Paul Masson Oursel : p. 93-4 ). राजसत्तेवरही नियंत्रण ठेवण्याचें सामर्थ्य असलेल्या सर्व प्राचीन सामाजिक व धार्मिक संस्था व संकेत बुद्धधर्मामुळें नष्ट झाले. यामुळेंच प्रथम स्वकीयांचीं व नंतर परकीयांचीं साम्राज्यें हिंदुस्थानांत स्थापन होऊं शकलीं. पतंजलीच्या प्रेरणेनें शुंगसातवाहनांनीं अश्वमेधपुनरुद्धार युग सुरू केलें. तेव्हांपासून परकीयांच्या आक्रमणाला पायबंद बसला. क्षत्रियसंहार पुरा झाल्यानंतर त्यानें आपलें लक्ष दलित जमातींच्या उध्दारावर केंद्रित केलें. अपरान्तांतील अनार्य व त्यांचे स्थानिक पुरोहित यांच्या आर्यीकरणाचा पायंडा परशुरामानेंच पाडला. त्यानें अपरान्ताचा प्रदेश कृषिकर्माला योग्य केला आणि जागोजाग आपल्या

अनुयायांच्या व निर्वासितांच्या वसाहती स्थापन केल्या. त्यानें क्षत्रियांच्या दर्पाचें मर्दन केलें, त्याचप्रमाणें ब्राह्मणाच्या दर्पाचें दमन केलें. एकूण एका कालखण्डांत आर्यावर्तातील जमातींच्या एकीकरणाला विरोधक अशा शक्ति नष्ट करून आणि पोषक अशा शक्ति संघटित करून परशुरामानें संस्कृतिसंवर्धनाचें विधायक कार्य केलें. या दृष्टीनें पाहिलें असतां परशुरामाचें कार्य दशावतारांत सर्वश्रेष्ठ दर्जाचें आहे असें दिसून येतें.

## सह्याद्रीचा पिंड :

सह्याद्रीचा पिंड संमिश्र आहे.

सह्याद्रीची खालाटी हें निर्वासितांचें आश्रयस्थान आहे आणि वलाटी हें आदिवासींचें आद्यस्थान आहे.

माहीच्या मुखापासून कन्याकुमारीच्या भूशिरापर्यंतच्या प्रदेशांत, अपरान्ताला मूलतः परक्या, पण दीर्घकालीन निवासामुळें हेंच आपलें मूलस्थान आहे असें मानीत असलेल्या, निर्वासितांच्या लहानमोठ्या वसाहती वसलेल्या आहेत : औदिच्य, भार्गव, नागर, पारशी, माध्यंदिन, पाठारे प्रभु, कायस्थ प्रभु, कऱ्हाडे, चित्पावन, सारस्वत, हविक व नंबुद्री या मुख्यत्वेंकरून बुद्धिजीवी किंवा परोपजीवी लहान लहान जमाती अपरान्तांत हारीनें स्थायिक झालेल्या आहेत. यांपैकीं पारशी व माध्यंदिन यांच्या वसाहती इतिहासाच्या आठवणींतल्या आहेत, इतरांच्या पुरातन आहेत. या जमातींचा विस्तार इतका मर्यादित आहे कीं एका जिल्ह्यांतल्या जमातीचा शेजारच्या दुसऱ्या जिल्ह्यांत मागमूसहीं लागत नाहीं आणि देशांतील किंवा प्रादेशिक लोकसंख्येच्या मानानें त्यांचीं प्रमाणेंही काढतां येत नाहींत. कोंकणांत त्यांच्या जोडीनें कुणबी, दुबळे, कोंकणी, आगरी व भंडारी या श्रमजीवि जमातींच्या वसाहती आहेत ; त्यांपैकीं कुणबी सर्वत्र आहेत आणि बाकीच्या जमाती स्थानिक आहेत. पहिल्या यादींत नमूद केलेल्यांहून या जमातींचा विस्तार मोठा आहे. सह्याद्रीच्या वलाटींत भिल्ल, कोळी, कातकरी, वारली व ठाकूर

या आदिवासी वन्य जमातींची वस्ती आहे. सातपुड्यालगतच्या सह्याद्रीच्या उत्तरभागांत भिल्ल आणि मध्यभागांत कोळी यांचें प्राबल्य आहे; आणि ठाणें व कुलाबा या जिल्ह्यांत कातकरी, ठाकूर व वारली यांचें.

आणि म्हणूनच वर सांगितलें कीं सह्याद्रीचा पिंड संमिश्र आहे, संकीर्ण आहे. जी अवस्था सह्याद्रीच्या खालाटीची व वलाटीची तीच सह्याद्रीच्या पठाराची व समुच्चयेंकरून महाराष्ट्राची. मराठे व महार या जमाती मात्र सर्वत्र आढळतात.

महाराष्ट्राच्या प्रत्येक पोटभागांत मराठा जमात बहुसंख्य आहे आणि वर्गीकृत जमातींपैकीं महार हेही महाराष्ट्राच्या प्रत्येक विभागांत विचारांत घेण्याएवढ्या प्रमाणांत आढळून येतात. स्थूल मानानें पाहिलें असतां महाराष्ट्र ही भूमि मराठे व महार यांचीच आहे. म्हणूनच महाराष्ट्र ही प्रादेशिक संज्ञा यांपैकीं कोणत्या जमातीच्या आद्य अस्तित्वावरून निर्माण झालेली आहे याविषयीं विद्वानांमध्यें मतभेद झालेला आहे. सह्याद्रीचा घाटमाथा ही भूमि अशाच स्थूल मानानें मुख्यतः भिल्ल व कोळी यांची आहे.

सरकारी शिरगणतींत मराठ्यांचें वर्गीकरण चार सदरांत केलेलें असतें : मराठा, मराठा कुणबी, लेवा कुणबी आणि कुळवाडी. मराठ्यांच्या आक्रमक किंवा अतिक्रामक उठावणीच्या अग्रभागीं असलेले माझे एक स्नेही सांगतात कीं हे सारे एकच. कुणबी व लेवा या पोटजमाती महाराष्ट्राप्रमाणें गुजरातेंतही आढळतात. रेवा म्हणजे नर्मदा. नर्मदेच्या खोऱ्यांत शेती करतात ते लेवा कुणबी. कुणबी म्हणजे कोणी बी, कोणीही; मुण्डासें घालतो तो कुणबी आणि समला सोडतो तो मराठा; या झाल्या ग्राम्य व्याख्या. श्री. देशमुख सांगतात ( क्षत्रियांचा इतिहास : भाग २ : पृ. ८८ ) 'कुलं बीजं' सर्व कुळांचें बीज अशी कुणबी या शब्दाची व्युत्पत्ति आहे. यांतील गर्भित अर्थ स्पष्ट सांगण्याची जरुरीच नाहीं. पण्डित भगवानलाल इंद्रजी ( Early Gujarat : p. 4 ) सांगतात कीं हा शब्द कुटुम्बिन् = गृहस्थ = घरदार, शेतवाडी धारण करणारा, या संस्कृत शब्दापासून सिद्ध झालेला आहे. कुळवाडी हा शब्द

कुलवृत्ति=कृषिकर्म करणारा, यापासून सिद्ध झालेला आहे असें महाराष्ट्र शब्दकोशांत सांगितलें आहे. कुल म्हणजे दोन नांगरांनीं नांगरतां येईल एवढी जमीन ; एवढी जमीन कसतो तो कुळवाडी. मराठा जमातींची राजकीय जागृति झाली तेव्हांपासून या साऱ्या पोटजमाती स्वतःला मराठा म्हणवून घेऊं लागल्या आहेत. जातीयता नष्ट झाली असा मात्र याचा अर्थ नाहीं. पूर्वीच्या खानेसुमारीच्या अहवालावरून दिसतें कीं मराठ्यांची सर्वांत अधिक संख्या सातारा जिल्ह्यांत असून त्याच्या खालोखाल पुणें व नगर या जिल्ह्यांत आहे. कुळवाडी व कुणबी यांची महाराष्ट्रांतील मुख्य वस्ती रत्नागिरी जिल्ह्यांत आहे. महारांची सर्वांत जास्त वस्ती सातारा व रत्नागिरी या जिल्ह्यांत आहे. देशावर दक्षिणेकडे जावें तसे महार कमी व मांग अधिक आढळतात. मुंबई इलाख्यांतील सर्व मराठ्यांचें प्रमाण २२·४% आणि महारांचें ४% बसतें. मुंबई, नगर व उपनगरें, मध्यभाग आणि बेळगांव, कुलाबा व रत्नागिरी या मुंबई इलाख्यांतील महाराष्ट्र भागांत मराठ्यांचें प्रमाण ३३·६% आणि महारांचें ६% बसतें.

महाराष्ट्र या संज्ञेचा पहिला ज्ञात उल्लेख वररुचीच्या व्याकरणांत महाराष्ट्री भाषेला अनुलक्षून केलेला आहे ; मात्र वररुचीचा काल विवाद्य आहे. अशोकाच्या शिलाशासनांत रिस्टिक ऊर्फ राठिक यांचा उल्लेख आलेला आहे. हे महाराष्ट्रीयांचे आद्य ज्ञात पूर्वज. ही संज्ञा महाराष्ट्रीयांना अनुलक्षून वापरलेली आहे ; आणि त्यांच्या पुढाऱ्यांनाही ; प्रथम लोकनियुक्त आणि नंतर कुलक्रमागत. सातवाहन कालारंभीं सत्तेला स्थैर्य आल्यानंतर महाराष्ट्रीयांच्या या पुढाऱ्यांनीं महारठि हें अभिधान धारण केलें. यांचे शिलालेख मुख्यत्वेंकरून घाटमाथ्यावर आढळतात. महारठि हे सातवाहनांचे माण्डलिक होते आणि स्वतःचीं नाणीं पाडण्याइतके स्वतंत्र होते. महारठि या शब्दाचें महारथि हें परिचित संस्कृतीकरण गैरसमजुतीवर व पूर्वग्रहावर आधारलेलें आहे. रठ हें राष्ट्र ह्या संस्कृत शब्दाचें प्राकृत रूप आहे. या अर्थानें व या रूपांत हा शब्द सातवाहनांच्या पाण्डवलेण्यांतील शिलालेखांत वापरलेला आहेही. महाराष्ट्राच्या वसाहतीकरणाचे कामीं महारठींनीं पुढाकार घेतल्यामुळें त्यांनीं

वसविलेल्या प्रदेशाला महाराष्ट्र हें नांव प्राप्त झालें. महाराष्ट्री ही त्यांची भाषा होतीच. उल्लेखित महारठींची संख्या आणि त्यांचें कार्यक्षेत्र हीं विचारांत घेतलीं असतां केवळ त्यांच्याचपासून मराठा जमातीचा संभव झालेला असणें संभवनीय वाटत नाहीं. महाराष्ट्र ही संज्ञाच सर्वसंग्राहक आहे; म्हणूनच भाषा, प्रदेश व रहिवासी या सर्वांना अनुलक्षून ती वापरण्यांत येते. अशा सर्वसंग्राहकत्वामुळेंच मराठा जमातीचा आहे एवढा विस्तार झालेला आहे.

मुंबई इलाख्यांत सर्व पोटजाती मिळून ब्राह्मणांची संख्या ९१८१२० आहे. एकुण लोकसंख्येंत त्यांचें प्रमाण ४·४%, हिंदु लोकसंख्येंत ५·५% आणि स्पृश्य हिंदूंत ६·२% एवढें आहे. नागर ब्राह्मणांची एकूण संख्या ९०२० असून त्यांपैकीं निम्मे फक्त अहमदाबाद जिल्ह्यांत आहेत. ब्राह्मणांत चित्पावन २·६% एवढेच आहेत; त्यांपैकीं ४५% रत्नागिरी व २६% पुणें जिल्ह्यांत स्थायिक आहेत. सारस्वतांपैकीं ३२% कानडा जिल्ह्यात आणि ३४% मुंबईत आहेत. जातिसंस्थेच्या निर्मितीला व अस्तित्वाला ब्राह्मण जबाबदार आहेत असें गृहीत धरलें तरी त्यांची वृत्ति जातीय नाहीं. त्याना राष्ट्राच्या भवितव्याबद्दल तळमळ आहे व राजकीय मतें आहेत आणि त्यांची प्रादेशिक विभागणी झालेली आहे व त्यांना स्वतंत्र मतदार संघ नाहींत. यामुळें संख्यासामर्थ्यावर अधिष्ठित असलेल्या लोकशाहींत आतां त्यांना समसंख्य महारांइतकेंही महत्त्व राहिलेलें नाहीं!

सह्याद्रि हा निर्वासितांचा आश्रयदाता आहे असें वर सांगितलें. वर नमूद केलेल्या जातीं–जमातींनीं सह्याद्रीचा आश्रय कधीं केला? आणि कां? व त्याचें फलित त्यांना व त्यांना निवारा देणाऱ्या देशाला काय मिळालें?

शूर्पारकांत पळशे या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या यजुर्वेदी ब्राह्मणांची वस्ती आहे. यादवांचें देवगिरीचें राज्य मुसलमानांनीं बुडविलें तेव्हां प्रतापबिंब यादवानें अपरान्तांत महिकावतीस नवें स्वतंत्र राज्य स्थापन केलें. पैठणहून बागलाणांतून अनहिलवाड्यावरून इकडे येतांना त्यानें सोमवंशी क्षत्रिय पाठारे व यजुर्वेदी ब्राह्मण बरोबर आणले

आणि त्यांच्या योगक्षेमाची तजवीज केली, असा इतिहास आहे. पाठारे हे प्रतीहार. मुसलमानांनीं कनोज काबीज केल्यानंतर ते दक्षिणेंत आले व यादवांच्या सैन्यांत सामील झाले. देवगिरीच्या पाडावानंतर गंगथडी सोडून ते अपरान्तात स्थायिक झाले. सह्याद्रिखंडांत सांगितलें आहे :

पैठणे पत्तने शप्त्वा मया कोपवशात्किल
पाठारीयाः प्रसिद्धा ये पैठणाख्या भवंतु ते

या उल्लेखावरून सह्याद्रिखण्डाच्या रचनेचा काल ठरवितां येतो. शूर्पारकाचें फिरंगाण होण्याचा प्रसंग पातला तेव्हां या उभयतांनींच नेट धरून चिमाजीअप्पाच्या नेतृत्वाखालीं मराठ्यांना वसईवर आणलें.

कुलाबा, ठाणें व पुणें या जिल्ह्यांत कायस्थ-प्रभूंची वसाहत आहे. त्यांचीं कुलदैवतें पुणें जिल्ह्यांत आणि वतनें मावळांत आहेत. यावरून ते पठारावरून अपरान्तांत उतरले असावे असें वाटतें. परशुरामानें ज्याचा उच्छेद केला त्या हैहय कुळांतील चंद्रसेन हा आपला मूळ पुरुष, त्याच्या वंशाचें रक्षण दाल्भ्यऋषीनें केलें आणि दाक्षिणेंतील गुप्त सम्राटांचे सामन्त जे शिलाहार त्यांच्या राज्यांत सम्राटांचे प्रतिनिधि म्हणून अनेक प्रभु कुलें आलेलीं असावींत असा प्रभु संशोधकांचा कयास आहे. ( Ethnological Notes on Chandraseniya Kayastha Prabhu: p. 16 ). या परंपरेंतील बरेच दुवे ढिले आहेत. कायस्थ प्रभूंचें कुल हैहय हें असतें तर त्यांनीं परशुरामाची माता रेणुका एकवीरा हिचा कुलदेवता म्हणून स्वीकार केला नसता. शिलाहार हें कुल प्राचीन नसून मध्ययुगीन आहे आणि हे गुप्त सम्राटांचे सामन्त कधींही नव्हते. यांचे सम्राट दाक्षिणीच होते. सम्राटांचे प्रतिनिधि सामन्तांच्या राज्यांत जमावानें जात नाहींत किंवा स्थायिक होत नाहींत. महाराष्ट्रीय कायस्थ हे मौर्य कालांत महाराष्ट्रांत आलेले असावेत असा डॉ. केतकरांचा अंदाज आहे. तें कसेंही असलें तरी ज्या अर्थी शिलाहारकालीन लेखांत प्रभूंचे राजकीय अधिकारधारी असे उल्लेख आढळतात त्या अर्थी त्या सुमारास प्रभु जमात प्रबल झाली असावी असें मानण्यास प्रत्यवाय

नाहीं. अव्वल मराठशाहींत प्रभूंनीं केलेलीं महत्कार्यें तर इतिहासांत तळपत आहेत.

सुरत व अहमदाबाद या जिल्ह्यांत नागर ब्राह्मणांच्या वसाहती आहेत. देवनागरी लिपी आपण निर्माण केली असा त्यांचा दावा आहे. ते शिक्षणांत पुढारलेले असून सुधारणेच्या अग्रस्थानीं आहेत. दक्षिण कोंकणांत चित्पावनांची वसाहत आहे. नागर व चित्पावन या एकाच जमातीच्या दोन वसाहती आहेत असें गुजराती संशोधकांचें म्हणणें आहे. या दोन्ही जमाती अल्पसंख्य आहेत, सुशिक्षित व सुदर्शन आहेत आणि नागरांबद्दल गुजरात्यांना वाटतो तसाच चित्पावनांबद्दल मराठ्यांना द्वेष वाटतो, एवढ्यापुरतेंच त्यांच्यामध्यें साम्य आहे. चित्पावनांप्रमाणें नागर लढाऊ वृत्तीचे नाहींत ; नागरांच्या कर्तृत्वाला राष्ट्रीयत्वाची वा स्वार्थ-त्यागाची धार नाहीं. महाराष्ट्राच्या शत्रूंचा उच्छेद करण्याचें महत्कार्य मराठ्यांच्या सहकार्यानें चित्पावनांनीं केलें, तर गुजरातच्या शत्रूंना आवाहन करण्याचें दुष्कृत्य नागरांनीं केलें. नागर केवळ टंकधारी आहेत, चित्पावन खड्गधारीही आहेत. या वृत्तिभिन्नत्वामुळें या जमाती एका वंशाच्या असतील असे वाटत नाहीं.

चित्पावनांची जमात कोंकणांत केव्हां स्थायिक झाली अगर हे लोक कोठून आले याबद्दल निश्चित ऐतिहासिक पुरावा नाहीं. दंतकथा व व्युत्पत्ति मात्र अनेक आहेत. कोणी सांगतात, हे मूळचे कोळी, परशुरामानें त्यांना ब्राह्मण्य दिलें. जातिरिवाजानुसार वागणारे चित्पावन मत्स्याहारी नाहींत किंवा दर्यावर्दीही नाहींत. कोणी सांगतात, परशुरामानें समुद्रांतून वहात आलेलीं चौदा प्रेतें सजीव केलीं, त्यांना ब्राह्मण्य दिलें, आंबे जोगाई येथून चौदा स्त्रिया आणवून या नवब्राह्मणांशीं त्यांचीं लग्नें लावून दिलीं, त्यांचा हा विस्तार. माझे एक यजुर्वेदी स्नेही आहेत. त्यांना ही दंतकथा प्रेतांच्या तपशिलापुरती खरी वाटते; कारण, त्यांच्या मतें चित्पावनांच्या चेहऱ्यांवर प्रेताची अवकळा दिसते ! सह्याद्रि-खण्डांत त्यांना बर्बर म्हटलेलें आहे. चित्पावन म्हणजे जिप्तवान, इजिप्शियन, असें श्री. मण्डलिकांचें मत होतें. कोणी म्हणतात, चैत्यपावन, बौद्ध धर्माचा स्वीकार केल्यामुळें पावन झालेले. हें खरें दिसत नाहीं ;

कारण चित्पावनांची वसाहत आहे त्या भागांत बौद्ध अवशेष आढळत नाहींत. चित्तपोळण–इतरांचीं चित्तें पोळतात ते. चितपोळण–चितीचें वाळवंट, स्मशान. यांवरून चिपळूण हें स्थलनाम व चित्पावन हें ज्ञातिनाम सिद्ध झालें असावें, असें श्री. साने यांचें मत होतें. चित्–बुद्धीचे–पुलीन, विद्वद्‌भूमीचे रहिवासी, असेंही त्यांचें वैकल्पिक मत होतें. चित्य, चिती व चित्याग्नि म्हणजे तीन वार औरस–चौरस नांगरलेल्या जमिनीवर विटा मांडून पक्ष्यांच्या बाह्यरेषा दाखविलेल्या भागांत प्रज्वलित केलेला पवित्र अग्नि; अशा अग्नीची पूजा करीत असल्यामुळें जे पावन, पवित्र, निष्पाप झाले ते चित्पावन; त्यांना हें अभिधान समकालीन नागानीं दिलेलें असावें; असा श्री. राजवाडे यांचा अंदाज होता. पाणिनीनें परशु या जमातीचा उल्लेख केलेला आहे. परशुरामाच्या नेतृत्वाखालीं मध्य आशियांतून असीरियन असुरांच्या धार्मिक जुलमानें त्रस्त झालेली ही जमात हिंदुस्थानांत आली व कोंकणांत स्थायिक झाली, असेंही त्यांचें मत होतें. कोणतीही दंतकथा अगर व्युत्पत्ति ग्राह्य मानली तरी परशुरामाचा किंवा पावन या शब्दाचा संबंध सुटत नाहीं.

रत्नागिरी जिल्ह्यांत कऱ्हाडे ब्राह्मणांची वसाहत आहे. गोमन्तक व कानडा या जिल्ह्यांत सारस्वताची वसाहत आहे आणि कानडा जिल्ह्यांत हविकांची. पैकीं हविकांची महाराष्ट्राच्या संस्कृतीवर छाप पडलेली नसल्यामुळें त्यांच्याबद्दल विचार करण्याचें कारण नाहीं. कऱ्हाडे अल्प-संख्य असले तरी त्यांचें राजकीय कर्तृत्व व विद्वत्ता महाराष्ट्राला परिचित आहेत. सह्याद्रि-खण्डांत सांगितलेलें आहे कीं ह्या जमातीचा मूळ पुरुष गाढवाच्या हाडांपासून (खर + हाड) निर्माण झालेला आहे! सर जेम्स कॅम्पबेल यांचें अनुमान (Census of India : 1911 : VII : Bombay : Part I. p. 246) आहे कीं परशुरामाचा अवतार क्षहरात कुलोत्पन्न नहपान यानें ही जमात निर्माण केली. कऱ्हाड्यांचा श्वेत हूणांशीं असलेला संबंध त्यांच्या मोघे, गुजर वगैरे आडनांवांवरून दिसून येतो, असें त्यांचें म्हणणें आहे. पण क्षहरात वेगळे आणि श्वेत हूण वेगळे. परशुरामाच्या नेतृत्वाखालीं सारस्वत घराणीं दक्षिणेंत आलीं व स्थायिक झालीं. परशुरामाला यज्ञ-

कर्मासाठीं ब्राह्मण मिळेनात म्हणून उत्तर हिंदुस्थानांतून, सरस्वतीच्या कांठावरील प्रदेशांतून त्यानें दहा गौड सारस्वत ब्राह्मण आणले आणि त्यांना गोमन्तकाची भूमि देऊन स्थायिक केलें, अशा दंतकथा आहेत. भार्गवकुलोत्पन्न दधीचपुत्र सारस्वत हा त्यांचा पूर्वज असावा असा माझा तर्क आहे. उत्तर हिंदुस्थानांत बारा वर्षांचा मोठा दुष्काळ पडल्यामुळें चंद्रगुप्त मौर्य आपल्या जैन धर्मगुरूंसह दक्षिणेंत आला, त्या वेळीं सारस्वत इकडे आले असावे, असाही एका संशोधकाचा अंदाज आहे. कदम्बांनीं हविक व सारस्वत ब्राह्मण यज्ञकर्मासाठीं दक्षिणेंत आणले आणि त्यांना आश्रय दिला, अशीही परंपरा आहे. हा सिद्धान्त मान्य करण्याजोगा आहे. महाराष्ट्रीय जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत सारस्वतांनीं नांव गाजविलेलें आहे.

चित्पायन जमातीचे आद्य पुरुष हे परशुरामाच्या क्षत्रिय संहार-कार्यांतले त्याचे सहकारी असावेत असें मला वाटतें. परशुरामाचें सहकार्य हा वर आहे, तसाच शापही आहे. परशुरामाची अघोरी वृत्ति अंशरूपानें चित्पावनांमध्यें अजूनही आहे. प्राचीन किंवा मध्ययुगीन काळांत चित्पावनांना राजाश्रय मिळाला नाहीं. याचें मुख्य कारण त्यांनीं वसाहतीसाठीं निवडलेला अलंघ्य प्रदेश. महाराष्ट्राच्या अर्वाचीन इतिहासावर मात्र चित्पावनांच्या कर्तृत्वाची एवढी छाप आहे कीं मराठेशाहीच्या इतिहासाच्या पेशवाई-कालखण्डाला एका विख्यात इतिहासकारानें ‘ चित्पावन एपिक ’ असें शीर्षक दिलेलें आहे. दुसरा बाजीराव व बाळाजीपंत नातू यांचीं पापें लोकमान्य टिळकांनीं, निदान महात्मा रानडे यांनीं धुऊन काढलेलीं आहेत. असें म्हणावें न म्हणावें तोंच आणखी पापें व पुण्यें नजरेसमोर उभीं राहतात आणि वाचा कुंठित होते! ज्वालामुखींतून उफाळलेल्या तप्त रसासारखी, अजूनही अधूनमधून धगधगणारी, तप्त मार्गी उपद्रवकारक आणि शांत मार्गी मानवी जीवनाला पोषक अशी ही अद्वितीय जमात आहे.

चित्पावनांच्या एका व्युत्पत्तीचा मला अनेक वेळां मोह वाटलेला आहे. मला वाटतें ही संज्ञा क्षत्रपावन या संज्ञेचा अपभ्रंश असावा. साधनांची चिकित्सा करून ही व्युत्पत्ति मीं अद्याप पडताळून पाहिलेली नाहीं.

सह्याद्रीच्या घाटमाथ्यावर व लगतच्या प्रदेशांत मुख्य वस्ती कोळी व भिल्ल या वन्य जमातींची आहे. मुंबई इलाख्यांतील महाराष्ट्राच्या प्रत्येक जिल्ह्यांत कोळयांची वस्ती आहे. कर्नाटकांत कोळी फारसे नाहींतच. मुंबई इलाख्यांत सर्व कोळयांची मिळून संख्या अकरा लक्ष सत्तर हजार असून त्यांपैकीं सात लक्ष अठ्याहत्तर हजार कोळी गुजरातेंत आहेत. मुंबई इलाख्यांत भिल्लांची संख्या सहा लक्ष सात हजार असून त्यांपैकीं सुमारें दोन लाख गुजरातेंत आहेत. गुजरातेंतील त्यांची वस्ती मुख्यत्वेंकरून भडोच व पंचमहाल जिल्ह्यांत आहे. राजपुतान्यांत साडेसहा लक्ष व मध्यहिंदुस्थानांतील संस्थानांत साडेतीन लक्ष अशी भिल्लांची संख्या आहे. यांखेरीज कातकरी, कातवडी, कोंकणी, ठाकूर व वारली या वन्य जमातींची वस्ती सह्याद्रीच्या परिसरांत आहे. यांपैकीं कांहीं जमातींच्या जिल्हावार विभागणीचें कोष्टक पुढें दिलें आहे:—

या कोष्टकावरून दिसून येतें कीं महाराष्ट्रांतील भिल्लांची बहुसंख्या नगर, नाशिक व खानदेश या जिल्ह्यांत आहे आणि कोळयांची बहुसंख्या या आणि ठाणें जिल्ह्यांत आहे. शिरगणतीच्या अहवालांत गुजराती व खानदेशी कोळयांना स्वतंत्र सदरें दिलेलीं आहेत. कोळयांपैकीं सोनकोळी ठाणें, कुलाबा व रत्नागिरी ह्या जिल्ह्यांत आहेत; महादेवकोळी नगर, नाशिक व पुणें जिल्ह्यांत आणि मल्हारकोळी ठाणें जिल्ह्यांत. जव्हार संस्थान मल्हारकोळयांचेंच होतें.

महाभारत व गाथासप्तशति या प्राचीन संस्कृत व प्राकृत ग्रंथांत भिल्लांचे अनेक उल्लेख आलेले आहेत. गाथासप्तशतींतील त्यांचे उल्लेख विन्ध्य पर्वताच्या साहचर्यांत आलेले आहेत. या सुभाषितसंग्रहांत विन्ध्य ही संज्ञा इन्ध्याद्रि पर्वताला अनुलक्षून वापरलेली आहे. रजपूत राजे राज्यारोहणाचे वेळीं भिल्लाच्या रक्ताचा टिळा लावतात. यावरून अनुमान होतें कीं राजपुतान्यांत स्थायिक होते वेळीं रजपुतांनीं भिल्लांचीं राज्यें नष्ट केलीं आणि त्यांच्या कत्तली केल्या. यामुळेंच भिल्लांनीं अरण्यांचा आश्रय केला असावा. माळव्यांतील भिलसा हें ग्रामनाम या जमातीवरूनच पडलेलें असणें संभवनीय आहे. खानदेशांत

## सह्याद्रीच्या परिसरातील आदिवासींची जिल्हावार सख्या.

| वन्य जमात. | मुंबई इलाखा संख्या | पैकीं गुजरातेंत | ठाणें जिल्हा. | कुलाबा जिल्हा. | नाशिक जिल्हा. | खानदेश जिल्हा. | नगर जिल्हा. | पुणें जिल्हा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कातकरी | ६६११६ | ७८ | २२५१३ | ३६१६७ | १५१ | २७ | ८९ | ५८८ |
| कातवडी | १८५४२ | ० | १४४५६ | ३८२ | १०८८ | १०७७ | ३०० | ८७९ |
| कोकणा | ९०१०५ | २० | ९२४८ | ० | ४५९६१ | २९६२६ | ५ | ४३९ |
| कोळी | ११६९५७९ | ७७३२९४ | ६९५०१ | ३०३६ | ११०३८३ | ८४११८ | १३३४० | ३३२५४ |
| ठाकूर | ९९३३६ | ५३१ | २२१६९ | २२१८२ | १८१५१ | ६६१३ | ७०९ | ५३० |
| भिल्ल | ६०७४५८ | १९९८५९ | २१२ | ० | ७७४८४ | ३०२५०१ | २६२७२ | ८०४ |
| वारली | १४२७४० | ४१६ | १२४८४७ | ० | १२०१९ | २० | ० | २ |

त्याची बहुसंख्या आहे. यावरून अनुमान होतें कीं महेश्वरानजीकचा नर्मदेचा उतार ओलांडून भिल्ल दक्षिणेंत आले असावे. मार्गदर्शन व संरक्षण यांच्या मोबदल्यांत प्रवाशांकडून कर वसूल करणें आणि आजूबाजूच्या प्रदेशांत दरोडे घालणें हे भिल्लांचे मुख्य व्यवसाय ; पेंढाऱ्यांच्या धामधुमीच्या काळांत त्यांनीं खानदेशांत कहर केला. त्यांना माणसाळविण्यासाठीं सरकारला नाना प्रकारचे उपाय योजावे लागले. भिल्लांहून कोळी हे मराठी गांवगाड्याला अधिक जवळचे. ब्राह्मण–क्षत्रियांनाही त्यांच्या हातचें पाणी चाले. शालिवाहनाचे पदरीं असलेल्या एका कोळी सरदारानें पंढरपूर गांव वसविलें, अशी दंतकथा आहे. सर्व कोळ्यांत मल्हारकोळी हे उच्च व निर्मळ. मल्हारकोळी व महादेवकोळी यांचें मराठ्यांशीं विशेष साम्य आहे. कदम, जाधव, पवार, शिरके वगैरे मराठा आडनांवें कोळ्यांतही आढळतात. महादेवकोळी स्वातंत्र्यप्रिय, शूर व देखणे असून त्यांच्या स्त्रियांचें सौंदर्य वाखाणण्याजोगें असतें. सह्याद्रीच्या सातमळा, बालाघाट व महादेव या श्रेणींतील घाटमाथ्याला व त्यालगतच्या पठारी भागाला कोळवण असें नांव होतें. या भागांतील डोंगरी किल्ल्यांवर कोळ्यांचा अधिकार होता. दक्षिणेंतील पहिल्या मुसलमान आक्रमकांशीं कोळ्यांनीं केलेलीं निकराचीं युद्धें इतिहासांत नमूद आहेत. यावरून त्यांचें यादव राजवटींतील स्थान समजतें. ‘ बारा बारा जण कोळी, पहिल्या दरवाजाचे गेटकरी ’ या पोवाड्यांतील उल्लेखावरून ( ऐतिहासिक प्रसिद्ध पुरुषांचे पोवाडे : सं. ऑकवर्थ व शाळिग्राम : पृ. ४१ ) त्यांचें मराठी राजवटींतील स्थान समजतें. तरीही कोळी कोणत्याही राजवटीशीं समरस झाले नाहींत. राज्यकर्त्यांना त्यांच्या बंडखोरीचा आणि प्रजेला लूटमारीचा उपद्रव समुद्रावर, कोंकणांत आणि देशावरही भोगावा लागलेला आहे. राज्यकर्त्यांविरुद्ध बंड करतो तो दडपशाहीला तोंड देण्याला तयार असतोच. या न्यायानें कोळ्यांवर वेळोवेळीं जुलूमजबरदस्ती, कैदफांशी झालेली आहे. कुलाबकर आंग्र्यांनीं तर सोनकोळ्यांच्या बायकांवर जोबनपट्टी नांवाचा कर बसविला होता. या छळामुळें कुलाब्याच्या

थळ भागांतील कोळी वस्ती उठवून ठाणें, वेसावें या बाजूकडे रहावयास गेले. आगरी लोकांची मुख्य वस्ती अंबा नदीच्या आसमंतात् आहे. ठाणें व कुलाबा या जिल्ह्यांत त्यांची वस्ती अनुक्रमें सुमारें एक लाख व दीड लाख आहे. आगरी लोकही या भागांत पैठणकडून प्रतापबिंबाबरोबर आले अशी आख्यायिका आहे. आपण गुजरातेंतून उत्तर कोंकणांत आलों असें कातकरी सांगतात. श्री. राजवाडे सांगतात : सध्यांचे डोंगरी कोळी हे पुरातन कोल लोकांचे वंशज आहेत. महाराष्ट्रीसम प्राकृत भाषा घेऊन वारली उत्तरेकडून कोंकणांत शिरला. वरुड नामेंकरून कोणी एक अनार्य जात होती. तिच्या-पासून वारुडकि ऊर्फ वारली ही जात झाली. कातवडी हे सह्याद्रीच्या आसपासच्या प्रदेशांतील अत्यंत जुनाट लोक आहेत. कातवडी हा मराठी अपभ्रंश कृत्तिपट्टिन् ह्या संस्कृत शब्दाचा होणें शक्य आहे. कृत्ति म्हणजे कातडें व पट्ट म्हणजे वस्त्र. कातड्याचें वस्त्र पांघरणारा तो कृत्तिपट्टिन्. ( महिकावतीची बखर : प्रस्तावना : पृ. ८३-४ ) डॉ. विल्सन यांचा अंदाज आहे कीं वारली हे मूळचे वराली, उंचवट्यावर राहणारे. श्री. सावे ( The Warli : P. 4. ) यावरून अनुमान करतात कीं कोंकणच्या एका भागाला प्राचीन काळीं वरालाट अशी संज्ञा होती, ती वारल्यां-वरून पडलेली असणें संभवनीय आहे. कात्यायनाच्या वार्तिकांतील तस्कर हे ठाकर, तेही उत्तरेकडून आले, असा श्री. राजवाडे यांचा कयास आहे. कोंकणांत भंडाऱ्यांची मोठी वस्ती आहे. त्यांचा मुख्य भरणा मुंबई (३५६२९), ठाणें जिल्हा (१५९२१) व रत्नागिरी जिल्हा ( ५३७७४ ) या भागांत आहे. पैठणचे आंध्रभृत्य व गोमंतकाचे कदम्ब या राजवंशांशीं ते दंतकथेच्या आधारानें माण्डलिकीचा संबंध जोडतात. शिवशाहींत भंडाऱ्यांनीं दर्यावर महत्त्वाची कामगिरी केलेली आहे. महाराष्ट्रीय राज्यकर्त्यांचें नौकानयनाकडे दुर्लक्ष झालें तेव्हांपासून हे लोक मद्यनिर्मितीच्या मार्गाला लागले. अलीकडे स्थानिक मद्यनिर्मिति बंद झाल्यामुळें त्यांचा तोही धंदा नष्ट झालेला आहे आणि बेकारीमुळें

ते बेकायदेशीर मार्गांचा अवलंब करतील अशी धास्तीची परिस्थिति निर्माण झालेली आहे.

मुंबई ते पुणें व मुंबई ते नाशिक या आगगाडीच्या आणि या व मुंबई ते रत्नागिरी या तेलगाडीच्या प्रवासांत आजूबाजूला नजर टाकली तर यांपैकीं बहुतेक जमातींचे प्रतिनिधि दृष्टीस पडतात आणि थोडीबहुत सवड मिळाली तर त्यांच्याबद्दलची माहिती मिळवितां येते. एवढ्या थोड्या अंतरांत व काळांत आपण संस्कृतीच्या किती थरांतून व इतिहासाच्या केवढ्या कालखण्डांतून प्रवास करीत असतों याची आपल्याला जाणीवही नसते. सृष्टीच्या हल्लीं अस्तित्वांत असलेल्या स्थितीचा सह्याद्रि हा एक मूल प्रदेश. एका काळीं येथें ज्वालामुखींचा तप्त रस खदखदत होता. या घटनेच्या खाणाखुणा आजही येथें दृष्टोत्पत्तीस येतात. आदिमानव जेथें उत्क्रांत झाले त्यांपैकीं सह्याद्रि हें एक आद्यस्थान असावें. या आद्य मानवजातीचे चालतेबोलते अवशेष अजूनही येथें वावरत आहेत. या भागांत उत्क्रान्त व स्थायिक झालेल्या जमाती वांशिक दृष्ट्या भिन्न आहेत हें वरवर पाहणारालाही पटतें. या भासाला शास्त्रीय आधार आहे काय ?

वंशशास्त्रोक्त मोजमापें घेऊन डॉ. इरावती कर्वे यांनीं ( मराठी लोकांची संस्कृति : पृ. १४६ ) मराठी समाजाचे तीन मुख्य गट पाडले आहेत. त्यांपैकीं फक्त सह्याद्रीच्या परिसरांतील जातीजमाती आणि त्यांबद्दलचे लेखिकेचे निष्कर्ष येथें देतों :

( १ ) लहान डोकीं : आगरी, कोळी, ठाकूर, भिल्ल, महार, मांग, वारली.

( २ ) मध्यम डोकीं : कायस्थ प्रभु, पाठारे क्षत्रिय, चरक व देशस्थ ऋग्वेदी आणि माध्यंदिन ब्राह्मण, मराठे, माळी, लेवा.

( ३ ) मोठीं डोकीं : कऱ्हाडे, चित्पावन व सारस्वत ब्राह्मण, पाठारे प्रभु, सोनकोळी.

"महाराष्ट्राच्या उत्तर सीमेवर, वायव्य कोपऱ्यांत व मधल्या डोंगरांच्या रांगांत राहणारे वन्य लोक इतर सर्व महाराष्ट्रीय जनतेपासून

वेगळे पडतात. भिल्ल, वारली वगैरे वन्य जमाती बहुधा मध्य हिंदुस्थानच्या अरण्यांतील मूळच्या रहिवासी असाव्यात. एके काळीं कदाचित् ते हिंदुस्थानभर पसरलेले असतील व शेतकीप्रधान लोकांनीं जंगलांची तोड केली तसतसे ते निबिड अरण्यांत शिरले असावे. महाराष्ट्रीय जातींत त्यांचें मिश्रण झालें असावें. आज ज्या सामाजिक क्रिया-प्रतिक्रिया चालल्या आहेत त्या पूर्वींही चालत असल्या पाहिजेत. हल्लींच्या सर्व जातींमध्यें अल्प प्रमाणांत वन्य जातींचें मिश्रण आढळतें. महाराष्ट्रांतील बलाढ्य शेतकरी जात मध्यम कपाळ, उंच नाकाची अशी आहे. माध्यंदिन हा बहुसंख्य ब्राह्मणवर्ग सर्वस्वीं मराठ्यांसारखाच आहे. रजपूत लोक दीर्घमस्तक आहेत असें निरनिराळ्या संशोधकांच्या मापांवरून दिसतें, त्या अर्थीं मराठे रजपूत खासच नव्हेत. रजपूत लोक हिंदुस्थानांत येण्याच्या आधीं कित्येक शतकें मराठी लोक महाराष्ट्रांत स्थायिक होऊन राज्यें स्थापून राहिले होते."

सह्याद्रीच्या परिसरांत स्थायिक झालेल्या स्थानिक जमातींच्या अस्तित्वामुळें निरनिराळे प्रश्न उपस्थित होतात, त्यांचा विचार केला पाहिजे.

महाराष्ट्रीय ब्राह्मणांमध्यें माध्यंदिन शुक्ल यजुर्वेदी बहुसंख्य आहेत; मात्र त्यांची बहुसंख्या मुख्यत्वेंकरून मराठवाडा, वऱ्हाड व त्यांलगतचे प्रदेश यांमध्यें स्थायिक झालेली आहे. त्यांच्या वसाहतींची दक्षिण मर्यादा कोणी गोदावरीपर्यंत मानतात, तर कोणी भीमेपर्यंत. सह्याद्रीच्या परिसरांत स्थायिक झालेल्या ब्राह्मणांमध्यें ऋग्वेदी देशस्थ बहुसंख्य आहेत. दक्षिणेकडे जावें तसतशी ऋग्वेद्यांची संख्या वाढत जाते आणि उत्तर-पूर्वेकडे यजुर्वेद्यांची. म्हणूनच वर म्हटलें आहे कीं सह्याद्रि हा ऋग्वेदी आहे आणि सातपुडा हा यजुर्वेदी. माध्यंदिन हा ब्राह्मणवर्ग बहुसंख्य व वांशिक्य दृष्ट्या मराठ्यांसारखा असला तरी मराठ्यांच्या आचारांवर त्यांच्यापेक्षां ऋग्वेद्यांचीच जास्त छाप आहे.

माझ्या ह्या निष्कर्षाला महाराष्ट्रांत प्रचलित असलेला मातुलकन्यापरिणय हा एक आधार आहे.

उत्तर हिंदुस्थानांत शुक्ल यजुर्वेदी जास्त; ऋग्वेदी किंवा कृष्ण यजुर्वेदी कमी. मामा, आत्या व मावशी यांच्या अपत्यांशीं लग्न

करण्याचा प्रघात उत्तरेकडे नाहीं. दाक्षिणात्य माध्यंदिनांत आतेच्या व मामाच्या मुलींशीं लग्न होत नाहीं. एवढेंच नव्हे, नवरामुलगा मुलीच्या मामाशीं सगोत्रीय असूनही चालत नाहीं. मामाच्या मुलीशीं लग्न करण्याचा प्रघात, एकदोन जाती वगळल्यास महाराष्ट्रांत सर्वत्र आहे. आतेच्या मुलीशीं लग्न करण्याची पध्दत महाराष्ट्रांत नाहीं; एकदोन जातींतच अशीं लग्नें होतात. ऋग्वेदी देशस्थांत मामाच्या मुलीशीं लग्न होतें, इतकेंच नव्हे, दक्षिण महाराष्ट्रांत व कर्नाटकांत आत्याच्या मुलीशीं व बहिणीच्या मुलीशींही लग्न करण्याचा प्रघात दिसतो. अशी पध्दत उत्तरेकडे नाहीं. दक्षिणेकडे द्राविड देशांत सर्वत्र आहे.

डॉ. इरावती कर्वे यांच्या 'मराठी लोकांची संस्कृति' या ग्रंथावरून आणि सरकारी शिरगणतीच्या अहवालांतील वांशिक विभागावरून (Census of India. 1911 Vol. VII. Bombay. Part I. Report.) वैवाहिक निषिद्धतेचें पुढील कोष्टक तयार केलेलें आहे.

| जमात | मामेबहीण | आतेबहीण | विधवाविवाह | विधवेच्या धाकट्या दिराशीं विवाह |
|---|---|---|---|---|
| अहीर. | × | × | V | V |
| आगरी. | V | × | V | × |
| कातकरी. | × | × | V | × |
| कायस्थ प्रभु. | V | × | ... | ... |
| खत्री. | × | × | ... | ... |
| खैरे कुणबी. | × | × | V | V |
| गवळी. | V | ... | V | V |
| गाबित. | V | × | V | ... |
| गुजर. | × | × | V | ... |
| गुरव. | V | ... | V | × |
| चांभार. | V | ... | V | ... |
| चित्पावन. | × | ... | ... | ... |
| ठाकर. | V | × | V | ... |

| जमात | मामेबहीण | आतेबहीण | विधवाविवाह | विधवेचा धाकट्या दिराशीं विवाह |
|---|---|---|---|---|
| त्वष्टा कासार. | V | ... | × | ... |
| तेली. | V | V (क्वचित्) | V | × |
| देशस्थ ऋग्वेदी. | V | V (कुंतल व कर्नाटक) | ... | ... |
| दैवज्ञ. | V | ... | ... | ... |
| धनगर. | V | × | V | ... |
| धनोजे कुणबी. | × | ... | V | V |
| पाचकळशी. | V | × | ... | ... |
| पाठारे प्रभु. | × | × | ... | ... |
| पारधी. | V | V | V | V |
| पोवार. | × | × | V | × |
| मल्हार कोळी. | V | V | V | V |
| माना कुणबी. | × | ... | ... | ... |
| भंडारी. | V | × | V | ... |
| भिल्ल : गुजरात. | × | × | V | V |
| ,, महाराष्ट्र. | V | V | ... | ... |
| मराठा. | V | V (गौण) | V | × |
| महार. | V | × | V | × |
| माध्यंदिन. | × | × | ... | ... |
| माळी. | V | ... | V | ... |
| मांग. | V | × | ... | ... |
| रामोशी. | V | V | ... | ... |
| लेवा कुणबी. | × | × | ... | ... |
| वणजारी. | × | ... | V | V |
| वारली. | V | V | V | × |
| सारस्वत. | V | V | ... | ... |
| साळी. | V | V | V | × |
| सुतार. | V | V | ... | ... |
| सोनकोळी. | V | ... | V | × |
| सोनार. | V | × | ... | ... |

या कोष्टकांत नमूद केलेल्या जमातींपैकीं अहीर व लेवा कुणबी यांची मुख्य वस्ती खानदेशांत आहे. सौराष्ट्रांतील अशोककालीन शिलालेखांत अहीरांचा उल्लेख आढळतो आणि महाराष्ट्रांतील सातवाहनोत्तरकालीन शिलालेखांत. या उल्लेखांवरून त्यांचा वसाहतकाल निश्चित करतां येतो. या दोन्ही जमाती गुजरातेंतून तापी खोऱ्यांतून महाराष्ट्रांत येऊन स्थायिक झालेल्या असाव्यात असें त्यांच्या इतिहासावरून व भाषेवरून दिसतें. कुणब्यांपैकीं खैरे, धनोजे व माना या जमातींची वस्ती नागपूर भागांत आहे आणि माध्यंदिनांचीही मुख्य वस्ती याच भागांत आहे.

या कोष्टकावरून निष्कर्ष निघतो, कीं ज्या जमातींवर माध्यंदिन यजुर्वेद्यांची छाप आहे, त्यांमध्यें आतेबहीण व मामेबहीण यांशीं विवाह होत नाहींत; अशा जमाती मुख्यत्वेंकरून मराठवाडा व नागपूर या भागांत स्थायिक आहेत. यावरून दिसतें कीं महाराष्ट्राच्या ज्या भागांत माध्यंदिन बहुसंख्य आहेत किंवा त्यांचें वर्चस्व आहे तेथील जमातींमध्यें आतेबहीण व मामेबहीण यांशीं विवाह होत नाहींत; आणि जेथें ऋग्वेदी देशस्थ बहुसंख्य आहेत किंवा त्यांचें वर्चस्व आहे तेथें मामेबहिणीशीं विवाह होतात आणि ज्या ऋग्वेदी देशस्थांवर द्राविडांची छाप आहे तेथें आतेबहिणीशींही विवाह होतात.

या भेदाचें मूलकारण कोणतें ?

डॉ. इरावती कर्वे सांगतात : महाराष्ट्रांत "दोन-चार जाती वगळल्यास इतर सर्व जातींत मामाच्या मुलीशीं लग्न करण्याची पद्धत आहे. आतेच्या मुलीशीं लग्न होतां कामा नये असा दंडक आहे ... साटेंलोटें पद्धतीनें विवाह ज्या समाजांत होईल तेथें आत्याचा नवरा मामा व मामाची बायको आत्या हें समीकरण जुळेल. अशी पद्धत उत्तरेकडे नाहीं. दाक्षिणेकडे द्राविड देशांत अब्राह्मणांत सर्वत्र आहे ... कर्नाटकांत ... जर आत्या मामाची बायको नसेल तर आत्याच्याच मुलीशीं लग्न करणें योग्य समजतात. साटेंलोटें हा प्रकार समान हक्काचा, समान देवघेवीचा असा आहे ... कोठचेही दोन समाज एकत्र आले किंवा त्यांचा संघर्ष झाला तर जेत्यांनीं जितांच्या स्त्रिया बायका म्हणून करणें हा जेत्यांचा हक्क असतो ... ह्या उलट जेते जितांना आपल्या मुली कदापि

देत नाहींत... एखादा समाज उच्च-कनिष्ठ जातींत विभागलेला असला किंवा एखादी जात उच्च-कनिष्ठ कुळांची मिळून झालेली असेल, तर त्यांतही वरील तत्त्वावर लग्नें होतात. मराठ्यांतही जातीची विभागणी उच्च-नीच कुळांत झालेली आहे ... आईचें कूळ आपल्या कुळांपेक्षा कमी असण्याचा संभव असल्यामुळें तिच्या कुळांतून मुलगी करून घेण्यास हरकत नाहीं. पण तिच्या कुळांत मुलगी द्यावयाची नाहीं अशी चाल पडली. जेत्यांनीं एतद्देशीयांच्या मुली केल्या; पण आपल्या होतांहोईतों दिल्या नाहींत, असा ह्या चालीचा ऐतिहासिक अर्थ निघतो. द्राविड देशांतील चाल त्यांनीं उचलली; पण साटेंलोटें जित-जेते संबंधामुळें मान्य झालें नाहीं व आत्याच्या मुलीशीं लग्न त्याच कारणामुळें रूढ झालें नाहीं."

मराठी कुटुंबव्यवस्था हें उत्तर व दक्षिण भारतीयांच्या संघर्षाचें प्रतीक आहे असें डॉ. कर्वे यांचें मत आहे. तें ग्राह्य आहे असें मला वाटत नाहीं. मराठ्यांनीं महाराष्ट्रांत वसाहती केल्या त्या काळांत येथें द्राविडांची वस्ती होती. मराठ्यांनीं त्यांना जिंकलें, त्यांवर अनेक शतकें जेते या नात्यानें राज्य केलें, या काळांत त्यांच्या कन्यांचा व कांहीं रीतरिवाजांचा स्वीकार केला व आपलें व्यक्तिमत्त्व टिकविलें आणि अखेरीस त्यांना अति दक्षिणेकडे हुसकलें, अशी परिस्थिति व इतिहास या सिद्धान्तासाठीं गृहीत धरावे लागतात. याला कांहीं पुरावा नाहीं. महाराष्ट्रीयांच्या पूर्वजांनीं वसाहती केव्हां केल्या आणि केल्या तेव्हां येथें काय परिस्थिति होती याबद्दल अनुमानें करावयास साधनें नाहींत. आद्य वसाहतकारांनीं एतद्देशीयांच्या कन्यांशीं लग्नें केलीं असलीं पाहिजेत, हें निर्विवाद. हे वसाहतकार विजेते असते तर जितांनीं त्यांच्या संस्कारांचें ग्रहण केलें असतें. या बाबतींत उलटापालट संभवत नाहीं. शिवाय मातुलकन्यापरिणय हा प्रघात उत्तर भारतीय यादवांत प्रचलित होताच. यासाठीं संस्कारांची देवाण-घेवाण होण्या-इतका दीर्घकालीन आर्यद्राविड संघर्ष कल्पिण्याचें कारण नाहीं. मला वाटतें, मातुलकन्यापरिणय हें पितृप्रधान व मातृप्रधान कुटुंबपद्धतींच्या समन्वयाचें प्रतीक आहे. भारतीय कुटुंबपद्धति साधारणतः पितृप्रधान

असल्यामुळें आणि आतेबहिणीच्या शरीरांत आजाचें प्रत्यक्ष रक्त खेळत असल्यामुळें असा विवाह निषिद्ध मानण्यांत आला असावा.

मराठ्यांचा द्राविडांशीं संसर्ग फार थोडा ; ऋग्वेदी देशस्थांचा संबंध अधिक. द्राविडांचे संस्कार महाराष्ट्रांत आले असलेच तर ते ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणांच्या मार्फतच आले असले पाहिजेत. मराठ्यांची विवाह-पद्धति देवकांवर आधारलेली आहे आणि ब्राह्मणांची गोत्रांवर. मराठ्यांच्या वन्य जमातींशीं असलेल्या संबंधाचें देवक हें प्रतीक. मराठी दरबार व समाज यांवरील ब्राह्मणांचें धार्मिक प्रभुत्व अलीकडे भासविण्यांत येतें तितकें अर्वाचीन नाहीं. ख्रि. पू. तिसऱ्या शतकाचे सुमारास महाराष्ट्र-सम्राट् सातवाहनांनीं जुन्नरनजीक अनेक यज्ञ केले असें नाणेघाटांतील नायनिकेच्या लेखावरून सिद्ध होतें. यज्ञासाठीं चारी वेदांचे अनुयायी अवश्य असतात. खुद्द सातवाहन हे ब्राह्मण होते आणि गोतमीपुत्र सातकर्णीनें चातुर्वर्ण्यसंकर विनिवर्तित केला असें नाशिकच्या पांडवलेण्यांतील गोतमी बालश्रीच्या शिलालेखावरून सिद्ध होतें. माध्यंदिनांचें महाराष्ट्रांतील आगमन बरेंच उत्तरकालीन आहे. ते आले तेव्हां त्यांची कुटुंबपद्धति नियमबद्ध झालेली होती. म्हणूनच एतद्देशीयांच्या सहवासांत ती ढिली झाली नाहीं, एवढेंच नव्हे, ज्या स्थानिक जमातींशीं त्यांचा निकट संबंध आला त्यांनींही माध्यंदिनांच्या संस्कारांचा स्वीकार केला.

डॉ. इरावती कर्वे ( पूर्वोक्त. पृ. १६५ ) सांगतात : दियेरवटूं ही चाल पूर्व महाराष्ट्रांतील जवळजवळ सर्व अब्राह्मण जातींत दिसून येते. उत्तर हिंदुस्थानांत नवऱ्याच्या थोरल्या भावाला जेठ ( ज्येष्ठ ) व धाकट्याला देवर म्हणतात. जेठाची बायको जेठाणी व देवराची देवराणी. देवराणीला जेठ हा सासऱ्यासारखा आणि ती त्याला सुने-सारखी. त्यांनीं एकामेकांशीं मर्यादा पाळावयाची. जेठाणी ही देवराची भाभी : जेठाणी विधवा झाली कीं तिचा पुनर्विवाह धाकट्या दिराशींच व्हावयाचा. या प्रघाताचें नांव दियेरवटूं. 'धाकट्यानें थोरल्याच्या मागून त्याच्या स्त्रीला भोगल्यानें थोरल्याची प्रतिष्ठा कमी होत नाहीं. पण धाकट्याच्या मागून थोरल्यानें तसें करणें विधीला

धरून नाहीं,' असें धर्मराजाचें वचन (महाभारत : १. २०५. २७) आहे. जेठाणी व देवर हीं सामान्यतः समवयस्क असल्यामुळें पितृ-प्रधान एकत्र कुटुंबांत त्यांची मैत्री होतेच. दीरभावजयींचे अनेक प्रेम-प्रसंग गाथासप्तशतींत वर्णिलेले आहेत; आणि मराठी लावण्यांतही. जिव्हाळ्याच्या भावना प्राकृतांतच व्यक्त व्हावयाच्या. मोठ्या भावाच्या हयातींतील व्यभिचाराला त्याच्या मृत्यूनंतर दीर–भावजयींनीं विवाहबद्ध होऊन धार्मिक मान्यता मिळवावयाची, एवढाच या प्रघाताचा अभिप्रेत अर्थ, असें मानण्याचें कारण नाहीं. केरळांतील नंबुद्रि ब्राह्मणांत फक्त थोरल्या भावानें नंबुद्रि स्त्रीशीं विवाह करावयाचा व धाकट्या भावांनीं इतर जातींच्या स्त्रियांशीं विवाह करावयाचा अशी प्रथा आहे; कारण ते या भागांत प्रथम आले तेव्हां त्यांच्याबरोबर आलेल्या स्त्रियांची संख्या पुरुषांच्या मानानें अल्प होती. (कुरल प्रांतांतील नंबुद्रि ब्राह्मण : प्रा. नंबुद्रिपाद, एम्. ए., ज्ञानेश्वर त्रैमासिक : वर्ष ४, अंक ४.) उत्तर हिंदुस्थानांत आर्यांनीं वसाहती केल्या तेव्हांही अशीच परिस्थिति असली पाहिजे. ज्येष्ठाची पत्नी आर्या व इतर भावांच्या आनार्या असाव्यात. आर्यांची प्रतिष्ठा रहावी म्हणून किंवा आर्येविषयीं विशेष आपुलकी असल्यामुळें प्राचीन आर्य समाजांत ही पद्धत प्रचलित झाली असली पाहिजे. आर्यांची संख्या वाढल्यानंतर ही प्रथा लुप्त झाली. त्यांचें अनुकरण करणाऱ्या कांहीं अन्य जमातींत मात्र ती आतां अस्तित्वांत आहे.

सह्याद्रीच्या परिसरांत स्थायिक झालेल्या जमातींपैकीं ज्या स्वयंभू किंवा आद्य आहेत त्या सर्वस्वीं वन्य आहेत. त्यांचीं सांस्कृतिक अवस्था जवळजवळ शून्यांशावर आहे. वन्य जमातींपैकीं ज्या उत्तर काळांत उत्तरेकडून आल्या व सह्याद्रीच्या उत्तर भागांत स्थिरावल्या त्यांपैकीं मुख्यत्वेंकरून भिल्ल व कोळी जमातींतील बहुसंख्य प्रजा गुजरात व राजस्तान भागांत रहात असल्यामुळें त्यांवर मध्यभारतीय संस्कृतीची छाया पडलेली आहे; येथें स्थायिक झालेल्यांचें मराठीकरण आजवर पुरेंसें झालेलें नाहीं आणि या परिस्थितीचा फायदा घेण्याला परप्रांतीय उत्सुक व सज्ज आहेत. यामुळें या जमातींचें अस्तित्व हा

महाराष्ट्राच्या संयुक्तीकरणाच्या मार्गातील एक अडथळा होऊन बसलेला आहे. या वन्य जमातींच्या आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक समस्या आपण सोडविल्याच पाहिजेत. या जमातींचा काल अद्याप महाराष्ट्राला अनुकूल आहे, तोंवरच स्वार्थत्यागपूर्वक, शिकस्तीनें, सतत, संघटित प्रयत्न केला पाहिजे. नाहीं तर महाराष्ट्राची धडगत नाहीं!

अपरांतांतील व सह्याद्रीच्या परिसरांतील कांहीं जमाती राजकीय किंवा धार्मिक जुलमामुळें निर्वासित होऊन येथें आलेल्या आहेत. कोणी उन्मत्तांचा जुलूम असह्य झाल्यामुळें, कोणी प्रतिकाराचें पारिपत्य चुकविण्यासाठीं, तर कोणी प्रतिकार सुसंघटित करण्यासाठीं; कोणी परशुरामाच्या काळांत, कोणी शालिवाहनांच्या अमदानींत; बौद्धांच्या धर्मचक्राचीं आवर्तनें असह्य झालीं तेव्हां किंवा पुराणांत वर्णिलेले शक व हूण यांचे अत्याचार असह्य झाले तेव्हां. धार्मिक व राजकीय जुलमामुळें छळ टाळण्यासाठीं एखाद्या जमातीला जातगोतासह स्वदेशत्याग करून परप्रांतीं स्थायिक व्हावें लागणें ही घटना कांहीं वर्षांपूर्वी असंभवनीय वाटत होती. आतां अशा घटनांची सत्यता आणि त्यांमागील घोर अत्याचारांची परंपरा प्रत्ययास आलेली आहे. सह्याद्रीनें पुरातन काळापासून निर्वासितांना आश्रय दिलेला आहे; आश्रयार्थ आलेल्या जमातींना संरक्षण दिलें व त्यांचा योगक्षेम चालविला, त्यांना स्वतंत्रपणें व सन्मानानें जगण्यास सवड दिली हें निर्विवाद आहे.

सह्याद्रीच्या परिसरांत स्थायिक झालेल्या रहिवाशांची आर्थिक अवस्था निकृष्ट दर्जाची आहे. अपरिमित पर्जन्य पडत असला तरी जमिनीच्या ठेवणीमुळें मौल्यवान् पिकें काढतां येत नाहींत. कंदमुळें, कोयी व आठळया आणि कडधान्यें यांवर गुजारा करावा लागतो. गेल्या शतकांतील औद्योगिक क्रांतीनंतर जीवनकलहाची तीव्रता वृद्धिंगत झाल्यामुळें सामान्यतः प्रत्येक कुटुंबांतील कर्त्या पुरुषांना देशांतर करावें लागत आहे; त्यांच्या प्राप्तींतील अंशावर येथील घरटीं तग धरतात आणि शेतसारा भरला जातो. शिरगणतींतील स्त्री-पुरुषांच्या स्थानिक संख्येवरून या विधानाची सत्यता प्रत्ययास येते. नमुन्यासाठीं

हें कोष्टक पहा : यांतील आंकडे Caste Table – Bombay Province : 1941 Census वरून घेतले आहेत :

| | | कुळवाडी | भंडारी | मराठा | महार | सारस्वत |
|---|---|---|---|---|---|---|
| मुंबई शहर | पु. | १६३१२ | २०२९० | १८९३७८ | ३५२३३ | १४४६९ |
| | स्त्री | ४९३९ | १३६६० | ११०५८८ | २७८२२ | १०७१६ |
| रत्नागिरी जिल्हा | पु. | १४४११० | ४५४२६ | १५७६५२ | ४९८०१ | |
| | स्त्री | ३५३७७१ | ५३७७४ | १८६९१४ | ५४५३२ | |
| कानडा जिल्हा | पु. | | | | | १२९२३ |
| | स्त्री | | | | | १३१४८ |

सह्याद्रीच्या राजकीय इतिहासावरून दिसतें कीं हा प्रदेश स्वातंत्र्याला पोषक असला तरी येथें स्वतंत्र व समर्थ साम्राज्याच्या स्थापनेला किंवा विकासाला अवसर नाहीं. कोंकणांतील व घाटावरील राज्यें सामन्तांचींच होतीं. महाराष्ट्रांतील आजवरचीं सर्व साम्राज्यें मैदानी. त्यांपैकीं कोणाच्याही राशियतींत मराठी लोक एकजीव झाले नाहींत, त्यांपैकीं कोणालाही किनारी सामन्तांवर किंवा अधिकाऱ्यांवर पुरेसें नियंत्रण ठेवतां आलें नाहीं ; शिवाय प्राचीन व मध्ययुगीन मराठी राजांनीं दर्यावर्दी व्यापाराकडे व आरमाराकडे दुर्लक्ष केलें. यामुळें अपरान्ताचा किनारा स्वकीय व परकीय चांचांच्या हातीं गेला व परकयांचीं राज्यें अपरान्तांत रुजलीं.

सह्याद्रीच्या परिसरांत स्थायिक झालेल्या कांहीं जमातींना प्रभावी व्यक्तिमत्त्व असलें तरी पठारी महाराष्ट्राचा पाठिंबा मिळत नाहीं तोंवर तें निष्क्रिय राहतें. प्रादेशिक वैशिष्ट्यांचा विकास आणि स्थानिक कर्तृत्वाचा परिपोष यांवरच राष्ट्राचें भवितव्य अवलंबून असतें.

## सह्याद्रीशीं सहकार्य :

सह्याद्रि हा महाराष्ट्राचा निर्माता आहे ; रक्षण, धारण व पोषणकर्ता आहे. सह्याद्रि हें महाराष्ट्राचें एकच एक महान् भौगोलिक सत्त्व आहे.

भूप्रदेशाची जशी मांडणी व ठेवण तशी तेथिल रहिवाशाची शक्ति व वृत्ति. प्रत्येक देशानें, स्वयंपूर्ण राष्ट्रानें किंवा संघराज्याच्या सदस्यानें, त्यांच्या अनुरोधानें राजकारणाचें व समाजकारणाचें धोरण आंखलें पाहिजे.

भूगोलशास्त्र व सामुद्रिकशास्त्र यांत बरेंच साम्य आहे. तळहाताचा आकार व पोत आणि त्यावरील उंचवटे, रेखा व चिन्हें यांवरून ही सांकेतिक लिपि जाणणाऱ्या सामुद्रिकाला व्यक्तीचें भूतभविष्य जाणतां व वर्तवितां येतें ; गतायुष्याचा पडताळा मिळाला म्हणजे भविष्य विशेष निश्चयानें सांगतां येतें. विशिष्ट प्रदेशाची भूतलावरील स्थिति, त्याचा आकार, त्यावरील पर्वत व पठारें, जमिनीचा पोत व नद्या या साधनां-वरून भूगोलशास्त्रज्ञाला राष्ट्राचें भूतभविष्य स्थूलमानानें वर्तवितां येतें. अशा राष्ट्राचा इतिहास माहीत असला तर भवितव्याबद्दलचीं अनुमानें विशेष निश्चयानें करतां येतात. नैसर्गिक शक्तींवरून प्रवृत्ति व प्रगति यांबद्दल अनुमानें करतां येतात. मानवी कर्तृत्वाला अवसर आहे हें हीं दोन्ही शास्त्रें कबूल करतात. मात्र कर्तृत्व हेंही नैसर्गिक शक्तींच्या व प्रवृत्तींच्याच अनुरोधानें प्रकट होत असतें. वैयक्तिक कर्तृत्वाच्या अनुरोधानें हातावरील रेषा बदलतात, कांहीं अस्पष्ट होतात व कांहीं उमटतात, असें सामुद्रिक सांगतात ; मुख्य रेषा आणि उंचवटे मात्र स्थिर राहतात. त्याच-प्रमाणें कर्तृत्ववान् राष्ट्राला प्रदेशाची ठेवण व मूलभूत शक्ति हीं बदलतां आलीं नाहींत तरी भाग्यरेखा स्पष्टतर व कार्यक्षम करतां येतात आणि दुर्भाग्याचीं चिन्हें नष्ट करतां येतात.

मानवी समतेचें तत्त्व शिष्टसंमत असलें तरी शास्त्रसंमत नाहीं. व्यक्तिमात्राचे अंगीं नैसर्गिक शक्ति व प्रवृत्ति असतात. त्या मूलतः भिन्न नसल्या तरी त्यांची कार्यक्षमता कमीअधिक असते. क्रियेच्या पुनरावृत्ती-मुळें तिची प्रक्रिया स्वभावांत अनुस्यूत होते. इच्छाशक्तीच्या प्रकर्षानें जें आजचें संपादित तें त्या व्यक्तीपुरतें उद्यांचें स्वाभाविक आणि त्या व्यक्तीच्या वंशजांमध्यें पूर्वजार्जित ; अशा व्यक्ति ज्या समाजाच्या घटक असतील त्यांमध्यें परंपराप्राप्त. मज्जातंतूंना स्वतंत्र संवेदनाग्रहणशक्ति असते, कृतीची स्मृति धारण करण्याची शक्ति असते. हीच व्यक्तिमत्त्वाची

बीजशक्ति. व्यक्तीच्या स्वकष्टार्जित गुणसमुच्चयाचा अंश वंशजांना निसर्गतः प्राप्त होतो, ही आनुवंशिकतेची बीजशक्ति. कर्तृत्ववान् व्यक्तींचें अनुकरण होतें आणि अनुसरण होतें. यामुळें जें आजचें वैयक्तिक व अपवादात्मक तें उद्यांचें सार्वत्रिक व स्वाभाविक. व्यक्तीनें किंवा समकालीनांनीं प्रयत्नपूर्वक संपादन केलेल्या शक्तींना संभवजन्य परंपरागतता प्राप्त होणें हीच संस्कृतीची आदिशक्ति; विकासासाठीं सर्वांना समान संधि उपलब्ध करणें आणि संचित व संपादित शक्तींची संघटना करणें हेंच राजकारण.

राजकीय, धार्मिक व ऐहिक सत्ताधाऱ्यांनीं ग्रासलेल्या युरोपांत, फ्रेंच राज्यक्रान्तीचे वेळीं, मानवी स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या युगप्रवर्तक महातत्त्वांची घोषणा झाली. या व्यापक तत्त्वांच्या मर्यादित सिद्धीनें व्यावहारिक साधन म्हणून राष्ट्रीयत्वाचें तत्त्व इटालियन राज्यक्रान्तीचे वेळीं निर्माण झालें. पहिल्या महायुद्धाचे वेळीं प्रादेशिक स्वयंनिर्णयाचें तत्त्व उत्क्रांत झालें. आंतरराष्ट्रीय स्पर्धेमुळें व संघर्षामुळें निर्माण झालेल्या खऱ्या व थंड्या युद्धजन्य परिस्थितीला तोंड देण्यासाठीं चालू शतकाच्या दुसऱ्या चतुष्टकांत राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय नियोजन व नियंत्रण हीं तत्त्वें निर्माण झालीं.. या तत्त्वांचीं आत्यंतिक व विकृत रूपेंही या काळांत निर्माण झालेलीं आहेत.

राष्ट्र ही विशिष्ट प्रदेशांत स्थायिक झालेल्या रहिवाशांची स्वतंत्र राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक संघटना; स्वतंत्र, कारण स्वातंत्र्य हें राष्ट्रीयत्वाचें मानचिन्ह आहे; राजकीय, कारण राजकीय संघटनेवर राष्ट्राचें व्यक्तिमत्त्व अवलंबून असतें; आर्थिक, कारण स्वयंपूर्णतेवर स्वातंत्र्याचें अधिष्ठान आहे; सांस्कृतिक, कारण सुसंस्कृतता हा मानवतेच्या बंधुभावाचा आविष्कार आहे. संघटना, कारण राष्ट्रीयत्व हें जनतेच्या संघशक्तीचें मूर्त स्वरूप आहे. राष्ट्राचें अस्तित्व नागरिकांच्या निष्ठेवर, सामर्थ्य संघटनेवर आणि उत्कर्ष नेत्यांच्या योजकतेवर अवलंबून असतात. व्यक्तीला संयम व व्यायाम तशी राष्ट्राला शिस्त व संघटना. व्यायामानें सामर्थ्य प्राप्त होतें आणि संयमानें सामर्थ्य कार्यक्षम होतें. त्यांच्या अभावीं मनुष्य क्षुद्र स्पर्धांचें व क्षणिक

भावनांचें खेळणें होतो. लष्करी सामर्थ्य हें राष्ट्रीय शिस्तीचें प्रधान व्यक्त स्वरूप आणि कायद्याचें प्रभुत्व हें राष्ट्रीय संघटनेचें. राष्ट्राच्या शक्तींच्या समन्वयानेंच मानवजातीची प्रगति शक्य आहे. शिस्त व संघटना ह्याच प्राचीन राज्यें व अर्वाचीन राष्ट्रें यांमधील मुख्य फरक. आधुनिक राष्ट्रें प्रजेच्या संघक्रियेमुळें निर्माण झालेलीं आहेत आणि त्यांचें अस्तित्व नागरिकांच्या संघसामर्थ्यावर अवलंबून आहे. आधुनिक राष्ट्रांची निर्मिति क्रांतिजन्य आहे आणि त्यांचा उत्कर्ष उत्क्रांतिजन्य आहे. शिस्तीचे अभावीं राष्ट्र स्वातंत्र्याला मुकेल आणि संघटनेचे अभावीं राष्ट्रीयत्व नष्ट होईल. राष्ट्राचें लष्करी सामर्थ्य व कायद्याचें प्रभुत्व ह्या संस्थांच्या कार्यक्षमतेवर नागरिकांचें स्वास्थ्य व उत्कर्ष अवलंबून असतात. या संस्थांची कार्यक्षमता नागरिकांच्या निष्ठेवर व संयमावर अवलंबून असते आणि नागरिकांची निष्ठा राज्यकर्त्यांच्या न्यायबुद्धीवर, राज्यकारभाराच्या कार्यक्षमतेवर व लोकमतानुवर्तित्वावर. या शक्तींचा तोल बिघडला, कीं प्रथम व्यक्तिस्वातंत्र्य नष्ट होतें; यामुळें अराजक निर्माण होतें आणि नंतर क्रान्ति होते.

शास्त्रांच्या साह्यानें आपण निसर्गावर जय मिळविला आहे अशी मनुष्याची शेखी आहे; पण शास्त्र ज्या शक्तींवर आधारलेलें आहे त्याही नैसर्गिकच आहेत. मनुष्य त्यांचें परिवर्तन व संवर्धन करूं शकतो आणि निसर्गाशीं सहकार्य करुन आपलें सामर्थ्य वाढवूं शकतो, एवढेंच. अखेरीस मनुष्याचें कार्यक्षेत्र व कर्तृत्वक्षेत्र हीं निसर्गावरच अवलंबून असतात.

हीं तत्त्वें लक्षात घेऊन आपण संभूयसमुत्थानाच्या योजना आंखल्या पाहिजेत.

सह्याद्रि व सातपुडा यांचा गाभा एकच आहे असें वर सांगितलें. उद्रेकजन्य कृष्णप्रस्तर प्रदेशाचें अस्तित्व व विस्तार या भौगोलिक सत्यावर संयुक्त महाराष्ट्राचें ऐक्य आधारलेलें आहे. महाराष्ट्राचें ऐक्य ही सृष्टिनिर्मात्याची योजना आहे; हें परमेश्वराचें वचन आहे. ही योजना अद्वितीय आहे; कारण अशी नैसर्गिक अनुकूलता इतरत्र कोठेंही आढळत

नाहीं. संपूर्ण हिंदुस्थानला मूलाधार असलेल्या सह्याद्रीच्या पुरातन व प्रचण्ड ढालीवर स्थायिक झालेले आपण सारे मराठी लोक अंतर्यामीं एकच आहोंत; आमचे आपसांतील भेदभाव व संघर्ष क्षुल्लक व क्षणिक आहेत. या प्रदेशांतील कांहीं रहिवाशांना उच्च गंडानें पछाडलेलें आहे आणि कांहींना न्यूनगण्डानें. शिष्टांना अशिष्टांशीं समरस होतांना संकोच वाटावयाचाच. असे क्षुद्र विकल्प दूर करून महाराष्ट्राच्या नैसर्गिक ऐक्याला मूर्त व संघटित राष्ट्रीय स्वरूप देणें हें आपलें आद्य कर्तव्य आहे.

अपरान्त, घाटमाथा व पठार हे महाराष्ट्राचे मुख्य नैसर्गिक विभाग. सह्याद्रि हा महाराष्ट्राच्या ऐक्याचा सूत्रधार, त्याचप्रमाणें या विभाजनाचें आदिकारण. निसर्गाच्या प्रेरणेमुळें व मानवी प्रतिक्रियेमुळें किनारी, डोंगरी व पठारी या तीन वृत्ति महाराष्ट्रांत आढळतात. म्हणूनच महाराष्ट्राचा त्रिमहाराष्ट्रक असा उल्लेख आढळतो आणि त्रिमूर्ति हें महाराष्ट्राचें प्रतीक मानण्यांत येतें ! चिरस्थायी यशप्राप्तीसाठीं राजकारणांत, अर्थकारणांत व समाजकारणांत या तिन्ही वृत्तींचा समन्वय साधला पाहिजे.

महाराष्ट्राच्या पठारावरील रहिवासी बहुसंख्य, सुसंपन्न आहेत. मैदानावरील रहिवाशांची वृत्ति सहकार्यप्रवण असते. म्हणून महाराष्ट्राच्या संयुक्तीकरणाची जबाबदारी मुख्यत्वेंकरून त्यांचीच आहे. हें आजचें पठारी राजकारण. घाटमाथ्यावरील झुंडशाहीचें समाप्तीकरण, स्थानिक तेजस्वितेचें राष्ट्रीयीकरण आणि वन्य जमातींचें मराठीकरण व संस्कृतीकरण हें आजचें डोंगरी राज व समाज कारण. संयुक्त महाराष्ट्रांत मुंबईचें समावेशन, अपरान्तांतील जमातींचें दर्यावर्दी संघटन आणि दमण-गोव्याचें विलीनीकरण हें आजचें किनारी राजकारण आहे.

आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या दृष्टीनें मुंबईसारखें सोईचें बंदर हिंदुस्थानांत नाहीं. हें आमचें भाग्य व दुर्भाग्यही ! दुर्भाग्य, कारण जें निसर्गतः आमचें, तें आमचें नाहीं, दुसऱ्या कोणाचें तरी आहे, तसें नसेल तर अखिल भारताचें आहे, असें ठरविण्याची बौद्धिक राष्ट्रीय चळवळ सुरू झालेली आहे. यासाठीं वंश व भाषा, इतिहास व कायदा यांचा आधार घेण्यांत येत आहे. मुंबईचा विस्तार व वैभव हीं वाढत आहेत, त्याच प्रमाणांत मुंबई महाराष्ट्रापासून अलग होण्याचा धोका

वाढत आहे. महाराष्ट्रांतील सर्व रस्ते मुंबईकडे धांवतात. या मार्गांवरच मुंबईची भरभराट अवलंबून आहे. मुंबई हें महाराष्ट्राचें औद्योगिक व सांस्कृतिक केंद्र आहे. जीवनासाठीं मुंबई महाराष्ट्रावर आणि महाराष्ट्र मुंबईवर अवलंबून आहे. मुंबई हें महाराष्ट्राचें एकच एक बंदर आहे. सातवाहनांपासून यादवांपर्यंत मुंबईची परंपरा महाराष्ट्राशीं निगडित आहे. मुंबई हें महाराष्ट्राचें नाकेंच नव्हे, नाकही आहे. आम्ही झोंपेंत होतों तोंवर त्यावर माशा बसूं दिल्या; म्हणून शरीराचा अवयवावरील अधिकार नष्ट झाला कीं काय? भोंवतालच्या प्रदेशांपासून राजधानी अलग करून शहराला स्वतंत्र प्रांताचा दर्जा देणें हें आक्रमणकाळीं एखादें शहर मुक्त ठरविण्याइतकें घातुक व नामर्द-पणाचें द्योतक आहे. पुणें व कोल्हापूर, पैठण व नागपूर यांचा समन्वय करणारी शक्ति मुंबईच्या अंगीं आहे आणि तिच्या अभावीं महाराष्ट्राचें संयुक्तीकरण तोकडेंच राहील.

महाराष्ट्रानें राजकीय जीवनाच्या आरंभापासून किनारी राजकारणा-कडे दुर्लक्ष केलेलें आहे. नौकाचिन्हांकित मुद्रा पाडणारा सातकर्णी, गोपकपट्टणाची प्रस्थापना करणारा जयकेशी कदम्ब आणि शिवाजी व कान्होजी आंगरे एवढेच आमच्या दोन हजार वर्षांच्या इतिहासांतले अपवाद. अपरान्ताची दर्यावर्दी परंपरा स्थानिक राज्यकर्ते व व्यापारी यांनीं निर्माण केलेली आहे. मध्यवर्ती सत्तांनीं या उद्योगाला प्रोत्साहन दिलें नाहीं, कारण त्यांच्या राजकारणाला किनारी धोरणाचा संपर्कही नव्हता. स्मृतिकारांनीं तत्कालीन परिस्थित्यनुसार हिंदु समाजाची उभारणी चातुर्वर्ण्यावर केली आणि समुद्र हा उच्चनीच भावाचा उच्छेदक असल्यामुळें समुद्रपर्यटणावर निर्बंध घातला. यामुळें अधिकृत शास्त्रधारी व शस्त्रधारी वर्ग या उद्योगांत सामील झाले नाहींत. या सर्व कारणांमुळें अपरान्ताच्या दर्यावर्दी परंपरेला चांचेगिरीचें हीन स्वरूप प्राप्त झालें. डोंगरी राजकारणाचें व युद्धपद्धतीचें विस्मरण झाल्यामुळें आपण पानिपतला मार खाल्ला आणि किनारी राजकारणाचें व्यवधान व समुद्री युद्धाचें साहित्य न सांभाळल्यामुळें इंग्रजांनीं मराठ्यांचा

पाडाव केला. विघटनेच्या काळांत फिरंग्यांनीं महाराष्ट्राचा लचका तोडला व स्थानिक दर्यावर्दी परंपरा नष्ट केली. याचा परिणाम, क्षुल्लक हबशांनीं आमच्या तोंडाला काळें फांसलें! आतां आमचे जातिवंत दर्यावर्दी क्षुद्र स्वरूपाची किनारी वाहतूक व मर्यादित मागणी भागविणारी मच्छीमारी करीत आहेत. पठारावरले लोक कोळ्यांसह मच्छीमारीचा उपहास करीत आहेत आणि माहितगार खलाशांसाठीं स्वतंत्र भारताला पाकिस्तानवर अवलंबून रहावें लागत आहे !

हिंदुस्थान हें द्वीप नसलें तरी द्वीपकल्प आहे. स्वतंत्र व समर्थ आरमार सज्ज ठेवणें हिंदुस्थानच्या अस्तित्वाला अवश्य आहे. अहिंसेचें राजकारण मैदानी आहे. तें समुद्रावर यशस्वी होणें अशक्य आहे. ज्या जमातींना दर्यावर्दी परंपरा आहे त्यांनाच आपल्या राष्ट्रीय आरमारांत आद्यस्थान दिलें पाहिजे. म्हणजेच आगरी, भंडारी, हेटकरी वगैरे मागासलेल्या दर्यावर्दी जमातींची उन्नति होईल, त्यांना राष्ट्रांत मानाचें स्थान प्राप्त होईल आणि त्यांच्या आनुवंशिक गुणसमुच्चयाचा देशाला उपयोग होईल.

महाराष्ट्रांतील बहुसंख्य लोक मत्स्याहारी आहेत; बंगालच्या खालोखाल. अहिंसेच्या प्रादुर्भावामुळें गुजरातेंतील परिस्थिति वेगळी आहे, किनारी भागांतही. अन्नधान्याच्या तुटवड्यामुळें आहारांतील मत्स्यांचें प्रमाण वाढविणें लवकरच अपरिहार्य होणार आहे. कोंकण-किनाऱ्यावर त्यांचा पुरवठा अपरंपार आहे. कोंकणपट्टींतील सुमारें दीड लाख लोक चरितार्थासाठीं मच्छीमारी धंद्यांवर अवलंबून आहेत; जोडधंद्यांत आणखी हजारों लोकांना उद्योग मिळणें शक्य आहे. असें आहे तरीही अपरान्ताचें व महाराष्ट्राचें या उद्योगाकडे असावें तितकें लक्ष नाहीं. मच्छीमाऱ्यांच्या जीवनाबद्दल उथळ सहानुभूतिपर किंवा लंपट कविता व गोष्टी मात्र भरपूर निर्माण होत आहेत!

ही परिस्थिति बदललीच पाहिजे. नाशवन्त मालाच्या पैदाशीचीं, रक्षणाचीं व वाहतुकीचीं साधनें, जोडधंद्यांची सशास्त्र व सप्रयोग माहिती या व्यवसायांना उपलब्ध झालींच पाहिजेत, तरच कोंकणची अर्थव्यवस्था स्वावलंबी होईल.

मुख्य जरूर आहे वाहतुकीच्या साधनांची. कोंकणच्या बंदरांचें देशावरील बाजारपेठांबरोबरचें दळणवळण सह्याद्रींतील घाटांमार्फत प्राचीन काळापासून चालू आहे. कोंकणच्या प्रत्येक टापूंत एक तरी नामांकित बंदर होतें. अफजलखानाच्या पोवाड्यांत कोंकणच्या बारा मराठी बंदरांचा उल्लेख आहे. ऑकवर्थनें ( Ballads of the Marathas, P. 119) टीपेंत त्यांची यादी दिली आहे. ती अशी : अलीबाग, रेवदंडा, बाणकोट, हर्णई, दाभोळ, जयगड, रत्नागिरी, जैतापूर, विजयदुर्ग, देवगड, मालवण आणि वेंगुर्ला. ह्या बंदरांची भरभराट देशावरील राजधान्यांवर अवलंबून होती. एकेका राजवटींत एकेका बंदराची भरभराट होते असें दिसतें त्याचें हेंच मूलकारण. आर्थिक क्रान्तीनंतर ज्या बंदरांना पठाराशीं जोडणाऱ्या आगगाडीच्या मार्गांची जोड मिळाली त्यांची विशेष भरभराट झाली. मुंबई, गोवें, मंगलूर व कोचीन या बंदराची वाढ व भरभराट मुख्यत्वेंकरून यामुळेंच झाली. मुंबईपासून गोव्यापर्यंत आगगाडी नसल्यामुळें या भागांतील बंदरें मागासलीं आणि स्थानिक उद्योगधंद्यांची गळचेपी झाली.

ऐकीव माहितीवर अवलंबून राहणारांना वाटतें कीं सह्याद्रीचे अगणित फांटे आणि किनारा फोडून आंत लांबवर घुसलेल्या असंख्य खाड्या यांमुळें कोंकणांत रूळरस्ते तयार करणें अशक्यप्राय आहे. वस्तुस्थिति इतकी बिकट नाहीं हें या भागांत तेलगाडीनें प्रवास केल्यानें प्रत्ययास येतें.

दुसरी काल्पनिक अडचण संचालक शक्तीची. कारण आक्षेपक सांगतात, सह्याद्रींत दगडी कोळसा सांपडत नाहीं. यामुळें या डोंगराळ भागांत आगगाडी चालविणें परवडणार नाहीं. सह्याद्रींत कृष्णशक्ति नाहीं, हें खरें; पण श्वेतशक्ति भरपूर आहे. औद्योगीकरणानंतरही सबंध महाराष्ट्राला पुरून उरेल एवढी वीज निर्माण करण्याची शक्ति सह्याद्रीचे अंगीं आहे.

सह्याद्रीची जलविद्युत्-निर्मितीची व्यक्त व अव्यक्त शक्ति हिंदुस्थानांत अद्वितीय आहे ; एवढेंच नव्हे, जगांतील उत्कृष्ट शक्तिस्थानांत सह्याद्रीची गणना करण्यांत येते ; कारण औद्योगिक केंद्रांनजीक,

एवढ्या सरळ उंचीवर, एवढे मोठे जलाशय इतरत्र कोठेंही नाहींत! पूर्वी मावळांना राजकीय महत्त्व होतें; आतां त्यांना आर्थिक महत्त्व प्राप्त झालें आहे. पूर्वी त्यांनीं विजेसारखे चपळ सैनिक पुरविले, आतां तीं महाराष्ट्राला पाणी व वीज पुरवीत आहेत. पाटपाणी व पाणवीज यांमुळें महाराष्ट्राच्या औद्योगिक जीवनांत क्रांति घडून आलेली आहे. महाराष्ट्रानें सहकार्य केलें तर दारिद्र्य व दुष्काळ यांना जिंकणारी चिच्छक्ति अपरंपार प्रमाणांत पुरविण्यास सह्याद्रि समर्थ आहे.

एक काळ असा होता, आणि हा काळ फार दूरवरचा आहे अशांतला भाग नाहीं, कीं जेव्हां सह्याद्रीचा परिसर गर्द झाडींनें आच्छादलेला होता. सह्याद्रीचा कांहीं भाग हल्लींही दाट जंगलांसाठीं विख्यात आहे. तशीच परिस्थिति पूर्वी सर्वत्र होती. तेव्हां पाऊस देशभर वेळेवर व भरपूर पडत होता. ही वस्तुस्थिति प्रत्यक्ष पाहिलेल्या व्यक्ति अद्याप हयात आहेत. इमारती लांकडांसाठीं व जळाऊ सरपणासाठीं हपापलेल्या नागरिकांची मागणी पुरविण्याकरितां ठेकेदारांनीं सह्याद्रि नागवला आहे, जवळ जवळ निर्वृक्ष केलेला आहे. या अदूरदृष्टीचे परिणाम महाराष्ट्राला आता भोगावे लागत आहेत. जंगली जमातींनीं अधूनमधून लहानसहान खेडीं लुटलीं किंवा एखाद्या दुसऱ्या संपन्न सावकाराच्या कोठ्यावर दरोडा घातला म्हणजे केवढा गाजावाजा होतो! याहून सहस्रावधि पटींनीं हानिकारक स्वरूपाची लुटालूट व जाळपोळ नागरिकांच्या प्रोत्साहनानें, सरकारच्या मंजुरीनें, सह्याद्रीच्या जंगलांत झालेली आहे आणि रोज राजरोस चाललेली आहे. यामुळें पावसाचें मान कमी व अनिश्चित झालें आहे; झरे कोरडे पडले आहेत व नद्या रोडावल्या आहेत; जमिनींचा कस धुपून जात आहे आणि सह्याद्रीच्या परिसरांतील कहाली दर हंगामीं वाढत आहे.

ही परिस्थिति बदललीच पाहिजे. झालेली हानि भरून काढण्याची जबाबदारी महाराष्ट्रावर आहे, सरकारवर आणि व्यक्तिमात्रावर. सह्याद्रि पूर्ववत् गर्द झाडींनें आच्छादला जाईपर्यंत त्यावर वृक्षारोपण करीत राहिलें पाहिजे; एखाद्या मंत्र्यानें उठवलेल्या हुलीमुळें समारंभपूर्वक किंवा क्षणिक उचलीसरशीं देखल्या देवा दंडवत म्हणून नव्हे; अहोरात्र समोर उभ्या

असलेल्या ह्या महादेवाची सार्वत्रिक व वैयक्तिक आराधना म्हणून ; अंतःकरणपूर्वक व सातत्यानें ; सह्याद्रीच्या परिसरांत पडणाऱ्या अपरिमित पर्जन्याचें पाणी कोरड्या दऱ्यांमध्यें बारमहा सांचून राहीपर्यंत, घाटमाथा व पठार यांच्या अंतर्यामांतील कोरडे पडलेले झरे पूर्ववत् वाहूं लागेपर्यंत, सह्याद्रींचें विख्यात समशीतोष्ण वातावरण परत येईपर्यंत ; सह्याद्रीचा उजाड परिसर सजल, सफल, सतेज व शीतल होईपर्यंत ! हीच सह्याद्रीची खरीखुरी आराधना.

सांखळीच्या दुव्यांपैकीं जो सर्वांत दुबळा असतो त्याच्या कुवती-इतकीच सांखळीची ताण सोसण्याची ताकत असते.

सह्याद्रींतील वन्य जमाती हा महाराष्ट्राचा सगळ्यांत दुबळा दुवा. नर्मदेच्या परिसरांतील त्यांच्या जमातवाल्यांच्या जोरावर आणि भाषेंतील लकबींच्या आधारावर महागुजरात त्यांना आपल्यात ओढूं पहात आहे ; सह्याद्रींतील त्याचा रहिवास आणि त्यांच्या भोंवतालीं पडलेलें मराठ्यांचें कडें यांच्या जोरावर संयुक्त महाराष्ट्र त्यांच्यावर हक्क सांगत आहे. दोघानाही त्यांनीं व्यापलेला प्रदेश धनशोषणासाठीं हवा आहे, त्यासाठींच या कष्टाळू अल्पसंतुष्टांचे सवंग श्रम हवे आहेत आणि निवडणुकीचे वेळीं त्यांचीं मतें हवीं आहेत ! दोहोंमध्यें फरक एवढाच कीं गुजरात्यांचे हात ओले व ओशट आहेत आणि मराठ्यांचे हात कोरडे व कठोर आहेत !

वन्य जमातींची समस्या सुटणार नाहीं तोंवर महाराष्ट्र दुभंगलेला व दुबळाच राहणार !

ही परिस्थिति बदललीच पाहिजे.

गेल्या शतकाच्या अखेरच्या चतुष्टकांत स्वार्थत्यागी महाराष्ट्रीयांनीं स्वावलंबी शिक्षणसंस्था निर्माण करून महत्त्वाचें देशकार्य केलें हें निर्विवाद आहे. सांस्कृतिक शिक्षणाची ओढ आवरली पाहिजे असें या क्षेत्रांतील अनुभवी तज्ज्ञांनाही आतां वाटूं लागलें आहे ; कीं जनतेंत प्राथमिक शिक्षणाची समान पातळी निर्माण झाल्यावांचून व्यावसायिक व उच्च शिक्षण इष्ट फलप्रद होणें अशक्य आहे. यापुढें उपयुक्त राष्ट्रीय शैक्षणिक कार्य करणें असेल तर त्याची व्याप्ति वन्य जमातींपुरती

मर्यादित ठेवली पाहिजे आणि यासाठीं स्वयंसेवकानीं स्वतंत्र, स्वावलंबी संघटना निर्माण करून सह्याद्रीच्या जंगलांतच घुसलें पाहिजे. तूपरोटीचे दिवस राहिले नाहींत, कण्याभाकरीचे दिवस आले आहेत. सह्याद्रीएवढे कामाचे डोंगर येथें ताटकळत आहेत. द्विपादांना मनुष्यत्व व मनुष्याला देवत्व प्राप्त करून द्यावयाचें महाकार्य येथें खोळंबलें आहे. धनुष्याच्या दोरीचें जानवें धारण करणारा किरातस्वरूपी महादेव, हातीं फरशी असलेला परशुराम, खांद्यावर वाकळ टाकलेला विठोबा, सह्याद्रीच्या अंतर्भागांत भक्तांची वाट पहात खोळंबले आहेत! शिळा झालेली अहिल्या रामचंद्राची वाट पहात झाडाझुडपांत, दगडमातींत, उन्हा-तान्हांत पडली आहे; त्याच्या चरणस्पर्शानें तिचा उद्धार व्हावा असा संकेत आहे. यासाठीं रामचंद्राला राज्यत्याग करून वनवासी झालेंच पाहिजे!

महाराष्ट्राच्या स्वार्थत्यागी परंपरेला हें सह्याद्रीचें आव्हान आहे. तें स्वीकारलेंच पाहिजे!

आणि हें कार्य लांबणीवर पडलें तर?

तर वन्य जमाती हिंदु धर्माला पारख्या होतील; महाराष्ट्राच्या कुशींत सलत राहतील; विध्वंसकांचे हातीं गेल्या तर त्या आपलें नागरी व तकलुपी सांस्कृतिक जीवन उध्वस्त करतील!

सह्याद्रीच्या परिसरांत अस्पृश्य जमातींची मोठी वस्ती आहे. स्मृति-कारांनीं प्राचीन काळीं तत्कालीन परिस्थितीच्या अनुरोधानें समाज-स्वास्थ्यासाठीं वर्गविभागणीची योजना केली. या योजनेमुळें स्वास्थ्य मिळालें, स्थैर्य लाधलें, प्रगति साधली; पण व्यावहारिक फळें पडलीं फक्त उच्चवर्णीय ब्राह्मण-क्षात्रियांच्या हातीं. या पापाचें खापर केवळ ब्राह्मणांच्या शिरावर फोडून चालणार नाहीं. गांवगाड्याच्या अस्तित्वाला अत्यावश्य असलेल्या अस्पृश्य जमातींना स्पृश्य समाजानें अत्यंत अन्यायानें वागविलेलें आहे. प्रत्येक बाबतींत महाराष्ट्राची गुजरातशीं तुलना करण्याची प्रथा अलीकडे सुरू झालेली आहे; विशेषतः आमची पीछेहाट स्पष्ट करण्यासाठीं आणि आमचीं वैगुण्यें ठळक करण्यासाठीं; म्हणूनच सांगतों; समाधानाची गोष्ट एवढीच कीं त्यांच्याबद्दलची आमची वृत्ति सौराष्ट्राइतकी कडू, तिखट व मर्मभेदक नाहीं. सामाजिक

व धार्मिक बहिष्कार या जमातींपैकीं कोणाला विशेष सलत असेल तर तो महारांना. गांवगाड्यांत ही जमात सर्वांत बुद्धिमान् व कर्तृत्ववान्. आतां त्यांचा स्वाभिमान जागृत झालेला आहे. स्वावलंबनाच्या जोरावर त्यांनीं औद्योगिक क्रान्तीचा शक्य तेवढा फायदा करून घेतलेला आहे. संघटनेच्या जोरावर त्यांनीं राजकारणांत स्वतंत्र स्थान मिळविलेलें आहे. बहिष्काराची कोंडी फोडून ते आक्रमक पावलें टाकूं लागले आहेत.

सह्याद्रीच्या प्रभावामुळें महाराष्ट्राची मनोवृत्ति सरंजामशाहीला अनुकूल आहे; कारण डोंगरी राजकारणाचा कल सरंजामशाहीकडे, सर्वसत्ताकेंद्रीकरणाकडे असतो. आम्ही लोकशाहीचा घोष करतों, पण अंतर्यामीं सरंजामशाहीला अनुकूल असतों. अलंघ्य चातुर्वर्ण्यव्यवस्था ही धार्मिक आणि वतनदारी ही राजकीय सरंजामशाही. वर्गविद्वेष आणि जातीयता यांवर आधारलेलें राजकारण हें या व्यवस्थेच्या कुजलेल्या अवस्थेचें प्रत्यंतर. कुजलेली सरंजामशाही आणि सडलेली लोकशाही यांच्या संकराचें झुंडशाही हें फळ, जिचा प्रत्यय महाराष्ट्रांतील अल्पसंख्यांना व विधायक कार्यकर्त्यांना वारंवार येत आहे!

दर्यावर चांचेगिरीला वाव राहिलेला नाहीं; तसाच घाटमाथ्यावर शिलेदारीला अवसर राहिलेला नाहीं. एकांड्या राजकारणाचा काळ संपला आहे. लोकशाहींत सत्ताभिलाषी जातीयतेला स्थान नाहीं.

महाराष्ट्रांत वन्य जमातींपैकीं वारली व कातकरी यांशिवाय स्वयंभू असे कोणीच नाहींत; आणि वंशानें शुद्ध असे कोणीही नाहींत.

महाराष्ट्रांत जातीयतेचा आरोप करण्यांत येतो मुख्यत्वेंकरून अल्पसंख्य ब्राह्मणांवर व प्रभूंवर. यांची जातीयता स्वसंतुष्ट आहे. बहुसंख्य मराठ्यांची जातीयता आक्रमक व उपद्रवकारक आहे, म्हणून प्रक्षोभक व हानिकारक आहे. यामुळें इतर जमाती राष्ट्रकार्यापासून परावृत्त किंवा निवृत्त होत आहेत. महाराष्ट्राच्या मराठेकरणाच्या चळवळीचे व समरसतेच्या तत्त्वज्ञानाचे एक आद्य पुरस्कर्ते श्री. भास्करराव जाधव (मराठे आणि त्यांची भाषा : पृ. ८३-४) सांगतात : ‘मराठा ही प्रमुख

जात इतर जातींसारखी एकलकोंडी नाहीं...राष्ट्रीय जात संग्राहक असते...संग्राहकपणाच्या गुणामुळें या राष्ट्रीय जातीची संख्या हळूहळू वाढतच जाणार...लहान जातींनीं योग्य प्रयत्न केल्यास व मराठी रीतिरिवाज स्वीकारल्यास त्यांचा ओढा या जातगंगेत मिळून त्याला गंगात्व मिळेल. लहान जाती या दिवसांत टिकणें कठीण आहे. त्यांनीं एक नाहींसें तरी व्हावें किंवा दुसऱ्या जातींत मिसळून तरी जावें.'

या तत्त्वज्ञानामुळें आणि तज्जन्य झुंडशाहीमुळें अल्पसंख्य जातींना महाराष्ट्रांतील खेड्यापाड्यांत राहणें अशक्यप्राय होत चाललें आहे. लोकशाही बहुमतानुवर्ती असल्यामुळें झुंडशाहीला जणुं राजाश्रय मिळालेला आहे. दुर्बलांनाही सुरक्षितता व विश्वास वाटेल अशाच पद्धतीनें राज्यकारभार चालला पाहिजे; त्यांना बहुसंख्यांशीं समरस होणें भाग पाडून नव्हे, त्यांचें व्यक्तिमत्त्व कायम ठेवून. जगांत आजवर झालेलीं सर्व महत्कार्यें अल्पसंख्यांनीं व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावावर केलेलीं आहेत हें ध्यानांत बाळगलें पाहिजे.

जगांत आजवर कोठेंही संकरप्रयोग यशस्वी झालेला नाहीं; संस्कार दृढ झालेल्या हिंदुस्थानसारख्या देशांत तर नाहींच नाहीं! संकराची घातुकता इतिहासांत जागोजाग प्रत्ययास आलेली आहे. जातीयता नष्ट करणें वेगळें व जाती नष्ट करणें वेगळें. आंतरजातीय विवाह हा जातीयतेविरुद्ध तोडगा सुचविण्यांत आलेला आहे. हा उपाय अव्यवहार्य आहे. ही प्रथा सर्वमान्य होणें शक्य नाहीं. मानवजात ही काय सत्ताधाऱ्यांची प्रयोगशाळा आहे? आणि मुलें व मुली काय रेडेम्हशी आहेत कीं त्याना कोणत्याही गोठ्यात बांधावें? बैल खरेदी करतांनाही आपण त्याच्या जातीकडे पाहतों; जातिवंत वळूविषयीं दक्ष असतों. जातीयता नष्ट करावयाची म्हणजे उच्च-नीच गंड नष्ट करावयाचा; सार्वजनिक संघटना सुकर व्हावी, सहजीवन प्रगतिक व सुरक्षित व्हावें, एवढ्याचसाठीं. एका वर्गाच्या बलसंघटनेसाठीं इतरांचें बलिदान केव्हांहि होतां कामा नये.

अल्पसंख्य अणुरेणूंसारखे आहेत म्हणून त्यांची उपेक्षा किंवा

अवहेलना करून चालणार नाहीं. वर्गविद्वेष फोंफावला तर वरिष्ठ व कनिष्ठ अल्पसंख्य जमातींची संयुक्त आघाडी निर्माण होईल. मग या अणूंचे स्फोट होतील; थंड झालेल्या ज्वालामुखींचे उद्रेक होतील; प्याद्यांचे फर्जी होतील आणि माजलेलीं मोहरीं नष्ट होतील.

एकट्या पुण्याला कोणी जुमानीत नाहीं आणि नुसत्या साताऱ्याला कोणी विचारीत नाहीं; पुणें-साताऱ्याच्या जुटीचा दरारा मात्र सर्वत्र आहे. विशेषतः परप्रांतांत. या वृत्तीचें रहस्य अद्याप आमच्या राजकारणी म्हणवून घेणाऱ्या मुत्सद्यांच्या ध्यानांत आलेलें दिसत नाहीं.

सह्याद्रींतील बौद्ध लेणीं हीं महाराष्ट्राच्या प्राचीन संस्कृतीचीं प्रतीकें; वेरूळचें कैलास हें ब्राह्मणी लेणें मध्ययुगाच्या प्रथमार्धाच्या संस्कृतीचें प्रतीक आणि हेमाडपंती मंदिरें हीं मध्ययुगाच्या उत्तरार्धाच्या संस्कृतीचीं प्रतीकें. मध्ययुगाच्या प्रथमार्धापर्यंत महाराष्ट्राची बांधणी एकसंधी होती. मोठमोठे दगड शास्त्रशुद्ध योजनेनुसार केवळ एकमेकांवर रचून हेमाडपंती मंदिरें उभारलेलीं असतात. त्यांच्या उभारणींत चुन्याचा उपयोग कोठेंही केलेला नसतो. क्वचित् एखाद्या कोपऱ्यांत कांहीं दगड लोखंडी सळयांनीं एकमेकांत गुंतविलेले असतात. हीं मंदिरें दिसतात तेवढीं मजबूत नसतात; कारण त्यांचे दगड एकामेकांशीं संलग्न झालेले नसतात. म्हणून कालप्रभावानें एखादा दगड कुजला किंवा खचला कीं तोल बिघडतो आणि सारें मंदिर पत्त्याच्या बंगल्यासारखें कोलमडून पडतें. हीं मंदिरें यादवांच्या अमदानींत उभारण्यांत आलीं. त्यांच्या राज्याची घटना अशीच होती. अपरान्ताचा किनारा, सह्याद्रीचा घाटमाथा, देशाचें पठार व वऱ्हाड-कर्नाटकाचीं मैदानें या प्रदेशांवर त्यांचें राज्य होतें; पण येथील सामन्तांवर किंवा राजप्रतिनिधींवर केंद्रसत्तेचें कार्यक्षम नियंत्रण नव्हतें; त्यांच्या राज्यकारभाराला दर्यावर्दी धोरण नव्हतें; डोंगरी धोरण यथातथाच होतें. राज्यकर्ते व प्रजा आणि वरिष्ठ व कनिष्ठ वर्ग एकमेकांच्या स्वास्थ्याविषयीं व उत्कर्षाविषयीं उदासीन होते. हेमाडपंती मंदिराप्रमाणेंच यादवांचें राज्य एकाएकीं कोलमडलें.

विधायक व विघातक शक्तींच्या मर्यादा विचारांत घेऊन आपण

महाराष्ट्र-मंदिर उभारलें पाहिजे. तें तेव्हांच चिरस्थायी होईल व तोंवर स्थिर राहील कीं जेव्हां व जोंवर आपण किनारी, डोंगरी व मैदानी राजकारणांचा समन्वय करूं शकूं आणि आपल्या कार्याची उभारणी सह्याद्रीच्या सहकार्यानें करूं.

## सह्याद्रि-माहात्म्य :

हिंदुस्थानांत सात कुलपर्वत आहेत, त्यांमध्यें सह्य व विन्ध्य हे मुख्य आहेत आणि कुलपर्वतांमधील हिमालयाचें स्थान वैकल्पिक आहे, असें वर सांगितलें. आतां सह्याद्रीचें माहात्म्य सांगतों.

कुलपर्वतांपैकीं सह्य व विन्ध्य यांचीं माहात्म्यें प्रसिद्ध झालेलीं आहेत. ( स्कन्दपुराणांतर्गत सह्याद्रिखण्ड : संपादक श्री. J. Gerson Da Cunha. 1887. Bombay ; विन्ध्यमाहात्म्यम् : संशोधक व प्रकाशक : पण्डित विश्वेश्वर दयालुजी वैद्यराज, बरालोकपूर, इटावा ). हे दोन्ही ग्रंथ अर्वाचीन आहेत. नर्मदेची पारंपारिक परिक्रमा अव्याहत चालू असल्यामुळें विन्ध्य व सातपुडा या पर्वतांचा परिसर भाविक प्रवाशांना परिचित आहे. ह्या परिक्रमेंतील पवित्र तीर्थस्थानें नर्मदापंचांगांत नमूद केलेलीं आहेत. सह्याद्रिखण्डाची रचना संकीर्ण आहे ; स्थलमाहात्म्यवर्णनापेक्षां चित्पावनादि जातींच्या निर्भर्त्सनेवर विशेष भर दिलेला आहे. हा ग्रंथ कोणीं केला याबद्दल कांहींही माहिती उपलब्ध नाहीं. ग्रंथकार कोणत्या जातीचा असावा याबद्दल अंतर्गत पुराव्यावरून अनुमान करणें शक्य आहे ; पण हा अंदाज सशब्द करणें अशक्य आहे. वाटतें कीं हा ग्रंथ पेशवाई नांवारूपाला आल्यानंतर रचण्यांत आलेला असावा. कारण यापूर्वी चित्पावनांना निंदा करण्याइतकेंही महत्त्व नव्हतें. सांगण्यांत येतें कीं पेशवाईच्या अखेरच्या काळांत हा ग्रंथ नष्ट करण्यासाठीं चित्पावनांनीं हातीं असलेल्या राज्याधिकाराचा उपयोग केला ; ज्यांचे संग्रहीं सह्याद्रिखण्ड सांपडलें त्यांना जबर शिक्षा दिल्या. अभिशंसनासाठीं का होईना, विशिष्ट प्रदेशांत स्थायिक झालेल्या मानववंशांवर लक्ष केंद्रित करणारा हा एकमेव पुराणग्रंथ आहे, यांत संशय नाहीं. जातिनिंदेमुळेंच ह्या ग्रंथाचा व्हावा तसा अभ्यास अद्याप झालेला नाहीं, असें वाटतें.

कुलाचलांपैकीं सह्य व विन्ध्य हे मुख्य होत असें वर सांगितलें. वस्तुतः विन्ध्य हा पर्वत नसून मध्य हिंदुस्थानच्या पठाराचा किनारा मात्र आहे. नर्मदेच्या तीरानजीक त्याची उभारणी तटबंदीसारखी दिसते, म्हणूनच त्याला पर्वत म्हणावयाचें. विन्ध्य पर्वताचे अंगीं व्यक्तिमत्त्व यत्किंचितही नाहीं. पुराणें सांगतात कीं एका काळीं स्वतःच्या माहात्म्याबद्दल अवास्तव कल्पना करून घेतल्यामुळें विन्ध्याद्रीची महत्त्वाकांक्षा अनावर झाली, सृष्टीला तापदायक झाली; शेवटीं जगाच्या कल्याणासाठीं अगस्तीनें त्याला नमविलें; तेव्हांपासून त्याची उंची कमी झाली आणि साष्टांग दंडवत घातल्यामुळें विस्तार मात्र वृद्धिंगत झाला. तेव्हांपासून विन्ध्याद्रीवरून रहदारी सुरू झाली. विन्ध्याद्रीहून सह्याद्रीचें माहात्म्य मोठें आणि व्यक्तिमत्त्व प्रखर; पण सह्याद्रि सृष्टीला उपद्रवकारक झाला नाहीं, हिंदुस्थानचें धारण करीत राहिला आणि कोणालाही कधींही शरण गेला नाहीं.

कुलाचलांपैकीं बाकीचे पर्वत क्षुद्र आहेत. सह्याद्रीशीं तुलना करावयाजोगा कोणता पर्वत असेल तर तो हिमालयच!

कविकुलगुरु कालिदासानें कुमारसंभवाच्या आरंभीं नगाधिराज हिमालयाला आवाहन केलेलें आहे :

अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा
हिमालयो नाम नगाधिराजः ।
पूर्वापरौ तोयनिधीवगाह्य
स्थितः पृथिव्या इव मानदण्डः ॥

“हिमालय हा जणुं पर्वतांचा सम्राट् आहे. तो पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत पसरलेला आहे. जणुं पृथ्वी मोजण्याचा हा मानदण्ड आहे. हिमालय हा देवतात्मा आहे.”

हिमालयाचा विस्तार पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत आहे हें कालिदासाचें विधान बरोबर नाहीं. विस्ताराच्या व उंचीच्या दृष्टीनें हिमालय हा पर्वतांचा सम्राट् आहे, हें मात्र खरें. हिमालय हा सह्याद्रीहून

प्रचण्ड व उत्तुंग असला तरी वयोमानाच्या दृष्टीनें सह्याद्रि हाच अधिक पुरातन आहे. हिमालयाला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. हिमालय ही मेरूची शाखा मात्र आहे. सह्याद्रि स्वतंत्र व स्वयंसिद्ध आहे; एवढेंच नव्हे, हिंदुस्थानच्या भूमीचा मूलाधार आहे. दक्षिणापथाच्या पश्चिम भागीं कुशीवर कलंडलेल्या ह्या पुराणपुरुषाचें प्राचीनत्व शास्त्रसिद्ध आहे !

हिमालयाचें शरीर प्रचण्ड व उत्तुंग आहे, त्याचा विस्तार आसमुद्र आहे किंवा तेथील वनश्री अद्वितीय आहे, म्हणून नव्हे, हिमालयावर देवदेवतांचें अधिष्ठान आहे, हिमालय हा देवतात्मा आहे, म्हणूनच कालिदासानें त्याला पर्वतांचें सम्राट्पद दिलेलें आहे.

हिमालय ही देवभूमि आहे, हेंच हिमालयाचें वैशिष्ट्य. जें अगम्य व अज्ञात तेथें देवाचें स्थान असें मानण्याकडे मानवाची प्रवृत्ति असते. गौरीशंकर व कैलास ह्या हिमालयाच्या शिखरांवर शंकराचें वास्तव्य आहे असें इतिहासपुराणें सांगतात. या शिखरांवर आजवर मानवी पदन्यास झालेला नाहीं. तीं अगम्य आहेत, म्हणूनच येथील कृत्रिम देवस्थानांची स्थापना या व अशा शिखरांच्या पायथ्यांलगत दऱ्याखोऱ्यांतून करण्यांत आलेली आहे. सह्याद्रीचीं शिखरें इतकीं उंच नाहींत. कळसूबाई हें मराठी सह्याद्रीचें अत्युच्च शिखर. त्याची उंची कैलासच्या पंचमांशाएवढी आहे. सह्याद्रीचीं शिखरें अलंघ्य होण्याइतकीं दुर्घट नाहींत. सह्याद्रीवरही अनेक देवस्थानें आहेत आणि तीं त्याच्या पायथ्याशीं नव्हे, शिखरावर अधिष्ठित आहेत. फार काय, सह्याद्रीचीं शिखरें हींच जणुं निसर्गनिर्मित देवस्थानें आहेत. महाराष्ट्राचीं देवस्थानें सह्याद्रीनें शिरावर धारण केलेलीं आहेत. हीं सर्व मंदिरें शंकराचीं, पुरुषाचीं व प्रकृतीचीं. फार काय, सह्याद्रीवर जणुं दुसऱ्या कोणा देवाला वा देवतेला मान्यताच नाहीं; आणि ह्या देवदेवेश्वराना सर्व वर्णांची व जमातींची पूर्ण मान्यता आहे; प्रत्यक्ष विष्णूच्या अवतारांचीही. परशुराम व रामचंद्र हे दोघेही विष्णूचे अवतार. या उभयतांनीं सह्याद्रीच्या परिसरांत अनेक शिवलिंगें स्थापन केलेलीं आहेत. सह्याद्रीच्या प्रत्येक टापूंत विविध स्थानिक नांवांनीं ओळखलें जाणारें शंकराचें मंदिर अगर स्थान असतेंच. सह्याद्रीच्या रांगा व शिखरें यांकडे आकाशां-

तून पाहतांना वाटतें कीं जणुं सृष्टिनिर्माणकाळीं ज्वालामुखींच्या उद्रेकांनीं तप्त झालेल्या भूमीला शांत करण्यासाठीं प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें येथें पार्थिव-पूजा केलेली असावी! सह्याद्रीवरील देवस्थानें बहुजनसमाजाला ज्ञात व गम्य अशा शिखरांवर आहेत. अपूर्व साहस व संघटना यांवांचून हिमालयाच्या शिखरांवरील पवित्र स्थानांचें दर्शन घेणें मनुष्याला अशक्य आहे. हिमालयावरील तीर्थक्षेत्रांच्या यात्रा सर्वसंगपरित्यागी व सर्वार्पण-सिद्ध तापसांनाच शक्य आहेत; किंवा सर्वसमर्थ धनिकांना; त्यांनाही या यात्रांना जमावानें जावें लागतें. सह्याद्रीवरील देवदेवतांचें दर्शन कोणीही, केव्हांही घेऊं शकतो. बहुजनसमाजाचीं दैवतें व्यक्तिमात्राच्या आटोक्यांत ठेवणें हें सह्याद्रीचें वैशिष्ट्य; आणि महाराष्ट्राचेंही!

सह्याद्रीनें शंकराला शिरावर धारण केलें आहे, आणि हिमालयानें स्कंधांवर; म्हणूनच कीं काय कोण जाणे, भारतांतील अधिकृत ज्योतिर्लिंगांपैकीं फक्त एकच हिमालयाच्या वांट्याला आलेलें आहे आणि बहुसंख्य ज्योतिर्लिंगें सह्याद्रीच्या वाट्याला आलेलीं आहेत.

ज्योतिर्लिंगें हें तर सह्याद्रीचें वैशिष्ट्य आहे. हीं सह्याद्रीच्या निर्मितीचीं प्रतीकें आहेत; सह्याद्रीच्या अंतर्यामाचीं द्योतक आहेत. दक्षिणेंतील ज्वालामुखी थंड झालेले असल्यामुळें त्यांच्या उद्रेककेंद्रांचा मागमूसही राहिलेला नाहीं. संभवनीय आहे कीं ज्योतिर्लिंगांचा संकेत ह्या केंद्रांचा द्योतक आहे आणि नैसर्गिक शक्तींच्या पूजेचें हें आद्यस्वरूप आहे. हिमालयांत कांगडा येथें असें एकच एक ज्योतिस्थान आहे. भूगर्भांतील घडामोडींचे प्रतिध्वनि व अंतर्यामांतील अग्नीच्या ज्वाला सह्याद्रींतील ज्योतिर्लिंगांतून वेळोवेळीं प्रकट होत असल्याच्या आख्यायिका या व अशा स्थानांच्या माहात्म्यांत नमूद आहेत आणि त्यांचा प्रत्यय सामान्य जनांना येतोही. पृथ्वीवरील प्रळयांचें कर्तृत्व शंकराकडे असल्यामुळें या उद्रेककेंद्रांचे जागीं ज्योतिर्लिंगाची स्थापना व्हावी हें सयुक्तिक आहे; इतकेंच नव्हे, सप्रमाण व सशास्त्र आहे.

शिवाय बौद्धांचीं प्राचीन, बहुसंख्य व उत्तमोत्तम लेणीं सह्याद्रींतच आहेत. सह्याद्रींतच हीं लेणीं खोदण्यांत आलीं; कारण हिंदुस्थानांतील सर्व पर्वतांत त्याचाच गाभा निर्मळ, एकसंध व कणखर आहे.

हिमालयाचा गाभा गढूळ, ठिसूळ व संकीर्ण आहे. म्हणूनच, बौद्ध-धर्माचा उद्भव व विकास हिमालयाच्या परिसरांत झालेला असला तरीही आद्य बौद्धांनीं त्याच्या उतारावर स्तूपांचे ढिगारे मात्र उभारले ; अशोकानें कोठें कोठें धर्मस्तंभही उभारले आहेत ; पण ते त्याला लांब-वरून वाहून आणावे लागले आहेत.

शंकराचा असहिष्णु हिंसाधर्म, परशुरामाचा वैयक्तिक क्रान्तिधर्म आणि बुद्धाचा सहिष्णु अहिंसाधर्म, या सर्वांना सह्याद्रीनेंच स्थान दिलेलें आहे.

आतां सांगा, हिंदुस्थानची देवभूमि सह्याद्रि कीं हिमालय ? सह्याद्रि अधिक पवित्र व पूज्य कीं हिमालय ?

हिमाच्छादित शुभ्र पृष्ठभाग, प्रचण्ड व उत्तुंग शिखरें, विस्तीर्ण व निर्मळ सरोवरें, दऱ्याखोऱ्यांतील सदैव हिरवीगार वनश्री, बारमहा वाहणारे स्वच्छ प्रवाह आणि जागोजाग कोसळणारे प्रपात, यांच्या समुच्चयामुळें हिमालयाचें सौंदर्य जगांत अद्वितीय आहे, यांत संशय नाहीं. पर्वतांवरील बर्फाचें आच्छादन व त्यामुळें निर्माण होणारें विशिष्ट वातावरण, हेंच त्यांचें सौंदर्य अजमावण्याचें खरें परिमाण आहे, असा पाश्चात्य प्रवाशांचा दण्डक आहे. हिंदुस्थानांतल्या तापलेल्या मैदानांतून उन्हाळ्यांत गिरिशिखरांकडे विश्रांतीसाठीं धांव घेणारे सुखवस्तु सुशिक्षित याच दृष्टीनें हिमालयाकडे पाहतात. हिमालयाच्या खोऱ्यांतील व चढणींवरील वनश्रीचें अपरिचित व अपरंपार वैभव पाहून अंतःकरण प्रसन्न होतें, मन भारलें जातें. काश्मीर हें हिंदुस्थानचें नंदनवन आहे. तेथील अद्वितीय सृष्टिसौंदर्याचा उपभोग मनुष्याला थोड्याफार प्रयासानें घेतां येतो. हिमालयाच्या अंतर्भागांतील सौंदर्याच्या वेग-वेगळ्या कलांच्या दर्शनाचा आनंद अनुभविणें कष्टसाध्य आहे. सृष्टि-सौंदर्याकडे ज्यांचें लक्ष क्वचितच जातें असे यात्रेकरूच या भागांत बहु-संख्येनें प्रवास करतात. देवभूमीच्या दर्शनासाठीं कष्टांना सज्ज असलेल्या या भाविकांना मार्गावरील हिमप्रस्तर संकटांसारखे वाटतात. प्राचीन हिंदी कवींची दृष्टीही अशीच होती. कारण पाश्चात्य प्रवाशांनीं लिहिलेलीं

आल्प्स पर्वताचीं वर्णनें त्यांनीं वाचलेलीं नव्हतीं. हिमालयाचें हिमाच्छादन हा कालिदासालाही त्याचा दोषच वाटतो. तो सांगतो :

अनन्तरत्नप्रभवस्य यस्य
हिमं न सौभाग्यविलोपि जातम्
एको हि दोषो गुणसंनिपाते
निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः ॥

हिमालयाचे अंगीं इतके गुण आहेत कीं त्यांत हा दोष लोपून जातो आणि त्याचे अंगीं हा एकच दोष असल्यामुळें त्याचें माहात्म्य मुळींच कमी होत नाहीं. सह्याद्रि मात्र ह्या दोषापासून सर्वस्वीं अलिप्त आहे. हिमाच्छादन हें सौंदर्याचें परिमाण मानलें तर सह्याद्रीचे अंगीं सौंदर्याचा लेशही नाहीं असेंच म्हणावें लागेल; कारण येथें फार तर दंव पडतें, बर्फ कधींच पडत नाहीं; यामुळें त्याचा वर्ण पांढुरका होतो, पांढरा फटक होत नाहीं. पर्वतांचें सौंदर्य त्यांच्यावरील हिमावरणावरून मोजावयाचें, मग प्रसाधनासाठीं चोपडलेल्या मुखरागांच्या लेपांवरून स्त्रियांचें सौंदर्य कां अजमावयाचें नाहीं? मनुष्याला गौरवर्ण साधारणतः विशेष आकर्षक वाटतो; विशेषतः उन्हाच्या झळींनीं काळवंडलेल्यांना. स्वाभाविक आवड कशीही असली तरीही श्यामल वर्णांतही माधुरी असते, हें निःसंशय. श्यामलेनें मुखावरून सौंदर्यरजांचा पुसता हात फिरविला म्हणजे अशी शोभा येते कीं वाटतें जणुं सह्याद्रीच्या कड्याला शरद्-ऋतूंतील विरल व शुभ्र असा मेघच लपेटलेला आहे!

श्री. राजारामशास्त्री भागवत सांगतात त्याप्रमाणें कालिदासाची वृत्ति लंपट, हेंच खरें; नाहीं तर त्याला मलयदर्दुर हे पर्वत क्षितीच्या स्तनांसारखे व सह्याद्रीची रांग नितंबासारखी भासली नसती. कीं प्रकृतीकडे पुरुषाच्या नजरेनें पाहण्याइतकी त्याची दृष्टि दिव्य झाली होती? सह्याद्रींतही अशा आवळ्या-जावळ्या टेंकड्या अनेक आहेत. दिग्विजयार्थ निघालेला रघुराजा दक्षिणेकडील देश जिंकून सह्याद्रीसमीप आला तेव्हांचें वर्णन करतांना कालिदास रघुवंशात ( रघुदिग्विजय : सर्ग ४ ) सांगतो :—

स निर्विश्य यथाकामं तटेष्वालीनचन्दनौ ॥
स्तनाविव दिशस्तस्याः शैलौ मलयदर्दुरौ ॥५१॥
असह्यविक्रमः सह्यं दूरान्मुक्तमुदन्वता ।
नितम्बमिव मेदिन्याः स्रस्तांशुकमलङ्घयत् ॥५२॥
तस्यानीकैर्विसर्पद्भिरपरान्तजयोद्यतैः ।
रामास्त्रोत्सारितोऽप्यासीत्सह्यलग्न इवार्णव ॥५३॥

श्री. गणेशशास्त्री लेले, त्र्यंबककर, ह्यांनीं केलेलें या भागाचें पद्यात्मक भाषांतर ( निर्णसागर–शके १८०५. पृ. ४७–४८ ) पहा :

विमल चंदन ज्यावरि साजिरें,
मलय दर्दुर नामक शैल रे,
युवति दिक् विलसे जणुं दक्षिणा,
कुच तिचेचि जयां प्रति हो गणां,
कामी निजस्त्री कुचकुड्मलाचा
जसा करी तो उपभोग साचा,
यथेच्छ तैसा उपभोग त्यांचा,
करोनिया तो अधिप प्रजांचा
सह्याख्य जो पर्वत थोर आहे,
नितंब जाणों क्षितिचाच पाहे,
समुद्ररूपी बहु भव्य वस्त्र,
राहे दुरी सोडुनि ज्या विचित्र;
स्त्रीच्या नितंबाप्रति वस्त्रहीना
पती जसा आक्रमितो सुजाणा,
तसा तया आक्रमुनी विशाळ,
सेनेसवें जाय तईं नृपाळ. ( ५२ )

त्याची विस्तीर्ण सेना बहुत पसरली पश्चिमेलागीं जेव्हां,
आशंका थोर जाली सकलहि जगतीवासि लोकांसि तेव्हां;
कीं पूर्वी जामदग्न्यें जलधि हटविला कोंकणांतील दूर,
तो आतां सह्य शैलावधि वरि जणुं ये, येवुनी त्यास पूर. (५३)

कालिदासाहून भवभूतीची वृत्ति अधिक गंभीर. उत्तररामचरिताच्या दुसऱ्या अंकांत त्यानें नाशिकनजीकच्या सह्याद्रीच्या परिसराचें वर्णन केलेलें आहे. मूळ मजकूर जागोजाग पांगलेला असल्यामुळें त्याचें संकलित भाषांतर तेवढें येथें देतों. भवभूति सांगतो, "जलानें भरलेल्या मेघांच्या मालेप्रमाणें दिसणारा हा पर्वत–" कारण सह्याद्रीचा वर्ण मेघश्याम आहे, "ज्यावरील गर्द वृक्षांची छाया गोदावरीच्या निर्मळ प्रवाहांत प्रतिबिंबित झालेली आहे, गजगंडघर्षणानें ज्यांचीं पुष्पें गळून पडतांना ते जणुं गोदावरीला पूजाच अर्पण करीत आहेत असें वाटतें ... हें दण्डकारण्य, कोठें स्निग्ध आणि श्याम, कोठें रुक्ष आणि भीषण!"

भवभूतीनें वर्णिलेल्या या प्रदेशाबद्दल पुराणांनीं काढलेले उद्गार पहा :—

"सह्यस्य चोत्तरार्धे तु यत्र गोदावरी नदी।
पृथिव्यामिह कृत्स्नाया स प्रदेशो मनोरमः॥

वायुपुराण : पूर्वार्ध–अ. ४५-११२.

मूळ पुराण कोणतें कोण जाणे, सर्व पुराणांनीं हेच उद्गार याच शब्दांत काढले आहेत, एवढें मात्र खरें.

अमरकंटक व कळसूबाई हीं उत्तुंग शिखरें, तोरणमाळ व महाबळेश्वर हीं प्रशान्त पठारें, गोदावरी व कृष्णा यांचीं मनोहर खोरीं, दूधसागर व जोग येथील रम्य व प्रचण्ड प्रपात, आंबेनळी व आंबोली येथील प्रदीर्घ घाट, जावळी व कारवार येथील घनदाट अरण्यें, दाभोळ व गोकर्ण-महाबळेश्वर येथील सुंदर समुद्रकिनारे, किती किती उदाहरणें सांगावींत! सृष्टिसौंदर्याच्या बाबतींत सह्याद्रि कोणालाही हार जाणार नाहीं!

कोणी आक्षेप घेतील कीं मी कड घेऊन सह्याद्रीची बाजू रंगवून सांगत आहें, गुणांना अतिशयोक्तीनें उठाव देत आहें आणि दोषांची वाच्यता टाळीत आहें. कोठें हिमालय आणि कोठें सह्याद्रि ! हिमालया-एवढा विशाल व उत्तुंग पर्वत जगांत दुसरा नाहीं; त्याचें सौंदर्य अद्वितीय नसलें तरी अव्वल दर्जाचें आहे आणि त्याचें पावित्र्य अखिल भारतीय स्वरूपाचें आहे. हिमालय हेंच भारताचें भूषण आहे. सह्याद्रि जगाच्या गणतींतही नाहीं; कोठें गौरीशंकर आणि कोठें महाबळेश्वर! असा उत्तरपक्ष करणें सोपें आहे. विशालता व उत्तुंगता, पावित्र्य व सौंदर्य यांचें अधिष्ठान असणें, एवढेंच पर्वतांचें माहात्म्य असें मानावयाचें कीं काय? नाहीं. पर्वताचें माहात्म्य त्यांवरील रहिवाशांच्या माहात्म्यावर अवलंबून असतें. हिमालय हा जसा देवतात्मा आहे तसा सह्याद्रि हा वीरात्मा आहे; सह्याद्रीचा पिंड स्वातंत्र्योन्मुख व युद्धप्रधान आहे; हीच त्याच्या माहात्म्याची परिसीमा आहे!

महाकवि भारवि किरातार्जुनीयांत ( १८ : ५ ) सांगतो :

उरसि शूलभृतः प्रहिता मुहुः
प्रतिहतिं ययुरर्जुनमुष्टयः ।
भृशरया इव सह्यमहीभृतः
पृथुनि रोधसि सिन्धुमहोर्मयः ॥

अर्जुन व शंकर हे कसलेले योद्धे. द्वंद्वयुद्धांत अर्जुनानें किराताच्या उरावर दणकावलेले मुष्टिप्रहार निष्प्रभ झाले आणि माघारे फिरले; कसे ? सागराच्या प्रचंड लाटा सह्याद्रीच्या तटावर आवेशानें धडाडतात आणि निकराच्या अशा अनेक प्रहारांनीही त्याचा कणखर कडा कोसळत नाहीं, हें निदर्शनास आल्यामुळें हताशपणें माघाऱ्या फिरतात, त्याप्रमाणें !

सह्याद्रीवर सागर अनंत काळापासून धडका मारीत आहे, तरीही सह्याद्रि कोसळला नाहीं; इतकेंच नव्हे, सह्याद्रीनें सागरालाच माघार घ्यावयास लावलें आहे. सह्याद्रीच्या शिखरावरून परशुरामानें भिरकावलेल्या बाणाच्या किंवा परशूच्या प्रभावामुळें सागरच दोन पावलें हटला.

सागरानें सह्याद्रीला अपरान्ताचा प्रदेश खंडणीदाखल दिला. सौराष्ट्रांतून महाराष्ट्रांत घुसलेल्या शकांपासून गंगायमुना मैदानांतून दक्षिणेंत लोटलेल्या यवनांपर्यंत अनेक आक्रमकांनीं सह्याद्रीवर धडका मारल्या; पण सह्याद्रि डरला नाहीं, नमला नाहीं! थोडा वेळ जरासा मागें सरलासा भासला; पण तो केवळ उसळीच्या उशीसाठीं; प्रतिकाराच्या संघटने-साठीं; कारण सह्याद्रि हा वीरात्मा आहे आणि स्वातंत्र्य हाच त्याचा स्थायीभाव आहे; आणि ह्यांतच त्याचें माहात्म्यसर्वस्व सामावलेलें आहे!

या दृष्टीनें पाहतां पामीर व कॉकेशस् यांशिवाय जगांतील इतर कोणतेही पर्वत सह्याद्रीशीं तुलनेलाही उभे राहूं शकत नाहींत.

हिमालयांत अनेक जातीजमातींची वस्ती आहे. पैकीं कांहीं पूर्वी सुसंस्कृततेसाठीं विख्यात होत्या. लम्पटतेमुळें त्यांची संस्कृति लयाला गेली आणि भ्रष्टतेमुळें त्यांचें स्वातंत्र्य नष्ट झालें. कांहीं जमाती शरीर-सौष्ठवासाठीं विख्यात आहेत, त्यांच्याविषयीं न बोललेलेंच बरें; आणि कांहीं जमाती शौर्यासाठीं. तेथील लढाऊ जातींच्या शौर्याचा विशेष बोलबाला झाला ब्रिटिशांच्या अमदानींत; कारण जेत्यांना आपल्या शत्रूंशीं झुंझावयास भाडोत्री लढवय्ये हवे असतात. कोणी म्हणतील, 'चिरंजीव त्यांचें जगीं नाम आहे!' माझे एक मित्र समस्यापूर्ति करतात, 'कुणासाठीं मेले, तुझें तूंच पाहे!' या जमाती लढाऊ व इमानी खऱ्या, पण स्वत्वशून्य व भाडोत्री! अलीकडे ठिक-ठिकाणीं गुरखे पहारेकरी नेमण्यांत येतात याचें रहस्य हेंच आहे. विंध्य पर्वतांतील जमातींना व्यक्तिमत्त्वच नाहीं. येथील वन्य जमातींनीं राज्यकर्त्या रजपुतांना वेळप्रसंगीं मदत करून इमान राखलें आहे; पण नांव घेण्याजोगें शौर्य कधीं गाजविलें नाहीं किंवा स्वतंत्र कर्तृत्वाची प्रथा प्रस्थापित केली नाहीं. सह्याद्रीप्रमाणेंच अरवली हाही वीरात्मा आहे. हिंदुस्थानला अभिमान वाटावा अशा रीतीनें येथील वीरांनीं स्वत्वाचें संरक्षण व स्वातंत्र्याचें संपादन केलेलें आहे; पण अर्वाचीन काळच्या प्रभावानें अरवली स्तिमित झालेला आहे.

अबूचा पहाड पुराणप्रसिद्ध आहे. अर्बुदाचलावर विश्वामित्रानें प्रज्व-

लित केलेल्या यज्ञकुंडांतून चार क्षत्रिय अग्निकुलें निर्माण झालीं अशी कथा आहे. हा पहाड विशेष प्रसिद्ध आहे त्यावरील जैन मंदिरांसाठीं. त्यांची उभारणी व त्यांतील कोरीव काम जगांत अद्वितीय आहे. यांपैकीं एक मंदिर भीमदेव सोळंकी ( १०२२ ते १०६४ ) याचा मंत्री विमल साह यानें १०३२ सालीं अठरा कोट रुपये खर्चून उभारलें; आणि दुसरें वस्तुपाल व तेजपाल या बंधूंनीं ११९७ ते १२४७ या अर्ध-शतकांत उभारलें. हे दोघे वीरधवल वाघेल याचे मंत्री होते. ह्या मंदिरांची उभारणी झाली ते कालखंड हिंदुस्थानच्या इतिहासांत अत्यंत आणीबाणीचे होते. अकराव्या शतकाच्या आरंभीं महमूद गझनी याच्या नेतृत्वाखालीं अफगाणांनीं हिंदुस्थानवरील वार्षिक मोहिमाची प्रथा सुरू केली. पहिल्या पंचवीस वर्षांत त्यांनीं येथील अनेक पुरातन शहरें व पवित्र मंदिरें लुटलीं व उध्वस्त केलीं, येथील मूर्तींचीं शकलें मशिदींच्या पायऱ्यांना लावण्यासाठीं गझनीस वाहून नेलीं. १०२४ सालीं त्यांनीं सोमनाथाचें मंदिर उध्वस्त केलें. धर्माच्या नांवानें मुसल-मानांशीं निकराचें युद्ध करावयास रणांत सज्ज झालेल्या हिंदु राजांच्या संघांत भीमदेव सामील झाला नाहीं; एवढेंच नव्हे, जीव बचावण्यासाठीं तो राज्यत्याग करून पळून गेला आणि स्वारी माघारी जाईपर्यंत कच्छच्या रणांत छपून राहिला! इकडे या घडामोडी चालल्या होत्या तेव्हां तिकडे अबूच्या पहाडावर भीमदेवाचे मंत्रिमहाशय मंदिरासाठीं संगमरवर कोरणाऱ्या कुशल कारागिरांना त्यांनीं कोरून काढलेल्या चुऱ्याच्या भारंभार सोनें तोलून देण्यांत चूर होते! सोमनाथावरील स्वारीच्या वेळीं या मंदिराचें काम चालू असलेंच पाहिजे; कारण त्यानंतर आठच वर्षांनीं तें पुरें झालेलें आहे. वस्तुपाल व तेजपाल या बंधूंनीं दिलवाड्या-वरील मंदिरें उभारण्यास सुरवात केली त्याच सालीं दिल्ली सुलतान मुहम्मद इब्न साम याचा सेनापति कुतबुद्दीन ऐबक यानें अनहिल-वाड्याची लूट केली आणि तेथील मंदिरांची धूळधाण केली. यानंतर तीन वर्षांनीं त्यानें दिल्ली व अजमीर येथील हिंदु मंदिरांच्या मशिदी केल्या १२३४ सालीं दिल्ली सुलतान इल्तात्मिश यानें उज्जैन येथील महाकालाचें पुरातन मंदिर उध्वस्त केलें. इकडे या घडामोडी चालल्या

होत्या तेव्हां वीरधवलाचे मंत्री सौराष्ट्राची संपत्ति अबूच्या पहाडावरील कलेच्या आवर्तांत ओतीत होते!

आणि या मंदिरांच्या निर्मितीसाठीं लागलेलें द्रव्य कोठून आलें?

दंतकथा सांगते कीं अबूचा राज्यपाल विमल साह याला त्याच्याच संरक्षणाखालीं सोळंकी राज्यांत लूटमार करणाऱ्या दरोडेखोरांपासून मंदिराच्या उभारणीसाठीं जरूर असलेलें अगणित द्रव्य प्राप्त झालें! वस्तुपाल व तेजपाल यांना प्राप्त झालेला व्यापारी लुटींतील हिस्सा ते काठेवाडांत हडालक येथें पुरून ठेवण्याच्या खटपटींत असतांना त्यांना तेथें आणखी गुप्त द्रव्य सांपडलें. त्यांना लक्ष्मीनें झपाटलें! अचानक प्राप्त झालेल्या या संपत्तीमुळें त्यांना झोंप येईना. तेव्हां वस्तुपालाची पत्नी ललिता व तेजपालाची पत्नी अनुपमा यांनीं त्यांना मनःस्वास्थ्या-साठीं अबू, गिरनार व शत्रुंजय येथें मंदिरें उभारण्यांत संपत्तीचा व्यय करावयास सांगितलें. त्यावरून यांनीं हीं मंदिरें उभारलीं!

आक्रमकांना कसून विरोध करणारीं पुरातन राजघराणीं नष्ट होत होतीं आणि त्यांचेच मंत्री राजकीय आपत्कालीं क्रोडों रुपयांचा व्यय करून मंदिरें उभारीत होते! हिंदूंनीं पवित्र मानलेलीं संपन्न मंदिरें उध्वस्त होत होतीं, त्याच काळांत जैनांचीं अतुल्य मंदिरें निर्माण होत होतीं! या घटनांवरून अनेक विपरीत निष्कर्ष निघूं शकतात. मूर्तिभंजक मुसलमानांच्या विध्वंसनांतून हीं मंदिरें कशीं बचावलीं? जैनांच्या ऐहिक इतिहासांतलि हें एक उघडें गुपित आहे.

सह्याद्रीच्या परिसरांत अशीं मंदिरें नाहींत. आंतरराष्ट्रीय किंवा आंतरप्रांतीय, मानवतेच्या किंवा कलेच्या दृष्टीनें हें आमचें दुर्भाग्य; पण राष्ट्रीयत्वाच्या आणि स्वाभिमानाच्या दृष्टीनें हेंच आमचें महत्-भाग्य! आमचीं खरीं मंदिरें म्हणजे सह्याद्रीवरील किल्ले. चालुक्य, राष्ट्रकूट, शिलाहार, यादव वगैरे प्राचीन व मध्ययुगीन सम्राट् व मांडलिक राज्यकर्त्यांनीं सह्याद्रीवर व सह्याद्रीच्या परिसरांत अनेक स्वातंत्र्यमंदिरें उभारलीं. त्यांनीं याच प्रदेशांत अनेक शिवमंदिरेंही उभारलीं आहेत; त्यांत व्यक्त होणारें कलाकौशल्य व त्यांवर खर्च झालेलें द्रव्य दिलवाड्याच्या पासंगालाही पुरणार नाहीं; मात्र हीं मंदिरें

उभारण्यासाठीं त्यांनी दरवडेखोराशीं भागीदारी केली नाहीं ; शिवाय तीं त्यांनीं स्वास्थ्याच्या काळांत उभारलीं. त्याचप्रमाणें राष्ट्राच्या रक्षणासाठीं मंदिरांहून अधिक किल्ले उभारले, मुख्यत्वेंकरून सह्याद्रीवर. भवानीच्या प्रसादानें मालोजीला वारुळांत धन सांपडलें, त्याचा व्यय त्यानें घोडदळाच्या उभारणींत केला. शिवाजीला जागोजाग गुप्त धन सांपडलें, त्यानें जागोजाग लुटालूट करून अपरंपार द्रव्य संपादन केलें. तरीही तो लक्ष्मीच्या आहारीं गेला नाहीं. या द्रव्यप्राप्तीमुळें शिवाजीची झोंप उडाली नाहीं. त्याची झोंप अगोदरच उडाली होती; स्वातंत्र्यसंपादनाच्या तळमळीमुळें, आक्रमकांवर झेंप घेण्याच्या अधीर आवेशामुळें. स्वसंपादित द्रव्याचा व्यय शिवाजीनें स्वातंत्र्यसंपादनासाठीं किल्ल्यांच्या उभारणींत केला. त्यानें असें केलें नसतें तरच त्याची संपत्ति ही हरामकमाई ठरली असती. शिवाजीनें अशी तरतूद करून ठेवली, म्हणूनच पुढें महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचें रक्षण होऊं शकलें. काय त्याला संगमवरी मंदिरें उभारतां आलीं नसतीं? यासाठीं पुरेशी संपत्ति त्याच्या हातीं होती, हें निश्चित. महाराष्ट्रांत संगमरवर अनुपलब्ध आहे आणि हा रांगडी मुलूख कलाकौशल्यापासून अलिप्त आहे, म्हणून त्यानें अशीं मंदिरें उभारलीं नाहींत कीं काय? दगड व कारागीर कोठूनही आणवितां आले असते. काय त्यानें अशीं मंदिरें व राजवैभव पाहिलेंच नव्हतें? दिल्लीच्या सुलतानांची सत्ता नष्ट होऊन अनेक वर्षें लोटलीं आहेत, त्यांच्या किंवा त्यांच्या वंशजांच्या नांवानें वेळींअवेळीं तर्पण करणाऱ्या त्यांच्या पक्षपात्यांच्या हातीं ती सत्ता अंशरूपानेंही फिरून येण्याचा यत्किंचितही संभव राहिलेला नाहीं; तरीही दिल्ली व आग्रा येथील निर्मनुष्य शाही किल्ले व त्यांतील महाल पाहतांना आतांही छाती दडपून जाते! सुलतानांची सत्ता, सामर्थ्य व वैभव यांची आतां कल्पनाही करतां येणार नाहीं इतकीं तीं अपरंपार असलीं पाहिजेत. तीं पराकाष्ठेला पोंचलीं होतीं तेव्हां जिवावर व धर्मावर उठलेल्या शत्रूंनीं भरलेल्या भर दरबारांत एकाकी शिवाजी दिपून गेला नाहीं, दिल्लीश्वराच्या विश्वासघातामुळें हतबुद्ध झाला नाहीं; त्यानें औरंगजेबाच्या नजरेला नजर भिडविली, आवेशानें

फुगलेल्या छातीवर त्वेषानें आंवळलेली मूठ आपटून तरवारीला हात घातला व या छोट्या मराठ्यानें बड्या बादशाहीला आव्हान दिलें; आणि हें सारें वैभव पाहून मायदेशीं परत आल्यावर स्वतःसाठीं शाही धर्तीचा संगमरवरी रंगमहाल उभारण्याचा विचारही मनांत न आणतां किल्लेकोटांच्या व आरमाराच्या उभारणीवर त्यानें आपलें सर्व द्रव्य व दक्ष लक्ष केंद्रित केलें; यांतच शिवाजीच्या निष्ठेचें व उद्दिष्टांचें सार आहे असें मला वाटतें. शिवाजीची बुद्धि चळली नाहीं; कारण तो सह्याद्रीचा सुपुत्र होता. अबू पहाडावर अद्वितीय मंदिरें उभारण्यासाठीं उधळण्यांत आलेली संपत्ति किल्ले व सैन्यें उभारण्यांत खर्च झाली असती तर सौराष्ट्राचें स्वातंत्र्य व वीर्य एवढ्या तडकाफडकीं नष्ट झालें नसतें. सह्याद्रीच्या प्रेरणेनें शिवाजीनें जागोजाग दुर्ग उभारले, शेतकऱ्यांचें शौर्य जागृत केलें, शूरांचें कर्तृत्व स्वातंत्र्योन्मुख केलें. त्यानें महाराष्ट्राला संजीवनी महामंत्र दिला. यामुळें आत्मसमर्पणाला सदैव सज्ज असलेल्या वीरांचें सहकार्य त्याला प्राप्त झालें; यामुळें महाराष्ट्रांत वीरात्म्यांची व हुतात्म्यांची अखंडित परंपरा निर्माण झाली. हा सह्याद्रीचा प्रसाद!

सह्याद्रीनें महाराष्ट्राच्या भूमीची घडण केलेली आहे, इतकेंच नव्हे, महाराष्ट्राच्या मनोभूमीचीही. बाह्यतः खडबडीत, पण अंतर्यामीं एकनिष्ठ; बाह्यतः निर्जल, अंतर्यामीं वत्सल! सह्याद्रि हें या वृत्तीचें आदिकारण. म्हणूनच सह्याद्रि परम पवित्र आहे, हिंदुस्थानातील पर्वतांत अद्वितीय आहे.

## सह्याद्रि-स्तोत्र :

पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं पांच महातत्त्वें. चैतन्य हें त्यांचें समीकरण. युगायुगांच्या प्रक्रियेनें मानवदेह उत्क्रांत झाला; युगायुगांच्या संस्कारांनीं संस्कृति उत्क्रांत झाली. मनुष्य स्थलजन्य आहे, स्थलचर आहे. मानवी शरीराचे सर्व रासायनिक घटक मृत्तिकेंत आहेत. मनुष्य ज्या भूमीवर जन्माला येतो तिचे गुणधर्म त्याला जन्मतः प्राप्त होतात, तिच्या प्रभावामुळेंच त्यांचें संवर्धन होतें. म्हणूनच आपण

मृत्तिकेच्या पार्थिवाची व ग्रामदेवतेच्या पाषाणाची पूजा करतों. मातेची पूजा ही जगन्मातेची पूजा, मानवतेची पूजा; त्याचप्रमाणें ग्रामदेवतेची पूजा ही मातृभूमीची पूजा, धरित्रीमातेची पूजा. वैयक्तिक पूजनासाठीं या आदिशक्तींची व्याप्ति आपण आपल्या सामर्थ्याच्या प्रमाणांत मर्यादित करीत असतों. आदिशक्तीचें ध्यान अज्ञ भक्त नाममात्रानें करतो आणि ज्ञाता सहस्रनामांनीं. ध्यानाची सांगता व्याप्तीवर नव्हे, उत्कटतेवर, तन्मयतेवर अवलंबून असते.

सह्याद्रीची पूजा ही मातृभूमीची पूजा; भारतमातेची पूजा.

आम्ही सह्याद्रीची पूजा करतों; कारण तोच आम्हांला जन्म देतो व आमचें पोषण करतो; आणि अखेरीस आम्हांला त्यांतच विलीन व्हावयाचें आहे!

सह्याद्रीकडे पाहून कोणाही महाराष्ट्रीयानें म्हणावें,

आहे रक्त तुझेंच खेळत पहा या रोमरोमांतुनी!

हिंदुस्थानचा मूलाधार असलेल्या ह्या परमसमर्थ महाराष्ट्रपित्याचें पूजन कसें करावयाचें? त्याचीं प्रतीकें कोणतीं? या आराधनेचें फल काय? त्याचें स्तोत्र कोणतें?

भूप्रदेशांचें जें स्वाभाविक वैशिष्ट्य किंवा तेथें स्थायिक झालेल्यांच्या अंतर्यामाची व कर्तृत्वाचीं जी निशाणी, तीं त्या प्रदेशाचीं प्रतीकें.

काळयाभोर कड्यांनीं वेढलेलीं उत्तुंग शिखरें हें सह्याद्रीचें वैशिष्ट्य.

अग्रभागीं देवदेवेश्वर महादेवाचीं किंवा देवदेवेश्वरी महाशक्तीचीं मंदिरें धारण करणारीं शिखरें हीं सह्याद्रीच्या पावित्र्याचीं प्रतीकें.

सह्याद्रीच्या शिखरावरील मंदिरें अगदीं साधीं व छोटीं आहेत; आमच्या बांध्यांशीं सदृश, आमच्या वृत्तीशीं अनुरूप व ऐपतीला साजेशीं. हीं बहुजनसमाजाचीं पूजास्थानें. येथें त्यांना अगम्य असलेल्या सुसंस्कृतांच्या अगाध ज्ञानाचा मागमूसही नाहीं, त्यांना अपरिचित असलेल्या सुसंपन्नांच्या अपरंपार वैभवाचा बडिवार नाहीं; भक्त व देव यांमध्यें त्रयस्थाची मध्यस्थी नाहीं. या स्वयंभू देवतांच्या दर्शनाला दिवसा-उजेडीं गाई येतात, त्यांवर दुधाचा अभिषेक करून जातात;

रात्रीं-अपरात्रीं व्याघ्र येतात आणि देवाच्या द्वारीं घटकाभर बसून परत जातात; माणसाची चाहूल नसेल तेव्हा नागराज त्यांना प्रदक्षिणा घालतात आणि त्यांवर फणा धरतात! मंदिरांभोंवतालच्या गर्द वृक्षांवर वसंत ताजीतवानी पालवी उमलवतो; त्यांच्या परिसरांत वर्षा फुलें फुलवितो; हीं मंदिरें अधिष्ठित असलेल्या शिखरांच्या स्कंधांवर शरद् शुभ्र मेघमाला चढवितो!

सचेतन व अचेतन सृष्टि ज्याची आराधना करते अशा या महास्थानांचें दर्शन हें सह्याद्रीच्या पावित्र्याचें पूजन!

घाटमाथ्यावरील गडकोट हीं सह्याद्रीच्या स्वातंत्र्यप्रेरकतेचीं प्रतीकें; महाराष्ट्राच्या धारणा व प्रतिकारशक्तीचीं. त्यांचीं व्यावहारिक उपयुक्तता नष्ट झाली हा काळाचा महिमा! म्हणून त्यांचें माहात्म्य नष्ट झालें कीं काय? नाहीं. समतावादी, विश्वशांतीचे पुरस्कर्ते व नवयुगाचे प्रवर्तक सांगतील कीं हीं मृत मध्ययुगाचीं हाडकें आहेत. असतील; मात्र तीं या चालत्याबोलत्या सांगाड्यांहून अधिक जिवंत आहेत. अस्थि असल्याच तर त्या दधीचाच्या आहेत.

गडकोटांचें दर्शन हें सह्याद्रीच्या स्वातंत्र्यप्रेरकतेचें पूजन!

सह्याद्रींतील लेणीं हीं महाराष्ट्राच्या सुसंस्कृततेचीं प्रतीकें; सह्याद्रीच्या कणखर पण निर्मळ अंतरात्म्याचीं; महाराष्ट्राच्या जयघोषाचीं व सहिष्णुतेचीं; श्रमसातत्याचीं व कलात्मकतेचीं.

त्यांचें दर्शन हें सह्याद्रीच्या संस्कृतीचें पूजन!

महाराष्ट्राच्या उज्ज्वल भूतकाळाच्या या प्रतीकांनजीकच आमच्या भावी वैभवाचीं मूलस्थानें आहेत.

सह्याद्रीची वृत्ति प्रतिसहकारी आहे; मळईमैदानांइतकी सहकारी नाहीं; खाऱ्या वाळवंटांइतकी असहकारी नाहीं. पाटपाणी व पाणवीज यांच्या संचयाचीं व निर्मितीचीं अनेक स्थानें सह्याद्रींत आहेत.

त्यांचें दर्शन हें सह्याद्रीच्या आदिशक्तीचें पूजन!

प्रतीकांचें माहात्म्य मनीं आणून या महास्थानांचें दर्शन घ्यावें व मनोमन पूजन करावें. पूजन करतांना भक्तिभावानें श्रीफल अर्पावें. एवढाच या महापूजेचा विधि!

श्रीफल अर्पावें, कारण श्रीफल हें सह्याद्रीचें प्रतीक आहे. सह्याद्रीच्या परिसरांत तांदूळ व श्रीफल हीं सर्वत्र व सदैव पैदा होतात. हींच अपरांताचीं प्रतीकें. सर्वारंभीं तांदूळ व प्रत्येक संस्कारांत श्रीफल हीं लागतातच. नारळीला कोंकणांत कल्पवृक्ष म्हणतात. जितका सुंदर तितकाच उपयुक्त; गंभीर व सात्त्विक; सडपातळ व चिरंजीव. खाऱ्या वाऱ्यावर पोसतो पण गोडींत अमृताला लाजवतो!

सह्याद्रि हा दुर्बल वन्यांचा आणि निर्वासितांचा आश्रयदाता. अपरान्तांत स्थायिक झालेल्या निर्वासितांची महाराष्ट्र हीच मातृभूमि. ही वृत्ति प्राप्त करून घेण्यासाठीं त्यांनीं अग्निपानीय व्रत केलेलें आहे. सह्याद्रीचें औदार्य ध्यानांत घेऊन आपण सह्याद्रिखण्डाची वृत्ति नष्ट केली पाहिजे. वन्य जमातींच्या मराठीकरणावर शक्तिसर्वस्व एकत्रित केलें पाहिजे.

या दृष्टीनें व हेतूनें जो जें करील तें सह्याद्रीचें खरेंखुरें पूजन!

परशुराम हा विष्णूचा अवतार. परशु व वेदि हीं त्याचीं प्रतीकें; रक्तरंजित परशु नव्हे, दुर्बलांच्या परित्राणासाठीं व दुष्कृतांच्या उच्छेदासाठीं उगारलेला विद्युत्प्रभ परशु. शिवाजी हा शंकराचा अवतार. गडकोट व भवानी तलवार हीं त्याचीं प्रतीकें; वाघनख नव्हे. हे दोघे एकामेकांना किती जवळचे आहेत याची आपणांस जाणीवही राहिलेली नाहीं. शिवाजीचा जन्म वैशाख शुद्ध द्वितीयेचा आणि परशुरामाचा वैशाख शुद्ध तृतीयेचा. तिथिक्षय झाला तर दोघांच्याही जयंती एकाच दिवशीं येतात. दोघेही मातृभक्त. दोघांच्याही पित्यांना उन्मत्तांचा उपसर्ग कमीअधिक प्रमाणात पोंचलेला. दोघेही शंकराचे भक्त. दोघांनाही पुरुषप्रकृतींपासून दिव्य अस्त्रें प्राप्त झालीं. दोघेही एकाच युद्धपद्धतींचे पुरस्कर्ते; दलितांचे उद्धारक; उन्मत्तांचे उच्छेदक, साम्राज्यांचे विध्वंसक, स्वातंत्र्याचे प्रस्थापक; आणि अपरान्ताचे स्वामी. दोघांनींही सागराला जिंकलें. जिंकलेली पृथ्वी परशुरामानें कश्यपाला दान दिली आणि शिवाजीनें रामदासाला. आणि दोघांचींही निवासस्थानें सह्याद्रींत!

या दोघांच्याही जयंती सह्याद्रीच्या परिसरांत सर्वत्र साजऱ्या केल्या

पाहिजेत. वैशाख शुद्ध द्वितीयेच्या रात्रीच्या प्रथमार्धी शिवाजीची व उत्तरार्धी परशुरामाची.

भगवा झेंडा हें मराठी क्षात्रवृत्तीचें प्रतीक; आणि मराठी भक्ति-भावाचेंही. संन्यस्त ज्ञानेश्वरांच्या वस्त्रांचा वर्ण भगवा, रामदासांच्या छाटीचा रंग भगवा, हें मराठी बहुजनसमाजाच्या स्थायीभावाचें प्रतीक. सह्याद्रींतील मंदिरांच्या शिखरांवर, येथून आघाडीवर निघणाऱ्या मराठी सैन्यांच्या अग्रभागीं, पंढरीकडे लोटणाऱ्या वारकऱ्यांच्या खांद्यां-वर भगवे झेंडे फडकत असतात. उत्तर हिंदुस्थानी भगव्यांत गुलाबी छटा असते. मराठी भगवा हा साध्या गेरूचा गडद रंग; हा सह्याद्रीच्या परिसरांतील तांबडमातीचा रंग. सह्याद्रीवर कोठेंही उभे राहून पहा, आसमंतांत भगवा झेंडा डोलतांना दिसतोच. सकाळीं—संध्याकाळीं तर भगवा झेंडा आभाळांत फडकतांना दिसतो! म्हणूनच सह्याद्रीचें ध्यान करतांना महाराष्ट्रभक्त म्हणतो,

जे झेंडे दिसतात नाचत तुला ते तेच माझ्या मनीं!

वस्तुतः या झेंड्याचा मराठ्यांनींच आग्रह धरावयास हवा, विशेषतः महाराष्ट्राच्या लोकप्रतिनिधींनीं व भारताच्या सैन्यांत सामील झालेल्या महाराष्ट्रीयांनीं, कीं मराठ्यांचें नांव धारण करणाऱ्या पलटणींच्या अग्रभागीं भगवा झेंडाच असला पाहिजे! पण दुर्दैवानें हा झेंडा आतां त्यांचा त्यांनाच नकोसा झालेला आहे. कारण, नवयुगाचे प्रवर्तक सांगतात, भगव्या झेंड्याला ब्राह्मण्याचा उग्र दर्प येतो, हिंदुत्वाची कुबट घाण येते! ज्यांच्या नांवानें नवयुगाची प्रस्थापना करण्यासाठीं राष्ट्रीय कार्यकर्ते झटत आहेत ते भगवान् बुद्ध कषायवस्त्रें परिधान करीत होते, बौद्ध भिक्खु अजूनही भगवीं वस्त्रें धारण करतात, असें सांगितलें तरी त्यांची या बाबतची शिसारी नाहींशी होत नाहीं. संयम व सहिष्णुता यांचे गोडवे गाणाऱ्या बहुजनसमाजाचा या पुरातन व पवित्र प्रतीकाविरुद्ध आवेश किती ज्वलंत? घरावर भगवा झेंडा लावणें म्हणजे आपखुषीनें जाणूनबुजून अग्न्यस्त्राला आवाहन करणें!

वेदि हें परशुरामाच्या सर्वसंग्रहपरित्यागाचें व पृथ्वीदानाच्या महा-पुण्याचें प्रतीक; पण या धगधगत्या यज्ञकुण्डाचें अधिष्ठान 'शापादपि-

शरादपि ' अशा जाज्वल्य ब्राह्मण्यावर आहे; आणि अलीकडे ब्राह्मण्याची वैयक्तिक जाणीव निःशब्द असली तरी तिरस्करणीय बाब झालेली आहे. परशुरामाचा परशु, शालिवाहनाचें धनुष्य आणि शिवाजीची तलवार यांचें अधिष्ठान हिंसाप्रधान आक्रमक क्षात्रवृत्तीवर आहे; पण अलीकडे, अलीकडच्या भाषेंत सांगतां, क्षात्रवृत्ति मंदींत आहे! गडेकोटांचे बुरूज व महाद्वारें हीं अतिक्रामक साम्राज्यवृत्तीचीं प्रतीकें; चैत्यगवाक्ष हें मृत्यूचें आणि निदान हिंदुस्थानांत तरी मृतवत् व बहिष्कृत धर्माचें प्रतीक. अतएव हीं प्रतीकें त्याज्य, निदान अमान्य.

मग संपूर्ण महाराष्ट्राला मान्य होण्याजोगें, जातीयता व प्रांतीयता यांपासून सर्वस्वीं अलिप्त आणि वैशिष्ट्यपूर्ण असें सह्याद्रीचें प्रतीक कोणतें?

दीपमाळ!

दीपमाळ हें महाराष्ट्राचें शिल्पवैशिष्ट्य. सह्याद्रीच्या एकाकी सुळक्याचें प्रात्यक्षिक. आद्य धर्मभावनेचें प्रतीक!

सह्याद्रींत अशीं अनेक मंदिरें आहेत, मुख्यत्वेंकरून शक्तिमंदिरें, कीं ज्यांच्या नजीक अलंघ्य उत्तुंग सुळके आहेत. कपारींतून सरसर चढणाऱ्या सराइतांना दिवसाउजेडींही त्यांवर जातां येत नाहीं. महोत्सवाच्या मध्यरात्रीं अंगीं अज्ञात शक्तींचा संचार झालेला भक्त, अंधारांत, एकटा या सुळक्यावर चढून जातो, झेंडा रोंवतो, चूड पेटवितो आणि पहाटेच्या आंत परत येतो.

सह्याद्रीच्या या आद्य व वन्य पूजेच्या प्रथेचीं दीपस्तंभ व दीपमाळ हीं ग्रामीण व नागरी, प्राकृत व संस्कृत स्वरूपें.

महाराष्ट्राला हें वैशिष्ट्यपूर्ण प्रतीक सह्याद्रीच्या कृपेनें प्राप्त झालेलें आहे.

सह्याद्रीच्या विविध शक्तींचें दर्शन व पूजन, ध्यान व आराधना केल्यानें फलप्राप्ति काय होते?

शरीर कणखर होतें; कणा ताठ होतो, छाती रुंदावते. मन प्रसन्न होतें, चित्त शुद्ध होतें. दृष्टिक्षेत्र विस्तारतें, आकांक्षा उंचावतात. शौर्य व धैर्य प्राप्त होतें. निष्ठा दृढ होते, कर्तृत्व प्रखर होतें. श्रमशक्ति

वृद्धिंगत होते. प्रतिकारशक्ति प्रज्वलित होते. दारिद्र्याची कदर व संकटांची डर नष्ट होते. स्वार्थत्यागाची व अंगीकृत कार्यावर लक्ष केंद्रित करण्याची प्रेरणा होते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे या व्रतांमुळें अंगीं मराठी बाणा येतो आणि हा ज्याच्या अंगीं असेल त्याचेजवळ नाहीं असें असण्यासारखें जगांत काय आहे?

अखेरीस सह्याद्रीचें स्तोत्र सांगतों —

सह्याद्रि नामा नग हा प्रचण्ड,
हा दक्षिणेचा अभिमानदण्ड ।
ज्वालामुखींनीं जरि निर्मियेला,
पवित्र तो रामपदें जहाला ॥
शिरावरी शंभु विराजताहे,
कन्याकुमारी पद धूत आहे ।
स्कंधांवरी दुर्गम दुर्ग ज्याच्या,
हातीं झळाळे परशू तयाच्या ॥
उन्मत्त-निर्दालन-दक्ष राही,
निर्वासितां आश्रय लाभ देई ।
ही पुण्यभूमी तशी त्यागभूमी
स्वातंत्र्यभूमी तशी कर्मभूमी ॥
आधार, आदर्श हि भारताला,
प्रसाद त्याचाच अम्हां मिळाला ।
झेंडा तयाचा भगवा विराजे,
तयापुढें मस्तक नम्र माझें ॥

---

